( ४२ )

काय माझें नेती वाईट ह्मणोन ॥ करूं समाधान कशासाठीं ॥ १ ॥
काय मज लोक नेतील परलोका ॥ जातां कोणी नरका नीवारील॥२॥
न ह्मणें कोणासी उत्तम वाईट ॥ सुखें माझी कूट खावो मागे ॥ ३ ॥
सर्व माझा भार असे पांडुरंगा ॥ काय माझें जगासवें काज ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें सर्व ही साधन ॥ नामसंकीर्तन विठोबाचें ॥ ५ ॥

( ४३ )

नाशवंत देह नासेल हा जाण ॥ कां रे उच्चाराना वाचे नाम ॥ १ ॥
नामेंची तारीले कोट्यान ही कोटी ॥ नामेंचि वैकुंठीं बैसवीले ॥ २ ॥
नामापरतें सार नाहीं त्रिभूवनीं ॥ तें कां तुम्ही मनीं आठवाना ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाम वेदांसी आगळें ॥ तें दिल्हें गोपाळें फुकासाठीं ॥ ४ ॥

( ४४ )

सांगों जाणती शकुन ॥ भूत भविष्य वर्तमान ॥ १ ॥
त्यांचा आम्हांसी कंटाळा ॥ पाहों नावडती डोळा ॥ २ ॥
रिद्धिसिद्धीचे साधक ॥ वाचासिद्ध होती एक ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाती ॥ पुण्यक्षयें अधोगती ॥ ४ ॥

( ४५ )

ठाकलोंसें द्वारीं ॥ उभा याचक भीकारी ॥ १ ॥
मज भीक कांहीं देवा[1] ॥ प्रेम भातुकें पाठवा ॥ २ ॥
याचकाचा भार ॥ नये घेऊं वेरझार ॥ ३ ॥
तुका ह्मणे दान ॥ सेवा घेतल्या वांचून ॥ ४ ॥

( ४६ )

सत्यसंकल्पाचा दाता नारायण ॥ सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥
येथें अळंकार शोभती सकळ ॥ भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥
अंतरींचें बीज जाणे कळवळा ॥ व्यापक सकळा ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी ॥ प्राप्तकाळ-घडी आल्यावीण ॥ ४ ॥

( ४७ )

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी ॥ मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
थोरीव सांडीली आपूली परीसें ॥ नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥

---

१ देवबा.

जगाच्या कल्याणा संतांच्या वीभूती ॥ देह कष्टवीती उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें भांडवल संतां ॥ आपूल्या ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे सूख पराचीया सूखें ॥ अमृत हें मुखें स्रवतसे ॥ २ ॥

( ४८ )

अवघा तो शकून ॥ ह्रदयीं देवाचे चरण ॥ १ ॥
येथें नसतां वीयोग ॥ लाभा उणें काय मग ॥ २ ॥
संग हरीच्या नामाचा ॥ शुचिर्भूत सदा वाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे हरिच्या दासा ॥ शूभकाळ अवघ्या दिशा ॥ ४

( ४९ )

पतीतपावना ॥ दीनानाथा नारायणा ॥ १ ॥
तुझें रूप माझे मनीं ॥ राहो नाम जपो वाणी ॥ २ ॥
ब्रह्मांडनायका ॥ भक्तजनाच्या पाळका ॥ ३ ॥
जीवींचीया जीवा ॥ तुका ह्मणे देवदेवा ॥ ४ ॥

( ५० )

धेनु चरे वनांतरीं ॥ चित्त बाळका पें घरीं ॥ १ ॥
तैसें करी वो माझे आई ॥ ठाव देउनी राखें पायीं ॥ २ ॥
काढितां तळमळी ॥ जीवना बाहेर मासोळी ॥ ३ ॥
तुका ह्मणे कुडी ॥ जीवप्राणाची आवडी ॥ ४ ॥

( ५१ )

म्हणे विठ्ठल ब्रह्म नव्हे ॥ त्याचे बोल नायिकावे ॥ १ ॥
मग होकां कोण्ही एक ॥ आदि करुनी ब्रह्मादिक ॥ २ ॥
नाहीं विठ्ठल जया ठावा ॥ तो ही डोळां न पाहावा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं ॥ त्याचि भीड मज कांहीं ॥ ४ ॥

( ५२ )

पोट लागलें पाठीसी ॥ हिंडवीतें देशोदेशीं ॥ १ ॥
पोटाभेणें जिकडे जावें ॥ तिकडे पोट येतें सवें ॥ २ ॥
जप तप अनुष्ठान ॥ पोटासाठीं झाले दीन ॥ ३ ॥
पोटें सांडीयेली चवी ॥ नीचापुढें तें नाचवी ॥ ४ ॥
पोट कशियानें भरे ॥ तुका म्हणे झुर झुरूं मरे ॥ ५ ॥

( ५३ )

सर्वां भूतीं द्यावें अन्न ॥ द्रव्य पात्र विचारून ॥

उपतिष्ठे कारण ॥ तेथें बीज पेरीजे ॥ १ ॥
पुण्य करितां होय पाप ॥ दूध पाजुनी पोसिला साप ॥
करुनी अघोराचा जप ॥ दुःख विकत घेतलें ॥ २ ॥
भूमी पाहातां नाहीं वेगळी ॥ माळ बरड एक काळी ॥
उत्तम निराळी ॥ मध्यम आणि कनिष्ठ ॥ ३ ॥
म्हणोनी विवेकें ॥ कांहीं करणें ते निकें ॥
तुका म्हणे फिकें ॥ रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

( ५४ )

कन्येचा जे नर करीती वीकरा ॥ ते जाती अघोरा नरकपाता ॥ १ ॥
नाम गाउनीयां द्रव्य जे मागती ॥ नेणों तयां गती कैसी होय ॥ २ ॥
कैसें होईल त्यांचें तेच हो जाणती॥आम्हांसी संगती नलगे त्यांची ॥३
आमुचा सांगाती आहे तो श्रीहरी ॥ नलगे दुराचारी तुका म्हणे ॥४॥

( ५५ )

साधूच्या दर्शना लाजसी गव्हांरा ॥ वेश्येचीये घरा हर्षें जाशी ॥ १ ॥
वेश्या दासी मुरळी जगाची ओंवळी ॥ ते तूज सोंवळी वाटे कैशी॥२॥
तुका म्हणे आतां लाज धरी लुच्या॥टांचराच्या कुच्या मारा वेगीं ॥३॥

( ५६ )

दुर्बुद्धि ते मना ॥ कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥
आतां मज ऐसें करीं ॥ तुझे पाय चित्तीं धरी ॥ २ ॥
उपजला भावो ॥ तुझे कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां ॥ लाभ नाहीं या परता ॥ ४ ॥

( ५७ )

साखरेच्या गोण्या बैलाचीये पाठीं ॥ तयासी शेवटीं करबाडें ॥ १ ॥
मालाचे पैं पेटे वाहताती उंटें ॥ तयांलागीं कांटे भक्षावया ॥ २ ॥
वाऊगा हा धंदा आशा वाढवीसी ॥ बांधोनीयां घेसी यमा हातीं ॥ ३ ॥
ज्यासी असे लाभ तोची जाणे गोडी ॥ येरवीं बापूडीं शिणलीं वायां॥४॥
तुका म्हणे शाहाणा होयीरे गव्हांरा ॥ चौऱ्यांशीचा फेरा फिरों नको॥५॥

( ५८ )

मुख्य ते गळाली पाहिजे अहंता ॥ उपदेश घेतां सूख वाटे ॥ १ ॥
व्यर्थ भाराभर केलें पाठांतर ॥ जोंवरी अंतर शुद्ध नाहीं ॥ २ ॥

घोडें काय थोडें वागवीतें ओझें ॥ भावाविण वांझें पाठांतर ॥ ३ ॥
तुका म्हणे धरा निष्ठावंत भाव ॥ जरी पंढरिराव पाहिजे तो ॥ ४ ॥

( ५९ )

जेथें कीर्तन करावें ॥ तेथें अन्न न सेवावें ॥ १ ॥
बुका लाऊं नये भाळा ॥ माळ घालूं नये गळां ॥ २ ॥
तट्टा वृषभासी दाणा ॥ तृण मागों नये जना ॥ ३ ॥
तुका म्हणे द्रव्य घेती ॥ देती तेही नरका जाती ॥ ४ ॥

( ६० )

कंई वाहावें जीवन ॥ कंई पलंगीं शयन ॥ १ ॥
जैसी जैसी वेळ पडे ॥ तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥
कंई भोज्य नाना परी ॥ कंई कोरड्या भाकरी ॥ ३ ॥
कंई बैसावें वाहनीं ॥ कंई पाईं अनवाणी ॥ ४ ॥
कंई उत्तम प्रावर्णें ॥ कंई वसनें तीं ही जीर्णें ॥ ५ ॥
कंई सकळ संपत्ती ॥ कंई भोगणें विपत्ती ॥ ६ ॥
कंई सज्जनासि संग ॥ कंई दुर्जनासीं योग ॥ ७ ॥
तुका म्हणे जाण ॥ सुख दुःख तें समान ॥ ८ ॥

( ६१ )

कासया पाषाण पूजीती पीतळ ॥ अष्ट धातू खळ भावहीन ॥ १ ॥
भावची कारण भावची तारण ॥ मोक्षाचें साधन बोलीयेलें ॥ २ ॥
काय करिल जप-माळ कंठ-माळा ॥ करिसी वेळोवेळां विषयजप ॥ ३ ॥
काय करिसील पंडित होउनी ॥ अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥
काय करिसील कूशल गायन ॥ अंतरीं मळीन कुबुद्धि तो ॥ ५ ॥
तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा ॥ तेणें काय देवा योग्य होसी ॥ ६ ॥

( ६२ )

साधकाची दशा उदास असावी ॥ उपाधी नसावी अंतर्बाह्य ॥ १ ॥
लोभातें टाकावें निद्रेतें जितावें ॥ भोजन करावें पूरीमित ॥ २ ॥
एकांतीं लोकांतीं स्त्रीयांसीं भाषण ॥ प्राण गेल्या जाण करूं नये ॥ ३ ॥
संग सज्जनाचा उच्चार नामाचा ॥ घोष कीर्तनाचा अहर्निशी ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे ॥ तया ज्ञान लाहे गुरुकृपें ॥ ५ ॥

( ६३ )

कासया गा मज घातलें संसारीं ॥ चित्त पायांवरी नाहीं तुझ्या ॥ १ ॥

कासया गा मज घातलें ह्या जन्मा ॥ नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥ २ ॥
नामावीण माझी वाचा अमंगळ ॥ ऐसा कां चांडाळ निर्मीयेला ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी जळो जळो काया ॥ विठ्ठला सखया वांचुनीयां ॥ ४ ॥

( ६४ )

माता कापी गळा ॥ तेथें कोण राखे बाळा ॥ १ ॥
हें का नेणा नारायणा ॥ मज चाळवीतां दीना ॥ २ ॥
नागवें धांवणें ॥ तेथें साह्य व्हावें कोणें ॥ ३ ॥
राजा सर्व हरी ॥ तेथें दुजा कोण वारी ॥ ४ ॥
तुझ्या केल्यावीण ॥ नव्हे स्थीर वश मन ॥ ५ ॥
तुका म्हणे हरी ॥ सूत्र तुम्हा हातीं दोरी ॥ ६ ॥

( ६५ )

परद्रव्य परनारी ॥ अभिलाषुनी नाक धरी ॥ १ ॥
जळो तयाचा आचार ॥ व्यर्थभार वाहे खर ॥ २ ॥
सोंवळ्याची स्फीती ॥ क्रोधें विटाळला चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सोंग ॥ दावी बाहेरील अंग ॥ ४ ॥

( ६६ )

टिळे टोपी उंच दावी ॥ जनीं मी एक गोंसावी ॥ १ ॥
अवघा वर रंग सारा ॥ पोटीं विषयाचा थारा ॥ २ ॥
मुद्रा लाविती कोरूनी ॥ मान व्हावयासी जनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे किती ॥ नरका गेले पुढें जाती ॥ ४ ॥

( ६७ )

ऐसे संत झाले कळी ॥ तोंडीं तमाखूची नळी ॥ १ ॥
स्नान संध्या बूडविली ॥ पुढें भांग वोढविली ॥ २ ॥
भांग भुर्का हें साधन ॥ पचनी पडे मद्यपान ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघें सोंग ॥ तेथें कैंचा पांडुरंग ॥ ४ ॥

( ६८ )

वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची ॥ कीर्ती मानवाची बोलों नये ॥ १ ॥
उदंडची झाले जन्मोनीयां मेले ॥ होवोनीयां गेले राव रंक ॥ २ ॥
अक्षय अढळ चळेना वळेना ॥ तया नारायणा ध्यात जावें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही विठ्ठल चित्तीं ध्यातां ॥ जन्म मरण व्यथा दूर होती ॥ ४ ॥

( ६९ )

जोडोनीयां धन उत्तम वेव्हारें ॥ उदास वीचारें वेंच करी ॥ १ ॥
उत्तमची गती तो एक पावेल ॥ उत्तम भोगील जीव-खाणी ॥ २ ॥
पर-उपकारी नेणे परनिंदा ॥ परस्त्रिया सदा बहिणी मायी ॥ ३ ॥
भूतदया गायी पशूचें पाळण ॥ तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥
शांतीरूप नव्हे कोणाचें वाच्यत्व ॥ वाढवी महत्व वडिलांचें ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंची आश्रमाचें फळ ॥ परम-पद-बळ वैराग्याचें ॥ ६ ॥

( ७० )

आली सिंहस्थ पर्वणी ॥ न्हाव्या भटां झाली धणी ॥ १ ॥
अंतरीं पापाच्या कोढी ॥ वरी बोडी डोयी दाढी ॥ २ ॥
जें बोडीलें तें निघालें ॥ सांग काय पालटलें ॥ ३ ॥
पाप गेल्याची खुण ॥ नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥
भक्तिभावें वीण ॥ तुका म्हणे अवघा शीण ॥ ५ ॥

( ७१ )

तुज घालोनीयां पूजीतों संपुष्टीं ॥ परी तुझ्या पोटीं चौदा भुवनें ॥ १ ॥
तुज नाचवूनी दाखवूं कौतुक ॥ परी रूप रेख नाहीं तुज ॥ २ ॥
तुजलागीं आम्ही गात असों गीत ॥ परी तूं अतीत शब्दाहूनी ॥ ३ ॥
तुजलागीं आम्ही घातीयेल्या माळा ॥ परी तूं वेगळा कर्तृत्वासी ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां होऊनी परिमित ॥ माझें कांहीं हीत विचारावें ॥ ५ ॥

( ७२ )

हेची थोर भक्ती आवडती देवा ॥ संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥
ठेवीलें अनंतें तैसेंची राहावें ॥ चित्तीं असों द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहील्या उद्वेग दुःखची केवळ ॥ भोगणें तें फळ संचीताचें ॥ ३ ॥
तुका म्हणे घालूं तया वरी भार ॥ वाहूं हा संसार देवा पायीं ॥ ४ ॥

( ७३ )

धनवंता लागीं ॥ सर्व मान्यता हे जगीं ॥ १ ॥
माता पिता बंधू जन ॥ सर्व मानीती वचन ॥ २ ॥
जंव चाले मोठा धंदा ॥ तंव बहीण म्हणे दादा ॥ ३ ॥
सदा शृंगार भूषणें ॥ कांता लवे बहूमानें ॥ ४ ॥
तुका म्हणे धन ॥ भाग्य अशाश्वत जाण ॥ ५ ॥

( ७४ )

लोहो परीसा स्पर्सलें ॥ सोनेपणासी मूकलें ॥ १ ॥
येथें कोणाचें काय गेलें ॥ ज्याचें तेणें अनहित केलें ॥ २ ॥
गंगा आली आळशावरी ॥ आळशी देखुनि पळे दुरी ॥ ३ ॥
गांवा खालील ओहळे ॥ रागें गंगेसी न मिळे ॥ ४ ॥
तुका म्हणे होऊनी दास ॥ गुरुसी न भजती शिष्य ॥ ५ ॥

( ७५ )

मागेन तें एक तुज ॥ देईं विचारोनी मज ॥ १ ॥
नको दुर्जनासी संग ॥ क्षण क्षणा चित्त-भंग ॥ २ ॥
जन्म घेईन मी नाना ॥ बहू सोसीन यातना ॥ ३ ॥
रंक होईन दीनाचा ॥ घायें देह-पात साचा ॥ ४ ॥
तुका म्हणे हेंचि आतां ॥ देईं देईं तूं सर्वथा ॥ ५ ॥

( ७६ )

लागो नेदीं बोल पायां तुझे हरी ॥ जीव जावो परी न करीं आन ॥१॥
परनारी मज रखुमाई समान ॥ वमनाहूनी धन नीच मानी ॥ २ ॥
तुका म्हणे याची लाज असो कोणा॥साह्यकारी वासना ज्याची तृया ३

( ७७ )

आपूलीया बळें नाहीं बोलवत ॥ सखा कृपावंत वाचा त्याची ॥ १ ॥
साळुंखी मंजूळ बोलतसे वाणी ॥ सीकवीता धनी वेगळाची ॥ २ ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें ॥ परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा ॥ वागवी पांगुळा पायांवीण ॥४॥

( ७८ )

जन हें सुखाचें दिल्या घेतल्याचें ॥ बा अंतकाळीचें नाहीं कोणी ॥१॥
झाल्या हीन शक्ती नाक डोळे गळती॥सांडोनीया पळती रांडा पोरें॥२॥
बाईल म्हणे खरें मरता तरी बरें ॥ नासीलें हें घर थुंकोनीयां ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी न होत हीं कोणी ॥ तुज चक्रपाणी वांचूनीयां ॥४॥

( ७९ )

मोलें घातलें रडाया ॥ नाहीं असूं आणी माया ॥ १ ॥
तैसा भक्तिवाद काय ॥ रंग बेगडीचा न्याय ॥ २ ॥

वेळीं धरिल्या दावी भाव ॥ मागें पळावया पाव ॥ ३ ॥
काजव्याच्या जोती ॥ तुका म्हणे नलगे वाती ॥ ४ ॥

( ८० )

पतित मी पापी शरण आलों तूज ॥ राखीं माझी लाज पांडूरंगा ॥ १ ॥
तारीयेले भक्त नकळे तुझा अंत ॥ थोर मी पतीत पांडूरंगा ॥ २ ॥
द्रौपदी बहीण वैरीं गांजीयेली ॥ आपणा ऐसी केली पांडूरंगा ॥ ३ ॥
प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार ॥ माझा कां विसर पांडूरंगा ॥ ४ ॥
सुदामा ब्राम्हण दरिद्रें व्यापीला ॥ आपणा ऐसा केला पांडूरंगा ॥ ५ ॥
तुका म्हणे तुज शरण निजभावें ॥ पाप निर्दाळावें पांडूरंगा ॥ ६ ॥

( ८१ )

समर्थाची धरिली कास ॥ आतां नाश कशाचा ॥ १ ॥
धावें पावें करिन लाहो ॥ तुमचा अहो विठला ॥ २ ॥
नलगे मज पाहाणें दिशा[१] ॥ हाके सरसा वोढसी ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हें धीर ॥ तुमच्या स्थीर दयेनें ॥ ४ ॥

( ८२ )

वैष्णवा संगतीं सुख वाटे जीवा ॥ आणीक मी देवा कांहीं नेणें ॥ १ ॥
गायें नाचें उडें आपुलीया छंदें ॥ मनाच्या आनंदें आवडीनें ॥ २ ॥
लाज भय शंका दुरावोला मान ॥ न कळे साधन या परतें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां आपुल्या सायासें ॥ आम्हा जगदीशें सांभाळावें ॥ ४ ॥

( ८३ )

लेंकरा लेववी माता अळंकार ॥ नाहीं अंतपार आवडीसी ॥ १ ॥
कृपेचें पोसणें तुमचें मी दीन ॥ तुम्ही संतजन माय बाप ॥ २ ॥
आरुष उत्तरीं संतोषे माउली ॥ कवळूनी घाली ह्रदयाआंत ॥ ३ ॥
पोटा आलें त्याचे न पाहे गुण दोष ॥ कल्याणचि इच्छी असावें हें ॥ ४ ॥
मनाची ते चाली मोहाची ते होय ॥ ओघ गंगा काय परतों जाय ॥ ५ ॥
तुका म्हणे मोठी उदार मेघ-शक्ती ॥ माझी तृषा कीती चातकाची ॥ ६ ॥

( ८४ )

हा मी आलों म्हणे कोणी बूडतया ॥ तेणें कीती तया बळ चढे ॥ १ ॥

---

१ दिशा पाहणें=इकडे तिकडे धुंडणें.

तुम्ही माझा भार घेतला सकळ ॥ आश्वासीलों बाळ अभयकरें ॥२॥
भुकेलीया आस द्यावीतां निर्द्धार ॥ किती होय धीर समाधान ॥ ३ ॥
तुका म्हणे दिल्ही चिंतामणीसाठीं ॥ उचित काचवटी दंडवत ॥ ४ ॥

( ८५ )

कोण्या काळें येईल मना ॥ नारायणा तुमचिया ॥ १ ॥
माझा करणें अंगीकार ॥ सर्व भार फेडूनी ॥ २ ॥
लागली हे तळमळ चित्ता ॥ तरी दुश्चित्ता संसारीं ॥ ३ ॥
इच्छा पूर्ण झाल्या वीण ॥ कैसा शीण वारेल ॥ ४ ॥
कंटाळा तो न धरावा ॥ तुम्ही देवा दासाचा ॥ ५ ॥
तुका म्हणे माझे वेळे ॥ न कळे कांहें उफराटें ॥ ६ ॥

( ८६ )

तूं माझी माउली तूं माझी साउली ॥ पाहातों वाटूली पांडूरंग ॥ १ ॥
तूं मज एकुला वडील धाकुला ॥ तूं मज बापूला सोयरा जीव ॥ २ ॥
तुका म्हणे जीव तुजपाशीं आस ॥ तुजवीण ओस सर्व दीशा ॥ ३ ॥

( ८७ )

घातलें दुकान ॥ देती आलीयासी दान ॥ १ ॥
संत उदार उदार ॥ भरलें अनंत भांडार ॥ २ ॥
मागत्याची पुरे ॥ धणी आणीकासी उरे ॥ ३ ॥
तुका म्हणे पोतें ॥ देवें भरलें नव्हे रितें ॥ ४ ॥

( ८८ )

मज शेवटींचा द्यावा ॥ ठाव तयांची[1] ये देवा ॥
नाहीं करीत मी हेवा ॥ कांहीं थोरपणाचा ॥ १ ॥
पाहा किती आले ॥ शरण समानची केले ॥
नाहीं वीचारिले ॥ गुण दोष कोणाचे ॥ २ ॥
नाहीं पाहिला आचार ॥ कुळ गोत्राचा वीचार ॥
फेडूं आला भार ॥ मग न म्हणे दगड ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व जाणा ॥ तुझ्या आल्यावरी मना ॥
केला तो उगाणा ॥ घडल्या महादोषाचा ॥ ४ ॥

१ त्यांच्या प्रमाणें.

( ८९ )

दुष्टा आचरणासि ग्वाही माझें मन ॥ मज ठावे गुण दोष माझे ॥ १ ॥
आतां तुम्ही सर्व जाणा पांडुरंगा ॥ पाहिजे प्रसंगा ऐसें केलें ॥ २ ॥
व्याह्या जांवयाचे पंगती दुर्बळ ॥ वंचीजे तो काळ नव्हे कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां झालों शरणागत ॥ पुढील उचित तुम्हा हातीं ॥ ४ ॥

( ९० )

जरा[1] कर्णमूळा सांगा आली गोष्टी ॥ मृत्यूची ये भेटी जवळी आली ॥१॥
आतां माझ्या मना होई सावधान ॥ हे पुण्याची जाण कार्यसिद्धी ॥२॥
सेवटील घडी बुडतां नलगे वेळ ॥ साधावा तो काळ जवळी आला ॥३॥
तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता ॥ वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥४॥

( ९१ )

संतासी क्षोभवी कोण्या ही प्रकारें ॥ त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥१॥
देवाचा तो वैरी शत्रू दावेदार ॥ पृथ्वीवरी थार नेदी तया ॥ २ ॥
संतांपाशीं ज्याचा नुरेची विश्वास ॥ त्याचे झाले दोष बळीवंत ॥ ३ ॥

( ९२ )

सेवकासी आज्ञा निरोपासी काम ॥ स्वामीचें तें कर्म स्वामी जाणे ॥१॥
मनाचीं थें मूळीं राहावें बैसोन ॥ आक्रोशावे गुण पायांपाशीं ॥ २ ॥
भेटीचे तांतडी करीतसे लाहो ॥ पाळावा हा देहो ऐसें वाटे ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें करावें कल्याण ॥ आपुलें जतन ब्रीद करा ॥ ४ ॥

( ९३ )

ज्याचा सखा हरी ॥ त्यावरि विश्व कृपा करी ॥ १ ॥
ऐसा असूनी अनुभव ॥ कासावीस होतो जीव ॥ २ ॥
करितां हरीचें चिंतन ॥ त्यासि बाधूं न शके विघ्न ॥ ३ ॥
तुका म्हणे हरी ॥ प्रल्हादासी यत्न करी ॥ ४ ॥

( ९४ )

नाहीं धर्माची वासना ॥ काय करूनी प्रदक्षिणा ॥ १ ॥
असें नव्हे भक्तिवर्म ॥ तेथें नाहीं माझा राम ॥ २ ॥
नये कृपा कांहीं केल्या ॥ नाहीं नेम जीव गेल्या ॥ ३ ॥
जैशी खांडियाची धार ॥ विठ्ठल-पायीं तुका शूर ॥ ४ ॥

---

१ वार्धक्य.

( ९५ )

जाणतें लेकरूं ॥ माता लागे दुरी धरूं ॥ १ ॥
तैसें नकरीं कृपावंते ॥ पांडुरंगे माझे माते ॥ २ ॥
शिंपी आणि जळा ॥ भेटी नव्हे मुक्ताफळा ॥ ३ ॥
तुका म्हणे लोणी ॥ ताक सांडी नीवडूनी ॥ ४ ॥

( ९६ )

मुखीं नाम हातीं मोक्ष ॥ ऐशी साक्ष बहूतांचीं ॥ १ ॥
वैष्णवाचा माल खरा ॥ फुका बरा घावला ॥ २ ॥
नलगे भस्म दंड काठी ॥ तीर्थे आटीं भ्रमण ॥ ३ ॥
तुका म्हणे घटा पटा ॥ नलगे वाटा शोधाव्या ॥ ४ ॥

( ९७ )

आधीं होता वाघ्या ॥ दैवयोगें झाला पाग्या ॥ १ ॥
त्याचा येळकोट राहीना ॥ मूळ स्वभाव जाईना ॥ २ ॥
आधीं होता ग्रामजोशी ॥ राज्यपद आलें त्याशी ॥ ३ ॥
त्याचें पंचांग राहीना ॥ मूळ स्वभाव जाईना ॥ ४ ॥
आधीं होती दासी ॥ पट्टराणी केलें तिसी ॥ ५ ॥
तिचें हिंडणें राहीना ॥ मूळ स्वभाव जाईना ॥ ६ ॥
आधीं होता संतसंग ॥ तुका झाला पांडूरंग ॥ ७ ॥
त्याचें भजन राहीना ॥ मूळ स्वभाव जाईना ॥ ८ ॥

( ९८ )

नाम विठोबाचें घ्यावें ॥ मग पाउल टाकावें ॥ १ ॥
सर्व मुहूर्त शकून ॥ ह्रदयीं विठोबाचें ध्यान ॥ २ ॥
ऐसा असतां हा योग ॥ लाभा उणें काय मग ॥ ३ ॥
तुका म्हणे हरिचे दासा ॥ शुभ काळ सर्व दिशा ॥ ४ ॥

( ९९ )

ज्यासी माता परनारी ॥ त्याचे मुखीं खरा हरी ॥ १ ॥
इतर पोटा साठीं सोंग ॥ तेथें कैंचा पांडुरंग ॥ २ ॥
ज्याला परधन विष ॥ तोचि खरा हरीदास ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य सत्य ॥ कृष्ण पायांची शपत ॥ ४ ॥

( १०० )

जेणें सांडीला संसार ॥ तयावरी माया फार ॥ १ ॥

धांवे चाले मागें मागें ॥ सुख दुःख सोशी अंगें ॥ २ ॥
ज्याणें घ्यांवें नाम ॥ त्याचें करावें तें काम ॥ ३ ॥
तुका म्हणे भोळी ॥ विठ्ठल कृपेची साउळी ॥ ४ ॥

( १०१ )

घेई घेई माझे वाचे ॥ गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
मना तेथें धांव घेई ॥ राहीं राघोबाचे पायीं ॥ २ ॥
डोळे तुम्ही घ्यारे सुख ॥ पाहा विठोबाचें मुख ॥ ३ ॥
तुम्ही आइकारे कान ॥ माझे विठोबाचे गुण ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवा ॥ नको सांडूं या केशवा ॥ ५ ॥

( १०२ )

ब्रह्मरस घेई काढा ॥ तेणें पीडा वारेल ॥ १ ॥
मध्य नाम विठोबाचें ॥ आणिक वाचे न सेवीं ॥ २ ॥
भवरोगा ऐसें जाय ॥ आणिक काय क्षुल्लक ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे बाधा ॥ आणिक कदा भूताची ॥ ४ ॥

( १०३ )

पडतां जड भारी ॥ दासीं आठवावा हरी ॥ १ ॥
मग तो होऊं नेदी शीण ॥ आड घाली सुदर्शन ॥ २ ॥
हरिनामाचे चिंतनें ॥ बारा वाटे पळती विघ्नें ॥ ३ ॥
तुका म्हणे हरी ॥ कांहीं उरूं नेदी उरी ॥ ४ ॥

( १०४ )

नाहीं निर्मळ जीवन ॥ काय करील साबण ॥ १ ॥
वंध्ये न होती लेंकुरें ॥ काय किजे त्या भ्रतारें ॥ २ ॥
नपुंसका पुरुषासी ॥ बाइल काय होय त्यासी ॥ ३ ॥
वृक्ष नेदी पुष्प फळ ॥ काय करील वसंत काळ ॥ ४ ॥
तुका म्हणे भक्तीवीण ॥ फळ कांहीं नाहीं जाण ॥ ५ ॥

( १०५ )

जे का रंजले गांजले ॥ त्यांसी म्हणवी जो आपुले ॥ १ ॥
साधु तोची ओळखावा ॥ देव तेथेंची जाणावा ॥ २ ॥
ज्यासी आपंगिता नाहीं ॥ त्यासी धरी जो ह्रदयीं ॥ ३ ॥
दया करीजे पुत्रासी ॥ तेचि दास आणी दासी ॥ ४ ॥

तुका म्हणे सांगू किती ॥ तोचि भगवंताची मूर्ती ॥ ५ ॥

( १०६ )

नाम घेतां उठाउठी ॥ पडे संसारासी तुटी ॥ १ ॥
ऐसा लाभ बांधा गांठीं ॥ विठ्ठलपायीं पडे मिठी ॥ २ ॥
नामा परतें साधन नाहीं ॥ जे तूं करिशी अणिक कांहीं ॥३॥
हाकारून सांगे तुका ॥ नाम घेतां राहूं नका ॥ ४ ॥

( १०७ )

परावीये नारी माउली समान ॥ मानिलीया धन काय वेंचे ॥ १ ॥
न करीं परनिंदा द्रव्यअभिलाष ॥ कां तुज आयास होती सांग ॥२॥
बैसलीया ठायीं म्हणतां राम राम ॥ काय तुज श्रम होत असे ॥ ३ ॥
तुका म्हणे देव जोडावया सांठीं॥आणिक आटा आम्ही नलगे कांहीं ॥४॥

( १०८ )

आलीया भोगासी असावें सादर ॥ देवावरी भार घालूंनिया ॥ १ ॥
तोची कृपानीधी वारील सांकडें ॥ येर ते बापुडे काय रंक ॥ २ ॥
भवाचीये पोटीं दुःखाचीया राशी ॥ शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जया भार घातलीया ॥ उपेक्षीना तया दीनबंधू ॥ ४ ॥

( १०९ )

तुझा दास ऐसें म्हणती सकळ ॥ म्हणोनी सांभाळ करीं माझा ॥ १ ॥
अनाथाचा नाथ पतीतपावन ॥ हें आतां जतन करीं नाम ॥ २ ॥
नेणो तुझी कैसी करावी ते सेवा ॥ जाणसी केशवा अंतरींचें ॥ ३ ॥
तका म्हणे तूंगा करुणेचा सिंधू ॥ तोडीं भव-बंधू माझा देवा ॥ ४ ॥

( ११० )

तुजवीण वाणूं आणीकाची थोरी ॥ तरी माझी हरी जिव्हा झडो ॥१॥
नेत्र आणीकासी पाहती आवडी ॥ जावोत तेचि घडी चांडाळ हे ॥२॥
कथामृतपान न करिती श्रवण ॥ काय प्रयोजन ह्यांचें मग ॥ ३ ॥
हात पाय तुझे पथीं न चालतां ॥ जावोत अनंता गळोनीयां ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज विसंबीतां क्षण ॥ वांचोनी कारण काय मग ॥ ५ ॥

( १११ )

नरदेहा यावें हरीदास व्हावें ॥ तेणें चूकवावें गर्भवासा ॥ १ ॥
नांहीं तरी वांया शिणवीली माय ॥ नरकासी जाय जन्मो जन्मीं ॥२॥

तीर्थ व्रत दान देवाचें पूजन ॥ ऐसें हें साधन साधकाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे मूर्खी नित्य म्हणे हरी ॥ तया सूखा सरी नाहीं पार ॥ ४ ॥

( ११२ )

कारे नाठवीसी कृपाळू देवासी ॥ पोसीतो जगासी एकलाची ॥ १ ॥
फुटे तरूवर उष्णकाळमासीं ॥ जीवन तयासी कोण घाली ॥ २ ॥
बाळा दुग्ध कोणी केलेंसे उत्पत्ती ॥ वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचें नांव विश्वंभर ॥ करा निरंतर ध्यान त्याचें ॥ ४ ॥

( ११३ )

नारायणीं जेणें घडे अंतराय ॥ होका बाप माय त्यजावी ते ॥ १ ॥
येर प्रिया पुत्रा असे कोण लेखा ॥ करीती ते दुःखा पात्र शत्रू ॥ २ ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधू ॥ तेणें माता निंद्यु भरतें केली ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व धर्म हरी-पाय ॥ आणीक उपाय दुःखमूळ ॥ ४ ॥

( ११४ )

हरीचीया दासा नाहीं भयाचिंता ॥ दुःख नीवारीता पांडूरंग ॥ १ ॥
नलगे वाहाणें संसार उद्योग ॥ जडों नेदी पांग देवराय ॥ २ ॥
असों द्यावा धीर सदा समाधान ॥ तेणें नारायण जवळो केला ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग ॥ व्यापीयेलें जग तेणें येकें ॥ ४ ॥

( ११५ )

तैसे नव्हों आम्ही विठोबाचे दास ॥ यावें आणीकास काकूळती ॥ १ ॥
स्वामीचीये सत्ते ठेंगणें सकळ ॥ आले कळी काळ हाताखालीं ॥ २ ॥
अंकिताचा असे अभीमान देवा ॥ समर्पूनी ठेवा असें पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां इच्छेचें बोलणें ॥ कोड नारायणें पुरवावें ॥ ४ ॥

( ११६ )

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ ॥ त्याचे गळां माळ असो नसो ॥ १ ॥
आत्माअनुभवीं चोखाळील्या वाटा ॥ त्याचे माथां जटा असो नसो ॥ २ ॥
परस्त्रीचे ठायीं जो का नपुंसक ॥ त्याचे आंगा राख असो नसो ॥ ३ ॥
परद्रव्या अंध निंदेसी जो मूका ॥ तोची संत देखा तुका म्हणे ॥ ४ ॥

( ११७ )

न मिळो खावया न वाढो संतान ॥ परि हा नारायण कृपा करो ॥ १ ॥
ऐशी माझी वाणी मज उपदेशी ॥ आणीक लोकांसी हेंची सांगे ॥ २ ॥

विटंबो शरीर होत कां विपत्ती ॥ परी राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे नाशवंत हें सकळ ॥ आठवी गोपाळ तेंची हीत ॥ ४ ॥

( ११८ )

सद्गुरु वांचूनी सांपडेना सोय ॥ धरावे ते पाय आधीं त्याचे ॥ १ ॥
आपणा सारिखे करीती तात्काळ ॥ कांहीं काळवेळ नलगे त्यांशी ॥२॥
लोह परीसासी न साहे उपमा ॥ सद्गुरुमहीमा अगाधची ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें आंधळें हें जन ॥ गेलें विसरून खऱ्या देवा ॥ ४ ॥

( ११९ )

विषयाचें सूख येथें वाटे गोड ॥ पुढें अवघड यमदंड ॥ १ ॥
हाणीती झोडीती मारीती निष्ठुर ॥ यमाचे किंकर बहूसाळ ॥ २ ॥
असीपत्र वन खैराचे विंगळ ॥ निघतील जाळ तैलपाकीं ॥ ३ ॥
तप्तभूमीवरी प्राणी लोळवीती ॥ बळें कवळवीती अग्निस्तंभ ॥ ४ ॥
म्हणोनियां तुका येतो काकूळती ॥ पुरे यातायाती गर्भ-वास ॥ ५ ॥

( १२० )

जननी तें जाणें बाळकाचें वर्म ॥ सुख-दुःख-धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥
अंधापुढें जेणें ठेवीला अंधार ॥ त्याचा तो वीचार तोची जाणे ॥ २ ॥
पोंहणार सांगड्या लावीता कांसेस॥उतारूची त्यास चिंता कीं.हो॥३॥
शरणागता जेणें घातलें पाठीसी ॥ जाणे तयां विशीं राखावया ॥ ४ ॥
तुका म्हणे जीत पिंड तूझे हातीं ॥ देउनी निश्चिंती मानीयेली ॥ ५ ॥

( १२१ )

नको जाउ देउं भंगा ॥ गात्रें माझी पांडूरंगा ॥ १ ॥
हरीकथेची सामुग्री ॥ देह-अवसानावरी ॥ २ ॥
माझें आयुष्य झालें ऊन ॥ परी मज आवडो कीर्तन ॥ ३ ॥
तुका म्हणे हाणी ॥ या वेगळी मना नाणी ॥ ४ ॥

( १२२ )

मुंगियांच्या घरा कोण धाडी मूळ ॥ देखूनीयां गूळ धांव घेती ॥ १ ॥
दुःखें पीडीयेला जाय वैद्य- घरा ॥ दुःख-परिहारा आपूलीया ॥ २ ॥
तुका म्हणे कां रे नकरा स्वहीत ॥ कारण हे प्रीत धरा नामीं ॥ ३ ॥

( १२३ )

टेंकणाचे संगें हीरा जो भंगला ॥ कुसंगें नाडला साधू तैसा ॥ १ ॥

वोढाळाचे संगें सात्वीक नाडले ॥ क्षण एक नासले समागमें ॥ २ ॥
तुका म्हणे धरा सत्संग हा बरा ॥ चुकेल तो फेरा चौऱ्यांशीचा ॥ ३ ॥

( १२४ )

आतां देवा ऐसा करीं उपकार ॥ देहाचा वीसर पडो माझ्या ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा ॥ बरवें केशवराजा कळों आलें ॥ २ ॥
ठाव देईं चित्ता राखें पायापाशीं ॥ सकळ वृत्तीशी अखंडीत ॥ ३ ॥
असे भय लाज चिंता काम क्रोध ॥ तोडावा संबंध यांचा माझा ॥ ४ ॥
मागणें हें देवा तुज एक आतां ॥ नाम मुखीं संतांसंग देईं ॥ ५ ॥

( १२५ )

जरी झाला भाग्यवंत ॥ तरिका भेटेल भगवंत ॥ १ ॥
उंच वाढला येरंड ॥ तरिका होईल इक्षुदंड ॥ २ ॥
जरी गर्धभ वेगीं धांवे ॥ तरि अश्वाचें मोल पावे ॥ ३ ॥
तुका म्हणे तोची थोर ॥ ज्याचे मुखीं रघूवीर ॥ ४ ॥

( १२६ )

विठो पंढरीच्या राया ॥ माझें दंडवत पायां ॥ १ ॥
तुझे कृपेचें पोषणें ॥ माझा समाचार घेणें ॥ २ ॥
नाम धरीयेलें कंठीं ॥ असे अर्थ बहुत पोटीं ॥ ३ ॥
माझे अंतरींचें जाणा ॥ तुका म्हणे नारायणा ॥ ४ ॥

( १२७ )

हेंचि दान दे गा देवा ॥ तुझा वीसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी ॥ हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥
नलगे मुक्ति धन संपदा ॥ संत-संग देईं सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे गर्भवासीं ॥ सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥

( १२८ )

आंधळ्यासी जन अवघेंची आंधळें ॥ आपणास डोळे दृश्य नाहीं ॥ १ ॥
रोगीयासी वीषतुल्य हें मिष्टान्न ॥ तोंडासी कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण ॥ तया त्रीभूवन अवघें खोटें ॥ ३ ॥

( १२९ )

सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण ॥ जोंवरी हा प्राण जाय त्याचा ॥ १ ॥

आणीकाचा धाक न धरावा मनीं ॥ निरोपा वचनीं टळों नये ॥ २ ॥
सांभाळी समय आगळें उत्तर ॥ देतां भेदी वज्र जयांपरी ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी म्हणावा सेवक ॥ खादलें तें हक्क अन्न होय ॥ ४ ॥

( १३० )

निवासीया लेंड टाकूनी बैससी ॥ दंड तो करीसी अनाथातें ॥ १ ॥
अनाथासी दुःख देशी सर्वकाळ ॥ ऐसी तुज वेळ पुढें आहे ॥ २ ॥
आहे नाहीं काय न करी विचार ॥ काय तूं पामर जन्मलासी ॥ ३ ॥
तुका म्हणे धर्म एक भूत-दया ॥ अहंता ते वायां न धरीं मनीं ॥ ४ ॥

( १३१ )

संसाराच्या तापें तापलों मी देवा ॥ करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
म्हणवोनी तुझे आठवीले पाय ॥ येईवो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥
बहुतां जन्मींचा झालों भारवाही ॥ सुटीजे सें नाहीं वर्म ठावें ॥ ३ ॥
वेढीयेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं ॥ कणवा न करी कोणी माझी ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां धांव घालीं वेगीं ॥ ब्रीद तुझें जगीं पांडुरंगे ॥ ५ ॥

( १३२ )

पाप ताप माझे गुण दोष वारी ॥ कृष्णा विष्णू हरी नारायणा ॥ १ ॥
काम क्रोध वैरी घालूनी बाहेरी ॥ राहे तूं अंतरीं पांडुरंगा ॥ २ ॥
करीसील तरी नव्हे काय एक ॥ निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥ ३ ॥
समर्थाशी काय आम्ही शीकवावें ॥ तुका म्हणे यावें पांडुरंगे ॥ ४ ॥

( १३३ )

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे आंगीं ॥ न भंगे प्रसंगीं धैर्य-बळ ॥ १ ॥
न म्हणे कोणासी उत्तम वाईट ॥ महाव वरिष्ठ नसे जेथें ॥ २ ॥
अंतरीं सबाह्य सारिखें निर्मळ ॥ हृदय कोमळ गंगारूप ॥ ३ ॥
तुका म्हणे काया कुरवंडी तया ॥ ठेवीन मी पायां मस्तक हें ॥ ४ ॥

( १३४ )

तुका उतरला तुकीं ॥ नवल झालें तिहीं लोकीं ॥ १ ॥
नित्य करितो कीर्तन ॥ हेंचि त्याचें अनुष्ठान ॥ २ ॥
तुका बैसला विमानीं ॥ संत पाहाती लोचनीं ॥ ३ ॥
देव भावाचा भूकेला ॥ तुका वैकुंठासी नेला ॥ ४ ॥

( १३५ )

पावलें पांवलें तुझें आम्हां सर्व ॥ दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥
॥ध्रु०॥ जेथें तेथें देखें तुमची पाउलें ॥ त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥ध्रु॥
भेदा भेद मतें भ्रमाचे संवाद ॥ आम्हा नको वाद त्यांशीं देऊं ॥ २ ॥
तुका म्हणे अणु तुंजविण नाहीं ॥ नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥ ३ ॥

( १३६ )

आम्ही तरी आस ॥ जालों टाकोनि उदास ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ आतां कोण भय धरी ॥ पुढें मरणाचें हरी ॥ ध्रु ॥
भलते ठायीं पडों ॥ देह तुरंगीं हा चढो ॥ २ ॥
तुमचें तुम्हां पासीं ॥ आम्ही अहों जैसीं तैसीं ॥ ३ ॥
गेलें मानामान ॥ सुखदु:खाचें खंडन ॥ ४ ॥
तुका म्हणे चित्तीं ॥ नाहीं वागवीत खंती ॥ ५ ॥

( १३७ )

निंदी कोणी मारी ॥ वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ मज हें ही नाहीं तें ही नाहीं ॥ वेगळा दोहीं पासुनी ॥ ध्रु ॥
देह भोग भोगें घडि ॥ जें जें जोडे तें तें बरें ॥ २ ॥
अवघें पावो नारायणीं ॥ जनार्दनीं तुक्याचें ॥ ३ ॥

( १३८ )

हिरा ठेवितां ऐरणीं ॥ वांचे मारितां जो घणीं ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ तोचि मोल पावे खरा ॥ करणीचा होय चुरा ॥ ध्रु ॥
मोहरा होय तोचि अंगें ॥ सूत न जळे ज्याचे संगें ॥ २ ॥
तुका म्हणे तोचि संत ॥ सोसी जगाचे आघात ॥ ३ ॥

( १३९ )

महारासि सिवे ॥ कोपे ब्राम्हण तो नव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु० तया प्रायश्चित्त कांहीं ॥ देहत्याग करितां नाहीं ॥ ध्रु ॥
नातळे चांडाळ ॥ त्याचा अंतरीं विटाळ ॥ २ ॥
ज्याचा संग चित्तीं ॥ तुका म्हणे तो त्या याती ॥ ३ ॥

( १४० )

पराविया नारी माउलीसमान ॥ मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥

१ तुझ्या पेक्षां

॥ध्रु०॥न करितां परनिंदा परद्रव्य अभिलाषा॥काय तुमचें यास वेचे सांगा॥ध्रु
बैसलिये ठायीं म्हणतां राम राम ॥ काय होय श्रम ऐसें सांगा ॥ २ ॥
संताचे वचनीं मानितां विश्वास ॥ काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ३ ॥
खरें बोलतां कोण लागती सायास ॥ काय वेचे यास ऐसें सांगा ॥ ४ ॥
तुका म्हणे देव जोडे याच साटीं ॥ आणीक ते आटी न लगे कांहीं॥५॥

( १४१ )

शुद्धबीजा पोटीं ॥ फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ मुखीं अमृताची वाणी ॥ देह वेचावा कारणीं ॥ ध्रु ॥
सर्वांगीं निर्मळ ॥ चित्त जैसें गंगाजळ ॥ २ ॥
तुका म्हणे जाती ॥ ताप दर्शनें विश्रांती ॥ ३ ॥

( १४२ )

चित्त समाधाने ॥ तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ बहु खोटा अतिशय ॥ जाणा भले सांगो काय ॥ ध्रु ॥
मनाच्या तळमळें ॥ चंदनें ही अंग पोळे ॥ २ ॥
तुका म्हणे दुजा ॥ उपचार पीडा पूजा ॥ ३ ॥

( १४३ )

परिमळ म्हंण[1] चोळूंनये फूल ॥ खाऊंनये मूल आवडतें ॥ १ ॥
मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद ॥ यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥
कर्मफळ म्हणुनी इच्छूं नये काम ॥ तुका म्हणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

( १४४ )

पवित्र सोवळीं ॥ एक तीं च भूमंडळीं ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ ज्यांचा आवडता देव ॥ अखंडित प्रेमभाव ॥ ध्रु ॥
तींच सरतीं भाग्यवंतें ॥ पुरवीतीं धन वित्तें ॥ २ ॥
तुका म्हणे देवा ॥ त्यांची केल्यापावे सेवा ॥ ३ ॥

( १४५ )

आशाबद्ध जन ॥ काय जाणे नारायण ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ करी इंद्रीयाची सेवा ॥ पाहे आवडीचा मेवा ॥ ध्रु ॥
भ्रमें जो चावळे ॥ त्यासि उचित न कळे ॥ २ ॥
तुका म्हणें विषें ॥ अन्न नाशियेलें जैसें ॥ ३ ॥

( १४६ )

करावी ती पूजा मनेंचि उत्तम ॥ लौकिकाचें काम काय असे ॥ १ ॥

---

१ म्हणून.

॥ध्रु०॥ कळावें तयासि कळे अंतरीचें ॥ कारण तें साचें साचा अंगीं॥ध्रु॥
अतिशयां अंतीं लाभ किंवा घात ॥ फळ देतें चित्त बीजा ऐसें ॥ २
तुका म्हणे जेणें राहे समाधान ॥ ऐसें तें भजन पार पांवी ॥ ३ ॥

( १४७ )

नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर ॥ घालूं तुज भार पांडुरंगा ॥ १ ॥
नेणें काळ वेळ राग घात मात ॥ तुझें पायीं चित्त ठेवीं देवा ॥ २ ॥
तुका म्हणे मज चाड नाहीं जना ॥ तुज नारायणा वांचूनियां ॥ ३ ॥

( १४८ )

मान अपमान गोवावे ॥ अवघे गुंडूनी ठेवावे ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ हें चि देवाचें दर्शन ॥ सदा राहे समाधान ॥ ध्रु ॥
जेथे शांतीची वसती ॥ तेथे खुंटे काळगती ॥ २ ॥
आली उर्मी ती साहे ॥ तुका म्हणे थोडें आहे ॥ ३ ॥

( १४९ )

दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी ॥ देखोनियां दुरी व्हावें तया ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ आइका हो तुम्ही मात हे सज्जन ॥ करूं संघट्टन नये बोलों॥ध्रु॥
दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ ॥ वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ २ ॥
दुर्जनाचें भय धरावें त्या परी ॥ पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ ३ ॥
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग ॥ बोलीलासे त्याग देशाचा त्या ॥ ४ ॥
तुका म्हणे किती सांगावे पृथक ॥ अंग कुंभिपाक दुर्जनाचें ॥ ५ ॥

( १५० )

अति वादी नव्हे शुद्ध या बीजाचा ॥ ओळखा जातीचा अंत्यज तो॥१॥
॥ध्रु०॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण॥ श्रेष्ठाचें वचन न मानी जो॥ध्रु॥
तुका म्हणे मद्यपानाचें मिष्टान्न ॥ तैसा तो दुर्जन [illegible] ॥ २ ॥

( १५१ )

शब्दा नाहीं धीर ॥ ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ त्याचें न व्हावें दर्शन ॥ स्थळा पंगती भोजन ॥ ध्रु ॥
संतास जो निंदी ॥ अधम लोभासाठीं वंदी ॥ २ ॥
तुका म्हणे पोटीं ॥ भाव आणीक जया होटीं ॥ ३ ॥

( १५२ )

कन्येचा जो करी कथेचा विकरा ॥ चांडाळ तो खरा तया नांव ॥ १ ॥

---

पावबी, पांचवी.

गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण ॥ यातिशीं कारण नाहीं देवा ॥ २ ॥
आशाबद्ध नये करूं तें करिती ॥ तुका म्हणे जाती नरकामधीं ॥ ३ ॥

( १५३ )

घरीं रांडा पोरें मरती उपवासीं ॥ सांगे लोकां पासीं थोरपण ॥ १ ॥
नेउनिया घरा दाखवावें काय ॥ काळतोंडा जाय चुकावूनि ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही जाणों त्या प्रमाण ॥ ठकावें हें जन तसें नहों ॥३॥

( १५४ )

काय वाणूं मी या संतांचे उपकार ॥ मज निरंतर जागविती ॥ १ ॥
॥धु०॥ काय द्यावें यांसि व्हावें उतराई॥ ठेवितां हा पायीं जीव थोडा॥छ॥
सहज बोलणें हित उपदेश ॥ करूनि सायास शिकविती ॥ २ ॥
तुका म्हणे वत्स धेनुचिया चित्तीं ॥ तैसें मज येती सांभाळित ॥ ३ ॥

( १५५ )

उपदेश तो भलत्या हातीं ॥ झाला चित्तीं धरावा ॥ १ ॥
॥ धु० ॥ नये जाउं पात्रावरी ॥ कवटी सार नारेळ ॥ छ ॥
स्त्री पुत्र बंदी जन ॥ नारायण स्मरविती ॥ २ ॥
तुका म्हणे रत्नसार ॥ परि उपकार चिंधीचे ॥ ३ ॥

( १५६ )

सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें ॥ भक्षावया दिलें श्वाना लागीं ॥ १ ॥
॥धु०॥ मुक्ता फळ हार खरासि घातला॥ कस्तुरी सूकराला चोजविली॥छ॥
वेदपारायण बधिरा सांगे ज्ञान ॥ तयाची ते खुण काय जाणे ॥ २ ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे ॥ भक्तीचें महिमान साधु जाणे॥३॥

( १५७ )

ऐसा हा लौकिक कदा राखवेना ॥ पतितपावना देवराया ॥ १ ॥
॥धु०॥ संसार करितां म्हणती हा दोषी॥ टाकितां आळसी पोटपोसा॥छ॥
आचार करितां म्हणती हा पसारा ॥ न करितां नरा निंदिताती ॥ २ ॥
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी ॥ येरा अभाग्यासि ज्ञान नाहीं॥३॥
धन नाहीं त्यासि ठायींचा करंटा ॥ समर्थासि ताठा लाविताती ॥ ४ ॥
बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ॥ न बोलतां सकळ म्हणती गर्वी॥५॥
भेटीसि न व जातां म्हणती हा निष्ठुर ॥ येतां जातां घर बुडविलें ॥६॥
लग्न करूं जातां म्हणती हा मातला ॥ न करितां झाला नपुंसक ॥ ७ ॥

निपुत्रिका म्हणती मुख न पहा हो ॥ पातकाचें मूळ पोरवडा ॥ ८ ॥
लोक जैसा ओक धरितां धरवेना ॥ अभक्ता जिरेना संतसंग ॥ ९ ॥
तुका म्हणे आतां ऐकावें वचन ॥ त्यजुनियां जन भक्ति करा ॥ १० ॥

( १५८ )

केला मातीचा पशुपति ॥ परि मातीसि काय म्हणती ॥
शिवपूजा शिवासि पावे ॥ माती मातीमाजी सामावे ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ तैसें पूजितों आम्ही संत ॥ पूजा घेतो भगवंत ॥
आम्ही किंकर संताचे दास ॥ संत पदवी नको आम्हास ॥ ध्रु ॥
केला पाषाणाचा विष्णु ॥ परी पाषाण नव्हे विष्णु ॥
विष्णुपूजा विष्णूसि अर्पे ॥ पाषाण राहे पाषाणरूपें ॥ २ ॥
केली कांशीची जगदंबा ॥ परि कांसें नव्हे अंबा ॥
पूजा अंबेची अंबेला घेणें ॥ कांसें राहे कांसेंपणें ॥ ३ ॥
ब्रह्मानंद पूर्ण माजी ॥ तुका म्हणे केली कांजी ॥
ज्याची पूजा त्यानेंचि घेणें ॥ आम्ही पाषाणरूपें राहाणें ॥ ४ ॥

( १५९ )

आणिकांच्या घातें ॥ ज्यांचीं निवतील चित्तें ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ तेचि ओळखावे पापी ॥ निरयवासी शीघ्रकोपी ॥ ध्रु ॥
कान पसरोनी ॥ ऐके वदे दुष्ट वाणी ॥ २ ॥
तुका म्हणे भांडा ॥ धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ३ ॥

( १६० )

नलगे चंदना सांगावा परिमळ ॥ वनस्पति मेळ हाकारुनी ॥ १ ॥
॥ध्रु०॥अंतरींचें धांवें स्वभावें बाहेरी॥धरितां ही परी आवरेना॥ ध्रु॥
सूर्य नाहीं जागें करीत या जना ॥ प्रकाश किरणा कर म्हून ॥२॥
तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें ॥ लपवितां खरें येत नाहीं ॥ ३ ॥

( १६१ )

चंदनाचे हात पाय ही चंदन ॥ परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार ॥ सर्वांगें साकर अवघी गोड ॥ ध्रु॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून ॥ पाहातां अवगुण मिळे चि ना ॥ २ ॥

( १६२ )

अंगीं ज्वर तया नावडे साकर ॥ जन तो इतर गोडी जाणे ॥१॥

॥ध्रु०॥एकाचिये तोंडीं पडिली ते माती॥अवघे ते खाती पोटभरी॥ध्रु.॥
चारितांची बळें येत असे दातीं ॥ मागोनियां घेती भाग्यवंत ॥२॥
तुका म्हणे नसे संचित हें बरें ॥ तयासि दुसरें काय करी ॥ ३ ॥

( १६३ )

धिग जीणें ज्याचें बाईले आधीन ॥ परलोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥
॥ध्रु०॥धिग जीणें ज्याचें लोभावरी मन ॥ अतीत-पूजन घडेचिना ॥ध्रु.॥
धिग जीणें आळस निद्रा जया फार ॥ अमित आहार अघोरिया ॥२॥
धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य ॥ झुरे मानालागीं साधुपणा ॥ ३ ॥
तुका म्हणे धिग ऐसे झाले लोक ॥ निंदक वादक नरका जाती ॥ ४ ॥

( १६४ )

वेदाचें गव्हर नकळे पाठकां ॥ अधिकार लोकां नाहीं येरा ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें ॥ तारी एक-सरें भवसिंधु ॥ध्रु.॥
जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ ॥ येर तो सकळ मूढ लोक ॥ २ ॥
तुका म्हणे विधि निषेध लोपला ॥ उच्छेद या झाला मारगाचा ॥ ३ ॥

( १६५ )

विधीनें सेवन ॥ विषय त्यागातें समान ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ मुख्य धर्म देव चित्तीं ॥ आदि अवसान अंतीं ॥ ध्रु.॥
बहु अतिशय खोटा ॥ तर्क होती बहु वाटा ॥ २ ॥
तुका म्हणे भावें ॥ कृपा करीजे ते देवें ॥ ३ ॥

( १६६ )

भला देवा कुणबी केलों ॥ नाहीं तरी दंभें असतों मेलों ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ भलें केलें देवराया ॥ नाचे तुका लागे पायां ॥ ध्रु. ॥
विद्या असती,कांहीं ॥ तरी पडतों अपायीं ॥ २ ॥
सेवा चुकतों संताची ॥ नागवण हे फुकाची ॥ ३ ॥
गर्वें होतां ताठा ॥ जातों यमपंथें वाटा ॥ ४ ॥
तुका म्हणे थोरपणें ॥ नरक होती अभिमानें ॥ ५ ॥

---

## तुकारामाची स्त्री तुकारामास रागानें बोलली ते अभंग.

( १६७ )

मजचि भोंवता केला येणें जोग ॥ काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥

॥ध्रु०॥चालोनियां घरा सर्व सुखें येती॥माझी तों फजीती चुके चि ना॥ध्रु॥
कोणाचीं बाईल होऊनीयां वोढूं ॥ संसारा काढूं आपदा किती ॥ २ ॥
काय तरी देऊं तोडितील पोरें ॥ मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥.
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर ॥ सारवाया ढोर-शेण नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे रांड न करितां विचार ॥ वाहुनियां भार कुंथे माथां ॥ ५ ॥

( १६८ )

काय नेणों होता दावेदार मेला ॥ वैर तो साधिला होऊनि गोहो ॥ १॥
॥ध्रु०॥किती सर्वकाळ सोसावें हें दुःख॥किती लोकां मख वासूं तरी ॥ध्रु॥

( १६९ )

गोणी आली घरा ॥ दाणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ भरी लोकांची पांटोरी ॥ मेला चोरटा खाणोरी ॥ ध्रु॥
खवळली पिसी ॥ हाता झोंबे जैसी लासी ॥ २ ॥
तुका म्हणे खोटा ॥ रांडे संचिताचा सांटा ॥ ३ ॥

( १७० )

आतां पोरा काय खासी ॥ गोहो जाला देवलसी ॥ १ ॥
॥ध्रु०॥डोचकें चिंधी घातल्या माळा॥उदमाचा सांडी चाळा॥ध्रु॥
आपल्या पोटा केली शार ॥ आमचा नाहीं येस पार ॥ २ ॥
हातीं टाळ तोंडवासी ॥ जाय देउळीं देवापासीं ॥ ३ ॥
आतां आम्ही करूं काय ॥ न बसे घरीं गणा जाय ॥ ४ ॥
तुका म्हणे धीर धरी ॥ अझुनि काय जालें तरी ॥ ५ ॥

( १७१ )

न करवे धंदा ॥ आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥
॥ध्रु०॥ उठितो तो कुटितो टाळ॥अवघा मांडिला कोल्हाळ॥ध्रु॥
जीवंतचि मेले ॥ लाजा वाटुनियां प्याले ॥ २ ॥
संसाराकडे ॥ न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥
तळमळती यांच्या रांडा ॥ घालिती जीवा नांवें धोंडा ॥ ४ ॥
तुका म्हणे बरें जालें ॥ घे गे चाइले लीहिलें ॥ ५ ॥

( १७२ )

कोण घरा येतें अमुच्या कशाला॥काय ज्याचा त्याला धंदा थोडा॥१॥
॥ध्रु०॥देवासाठीं झालें ब्रम्हांड सोंइरें ॥ कोमळ्या उत्तरें काय वेंचे ॥ध्रु॥

मानें पाचारितां नव्हे आगणुक ॥ आपें येती लोक मीतीसाठीं ॥ २ ॥
तुका म्हणे रांडे नावडे भूषण ॥ कांतेलेंसें श्वान लागे पाठी ॥ ३ ॥

( १७३ )

भाव धरी तया तारील पाषाण ॥ दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥
॥ध्रु०॥करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ॥खापरा परीस काय करी॥ध्रु॥
काय करिल तया साकरेचें आळें ॥ बीज तैसीं फळें येतीं तया ॥ २ ॥
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ ॥ कठीण हा खळ तयाहूनी ॥ ३ ॥

---

## शिवाजी राजे यांनीं कारकुना बरोबर पत्र, अबदागीर वगैरे देऊन तुकारामास बोलावणें पाठविलें तेव्हां त्यांनें उत्तर पाठविलें ते अभंग.

( १७४ )

दिवट्या छत्री घोडे ॥ हें तो बऱ्यांत न पडे ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ आतां येथें पंढरिराया ॥ मज गोविसी कासया ॥ध्रु ॥
मान दंभ चेष्टा ॥ हे तो शूकराची विष्ठा ॥ २ ॥
तुका म्हणे देवा ॥ माझे सोडवणे धांवा ॥ ३ ॥

( १७५ )

नावडे जें चित्ता ॥ तेंचि होसी पुरविता ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ कां रे पुरविली पाठी ॥ माझी केली जीवें साटीं ॥ ध्रु ॥
न करावा संग ॥ वाटे दुरावावें जग ॥ २ ॥
सेवावा एकांत ॥ वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥
जन धन तन ॥ वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥
तुका म्हणे सत्ता ॥ हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ५ ॥

( १७६ )

विरंचीनें केलें ब्रम्हांड सकळ ॥ तया माजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥
॥ध्रु०॥युक्तीचा चाळक ब्रम्हनिष्ठ ज्ञानी॥गुरुभक्ति मनीं विश्वासेंसी॥ध्रु॥
ऐसा तुझा प्रेमा कळला हा एक ॥ पाहूनियां लेख पत्रिकींचे ॥ २ ॥
शिव तुझें नाम ठेविलें पवित्र ॥ छत्रपति सूत विश्वाचें कीं ॥ ३ ॥
व्रत नेम तप ध्यान योग केला ॥ करूनि मोकळा जालासी तूं ॥ ४ ॥
हेत हा लागला आमुचिये भेटी ॥ पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ५ ॥

याचें हें उत्तर ऐके गा भूपती ॥ लिहिली विनंती हेताची हे ॥ ६ ॥
अरण्यवासी आम्ही फिरूं उदासीन ॥ दर्शन हें हीन अमंगळ ॥ ७ ॥
वस्त्राविण काया जालीसे मळीन ॥ अन्नाविणे जीण फळाहारी ॥ ८ ॥
रोड हात पाय दिसे अवकळा ॥ काय तो सोहळा दर्शनाचा ॥ ९ ॥
तुका म्हणे माझी विनंती सलगीची ॥ वार्ता हे भेटीची करूं नका ॥१०॥

( १७७ )

ऐसी माझी वाणी दीनरूप वाहे ॥ करुणा त्या आहे ह्रदयस्थाशी ॥ १॥
॥०ध्रु॥ नहों कोलवाण नहों आम्ही दीन ॥ सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ध्रु॥
पांडुरंग आम्हा पाळिता पोसिता ॥ आणिकांची कथा काय तेथें ॥२॥
तुझी भेट घेणें काय हो मागणें ॥ आशेचें हें शून्य केलें तेणें ॥ ३ ॥
निराशेचा गांव दिधला आम्हांसी ॥ प्रवृत्ति भागासी सोडियेलें ॥ ४ ॥
पतिव्रता मन पतिशीच भेटो ॥ तैसे आम्ही विठोमाजी नांदों ॥ ५ ॥
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं ॥ देखणें तुझें हो तयामाजी ॥ ६ ॥
तुजही विठ्ठल हवा ऐसा वाटे ॥ परि ऐक गोष्टी आवडीची ॥ ७ ॥
सद्गुरु श्रीरामदासाचें भाषण ॥ तेथें घालीं मन चळों नको ॥ ८ ॥
बहुतां ठायीं वृत्ति चावळली जेव्हां ॥ रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥ ९ ॥
तुका म्हणे बापा चातुर्यसागरा ॥ भक्तिभावथाग भाविकांसी ॥ १० ॥

( १७८ )

तुम्हांपासीं आम्ही येऊनियां काय ॥ वृथा सीण आहे चालण्याचा॥१॥
॥ध्रु०॥मागोंव हें अन्न तरी भिक्षा थोर॥वस्त्रासी हे थार चिंध्या बिदीं॥ध्रु॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण ॥ वरी हें प्रावर्ण आकाशाचें ॥ २ ॥
तेथें काय करणें कोणाची ही आस ॥वायां होय नाश आयुष्याचा॥३॥
राजगृहा यावें मानाचिये आसे ॥ तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥
रायाचिये घरीं भाग्यवंता मान ॥ इतरां सन्मान नाहीं तेथें ॥ ५ ॥
देखोनियां वस्त्राभूषणाचे जन ॥ तात्काळ मरण येतें आम्हां ॥ ६ ॥
ऐकोनियां मनीं उदासावें जरी ॥ तरी आम्हा हरी उपेक्षीना ॥ ७ ॥
आतां हेंचि तुम्हां सांगणे कौतुक ॥ भिक्षे ऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥
तप व्रत योगें महा भले जन ॥ आशाबद्ध लीन वर्तताती ॥ ९ ॥
तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे ॥ पूर्वील देहाचे हरिभक्त ॥ १० ॥

( १७९ )

आतां एक योग साधावा हा नीट ॥ भल्याचा तो वीट मानूं नये ॥१॥

॥ध्रु०॥ जेणेयोगें तुम्हां लागूं पाहे दोष॥ऐसा हा सायास करूं नये ॥ध्रु॥
निंदक दुर्जन संग्रहीं असती ॥ त्यांची युक्ति कीर्त्ती आणूं नये ॥ २ ॥
परीक्षावे कोण रायाचे रक्षक ॥ विवेकाविवेक पाहोनियां ॥ ३ ॥
सांगणें न लगे सर्वज्ञ तूं राजा ॥ अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ४ ॥
हेंचि ऐकोनियां पावें समाधान ॥ आतां या दर्शना काज नाहीं ॥ ५ ॥
घेऊनियां भेटी कोणा हा संतोष ॥ आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥
एक दोन कर्मे जाणोनियां वर्मे ॥ आपुलिया श्रमें राहे आतां ॥ ७ ॥
कल्याण कारक अर्थ याचा एक ॥ सर्वांभूतीं देख एक आत्मा ॥ ८ ॥
आत्मारामीं मन ठेवूनियां राहें ॥ रामदासीं पाहें आपणची ॥ ९ ॥
तुका म्हणे राया धन्य जन्म क्षितीं॥त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी॥१०॥

( १८० )

आतां हे विनंती प्रधान अष्टका ॥ प्रभूसी विवेक ऐसा सांगा ॥ १ ॥
॥ध्रु०॥ प्रतिनिधि मन रक्षक चतुर ॥ सात्विकाचें घर तुम्हां पाशीं॥ध्रु॥
मुजुमीचे धनी लेखन कारक ॥ पत्रींचा विवेक समजाववा ॥ २ ॥
पेशवे सुरनिस चिटनिस डबीर ॥ राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ३ ॥
भूषण पंडित राय विद्या धन ॥ वैद्यराजा नमन माझें असो ॥ ४ ॥
पत्रींचा हा अर्थ अंतरीं जाणोनि ॥ विवंचोनि श्रवणीं घाला राया ॥५॥
सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें ॥ बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥
यथास्थित निरोप सांगणें हा राया ॥ अर्थ पाहा वांयां जाऊं नद्या॥७॥
भिडेसाटीं बोलाल गाळूनि अर्थातें ॥ अनर्थकारी तुमतें होइल तेणें॥८॥
तुका म्हणे तुम्हां नमन अधिकाऱ्यां ॥ सांगणें हें राया पत्र माझें ॥९॥

## वामन पंडित.

वामन पंडित हा सातार जिल्यांतील कोरेगांव कुमटें येथला जोशी होता. हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राम्हण. ह्याच्या बायकोचें नांव गिरीबाई. ह्यानें काशीस शास्त्राध्ययन पुष्कळ केलें, व वादविवाद करून पुष्कळ पंडितांस जिंकिलें. ह्यानें संस्कृत कविता बरीच केली आहे. पुढें ह्यास पश्चात्ताप होऊन रामदासस्वामीच्या सांगण्यावरून ह्यानें लोकोपयोगीं मराठी ग्रंथ करण्यास आरंभ केला.

वामनाची कविता गोड आणि रसभरित आहे. ह्याचे कवितेंत यमकें फार म्हणून ह्यास रामदास "यमक्यावामन" म्हणत असे.

वामन पंडित कृष्णातीरीं वांई क्षेत्राजवळ पांडववाडी म्हणून एक गांव आहे तेथें वारला. त्याच्या शिष्यमंडळीनें त्याच्या पादुका अद्यापि सांभाळून ठेविल्या आहेत. व त्यांची ते पूजा करीत असतात, असें ऐकण्यांत आहे. वामनाचे वंशज अद्यापि काशीस आहेत.

मरणशक १५९५ वैशाख शुद्ध ६. इ० स० १६७३

## त्यानें केलेले ग्रंथ.

वेदार्थदीपिका ( गीतेवर टीका ), श्लोकबद्ध प्रकरणें ३६, गीता समश्लोकी, निगमसार ( ओवीबद्ध ), शके १५९५ त समाप्त.

## वेंचे, वामनी श्लोक.

### मंगलाचरण.

शिखरिणीवृत्त. नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी ॥
हरी जो तापातें उचलुनि कृपासिंधुलहरी ॥
हरी वांटे काळा करिस विपती मृत्युभुजगा ॥
जगाचा तूं ऐसा धनि कवण तो पाव मज गा ॥ १ ॥

अमृत जसें मरण चुकवितें, तसें जन्ममरणप्रवाहांतून सोडविणारें भगवंतांचें नाम, त्याचा महिमा ह्या प्रकरणांत वर्णिला आहे; म्हणून, ह्यास नामसुधा असें नांव दिलें आहे.

### वेंचे, नामसुधेंतील.

मालिनीवृत्त. हरिपण हरिनामें धातुमूर्तीस आलें ॥
हरिमय हरिनामें विश्व संतांसि जालें ॥
भवभय हरिनामें साधकांचें पळालें ॥
वद वद वद जव्हे रामनामें रसालें ॥ १ ॥

---

१ नदीच्या लाटा ज्याप्रमाणें दाह शांत करितात त्याप्रमाणें जो परमेश्वर आपल्या कृपेच्या योगानें लोकांचें दुःख निवारितो. २ यम रूप हत्तीस हरि म्ह० सिंहासारिखा. ३ मृत्यु रूप सर्पास विपति म्ह० गरुडासारिखा. ४ मोक्षप्राप्तीकरितां यत्न करणारांचें.

वसंततिलका. आकाशअंत न कळूनिहि अंतरिक्षीं ॥
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी ॥
नामप्रतापहि यथामति याच रीती ॥
सीमा न पावति तथापि मुनींद्र गाती ॥ २ ॥

मालिनी. नकळतहि पडे हा विष्णुनामाग्नि जेथें ॥
दुरिततृणगृहाचें भस्म होणार तेथें ॥
मग सम करुणेची आयती कृष्णदृष्टी ॥
भिजविल करिते जे सर्व-सृष्ट्यर्थ वृष्टी ॥ ३ ॥

द्रुतविलंबित. न कळतां पद अग्निवरी पडे॥ न करि दाह असें न कधीं घडे ॥
अजित-नाम वदो भलत्या मिसें॥सकळ पातक दग्ध करीतसे॥४॥

पृथ्वी. न जाणतहि ये मुखा हरि तथापि पापें हरी ॥
स्मरोनि महिमा स्मरे वदोनि तोंच नामें जरी ॥
प्रवृत्तिविषयीं जरी असति त्या जनांचीं मनें ॥
विरक्त करितो हरी स्वगुणनामसंकीर्तनें ॥ ५ ॥

वसंततिलका. अत्यंत शुद्धि हरिकीर्तन भक्तिभावें ॥
होतां खरें परि न जाणत ही स्वभावें ॥
नारायण-स्मरण-कीर्तन मात्र कांहीं ॥
ज्याला घडेल तरि पातक त्यास नाहीं ॥ ६ ॥

वसंततिलका. येथें म्हणाल जळतीं जरि सर्व पापें ॥
मूळें न कां जळति नाममहाप्रतापें ॥
तणोनि नाम म्हणतां दुरितासि जेमें ॥
जाळी न कां सकळ पातकमूळ तैसें ॥ ७ ॥

भुजंगप्रयात. न जाणे शिशू अग्निची शक्ति कांहीं ॥
जळो तूळ इच्छा अशी ज्यास नाहीं ॥
तरी घालितां अग्नि कार्पासराशी ॥
जळे येरिती नाम ही पाप नाशी ॥ ८ ॥

---

१ हा सामासिक शब्द असून येथ कवीनें संधि केला नाहीं. वामनाच्या कवितेंत अशीं उदा० पुष्कळ आढळतात. २ विष्णूचें नाम हाच अग्नि. ३ पातक हेंच गवताचें गृह त्याचें. ४ परमेश्वराचें नांव. ५ संसार. ६ आपले गुण व नाम ह्यांच्या संकीर्तनानें लोकांच्या मनांत प्रपंचाविषयीं वैराग्य उत्पन्न करितो. ७ होते ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ८ सहजगत्या. ९ ह्यावर अशी शंका घ्याल कीं. १० पापांचें मळ जी वासना ती. ११ कापसाचा ढीग.

शार्दूलविक्रीडित. आयासाविण ही कथा परिसतां गोडी हरीच्या गुणीं ॥
ज्यां चिन्ता उपजे निघे सहज ती त्याच्या पदीं तत्क्षणीं ॥
ऐसें येरिति अर्पिती सहज ही जे एकदा त्यां मना ॥
ते स्वप्नीं नयनीं न देखति यमा कैंच्या तयां यातना ॥ ९ ॥

द्रुतविलंबित. सहज ही हरिकीर्तन जो करी॥सुमति देइल त्यासहि तो हरी॥
परम शुद्धि हि जे जन इच्छिती॥सुगति दे हरि तोचि रमापती॥१०

शार्दूलवि० हस्तीतें धुतलें जळीं बसविलें मालिन्य ही नाशिलें ॥
तेणें तें पहिलें स्वकर्म वहिलें तीरींच आरंभिलें ॥
शुंडाग्रें धरिलें धुळीस भरिलें सर्वांग ही आपलें ॥
प्रायश्चित्त दिलें तथापि न भलें ज्याचें मन क्षोभलें ॥ ११ ॥

स्वागता शर्वकंठविषगर्व हराया ॥ शक्त नामचि तुझें रघुराया ॥
सेतु सागर कपी उतराया॥नामसेतु भवसिंधु तराया॥१२॥
प्राणप्रयाणसमयीं यमदूत जेव्हां ॥
येती घडे किमपिही हरिदास्य तेव्हां ॥
आजन्म पातक जळे मग त्या पवित्रा ॥
होतील दुर्गति कशा विविधा विचित्रा ॥ १३ ॥

## वेंचे, वनसुधेंतील.

कृष्णानें कुंजवनांत गोपाळांसहवर्तमान जी क्रीडा केली ती सुधेसारिखी गोड असून ती ह्या प्रकरणांत वर्णिली आहे, म्हणून ह्यास वनसुधा असें नांव दिलें आहे.

वसंतति० बोले मुलांप्रति हरी पहिले दिशीं कीं ॥
रात्रींच सिद्ध करणें अशनादि शिकीं ॥
जाऊं समस्तहि उद्यां वनभोजनातें ॥
पोटांत भाव वधणें अघदुर्जनातें ॥ १ ॥
एकेदिनीं मनि धरूनि असें हरी तो ॥
चाले प्रभात समयीं खळ जो हरीतो ॥

१ हरीला. २ सागर उतराया कपींना जसा सेतु तसा इ० ३ प्राण जाते वेळीं. ४ उपजल्यापासून मरेपर्यंत केलेलें. ५ नरकयातना. ६ खाण्याचे वगैरे पदार्थ व शिकीं. ७ दुष्ट अघासुरातें; (कृष्णास मारण्याकरितां हा पूतनेचा भाऊ कंसानें पाठविला होता. त्यानें कपटानें आजगराचें रूप धरिलें होतें, त्याला कृष्णानें मारिलें.) ८ नाशितो.

शृंगीरवेंचि करि जागृत मित्रसेना ॥
देणार जागृतिस ज्याविण हो दिसेना ॥ २॥

द्रुत वि- खडबडोनि समस्तहि धांवले ॥ सहित वत्स हरीप्रति पावले ॥
लंबित. सकळ खेळति सोडुनि वासुरां॥परम कौतुक जें गगनीं सुरां॥३॥

भुजंग वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे ॥ तुरे खोविती मस्तकीं पल्लवांचे ॥
प्रयात फळांचे गळां घालिती दिव्य हार॥स्वनाथासवें ते करीती विहार॥४॥
स्वकौशल्य ज्या गुंजमाळांत नाना॥गळां घालिती ते करीती तनाना॥
शिरीं बांधिती मोरपत्रें विचित्रें॥शरीरावरी रेखिती दिव्य चित्रें॥५॥

इंद्र पक्ष्यांचिया साउलिच्याच संगें ॥ ते धांवती हास्यरसप्रसंगें ॥
वज्रा. हंसाचिया दाखविती गतीतें ॥ जे लाधले हंसगुरू-गतीतें ॥ ६ ॥

भुजंग वनीं देखुनी मेघनीळास मोर ॥ प्रमोदें करी नृत्यलीला समोर॥
प्रयात. तयासारिखे नाचती तोक सारे॥खुणावूनि अन्योन्य कीं तो कसारे॥
जसे दांभिक ध्यानमुद्रा धरीती ॥ जना दाविती ज्ञानही बोधरीती॥
तसी दाविती ते बकाभ्यासमुद्रा॥गडी हांसवीती कृपेच्या समुद्रा॥८॥
वदे कृष्ण गोपाळ बाळां जनांतें॥ बसूनी करूं प्रेस्थळीं भोजनातें॥
वनीं वत्स सोडा चरायासि, पाणी॥तयां पाजुनीया; म्हणे चक्रपाणी९
बरें कृष्णजी बोलसी तूं जसा रे ॥ तसें वर्ततों लक्षितों तूज सारे ॥
असें बोलुनी सोडिती वासुरांतें ॥ नभीं होय आश्चर्य सर्वा सुरांतें१०

इंद्र संतोषतो नंदकुमार साचा ॥ बाळांत तैशा परमा रसाचा ॥
वज्रा. पंक्तीस दे लाभ अंजी वनांत ॥ बुद्धी जयांच्या जगजीवनांत॥११॥

मालिनी निजमुख कवणाही आडदृष्टी असेना ॥
रचुनि बसवि ऐसी भोंवतीं बाळसेना ॥
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या ॥
म्हणुन बहुत पंक्ती मंडळाकार केल्या ॥ १२ ॥

---

१ लहान शिंगाच्या शब्दानें. २ अज्ञान निद्रेपासून सुटका—ज्ञान. ३ गवळ्यांचे. ४ गाण्याचे आलाप घेती. ५ मोरांचीं पिसें—( संस्कृत व प्राकृत शब्दांचा समास). ६ मेघासारिख्या कृष्णास. ७ अत्यानंदानें. ८ उपदेश करण्याच्या रीतीवरून. ९ईश्वर चिंतन एकाग्रमनानें करीत बसल्यासारिखी निश्चल स्थिति. १० बगळ्याप्रमाणें ध्यानस्थ चर्या. ११ कृष्णारा. १२ अत्युत्कट आनंदाचा. १३ अहो. १४ कृष्णाचे ठायीं.

जंगम० हरी कर्णिकेच्या स्थळीं मध्यभागीं ॥
मुलें भोंवतीं ऱ्हस्वदीर्घ विभागीं ॥
ल्हानापुढें थोर अंभोज-पत्रें ॥
अशीं बैसवीलीं भवार्कातपत्रें ॥ १३ ॥
असे कर्णिका अंबुजामाजि जेवीं ॥
मुलांमध्यभागीं बसे कृष्ण जेवी ॥
मुखीं ग्रास सप्रेम घालूनि हातीं ॥
दहींभात दे देव लीला पहाती ॥ १४ ॥
शार्दूलवि० वंशी नादनटी तिला कटितटीं खोंवोनि पोटीं पटीं ॥
कक्षे वामपुटीं स्वशृंग निकटीं वेताटिही गोमटी ॥
जेवी नीरतटीं तरुतळवटीं श्रीश्यामदेहीं उटी ॥
दाटी व्योमघटीं सुरां; सुखलुटी घेती जटी धूर्जटी ॥१५॥

## वेंचे, वेणुसुधेंतील.

श्रीकृष्ण वनांत मुरली वाजवीत असतां तिचा अमृतासारखा गोड ध्वनि ऐकून प्राणिमात्र मोहित झाले; ही कथा ह्या प्रकरणांत वर्णिली आहे.

स्वागता. अंग वक्र अधरीं धरि पांवा ॥ गोपवेष हरि तोचि जपावा ॥
वामबाहुवरि गालहि डावा ॥तो ठसा स्वत्हृदयांत पडावा ॥ १ ॥
उपजाति वेणुध्वनी तो सुरगायकांनीं॥ त्यांच्या विमानांतचि बायकांनीं॥
आश्चर्य कानीं पडतांचि केलें॥ न तृप्त ज्यांचें मन हें भुकेलें ॥२॥
स्वागता. मोहती व्रजपशू मृगगाई ॥ आमुचें नवल काय अगाई ॥
स्तब्ध होति लिखितें जसिं चित्रें॥वेणुच्या ध्वनिरसेंचि विचित्रें॥३॥

टेंगणीं आणि उंच. २ कमलाच्या पाकळया. ३ (भव+अर्क+आतप+त्र) संसार हाच सूर्य त्याच्या संतापापासून रक्षिणारा ह्यानें. ४ (वक्रची केलेली) मुरली किंवा पांवा. ५ नादानें नटणारी म्ह० मंजूळ नादाची. ६ कंबरेस. ७ निऱ्या खोंवण्याच्या ठिकाणीं. ८डाव्या काखेमध्यें. ९आपलें वाजविण्याचें शिंग. १० यमुनेच्या कांठीं. ११ आकाशाच्या पोटांत. १२ गंधर्वांनीं. १३ गोकुळांतील पशु.

उपजाति. मातृ-स्तनींचा रस आननांत॥तों होय वेणु-ध्वनि काननांत
गळे गिळेना पय वासुरांतें ॥ आश्चर्य वाटे गगनीं सुरांतें ॥४

स्वागता. मल्लवेष रचिला अभिराम ॥ श्रीधर प्रभु सवे बळराम ॥
मोरपत्र-मुकुटीं तरुपत्रें ॥ नेत्र सुंदर जसीं शतपत्रें ॥ ५.॥

उपजाति. सये असा ज्यां हरि देखिला गे ॥ तो प्रेम-रंगीं मनि रेखिला गे
पाचारितो वेणु-रवेंचि गाई ॥ आश्चर्य तेव्हां करितों अगाई॥६

स्वागता. गोधनीं बहु पुढें नव जावें ॥ ठाव एकचि धरूनि थिजावें ॥
वाजवी म्हणुनि जो निज पांवा॥कृष्ण तोचि हृदयांत जपावा।

इंद्र-वज्रा आपाद माळा प्रभु कृष्णजीची॥सुधा पिती षट्पद कृष्ण जीची
प्रदक्षिणांते अवघे तिलाहो ॥ करूनि गुंजारव घेति लाहो ॥ ८

वसंततिलका. गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें ॥
वेणुध्वनी मिसळिला मृदु वासुदेवें ॥
आपाद कंठ वनमाळ अशी विराजे ॥
ते सेविती मधुप होउनि देवराजे ॥ ९ ॥

भुजं-प्रग० वनीं राजहंसीं पिकानीं शुकानीं॥ध्वनी गोड तो आयकोनी सुकानीं
त्वरें येउनी सेवियेलें हरीतें ॥महापाप ही नाम ज्याचें हरी तें॥१०

द्रुत-विलं० वदन लाउनि ते सकळ क्षिती ॥ नयन झांकुनि अन्य न लक्षिती
स्थिरमनें करुनी स्थिर आसना॥करिति ते खग कृष्ण-उपासना॥११

भुजं-प्रग० जगज्जीवन श्रीहरी आणि काळा॥करी तो जगीं जीवनाच्या सुकाळ
असे मेघ ही या निमित्तें सखा हो॥सुहृद्भाव ऐसा नसे आणिकां हो
झणी उष्ण लागे सख्या केशवातें॥म्हणूनी त्वरें येउनी लेश -वातें
मुकुंदावरी मेघ तो छत्र झाला॥करी स्वात्मदेहार्पण श्रीअजाला॥१

द्रुत-विलं० हळुहळू घन गर्जतसे नभीं ॥ मुरलिहूनि चढेल म्हणोन भी ॥
श्रवण भक्ति-अतिक्रम वर्जतो॥ करित कीर्तन ही घन गर्जतो॥१४

१ हे सखि. २ प्रेम- रूप रंगानीं. ३ तजवीर काढिली. ४ गायींच्या समुदाया ५ थांबून राहावें. ६ पायघोळ. ७ काळे भुंगे. ८ कृष्णाच्या गळ्यांतील माळ. ९ कदेऊन. १० जगताच्या स्थितीला कारण. ११ वाचणें, पाणी. १२ वाऱ्याच्या झुळुकीच्या योगानें. १३ आपलें मन व शरीर ह्यांचें अर्पण. १४ जन्मरहित परमेश्वराला १५ आपल्या गर्जनेनें मुरलीचा शब्द लोपविला तर नवविध भक्तींतील श्रवण भक्ती उल्लंघन होईल म्हणून तें टाळण्याकरितां हळू शब्द करितो हा भाव. १६ टाळतो.

भुजं- यशोदे तुझा पुत्र वंशस्वरांनीं ॥सुधा ओतिची वर्षतो या स्वरानीं ॥
प्रया० तई भोंवते मोहती देवजाती॥जयांचीं मनें उन्मनत्वास जाती॥१५॥

---

## वेंचे, भामा विलासांतील.

शिखरिणी. लता सत्या अंकीं खगगमन भक्तामरतरू ॥
तरू हातीं तो श्रीपति भवनदीपार उतरू ॥
धरी लक्षी पक्षी करतलयुगीं पादयुगळा ॥
गळां रत्न ध्यावा द्रुम-गरुड-संयुक्त सगळा ॥ १ ॥

उपजा- खगेंद्र खांदां सुरभूरुहातें ॥ हातें धरी पाद-सरोरुहातें ॥
ति० त्यातें स्मरा नाशिल तो असत्या॥सत्यापती दाविल नित्यसत्या॥२॥

वसंतति० कृष्णासि कृष्ण-पद-भक्ति-विशारदानें ॥
जें स्वर्ग पुष्प दिधलें मुनिनारदानें ॥
तें रुक्मिणीप्रति दिलें त्रिजगन्निवासें ॥
जें द्वारका करि भरोनि सुगंध वासें ॥ ३ ॥

भुजं- असी गोष्ट दासी जनीं बायकांनीं॥विचारूनियां सांगतां जाय कानीं॥
प्रया० तई सत्यभामा महाक्रोध दावी॥बुझावी हरी तोंच लीळा वदावी॥४॥

द्रुत- गडबडां धरणीवरि लोळते ॥ वदवती न कवीसहि लोळ ते ॥
विलं० रडत मूर्छित होय घडी घडी ॥ पवननिश्चळ नेत्र न उघडी ॥ ५ ॥

मालिनी रडत रडत मूर्छे-माजि वृत्ती बुडाल्या ॥
परम विकळ मी तूं या स्मृती ही उडाल्या ॥
उचलुनि सखियांहीं मंचकीं दिव्य सेजे ॥
निर्जिवलि मृत-तुल्या सत्यभामा दिसे जे ॥६ ॥

१ पांवाच्या सुरानें. २ आपल्या वनात. ३ ज्या स्थितींत मनाचा ही लय होतो अशा ( उन्मनी ) स्थितीत. ४ सत्यभामा कृष्णाची स्त्री. ५ गरुडावर बसून संचार करणारा. ६ भक्तांना कल्पवृक्षासारखा. ७गरुड हा 'खगी', 'आणि', लक्षी ह्यांचा कर्ता. ८ खोट्याला म्ह० मायेला. ९ भ्रम्हाला. १० कृष्णाच्या पायांच्या भक्तीविषयीं प्रवीण ११ लोकांच्या बायकांनीं फूल कोठून आणिले असें विचारिल्यावरून रुक्मिणीच्या दासींनीं सांगितलें तेव्हां ती गोष्ट सत्यभामेच्या कानीं गेली. १२ समजूत करी. १३ श्वास बंद होई. १४ अंतःकरण व्यापार.

स्वाग-ये अशांत सदनांत हरी तो॥ जो अनादि भवशोक हरीतो ॥
ता. किंकरी नमुनियां चरणातें ॥ सांगती सकळ आचरणातें ॥ ७ ॥

भुजंगप्र० म्हणे शोक कां प्राप्त झाला महा हा ॥
अशी कष्टली कां शुभांगी अहा हा ॥
न बोलेचि कां आमुशीं आज राणी ॥
जिच्या बोलण्याचीच आम्हां शिराणी ॥ ८ ॥

शिखरिणी. जयीं श्रीवत्सांक प्रभु करि निजांकस्थित शिरा ॥
शिरा नाडी प्राण प्रगटति नलावूनि उशिरा ॥
शिराणी शब्दाची पुरवि तरि डोळे न उघडी ॥
घडी जों मानाची विघडलि असे तोंवरि घडी ॥ ९ ॥
बजागी ते जागी स्वमनिं परि डोळे न उघडी ॥
घडी एक क्रोधीं मन बुडवि मानें अवघडीं ॥
घडी पूर्वप्रेमस्थितिस बसतां तीस विघडी ॥
घडी स्त्री जातीची घडविलि असे ख्याति सुघडी ॥१० ॥
वदे भामा कोपें अति विकळ चाऊनि अधरा ॥
धरा-पृष्ठीं नाहीं ठक तुज असा अंबुजधरा ॥
धरावें या अंकीं शिर अजि तिचें पक्षिगमना ॥
मना आलें देणें कुसुम जिस तें कंसदमना ॥ ११ ॥

वसंतति० जों नेत्र मोडूनि वदे ढकलूनि मांडी ॥
भ्रूमंडळीं भ्रमण अंगुलिभंग मांडी ॥
तों कृष्णजी करुनि हास्य म्हणे अहा हा ॥
वेडे अनर्थ इतुक्यास्तव कां महा हा ॥ १२ ॥

स्वाग- अर्पितां मुनिवरें सुमनातें ॥ वाटलें प्रथम हेंचि मनातें ॥
ता० कीं असा तरु पुरींत असावा॥त्यांतही स्व-सदनींच वसावा ॥१३॥
फूल देउनि तिला उतराई ॥ होइं मी समज हे चतुराई ॥

---

१ आम्हापाशीं. २ ज्याच्या उरस्थलावर भृगूच्या लातेची श्रीवत्स नांवाची खूण आहे असा प्रभु ( कृष्ण ). ३ आपल्या मांडीवर ठेवलेलें. ४ मस्तकास. ५ तोंपर्यंत घटिकाभर—( डोळे न उघडी असा अन्वय ). ६ दुर्वह. हें क्रोधाचें विशेषण. ७ स्त्री-जातीची सुघडी ( चांगली ) घडी घडविली ( अशी, ख्याति असे—असा अन्वय ). ८ कमल हातांत धरणाऱ्या कृष्णा. ९ भिवया फिरविणें. १० बोटें मोडणें.

देतसें तरुचि तो तुजल्मगे ॥ खेद हा न करणें तुजला गे ॥ १४ ॥

शिखरिणी. हरी जाणे ईर्षे कीं न वदत असे क्रोध-निकरें ॥
करें आलिंगावी प्रिय वदत हे प्यां प्रियकरें ॥
करें श्रीचंद्राच्या कठिन शशिकांत द्रवतसे ॥
तसी हे ही भाव प्रगट करणारी अमृतसे ॥ १५ ॥

भुजंगप्र० तुतें वृक्ष देणेंचि यालागिं आधीं ॥
फुलें नाशिला जो तिला होय आधी ॥
न जाणोनि केले तुवां कष्ट भारी ॥
समाधान ऐसें करी कैटभारी ॥ १६ ॥
अशी ते बुझावूनि रंभोरु हातें ॥
तिच्या धूतसे हो मुखांभोरुहातें ॥
उटी लावुनी वाटल्या केशरा जी ॥
स्वहस्तांबुजीं विचरी केशराजी ॥ १७ ॥

मालिनी. करि हरि यमुना हो मूद गंगावनाची ॥
मिरवि धवल पुष्पीं दीप्ति गंगावनाची ॥
सित असित नद्यांच्या संगमीं श्री त्रिवेणी ॥
तशिच यदुपतीनें घातली चित्र वेणी ॥ १८ ॥

---

## वेंचे, रुक्मिणीविलासांतील.

करुनि नमन देवा रुक्मिणीनायकातें ॥
निजपद हरि दे जो कीर्तिच्या गायकातें ॥
स्मरत पद तयाचें त्याचिया लोकलीला ॥
कथिन हरिति गातां वर्णितां ज्या कलीला ॥ १ ॥

वसंतति० चिच्छक्तिला सतत चिन्मय जेविं योग ॥
श्रीरुक्मिणीस न कधीं हरिसीं वियोग ॥

---

१ रागाच्या सपाट्यांत. २ अमृतसे भाव प्रकट करणारी हे ही तसी द्रवेल, असा अन्वय. ३ रुक्मिणीला. ४ कैटभ दैत्य मारणारा कृष्ण. ५ केळीच्या खांबाप्रमाणें आहेत मांड्या जीच्या अशी सत्यभामा. ६ मुखकमलातें. ७ उटीकडे ह्याचा संबंध. ८ केशपंक्ति. ९ भागीरथीच्या पाण्याची. १० गंगा यमुना सरस्वती ह्यांचा प्रवाह. ११ मुक्ति. १२ मायेला. १३ ज्ञानस्वरूप-ब्रम्ह.

मी यास्तव प्रियतमा परमा रमा ते ॥
मानी अहंकृति शिवे असि मारमाते ॥ २ ॥

मालिनी. म्हणउनि खिजवीतो रुक्मिणीतें हरी तो ॥
परम करुण तीच्या मीपणाला हरी तो ॥
कथिन चरित तें जें वर्णिलें श्री–शुकानें ॥
मनिं धरुनि पहावें सज्जनीं हें सुकानें ॥ ३ ॥

उपजाति. श्रीरुक्मिणीची बहु गोड वाणी ॥ ग्रंथास तेथें न करीन वाणी ॥
कीं कृष्ण जे शब्द अगाध वाचे ॥ वदेल ते वर्णिन माधवाचे ॥ ४ ॥
हा प्रेमसंवाद सुखी सुजाणा ॥ करीतसे नामहि तेंचि जाणा ॥
आतां शुकाचार्य परीक्षितीतें ॥ सांगे कथा धन्य करी क्षितीतें॥५॥

भुजंगप्र० पलंगावरी रुक्मिणीच्या सुसेजे॥बसे कृष्ण ते त्यास सेवीतसे जे॥
उभी सुंदरी ढाळिते चामरातें ॥ मनीं जे शिवे मीपणा पामरातें ॥६॥

द्रुतविलं० कर मुद्यावलयांसह चाळितां ॥ चवर माधवजीवरि ढाळितां ॥
ध्वनि उठे चरणीं मृदु भूषणीं ॥ त्दृदय लग्न जिचें यदु-भूषणीं॥७॥
चहुंकडूनि हि आनन शोभलें ॥ पदक खालुनि शोभतसे भलें ॥
श्रवणिंचे नग शोभति दोंकडे ॥ वरुनि चांचर केशहि वांकुडे ॥ ८ ॥
गळसरी दुसरी न धरी गळां ॥ प्रति-भवीं न पती हरिवेगळा ॥
अवतरे अवतीर्ण जयीं पती ॥ स्व-अनुरूप परस्पर दंपती ॥ ९ ॥
कसि असीस अहंमति वाटते ॥ नरक-जन्म-मृतीसहि वाट ते ॥
म्हणउनी खिजवूनि तितें हरी॥निपुण कृष्ण अहंकृति ते हरी॥१०॥

शिखरिणी. वरावे ते राजे निजसम तुवां राजतनये ॥
नये आम्हां ऐसा क्वचिदपि वरू वो सुविनये ॥
दिलें बापें भावें त्यजुनि बरवे ते क्षितिपती ॥
पतीं केला ज्याचे कुळपति समुद्रांत लपती ॥ ११ ॥

स्वागता. घालिती नृपति येउनि घाले ॥ यानिमित्त जलधींत निघाले ॥
शत्रु ज्यास नृप दानव, रीती ॥ऐशियास नवऱ्या न वरीती॥१२॥

१ मदनाची आई रुक्मिणी इला. २ कमताई. ३ आणि. ४ सुज्ञास. ५ अहंपणा ह्या मीपणातें. ६ अंगठ्या व बांगड्या ह्यांसह. ७ कृष्णाचे ठिकाणीं ८ चंचल. ९ कधींही. १० अतिनम्र. ११ जरासंधाच्या भयानें कृष्णानें समुद्रांत द्वारका नगरी बांधून तींत आपले सर्व आप्त इष्ट घेऊन तो राहिला अशी कथा आहे,तीस लक्षून वरील लिहिलें आहे. १२ अशी चाल आहे.

द्रुतवि- त्यजियलें अजिहि स्वनृपासना॥करिल त्याचि हि कोण उपासना॥
लं० प्रगट गोष्टिहि हे जनि हो असो॥कळत तूं ठकलीस अहा कसी॥१३॥

वसंत ति० ऐश्वर्यवंत वय आकृति ही समान ॥
स्वार्थार्थ होतिल परस्पर त्यांस मान ॥
मैत्री विवाह न घडे अधमोत्तमातें ॥
तूं भाळलीस नृपनंदिनि काय मातें ॥ १४ ॥
येथें सुजाणपण जाण तुझें बुडालें ॥
कीं दीर्घदृष्टिपण तें अवघें उडालें ॥
ज्यालां न लेश गुण तो पति काय केला ॥
ज्याकारणें जन अकिंचन तो भुकेला ॥ १५ ॥

मालिनी. अटन करित भिक्षा भक्षणें ज्या समाजीं ॥
गगन-वसन, वारा सूत्र, ही त्यास, माजीं ॥
अगुणपण जयाचें ऐसिया स्वादु लागे ॥
तुज नृपति-सुते तो कायसा दादुला गे ॥ १६ ॥

उपजा आतां तरी क्षत्रिय तूं भला गे ॥ वरीं जयाचा तुज लोभ लागे ॥
ति० जेणें तुला संधति लोक दोनी॥आम्हीं वृथा काय बहू वदोनी॥१७॥

वसंतति० झाली असें परिसतांचि अनाथ-वाणी ॥
ठावी नसे जिस कधीं असि नाथ-वाणी ॥
त्रैलोक्यनाथ पति हा प्रिय आपणातें ॥
त्यागावया तिस गमे करितो पणातें ॥ १८ ॥
दाटूनि कंठ पडली वदनास मुद्रा ॥
शोकें भरे जल जसें भरितें समुद्रा ॥
घेऊनि चामरचुडा सह मुद्रिकांहीं ॥
भूई पडे उरि नुरे तनुमाजि कांहीं ॥ १९ ॥

भुजंगप्र० पडे केळ जैसी महाचंड-वातें॥असें देखतां ये कृपा माधवातें ॥
उडी शीघ्र टाकी पलंगावरूनी॥धरी उत्तरीयांबरा सांवरूनी॥२०॥

मालिनी. मजविण न सुखाचा तूज तों हेतु कांहीं ॥

१ एकमेकांच्या हितास कारण. २ भोळेपणानें वश झालीस. ३ आकाश हेंच वस्त्र. ४ राहित्य ( निर्गुणपणा व मूर्खपणा असे दोन अर्थ समजावे ). ५ दीनासारखी. ६ तोंड बंद पडलें. ७ बाकी. ८ पांघरलेल्या वस्त्राला.

समजत तुझिया या पाहतों कौतुकांही ॥
निजवचन विनोदें बोलिलों तूजला गे ॥
न कळत गति याची खेद हा तूज लागे ॥ २१ ॥

नयन-शर धनुष्यें भोवयांच्या मतापें ॥
श्रवण वरिहि येती तांबडे कोपतापें ॥
अधर थरथरीती रक्तवर्ण स्वभावें ॥
असस तुज पहावें बोललों याचि भावें ॥ २२ ॥

उपजाति. लक्ष्मी अपांगे मुख कृष्णजीचें ॥ विलोकनीं चित्त अखंड जीचें॥
स्नेहें सलज्जें नयनींच पाहें॥टाकूनि चिंता कळतां कृपा हे॥२३॥

भुजंग-प्र० अतिश्रेष्ठता तूज सर्वोत्तमातें॥ उणी मी जरी सेविती मत्त मातें॥
खरें हें तरी योग्य होतें वराया॥अजी आयकावें बरें देवराया॥२४॥

मालिनी जरि निपट दरिद्री जो न लाहेचि कांजी ॥
तरि अमृत मिळाल्या त्यास सोडील कां जी ॥
तसि बहुत उणी मी लभ्य झालास मातें ॥
ह्मणउनि वरिलें म्यां तूज सर्वोत्तमातें ॥ २५ ॥

उपजाति. राज्यादिकें टाकुनि निर्विकारी॥ त्वदर्थ होतात असे भिकारी ॥
राज्यांत दुःखें सुख तूजमाजीं॥म्हणून तूं श्लाघ्य तया समाजीं॥२६॥

भुजंग-प्र० सुधा मानुनीयां पितो एक कांजी॥सुधापान-कर्ता शिवे त्यास कां जी॥
तसी टाकुनी मी तुला मंगळाला॥नृपांला तया कां भजों वोंगळांला२७

## वेंचे, लोपामुद्रासंवादांतील.

शालिनी. वंदूनि श्रीराम संसारसाक्षी॥ज्याचे अंकीं जानकी सारसाक्षी ॥
लोपामुद्रेशीं तिशीं शब्दमाला॥झाल्या अर्पूं त्याचि सर्वोत्तमाला॥१॥

वसंतति० मारुनि रावण विदेहसुता-श्रमातें ॥
नासूनि ये कलश-संभव-आश्रमातें ॥

---

१ रोस. २ कोपतापें तांबडे नयनशर ( कटाक्षरूप बाण ) भोंवयांच्या धनुष्यें प्रतापें श्रवण वरिहि ( आकर्णपर्यंत ). येती असा अन्वय–म्ह० जी रागानें लाल झालेले डोळे भिवया वळवून आकर्ण फिरवित आहे अशीस. ३ कल्याणस्वरूपाला. ४ शब्द रूप माळ. ५ जनकाची मुलगी सीता तिच्या दुःखातें. ६ [illegible] स्थानातें.

तो सिंधु बिंदु करि हा मनिं गर्व वाहे ॥
त्यांची वधू विदितसे मनिं राघवा हें ॥ २ ॥

उपजाति. न तीपुढें सेतुकथा वदावी ॥ म्हणोनि सीतेप्रति भाव दावी ॥
बोलोनि ही सांवरिजे स्ववाचा॥हा शब्द तो सूचवि लाघवाचा॥३

भुजंगप्र० विचारी मनीं सर्व-संसार-साक्षी॥जरी वारिली जानकी सारसाक्षी॥
सदा सेतुलीला-निदिध्यास तीतें ॥वदेल स्ववाचे ऋषीचे सतीतें॥४॥

वसंतति० सर्वा कथा कथि अगस्तिवधूसि सीते ॥
क्षाराब्धिसेतुरचना न कथीं सतीतें ॥
कीं चूळ जो जलधिची करि त्या मुनीची ॥
कांता वदेल तव वल्लभ-कीर्ति नीची ॥ ५ ॥

उपजाति. प्रमाण आज्ञा म्हणवूनि रामा ॥ वंदूनि जातां मुनिवर्य-धामा ॥
पुसे तिला क्षेम तया प्रसंगीं ॥ संवाद हा राघव-विप्रसंगीं ॥६ ॥

स्वागता. राम तो स्वरतें नित्य विरक्त॥ हा नसेल तुजशीं अनुरक्त ॥
कीं असेल सुख तें वद, सीते ॥ सांग गोष्टि हि सुख-प्रदसी ते॥७॥
काय बोलत असे अभिराम ॥ श्रांत तूज अवलोकुनि राम ॥
सांग आणिकहि वल्लभवार्ता॥ज्या कथा करिति सौख्य भवार्ता॥८॥

उपजाति. विरक्त बाई रघुराज साचा ॥ भोक्ता नव्हे राजस तामसांचा ॥
न या वहू कल्पतरूपमा ते ॥ दे सोहळे कल्पितरूप मातें ॥ ९ ॥

मालिनी. जसि बहु रवितप्ता साउली गोड वाटे ॥
तसि वनिं पतिलाडें मानिते कोड वाटें ॥
घरिंहुनि मज बाई सोहळे काननाचे ॥
सजलजलदसंगें मोर वो कां न नाचे ॥ १० ॥

शिखरिणी. पथीं मागें मागें परम अनुरागें रघुपती ॥
उभा राहे पाहे गुणहि मुनि हे हेचि जपती ॥

---

१ अगस्तिऋषि. २ सुग्रीवा. ३ मोठा ध्यास. ४ क्षार-समुद्रावर सेतु बांधणे. ५ तुच्छ. ६ राम—व अगस्ति हे एकीकडे असतां लोपामुद्रा व सीता ह्यांचा हा पुढील संवाद झाला. ७ [illegible] स्वरूपीं रममाण. ८ सुखप्रद-अशी. ९ संसार दुःखानें पिडले [illegible]. १० [illegible] व तामस विषयांचा. ११ कल्पतरूची उपमा. १२ जेजे मनांत [illegible] ते. १३ [illegible]. १४ घरांतल्या पेक्षां. १५ पाण्यानें भरलेल्या मेघाच्या [illegible].

कृपापांगें आंगें निववि करि संसारधिंवसा ॥
धरा माता, भ्राता शशिच सविता होय दिवसा ॥ ११ ॥

मालनी. रघुपतिसह शय्या भूमि हे माय वाटे ॥
मृदु सुपथिहुनी ही मानितें पायवाटे ॥
श्वशुर दिनमणी ही होय एणांक भाऊ ॥
न कळत मज ऐसे क्लेश निःशेष भाऊं ॥ १२ ॥

भुजंगप्र॰ तिघें पावलों अत्रिच्या आश्रमातें ॥
तयाची वधू ते हरी वो श्रमातें ॥
तयीं हार हे गंध लावूनि घाली ॥
स्वआतिथ्य कौशल्य दावूं निघाली ॥ १३ ॥

वसंततिं॰ ये देखतां बहु कृपा मज दत्तमाते ॥
पूजूनि येरिति वदे सति उत्तमा ते ॥
वेणी फणी करिल वो तुज कोण वाटे ॥
वाईट हें मज म्हणे मुलि फार वाटे ॥ १४ ॥

स्वागता. म्लानता कधिं न यो सुमनांतें ॥
क्लेश केश न करोत मनातें ॥
गंध आईचि असो अनसूया ॥
दे असा वर न जीस असूया ॥ १५ ॥

मालिनी. करतल न दुखों दे फोड वो जेविं–वाणी ॥
वनिं धरि मन माझें येरिती चापपाणी ॥
कनकमृग म्हणों, तों पाठिसी राम लागे ॥
दशमुख हरि ऐशामाजि मेला मला गे ॥ १६ ॥

भुजंग प्र॰ मृग प्राण सोडी तयीं दीनवाणी॥अरे लक्ष्मणा धांव ऐशी सुवाणी॥
वदे तों मला रामवाणीच वाटे॥म्हणोनी बळें लाविलें त्याचि वाटे१७॥
नजातां तया बोलिलें दुष्ट वाचा॥अरे घात तूं इच्छिसी राघवाचा॥
तुला माम होणार कां देवरा मी॥धरीसी असा कां म्हणे भाव रामीं१८

१ कृपाकटाक्षानें. २ होस. ३ दिवसा सविता भ्राता शशीच होयः—म्हणजे रामाच्या बरोबर असल्यानें सूर्य ही चंद्रासारखा थंड वाटला. ४ सूर्य हा सासरा असून भाऊ जो चंद्र त्यासारखा वाटला. ५ लोक मानोत. ६ दत्तात्रेयाची आई अनसूया तिला. ७ जसें. ८ धनुष्य धारण करणारा राम. ९ सोन्याचा हरिण. १० इतक्यांत.

अशा शब्दबाणीं सुमित्रात्मजाला[1] ॥ अवो विंधितां तो मृतप्राय जाला ॥
रडे जाय तो राघवा लोकपाळा ॥ करूं काय आतां म्हणे मी कपाळा १९

स्वागता. जाय तो रडत दाटत कंठ ॥ प्राप्त होय मजला दश-कंठ ॥
पद्मिनी उपडुनी गज हस्तीं ॥ ने तसा उचलुनी मज हस्तीं ॥ २० ॥

मालिनी. असि सकळ अनर्था मूळ माझीच वाणी ॥
धरुनि मज पळे तैं होय मी दीनवाणी ॥
बहुत मजनिमित्तें राघवें शोक केला ॥
करुण म्हणुनि नें स्त्रीकाम[2] कामीं भुकेला ॥ २१ ॥

द्रुत-विलं॰ मजनिमित्त करी गडि वानरां ॥ सुलभ जो न सुरां अथवा नरां ॥
धरि मदर्थ असा व्यवसाय कीं ॥ दशमुखा बांधि[3] राघव सायकीं ॥ २२ ॥
करिं करी कमळा कमलापती ॥ मथुनि सिंधु असाचि मला पती ॥
जलधि मध्यपुरींत[4] तिचा धणी[5] ॥ वधुनि दे मज आत्मसुखें धणी ॥ २३ ॥

स्वागता. जे जळांत बुडणार तीव्र ते ॥ थोर पर्वत अवो पतिव्रते ॥
सागरीं तरति सेतुवाट ते ॥ हे अतर्क्य करणीच वाटते ॥ २४ ॥

द्रुत-विलं॰ परततां जळधीवरि पाहतें ॥ तरति पर्वत विस्मित राहतें ॥
जळतळावरि हो धरणी सये ॥ करि, नसे तुळणा करणीस ये[6] ॥ २५ ॥

भुजंगप्र॰ समुद्रावरी सैन्य ये पायवाटे ॥ मनीं हें सदां जीस आश्चर्य वाटे ॥
कशी सेतुची गोष्ट तीच्या मुवाचे ॥ नये वीसरे बोल ते राघवाचे ॥ २६ ॥
शरीरीं भरे वर्णितां रामवारें ॥ उठाणें मनाचीं तयीं दुर्निवारें ॥
पतीचीं यशें जे निरोपीत जाते ॥ वदे गोष्टि हेही विदेहात्मजा ते ॥ २७ ॥
विदेहात्मजा पावली विस्मृतीतें ॥ म्हणे बांधला सिंधु जो त्या सतीतें ॥
जसें हास्य[7] ये, स्वामिच्या भारतीतें ॥ स्मरे, तो स्फुरे हा चमत्कार तीतें २८

वसंतति॰ क्षाराब्धि-सेतु झणि सांगसि तीस सीते ॥
जीचा पती जळधि चूळ करी तसी ते ॥
शब्दांत या रघुपतीच खुणेस दावी ॥

---

१ सुमित्रेचा मुलगा लक्ष्मण त्याला. २ स्त्रीकाम म्ह॰ स्त्रीलंपट, किंवा विषयासक्त असल्यामुळें त्यानें शोक केला असें नाहीं, तर त्याचें अंतःकरण अत्यंत दयार्द्र होतें म्हणून मज अबलेवर भयंकर प्रसंग गुदरलेला पाहून त्यानें शोक केला. ३ मारिता झाला. ४ समुद्रा मध्यें असणाऱ्या पुरींत (लंकेंत) ५ रावण. ६ या. ७ आलें (लोपामुद्रेला).

कीं क्षार मूत्र अशि गोष्ट पुन्हा वदावी ॥ २९ ॥

शिखरिणी. म्हणे लोपामुद्रा चुळभरि समुद्रा करि पती ॥
तया या आयासें करुनि उतरे कां रघुपती ॥
द्विजाच्या हो मूत्रा शिवति अपवित्रा न कपि ते ॥
म्हणे सीता नाहीं तरि सगिरिसप्ताब्धि हि पिते ॥ ३० ॥

---

## वेंचे, वामन चरित्रांतील.

बळीनें इंद्रपदहरण केल्यानंतर तें पुन्हा इंद्रास द्यावें म्हणून, विष्णूनें वामनाचा अवतार घेऊन बळी यज्ञ करीत होता तेथें येऊन त्यास त्यानें आपल्या पावलानें तीन पावलें जमीन मागितली. बळीनें त्याप्रमाणें घे म्हटल्यावर वामनानें विश्वव्यापक रूप धारण करून दोन पावलांत भूलोक व स्वर्ग लोक व्यापिले, आणि पूर्वींच्या वचनाप्रमाणें तो बळीपाशीं आणखी पाऊलभर जमीन मागूं लागला, तेव्हां बळीनें आपलें बोलणें सत्य करण्यासाठीं आपल्या मस्तकावर तिसरें पाऊल ठेवावयास सांगितलें. मग वामनानें त्याच्या डोकीवर पाय देऊन त्यास पाताळीं घातलें; असी कथा ह्या आख्यांनात आहे.

शार्दूलवि० इंद्राचें पद दैत्यराज बळि तो विप्रप्रसादें हरी ॥
तेव्हां कश्यपमंदिरीं अदितिच्या दिव्यव्रतें श्रीहरी ॥
झाला वामन मुंजि तेचि समयीं होतांचि भिक्षाछळें ॥
सर्वस्व त्रिपदें हरी स्मर मना त्याचीं पदें कोमळें ॥ १ ॥

भुजंगप्र० बळी याग तो नर्मदेच्या तटाकीं॥करी,आहुती शुक्र अग्नींत टाकी॥
अकस्मात तों देखिलें वामनाला॥सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला॥२॥

द्रुतविलं० करिं कमंडलु दंड मृगाजिन ॥ त्रिजग माप करी बटु वामन ॥
सकल वेदविशारद चांगला ॥ कटितटीं अति सुंदर मेखला ॥ ३ ॥

शार्दूलवि० तूं गा कोण?, अपूर्व[1]; कोठ वससी?, हें विश्व[2] जी तत्वता; ॥
पाळी कोण तुतें?, अनाथ अजि मी त्राता न माता पिता; ॥
घावें काय तुतें?, त्रिपाद धरणी माझ्या पदें; फार घे; ॥

---

१ पर्वता सहवर्तमान सात समुद्र. २ तीन पावलांनीं. ३ अपूर्व (अनादि पक्षीं विलक्षण). ४ विश्वव्यापक पक्षीं जगांत कोठेंतरी राहणारा. ५ ज्याहून कोणी समर्थ नाहीं; पक्षीं ज्याचें रक्षण करणारा कोणी नाहीं.

नेघे, वामन बोलिला बळिस कीं तृप्ति त्रिलोकीं रिघे ॥ ४ ॥

वसंततिः पूजी बळी मग म्हणे बटु वामनातें ॥
कीं माग जें तव अभीष्ट गमे मनातें ॥
देणार गा इतर मी मज काम नाहीं ॥
तूं माग जे पुरवितों तव कामना ही ॥ ५ ॥

भुजंगप्र० म्हणे धन्य राया स्ववंशानुसारें॥प्रभू बोलसी तूं तुझा बोल सारे॥
रणीं आणि दानीं तुझीया कुळीं रे॥न दे पाठि कोणीच राया बळी रे६

इंद्रवज्रा राया मला एक असे अपेक्षा ॥ त्यावेगळी सर्व जनीं उपेक्षा ॥
मोजूनि माझ्या त्रिपदेंचि मातें ॥ दे भूमि विप्रप्रवरोत्तमातें ॥७॥

द्रुतविलं० बळि म्हणे अति सादर वामना ॥ बहुत वाटसि गा बरवा मना॥
मज अशा भुवनत्रय-पाळका॥बहु न मागसि कां द्विज-बाळका॥८

रथोद्धता: शब्दमी धरिन मस्तकावरी ॥ ब्राम्हणा अधिक भूमिका वरी॥
वाटसी बहुत नेटका मना ॥ जे असेल वद नीट कामना ॥९॥

द्रुतविलं० द्विजसुता तुझिया वचनामृतें ॥ मज गमे उठतील शवें मृतें ॥
निपुण दीससि निर्मळ आरसा॥परि न मागसि अर्थचि फारसा॥१०॥
हरि म्हणे मजला इतुकें पुरे ॥ त्रिभुवनात्मक होउनियां उरे ॥
त्रिपदमात्रचि कार्य असें बरें॥अधिक इच्छिति लोक न ते बरे ॥११

रथोद्धता. शब्दभाव बळिलाहि नाकळे ॥ शुक्र सन्निध तयासि तो कळे ॥
तो वदे भुज सभे उभारुनी॥त्या बळीप्रतिच हाक मारुनी॥१२॥

द्रुतविलं० अदितिच्या उदरीं हरि जन्मला॥म्हणुनि ये समयीं कळलें मला॥
विभव राज्य समस्त हरील रे॥यशहि होइल विस्तृत अस्त रे॥१३॥
म्हणुनि सांगतसें तुज मी अगा॥बस तुं मौनपणें अथवा उगा ॥
म्हणसि देइन यावरि ही जरी॥रिघसि दाटुनि पातकपंजरीं ॥१४॥

उपजाति० संकल्प जो तूं करिसील बापा॥न देववे जासिल सद्य पापा ॥

---

१ तीन पावलांनीं तिन्ही लोक व्यापले म्हणजे अधिक कांहींच उरणार नाहीं असा आशय. २ आपल्या कुळाला शोभेल अशा रीतीनें. ३ साजे. ४ ब्राम्हणांमध्यें अति श्रेष्ठ जो मी त्या मला. ५ जास्त भूमि माग. ६ तीन पावलें जागा दिली असतां ती त्रैलोक्याहून ही जास्त होईल असा उत्तानार्थ व तीन पावलें मापण्याला त्रैलोक्य ही पुरणार नाहीं असा गर्भितार्थ ७ हे दोन्ही शब्द एक अर्थाचेच आहेत-अशीं वामना-च्या कवितेंत पुष्कळ दुसरीं उदाहरणें आहेत. ८'पापा जासील' म्हणजे तुला पाप लागले.

पद–द्वयीं विश्व पुरेचि जेव्हां॥जावें तुवां कीं नरकासि तेव्हां॥१५॥
करूनि संकल्प न दे द्विजा तो॥ प्राणी स्वपापें नरकासि जातो ॥
आधींच नेदीं म्हणतां भला हो॥देसी झणी वैखरिमात्र लाहो ॥ १६

द्रुत- जरि विचारुनि गोंविसि वैखरी ॥ तरिच होइल जाण अगा खरी॥•
विलं० म्हणुनि शुक्र अजी बहु बोलतो॥परि तयीं वदला बळि बोल तो॥१७

भुजं- विचारूनि आचार्यवाचा निदानीं॥बळी तो धरी बुद्धि सर्वस्वदानीं ॥
गप्र० म्हणे बोलतां जी जरी सत्य वाणी॥द्विजा केंवि वाचा वदों दैन्यवाणी१८

इंद्र- हे भूमि वेश्या इसि सर्व जाती ॥ भोगोनियां मृत्युपथास जाती ॥
वज्रा. लोभें इच्या लंघुनि विप्रवाणी ॥ धिग्बोलती वैखरि दैन्यवाणी॥१९॥

मालिनी. निगमविधि–विधानें मांडुनी हे पसारे ॥
यजुनि विविध यागीं वंदिती ज्यासि सारे ॥
वरद हरिच तो हा विप्र कोण्हीच हो जी ॥
किति तरि मज मागो भूमि देतों अहो जी ॥ २० ॥

इंद्र- सर्वस्वदानीं बळि सिद्ध झाला ॥ पूज्यासनीं बैसवि त्या द्विजाला ॥
वज्रा. प्रक्षाळि त्या श्रीपदपंकजातें॥ ध्याती रमाअब्जभवादि ज्यातें॥२१॥

वसंतति० आली समीप यजमानिन पट्टराणी ॥
पाहे हरीस जिचि हो न पुरे शिराणी ॥
ओती करें कनकपात्र धरूनि वारी ॥
सर्वस्व दे पात तयास न जे निवारी ॥ २२ ॥

उप- करूनि संकल्प करांत पाणी ॥ घालूं म्हणे पूजुनि चक्रपाणी ॥
जाति. निघे न झारींतुनि नीर बिंदू ॥ म्लानत्व पावे बळिचा मुखेंदू ॥२३॥
कीं शुक्र झारींत रिघोनि गोळा॥करूनि आंगें अजि होय बोळा ॥
फोडी हरी घालुनि दर्भ डोळा ॥ दिसे जना विप्रकुमार भोळा ॥२४॥
ऐशा रिती पूजुनि दानवारी ॥ घाली करीं तें मग दानवारी ॥

१ नाहींतर मी देतों असें म्हणण्याचा मात्र लाभ घेशील, वस्तुतः तुझ्यानें म्हट-ल्याप्रमाणें करवणार नाहीं हा भाव. २ भाषण हें 'वदला' याचें कर्म. ३ विचार करून. ४ दैत्यगुरु शुक्र त्याची वाणी. ५ सर्व जातींचे लोक. ६ वेदोक्त कर्ममार्गाप्रमाणें. ७ सु-टपटी. ८ वामनाच्या सुंदर चरण कमलास. ९ लक्ष्मी, ब्रह्मा आदिकरून. १० दानव-अरि ( दानवांचा शत्रु वामन ). ११ दानोदक.

म्हणे स्वपादीं अजि भूमि मोजीं॥जे अर्पीली;त्याचि पदा नमो जी२५

वसंतति. संकल्पयुक्त पडतां स्वकरांत पाणी ॥
वाढे त्वरें करुनि वामन चक्रपाणी ॥
पाताळ पादतळ मस्तक सत्यलोकीं ॥
कर्णी दिशा दिनमणी नयनावलोकीं ॥ २६ ॥

उप- एक्या पदें भूमि भरोनि थोडी ॥ दुज्या पदें अंडकटाह फोडी ॥
जाति. दे तीसरा पाद म्हणे बळीला॥ म्हणोनि पाशीं दृढ आकळीला॥२७॥
याकारणें प्रार्थुनियां हरीची ॥ करी स्तुती प्रेमरसें विरिंची ॥
प्रल्हाद आजा बळिभूपतीचा॥ आला महाभक्त रमापतीचा॥२८॥
म्हणे तुवां हे दिधली त्रिलोकी ॥ नेली तुवां पूर्णकृपावलोकीं ॥
केला तुवां दंड कृतार्थ झाला ॥ प्रल्हाद इत्यादि वदे अजाला॥२९॥
पत्नी बळीची जगदीश्वरातें ॥ वंदोनि बोले कमळावरातें ॥
म्हणे धणी तुंचि चराचरांचा ॥ वृथाऽभिमान प्रभुजी नरांचा ॥३०॥
सर्वांचिया आइकतां स्तुतीतें ॥ बोलावुनी त्याच महामतीतें ॥
म्हणे बळी दे तिसऱ्या पदातें॥ कीं भोग पापें बहु आपदांतें ॥३१॥
करुनि संकल्प न देसि जेव्हां ॥ जाशील राया नरकासि तेव्हां ॥
म्हणे बळी देइन देवराया॥ आहे स्वसंकल्प खरा कराया ॥ ३२॥
तसा न भीं मी नरकासि देवा ॥ या पाशबंधासहि वासुदेवा ॥
नभीं सुरांच्या जयवाद्यनादा॥भीतों जसा मी अपकीर्तिवादा ॥३३॥
करुनि संकल्पहि तूज देना ॥ कोण्ही मला धन्य जगीं वदेना ॥
माझ्या शिरीं ठेव निजा पदातें॥ जें छेदिनें सर्वहि आपदांतें ॥ ३४॥

द्रुत- पदयुगें भुवनत्रय मोजिलें ॥ पद तिजें बळिचे शिरिं योजिलें ॥
विलं० पदनखें विधिअंड विदारिलें ॥ पदतळेंचि जगत्त्रय तारिलें ॥ ३५ ॥

उप- करी बळी स्वात्मनिवेदनातें ॥ संतोष झाला मधुसूदनातें ॥
जाति. दैत्येंद्र तात्काळचि मुक्त केला॥प्रेमामृताचा हरि हा भुकेला ॥३६॥

---

१ नमस्कार असो. २ कटाह म्ह० कढई ती सारखें अंड म्ह० ब्रह्मांड. ३ उदार आहे बुद्धि ज्याची अशा बळीतें. ४ देतों म्हणून दिलें नाहीं ह्या पातका मुळे. ५ माझा पराजय झाल्यामुळें देवांनीं केलेल्या जयसूचक वाद्यनादास. ६ दुष्कीर्तीचें भाषण. ७ ब्रम्हांड. ८ आपल्या आत्म्याचें अर्पण. ९ मधुनामक दैत्याला मारणारा वामन.

## वेंचे, भरत भावांतील.

राम वनांत जातांच त्याच्या वियोगानें दशरथ मरण पावला. तेव्हां भरत आपल्या मामाच्या घरीं होता, त्यास वसिष्टऋषीनें बोलावून आणिलें. राम वनवासास जाण्याला व दशरथ मरण्याला आपली आई कैकयी हीच कारण झाली, असें भरतास समजतांच त्यास परम खेद झाला. नंतर बापाची क्रिया संपल्यावर तो रामाला वनांतून परत आणावें म्हणून त्याजकडे गेला. परंतु मी वनांत जावें व तूं राज्य चालवावें अशी पित्राज्ञा आहे ती आपण दोघांनीं ही उल्लंघूं नये असें रामानें सांगून त्यास राज्याधिकार चालविण्यास परत पाठविलें. नंतर भरत रामाच्या पादुका घेऊन अयोध्येस आला, हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे; व ह्यांत भरताची रामचंद्राविषयीं अलौकिक भक्ति वर्णिली आहे म्हणून ह्या आख्यानास 'भरतभाव' ही संज्ञा कवीनें योजिली आहे.

द्रुत-विलं० करुनि वंदन जानकि-नायका ॥ भरतभाव निरोपिन आयका ॥
जननि टाकुनि रामपदीं निघे॥सुकृति तो मति हे समजोनि घे॥१॥

मालिनी. भरत जवळि नाहीं मातुल-ग्राम-वासी ॥
भरत-जननि धाडी कानना राघवासी ॥
दशरथ मृत झाला राम जातां वियोगें ॥
तृण बहुत दिसाचें अग्निच्या जेवि योगें ॥ २ ॥
मग भरत वसिष्ठें आणिला जो अयोध्ये ॥
नगरि गतधवा ते आणि निर्वीर्य योद्धे ॥
जन मृत-सम देखे हेतु कांहीं कळेना ॥
जननिकृत कुचेष्टा बुद्धितें आकळेना ॥ ३ ॥

उपजाति. वृत्तांत सांगे भरतासि माय ॥ स्वानंद जीचा त्रिजगीं न माय॥
भेदूनि वक्षस्थळ शब्द तीचा॥करी महा क्षोभ महा-मतीचा॥४॥
जाळील तीतें निजदृष्टिपातें ॥पाहे असा हालविनाच पातें ॥

---

१ 'जननि टाकुनि (जो) रामपदीं निघे तो सुकृति, हे मति समजोनि घे'—अत्यंत प्रिय जी आई तिला ही सोडून देऊन जो ईश्वरास शरण जाऊन त्याची सेवा करितो तोच धन्य होय, असा उपदेश घे, असें वाचकास कवि म्हणतो. २ मामाच्या गांवीं राहिलेला. ३ थोर अंतःकरणाचा जो भरत त्याचा.

म्हणे अवो पापिणि पापरूपे॥जळो तुझें तोंड जड-स्वरूपे॥५॥
जाळीन हें तोंडचि जाण आधीं॥मुखें जया देशि अनंत आधी॥
न मांय तूं वैरिण होसि साची॥माझे मनीं भाव खरा असाची॥६॥
केला तुवां देखत भर्तृ-घात ॥ क्षणें ति-वाटा रचिल्या तिघांत॥
शत्रुघ्न मी लक्ष्मण राम जोडे॥राजा तिजा तींस अनर्थ जोडे॥७॥
द्रुतविल. गिरि-वनाप्रति राम रमापती ॥दवडिल्यावरि मृत्यु-मुखीं पती॥
निजविला, मज हे विधवा धरा॥म्हणसि भोग अभोग्य वसुंधरा८
भुजंगप्र० वना धाडिलें जेधवां रामराया॥तुंवा हेतु केला स्वभर्ता मराया ॥
अहा, राम सीता अशा दंपतीतें॥वना धाडिलें, मारिलें कां पतीतें९
मालिनी. नकळत पतिताचें खादलें अन्न वोकी ॥
तरि पतित नव्हे तो पापरूपे अवो कीं ॥
म्हणुन उदरिं तुझ्या देह हा जन्मला गे ॥
त्यजिन तरि मला हें पाप तूझें न लागे ॥ १० ॥
वसंततिल. हे अग्नितापितघृतांत तनू जळेना ॥
प्रत्यक्ष तो कधि हि पावक आतळेना ॥
रामापराधिनि-सुतास शिवेल कां जी ॥
घे ब्राम्हणोत्तम न अंत्यज-पात्र-कांजी ॥ ११ ॥
मारील सद्य मज खायिन त्या विखातें ॥
कीं पापियास निजपातक जेंवि खातें ॥
तूं पापिणी त्वरित जाशिल रौरवासी ॥
होसी सदा निरयदारुणलोकवासी ॥ १२ ॥

## घनाक्षरी.

अवो कैकई हें काय ॥ केलें तुवां हाय हाय ॥

१ हा दोन विशेषणें देण्याचें तात्पर्य हें कीं, तुला नुसतें पापिणी म्हणजे पाप करणारी असें म्हणणें शोभत नाहीं, तर तूं पापरूप म्हणजे साक्षात् पापाची मूर्तिच आहेस. २ जड म्ह० पाषाणादि त्याप्रमाणें आहे स्वरूप जीचें म्ह० तुला अंतःकरणच नाहीं असा भावार्थ. ३ शत्रुघ्न व मी आणि लक्ष्मण व राम हे जोडे, आणि तिजा राजा, ह्या तिघांत तीन वाटा रचिल्या, आणि तींस (तिघांस) अनर्थ जोडे असा अन्वय. ४ हे ननु म्ह० हें माझें शरीर. ५ येथें संस्कृत नियमाप्रमाणें 'नी' दीर्घ असावें. ६ अतिशूद्रांच्या भांड्यांतील पेज.

न म्हणवे तुजमाय ॥ जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥
सर्वजगदभिराम ॥ वना धाडिला तो राम ॥
केलें विख्यात कुनाम ॥ कीं हे पति-मारिणी ॥ २ ॥
तुझ्या वधें न अधर्म ॥ तुज मारावें हा धर्म ॥
परि निंदील हें कर्म ॥ राम-पाप-कारिणी ॥ ३ ॥
नाहीं तरी प्राण आज्य ॥ तुझें घालूनियां प्राज्य ॥
जाळूनियां सामराज्य ॥ दाखवितों करणी ॥ ४ ॥ १३ ॥

शालिनी. धिक्कारूनी गोष्टि मातेसि सांगे॥कौसल्येच्या ये गृहा सानुरागें॥
त्यातें देखे जेधवां राम-माय॥श्रीरामाचा शोक लोकीं न माय॥१४॥

रथोद्धता. मोकळा करुनि कंठ तेधवां॥आठवूनि मनिं जानकीधवा॥
ते रडे भरतही तसा रडे ॥ जोंवरी नयन होति कोरडे ॥ १५ ॥

भुजंगप्र० म्हणे वासरा घात झाला असारे॥तुझ्या माउलीचेच हें खेळ सारे॥
वृथा धाडिला राम माझा वनासी॥न देखों शके त्या जगज्जीवनासी१६
अरे राघवें व्यापिले लोक सारे॥तरी नावरे शोक माझा कसारे॥
तृषाऽक्रांत डोळे घनश्याम रामा॥पाहायासरे सर्व-लोकाभिरामा१७

स्वागता. जानकी जनकराज-कुमारी॥पाय कोमळ जिचे, सुकुमारी॥
चालली जसि वना अन्हवाणी॥बोलली कटकटा जन-वाणी॥१८॥
सून सूनु हि वना प्रति जाती॥आणि जो जित असेल कुजाती॥
मानवी तनु पशूंत गणावी॥ते शिळा परि सजीव म्हणावी॥१९॥

द्रुतविल. भरत शोक अनेक तिचे असे॥परिसतां मग बोलत तो असे॥
जननि गोष्टि समस्तहि हे खरी॥परिस येविषयीं मम वैखरी॥२०॥

उपजाति. 'मी ब्रम्हहत्याशतपाप लाहें ॥ ठावें असे लेश जरी मला हें ॥
खड्गें वसिष्ठासि अरुंधतीतें॥वधीं जरीं ठाउक हें मतीतें ॥ २१ ॥
म्हणे राम-माता अरे वासरा मी॥तुझा जाणतें प्रेम-उल्हास रामीं॥
तुला रामसेवेविणें काम नाहीं॥न राज्यादिकांची जया कामना हीं२२

स्वागता. तों वसिष्ठ वदला भरतातें ॥ रामपादनिजं-लाभरतातें ॥
पाळि यावरि समस्त धराहे ॥ राजनीति करिं, सावध राहें॥२३॥

---

१ संपूर्ण जगामध्यें सुंदर. २ साम्राज्य( सार्वभौमराज्य. ) ३ आवडीनें. ४ ह्याचा 'ती' हा अध्याहृत कर्ता. ५ प्रेमभर. ६ रामाच्या चरणाची आपणाला प्राप्ति करून घेण्याविषयीं उत्सुक.

वसंततिल०    रायें तुतेंचि दिधलें स्वनृपासना रे ॥
संपूर्ण तं जननिची करिं वासना रे ॥
शब्दार्थ हे न कळती गुरु-लाघवाचे ॥
साचे म्हणूनि पद आठवि राघवाचें ॥ २४ ॥

**घनाक्षरी.**

म्हणे भरत हा राम ॥ त्राहे त्राहे मेघश्याम ॥
वसिष्ठ हा गुरु नामें ॥ तोही मज कोपला ॥
अंतरले तुझे पाय ॥ तया राज्याचे उपाय ॥
सांगे मज हाय हाय ॥ नव्हे गुरु आपला ॥
अग्नितुल्य वाटे राज्य ॥ मज जाळिल सामराज्य ॥
वरी ऋषी घाली आज्य ॥ त्याणें जीव तापला ॥
दावीं सत्वर चरण ॥ किंवा स्वामी दे मरण ॥
तुझ्या नामाचें स्मरण ॥ त्याचा भव संपला ॥ २५ ॥

उप-जाति.    स्मरोनि ऐसें रघुनंदनातें ॥ त्या राघवाच्या पदवंदनातें ॥
जावें असा भाव धरूनि साच॥बोळे वसिष्ठामतिही तसाच॥२६॥

वसंततिलका.    राजाधिराज रघुराजचि एक जाणा ॥
पाहों चला सकळ जाउनि त्या सुजाणा ॥
आम्ही समस्त जन किंकर राघवाचे ॥
जे रामनाम जपतों अजि नित्य वाचें ॥ २७ ॥

भुजंगप्र०    विना राक्षसी-कैकयी काननातें॥चला सर्व पाहूं मृगांकाननातें॥
प्रयत्नेंचि घेऊनि येऊं गृहातें॥नयेतां समर्पूं शरीरें स्वहस्तें ॥२८॥

इंद्रव-ज्रा.    येणार ते या अथवा नका हो ॥ राहेन मी हें न घडेचि कांहीं ॥
बोलोनियां स्पष्टचि चालिलाहो॥शोकांत ही ये प्रभुनामलाहो॥२९॥

उप-जाति.    हा राम हा राम असेंचि वांचे॥ चित्तांत पाय प्रभु राघवाचे॥
त्यजी कुलाचार्य हि रामवाटे॥कींतो गुरू त्यास गुरू न वाटे॥३०॥

---

१ भरताची फक्त परीक्षा पाहण्यासाठीं राज्य कर वगैरे जे वसिष्ठ फार खुबीचे शब्द बोलला त्यांचा उत्तानार्थच खरा मानून गुरुही असें बोलतो, असें पाहून भरतास फार दुःख झालें व त्यानें रामाचें स्मरण केलें. २ त्राहि तार. ३ उघड किंवा निंदा या अर्थी हें अव्यय आहे. ४ मृग-अंक आननातें—हरिणाचें चिन्ह ज्याला आहे तो मृगांक म्ह० चंद्रासारखें आहे मुख ज्याचें त्याला. ५ प्राणत्याग करूं हा भाव. ६ म्हणे व स्मरे अशीं अध्याहृत क्रियापदें घ्यावीं. ७ रामाकडे जाण्याकरितां.

इंद्रव- येणार ते या अथवा नका ही॥शब्दांत या अर्थ सखोल कांहीं॥
ज्रा. कीं जो गुरू अंतर राम-पायीं॥पाडी, त्यजावा गुरु तो उपायीं३१
उप- श्रीरामही टाकुनि राज्य मातें ॥ जो घे म्हणे त्या ऋषिसत्तमातें ॥
जाति. गुरुत्व कैचें, तरि मी उपेक्षा॥करीन त्याची न मला अपेक्षा॥३२॥
इंद्रव- या कारणें या अथवा नका ही ॥ राहेन मी हें न घडेचि कांहीं॥
ज्रा. ऐशी उपेक्षा वदनीं वदे तो॥श्लोकांत या व्यासचि भाव देतो॥३३॥
उप- नाहीं तरी या अथवा नका ही ॥ गुरूस बोलेल घडेल कांहीं ॥
जाति. रामानिमित्तें गुरुही त्यजावा॥वाक्यांत भावार्थ असा भजावा॥३४॥
इंद्रव- रामानिमित्तें जननीस टाकी ॥ पाणी न पी राज्य नदीतटाकीं ॥
ज्रा. लंघूनियां ही गुरु-संगतीतें॥ पावे अहो दे गुरु ज्या गतीतें॥३५॥
द्रुत- गुरुविणे न घडे परमा गती॥गति शुकादि गुरूंसचि मागती ॥
विलं० परि गुरू करि अतंर राघवीं॥न गुरु तो ठक दांभिक लाघवी॥३६॥
उप- तो बाप जो राघव-भक्ति दावी ॥ तसीच जे मायहि ते वदावी॥
जाति. जो राम दावी गुरु तोचि साच॥श्रुत्यर्थ-ईत्यर्थ असे असाच॥३७॥
वसिष्ठ घे राज्य म्हणेचि साच ॥ परंतु भावार्थ न्व्हे तसाच ॥
त्याच्या परीक्षार्थचि बोलिलाहो॥त्याहूनि आधीं मुनि चालिलाहो॥३८
आज्ञा गुरूची अवघे करीती ॥ सच्छिष्य ते लोक-अलोकरीतीं॥
परंतु त्यांच्या वचनें तयातें ॥ न टाकिती सत्पद-दातयातें ॥ ३९ ॥
स्वाग- राम न त्यजि तईंच गुरूतें ॥ न त्यजी स्वसुख-कल्पतरूतें ॥
ता. जो असें वचन ही न मनीतो ॥श्रीगुरूनमनि हीन मनीं तो॥४०॥
उप- म्हणे परीक्षार्थचि टाकि मातें ॥ तसा म्हणे टाकि रघूत्तमातें॥
जाति. उल्लंघितां शब्दचि इष्ट वाटे ॥ म्हणोनि लागे ऋषिवर्य वाटे॥४१॥
द्रुत- प्रकरणीं पुढिल्या गुरुराज तो॥ भरत संगतिनेंच विराजतो ॥
विलं० जरि पथीं गुरु होय समागमीं॥तरिच राम मिळे निगमागमीं॥४२॥

---

१ रामाकडे जाऊं नको व राज्य कर असें म्हणणारा गुरुच नव्हे असा भरताचा भाव; असें नसतें तर 'या अथवा नका' असें तो गुरूस बोलेल असें घडेल काय ? २ ध्यावा. ३ कावेबाज. ४ तात्पर्यार्थ. ५ भरताच्या अगोधर. ६ लोक रीतीस अनुसरून असो अथवा नसो. ७तथापि गुरूनें आपला त्याग करायास सांगितलें तरी तो सत्पद म्ह० परमेश्वर प्राप्ति करून देणारा आहे म्हणून सच्छिष्य त्याला टाकीत नाहीं. त. असें असतां भरतानें गुरूचा त्याग केला, ह्याचें खरें तात्पर्य पुढील श्लोकांत कवीनें स्पष्ट केलें आहे. ८ वेद शास्त्रांच्या योगानें.

उप- वसिष्ठ, तो, आणि समस्त मोया॥रामार्थ टाकूनि समग्र माया ॥
जाति. सेना प्रजा सर्वहि त्याच वेळे॥जाती जसे लंघिति सिंधु वेळे ॥४३॥

वसंतति० पाई निघे भरत सानुज रामवाटे ॥
रामाविणें इतर इष्ट न काम वाटे ॥
माथां जटामुकुट, वल्कल नेसलाहो ॥
श्रीराम-वेष, वदनीं प्रभुनाम-लाहो ॥ ४४ ॥

स्वाग- राम-वल्कल-जटादिकरीती ॥ वेष तो उभय बंधु करीती ॥
ता. राम सानुज तसें भरतातें ॥ देखती सकळ रामरतातें ॥ ४५ ॥

वसंतति० तो भेटला गुहक-नाम किरात वाटे ॥
श्रीरामभक्त परमाप्त तयास वाटे ॥
गंगातटीं रघुपती-शयनास दावी ॥
ते भक्ति काय म्हणुनी मुखि वो वदावी ॥ ४६ ॥

स्वाग- दर्भ-निर्मित तया शयनातें ॥ देखतां उदक ये नयनातें ॥
ता. भूतळीं भरत घालुनि घे वो ॥त्या स्थळींहुनि न चित्त निघेवो॥४७॥
रामवृत्त रघुवंशवरातें ॥ सर्व वर्णुनि गुहाख्य किरातें ॥
लंघुनी सुरनदी भरतातें ॥ ने स-सैन्य रघुराजरतातें ॥ ४८ ॥

उप- ब्रम्हा रमा वंदिति नित्य जातें ॥ त्या राघवाच्या चरणांबुजातें ॥
जाति. पाहूं त्वरें हे भरता असोसी॥वियोग तो प्राण-वियोग सोसी॥४९॥

शालि- कैकेयीच्या दुष्टभावें जळाला॥इच्छी रामाच्या पदाच्या जळाला ॥
नी. तों स्वामीच्या देखिलें आश्रमातें॥कांहीं चित्तें टाकिलें हो श्रमातें५०

स्वाग- पादचिन्हित तये वसुधेतें ॥ देखतां तृषित जेविं सुधेतें ॥
ता. रामचंद्र-पदसारसमुद्रा ॥ वाढवी भरत-सौख्य-समुद्रा ॥ ५१ ॥

वसंततिल० घालूनि घे भरत देखुनि त्या रजातें ॥
शत्रुघ्नही अनुसरोनि निजाग्रजातें ॥
चित्त स्मरे प्रभुचिया पदनीरजातें ॥
प्रेम-प्रवाह नयनीं सुखनीर ज्यातें ॥ ५२ ॥

---

१ भरत. २ भरताच्या आया. ३ समुद्र जसा वेळेला म्ह० मर्यादेला सोडतो तसे सर्व लोक अयोध्या सोडून रामाकडे गेले. ४ रामाच्या आधिकरणास. येथें ती न्हस्व असावी. ५ भागीरथी. ६ रामाच्या पदकमलाचा ठसा. ७ आनंदाश्रु. ८ डोळ्यांस.

द्रुतवि- तनुवरी गुढियांच उभारती ॥ कविमुखें किति वर्णिल भारती ॥
लंबि० भरत ये रितिनें अजि लोळला॥प्रभुपदाब्जरजीं बहु घोळला॥५३

वसंततिल० हा राम राम रघुनंदन हेंचि वाचे ॥
चित्तांत ते चरण दीसति राघवाचे ॥
ते रेणु हे मुकुटमंडण जे शिवाचे ॥
ऐसें म्हणे त्यजुनि भाव अहो जिवाचे ॥ ५४ ॥

मालिनी. भरत पदरजीं त्या घोळला दीर्घ काळ ॥
त्रिभुवनिं हि सुखाचा होय तेव्हां सुकाळ ॥
न मिळति पदरेणू जे विरिंच्यादिकांही ॥
सुलभ मज म्हणे हें भाग्य माझेंचि कांहीं ॥ ५५ ॥

वसंततिल० देखोनि राघव-पदाब्ज-रजास वाटे ॥
लोटांगणीं गडबडे सुख फार वाटे ॥
आनंद-नीर त्वदयीं नयनांबुजाचे ॥
चित्तांत राम शिव घे पदअंबु ज्यांचें ॥ ५६ ॥

स्वाग- वाम-अंक-गत भूमि-कुमारी ॥ वाम-बहु-सुरता सुकुमारी ॥
ता. वल्कलांबरजटा-अभिरामा ॥ देखतो भरत त्या अभिरामा ॥५७॥

इंद्र- दूर्वादलश्यामल दीप्ति देहीं ॥ सेवी पदें लक्ष्मण तो विदेही ॥
वज्रा. गंगातटीं सेवित मंदवातें ॥ देखे अशा श्रीरघुपुंगवातें ॥ ५८ ॥

उपजा- देखोनि ऐसें रघुनंदनातें ॥ धांवे त्वरेनें पदवंदनातें ॥
ति. अलभ्य जो हर्ष सुरादिकां ही॥तो होय,त्या माजिच शोक.कांहीं५९

भुजं- रडे फुंद फुंदे शिरीं पादपद्मा॥धरी, सद्म मानी जया नित्य पद्मा ॥
प्रग० बळें क्षेम घे त्यासि वोढूनि राम॥स्वभक्तप्रिय स्वामि विश्वाभिराम६०

स्वागता. मांडिये उपरि बैसविला हो ॥ अश्रुनीर पुसि हें सुख लाहो ॥
वासरा न रड सांग सुवार्ता॥ शब्द हा निववि दुःखदवार्ता॥६१॥

---

१ शरीरावर आनंदानें रोमांच उभे राहिले. २ रामाच्या पदकमलाच्या धुळींत. ३ जिवाचे भाव त्यजुनि म्ह० देहभान सोडून. ४ ज्या रामाचें. ५ डाव्या मांडीवर बसलेली. ६ सीता. ७ रामाच्या डाव्या हातास चिकटून बसलेली. ८ वैराग्ययुक्त. ९ आलिंगन देता झाला. १० दुःख रूप वणव्यानें पिडलेल्या भरतास.

वसंततिं० तों देखला गुरु वसिष्ठ तयासि वंदी ॥
ब्रम्हण्य देव जडला चरणारविंदीं ॥
तों माउल्या तिघिहि सत्वर पावल्याहो ॥
भेटोनियां तिघिहि सत्वर सेविल्याहो ॥ ६२ ॥

उपेंद्र- पिता सुखी कीं म्हणतांचि रामो ॥ रडोनि त्या सांगति सूपुरामा ॥
वज्रा. रडे अहो रामहि लोकरीती॥स्त्रिया पुन्हा शोक महा करीती॥६३॥

भुजं- सपिंडी-क्रिया राम गंगातटाकीं॥करी, आणि ते पिंड गंगेंत टाकी ॥
गप्र० रडे लोकदृष्टीस शोक अमातें॥प्रभू दाउनी ये पुन्हा आश्रमातें॥६४॥

स्वाग- तों वदे भरत गोष्टि मनाची ॥ प्रार्थना बहुत आगमनाची ॥
ता. मांडिली, परि न राघव मानी ॥ देखतां सुरवरांस विमानीं ॥ ६५ ॥

द्रुत- झणि फिरे स्वपुरीप्रति राम हा॥म्हणुनि आधि मनीं अमरां महा॥
वि० भरतशब्द तदर्थ नये मना ॥ पुरवणें प्रभुला सुरकामना ॥ ६६ ॥

उपजा- आज्ञा पित्याची मज मोडवेना ॥ वत्सा तुझी गोष्टहि तोडवेना॥
ति. घालूं नको बा मज संकटांत॥नको पडों या सहसा हटांत॥६७॥

भुजंग- असी आयके जेधवा रामवाणी॥मुख-श्री करी बंधु तो दीनवाणी॥
प्र० म्हणे तात-आज्ञा मृगांकाननारे॥मला सांग जाईन मी काननारे६८

शालि- बापा ऐसें वर्ततां तो विशेषें ॥ आज्ञाभंग प्राप्त दोघां अशेषें ॥
नी. एवं राज्यातें तुवांरे भजावें॥ताताज्ञेनें कानना म्यांच जावें ॥६९॥

वसंततिल० येना असें भरत देखुनि राम राया ॥
गंगातटीं रचुनि दर्भ बसे मराया ॥
पाहे वसिष्ठमुनि-वक्त्रसरोरुहातें ॥
श्रीराम आणि खुण दाखवि हो स्वहातें ॥ ७० ॥
कीं सांग गुह्य अवतारचरित्र याला ॥
जें तारितें चहुं युगांत जगत् त्रयाला ॥
बोले वसिष्ठ मग सन्निध जाउनीयां ॥
कां प्राण टाकिसि म्हणे समजावुनीयां ॥ ७१ ॥

उपजा- हा राम मारील दशाननासी ॥ यालागिं जातो प्रभु काननासी ॥
ति. नको निवारूं भरता तयाला ॥ ब्रह्मादिकांच्या पददातयाला॥७२॥

---

१ आयका. २ मरणाला. ३ देव कार्या साठीं राम वनास निघाला होता म्हणून परत गेल्यानें तें सिद्धीस जाणार नाहीं ह्याचें स्मरण देवांना आकाशांत पाहून झालें. ४ आग्रहांत. ५ सर्व प्रकारें. ६ म्हणून.

वसंततिल० येणार मागुति चतुर्दश वत्सरांतीं ॥
राहो वनांत तितुके दिन आणि राती ॥
आत्माच तो तुज वियोग तयासि नाहीं ॥
येऊनि हे करिल जे तव कामना ही ॥ ७३ ॥
हें आयकोनि जरि शोकहि दूर केला ॥
प्रत्यक्ष दर्शनसुखास बहू भुकेला ॥
तेव्हां उठोनि भरतें पदवंदनातें ॥
केलें दुरूनि म्हणतो रघुनंदनातें ॥ ७४ ॥
देखोनियां गमननिग्रह राघवाचा ॥
बोले उभा भरत निश्चयरूप वाचा ॥
वर्षें चतुर्दशवरीच धरीन देहा ॥
त्यानंतरें त्यजिन यास निरोप दे हा ॥ ७५ ॥
वर्षें द्विसप्तभरि काल समाप्त जाला ॥
त्यानंतरें अजि तुझ्या चरणां बुजाला ॥
स्पर्शे शिरें न जरि देह तयाच वारीं ॥
यातें त्यजीनचि विरिंचि जरी निवारी ॥ ७६ ॥
वर्षें चतुर्दशहि रक्षिन शासनातें ॥
अंगीकरीन, न बसेन नृपासनातें ॥
सिंहासनावरि तुझ्या पदपादुका मी ॥
पूजीन तों तव पदांबुजलाभकामी ॥ ७७ ॥

स्वागता. पादुका जडितें आणुनि हातें ॥ रामचंद्रचरणांबुरुहातें ॥
लावुनी निजशिरीं भरतानें ॥ वंदिल्या रघुवरांघ्रिरतानें ॥ ७८ ॥

मालिनी. भरतजननि जागी होय रामप्रतापें ॥
विकळ रघुपतीच्या द्रोहपापानुतापें ॥
रडत म्हणतसे मी पापिणी रामराया ॥
न धरिन तनु, आज्ञा ये स्थळीं दे मराया ॥ ७९ ॥

---

१ सर्व व्यापक ईश्वर. २ घाबरा. ३ रत्नखचित. ४ रघुकुळांत श्रेष्ठ जो राम त्याच्या चरणीं आसक्त. ५ दुःखी. ६ रामाच्या द्वेषाच्या पापापासून झालेल्या पश्चात्तापानें.

रघुपति तिस बोले टाकिं हा शोक माते ॥
इतुकिहि.मम माया जींत हे सृष्टि माते ॥
सकळहि सुरकार्यां ग्यांच हे हेतु केले ॥
अमर दशमुखाच्या मृत्युतें वो मुकेले ॥ ८० ॥

शिखरिणी. झणी वो कैकेयी बुडविशिल शोकांत त्त्दया ॥
तझी माझेठायीं सुमति भरताहूनि सुदया ॥
तुतें मी कौसल्येहुनि अधिक माते समजतों ॥
तुवां ऐसें केलें म्हणउनि न वाटेचि मज तों ॥ ८१ ॥

द्रुतवि-लं० करुनि मागुति बुद्धिस कोमला॥ क्षणभरी विसरोंच नको मला ॥
तरि असा न पडे भ्रम मागती॥जितचि पावसि हो परमांगती॥८२॥

# रामदास.

गोदातीरीं राक्षसभुवनापासून २० कोसांवर जांब म्हणून एक गांव आहे. तेथें सूर्योपंत म्हणून एक कुळकरणी राहत असे. हा ज्ञातीचा जामदग्न्यगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राम्हण. हा सूर्योपासक असे. त्याचा पुत्र रामदास. ह्याचे आईचें नांव राणू बाई. ह्याचें पहिलें नांव नारायण, परंतु पुढें तो रामाची भक्ति करूं लागला, म्हणून त्याचें नांव रामदास असें पडलें. याचा वडील भाऊ गंगाधर म्हणून होता त्यास रामीरामदास म्हणत. ह्याचा जन्म शके १५२७ त झाला. ह्यानें भक्तिरहस्य नामें ग्रंथ केला आहे; शिवाय अध्यात्मपर पदें केलीं आहेत. हा शके १५९९ त फाल्गून वद्य १३ स निजधामास गेला.

रामदास लहानपणापासून विरक्त होता. हा मारुतीचा अवतार असें म्हणतात. त्याच्या आईबापांनीं त्याचें लग्न करण्याची सर्व तयारी केली होती; पण त्याचे मनांत लग्न करून घेण्याचें नव्हतें, म्हणून तो पळून गेला. पुढें कांहीं दिवस नाशिकक्षेत्रीं पंचवटींत राहून पुढें साताऱ्याजवळ चांफळ येथें जाऊन राहिला. तो बहुतकरून

१ मुक्ति.

तीर्थयात्रा करीत फिरत असे. त्याच्या शिष्यमंडळींत शिवाजी राजा होता. शिवाजीनें आपलें सगळें राज्य रामदासास दिलें तेव्हां त्यानें त्याचा स्वीकार करून तें पुनः शिवाजीच्या स्वाधीन केलें, आणि तो म्हणाला कीं, माझ्या स्वामित्वाची इतकीच खूण असावी कीं, तुझ्या फौजेचा झेंडा भगवा असावा. तेव्हांपासून शिवाजीनें आपल्या फौजेंत भगव्या झेंड्याची चाल पाडली. शूद्र वगैरे हलक्या जातीचे हिंदूंत "जोहार" म्हणण्याचे ठिकाणीं "रामराम" म्हणण्याची जी चाल पडली आहे तीही शिवाजीनेंच नवी पाडिली.

रामदास निवांतपणें राहण्याकरितां साताऱ्याजवळ परळी नांवाचा किल्ला आहे तेथें जाऊन राहात असे. तेथें शिवाजी राजा त्याची बरदास्त ठेवी. रामदास तेथें राहिल्यामुळें तेथें संतमंडळी जाऊं येऊं लागली, म्हणून त्या किल्ल्यास सज्जनगड असें नांव पडलें येथें-च रामदास वृद्ध होऊन आपले वयाचे ७३ वे वर्षीं समाधिस्थ झाला. त्याचे सांमदायी पुष्कळ आहेत त्यांस रामदासी असें म्हणतात.

रामदासाच्या ओंव्या, श्लोक व अभंग पुष्कळ आहेत. ह्याची कविता सुलभ व भक्तिरसप्रधान आहे.

रामदासाचा जन्म शक १५३० चैत्र शुद्ध ९; इ०स० १६०८.

समाधि शक १६०३माघ वद्य ९; इ०स० १६८१.

### त्यानें केलेले ग्रंथ.

दासबोध. स्फुट अभंग. मनाचे श्लोक. समासआत्माराम.

## स्फुट अभंग.

### वेंचे, रामदासाचे अभंगांतील.

( १ )

सुखाचे सांगातीं सर्वही मीळती ॥ दुःख होतां जाती निघोनीयां ॥ १ ॥
निघोनीयां जाती संकटाचे वेळे ॥ सुख होतां मीळे समुदाव ॥ २ ॥
समुदाव सर्व देहाचे संबंधी ॥ तुटली उपाधी रामदासीं ॥ ३ ॥

( २ )

मूर्ख तो संसारीं माझें माझें करी ॥ मृत्यु बरोबरी हिंडतसे ॥ १ ॥

हिंडतसे काळ सांगातीं सरीसा ॥ धरी भरंवसा नेणोनीयां ॥ २ ॥
नेणोनीयां प्राणी संसाराशी आला ॥ आला तैसा गेला दैन्यवाणा॥ ३ ॥
दैन्यवाणा गेला सर्वही सोडोनी ॥ ठेवीलें जोडोनी जनालागीं ॥ ४ ॥
लागलेली मळी दोषाची सूटेना ॥ आसक्ती तूटेना अंतरींची ॥ ५ ॥
अंतरींची मूर्ती अंतरली दूरी ॥ कदाकाळीं हरी आठवेना ॥ ६ ॥
आठवेना अंतकाळीं रामावीण ॥ धन्य तें मरण दास म्हणे ॥ ७ ॥

( ३ )

सुख पाहों जातां कोठेंची न दीसे ॥ संसार हा असे दुःखमूळ ॥ १ ॥
दुःखमूळ जन्म जन आणि नारी ॥ पाहातां संसारीं सूख नाहीं ॥ २ ॥
सुख नाहीं कदा शाश्वतावांचूनी ॥ जाणती सुज्ञानी दास म्हणे ॥ ३ ॥

( ४ )

पूर्ण समाधान इंद्रियदमन ॥ श्रवण मनन निरंतर ॥ १ ॥
निरंतर ज्याचे त्दद्यीं विवेक ॥ उपासना एक तोची धन्य ॥ २ ॥
धन्य तोचि एक संसारीं राहातां ॥ विवेकें अनंता ठाई पाडी ॥ ३ ॥
ठाई पाडी नीज स्वरुप आपूलें ॥ असोनी चोरीलें जन्मोजन्मीं ॥ ४ ॥
जन्मोजन्मीं केलें पुण्य बहुसाल ॥ तरीच घडेल संत-संग ॥ ५ ॥
संत-संग जया मानवा आवडे ॥ तेणें गुणें घडे समाधान ॥ ६ ॥
समाधान घडे सज्जनाच्या संगें ॥ स्वरुपाच्या योगें रामदासीं ॥ ७ ॥

( ५ )

ज्या जैसी संगती त्यासी तैसी गती ॥ समागमें रीती सर्व कांहीं ॥ १ ॥
सर्व कांहीं घडे संगतीच्या गुणें ॥ साधूचीं लक्षणें साधूसंगें ॥ २ ॥
साधूसंगें साधू होईजे आपण ॥ राम-दास खूण सांगतसे ॥ ३ ॥

( ६ )

चंदनासंगतीं चंदनची होती ॥ हांय काळी माती कस्तूरीका ॥ १ ॥
कस्तूरीका होय कस्तूरीच्या योगें ॥ साधूचेनी संगें साधूजन ॥ २ ॥
साधूजन होती संगती धरीती ॥ मिळणी मिळतां गंगा जेंवी ॥ ३ ॥
जेवितां अमृत अमर होईजे ॥ अचळ पावीजे साधुसंगें ॥ ४ ॥

( ७ )

साधूसंगे साधू भोंदूसंगें भोंदू ॥ वाघासंगे वाघू होत असे ॥ १ ॥
होत असे भला भल्याच्या संगतीं ॥ जाय अधोगती दुष्ट-संगें ॥ २ ॥

स्नान संध्या टिळे माळा ॥ पोटीं क्रोधाचा उमाळा ॥२॥
नित्य दंडीतोसी देह ॥ परी फिटेना संदेह ॥ ३ ॥
नित्य नेम खटाटोप ॥ मनीं विषयाचा जप ॥ ४ ॥
बाह्य केली झळ फळ ॥ देहबुद्धीचा वीटाळ ॥ ५ ॥
रामदास दृढभाव ॥ तयावीण सर्व वाव ॥ ६ ॥

( १७ )

देह विटाळाचा गोळा ॥ कैसा होतोसी सोंवळा ॥ १ ॥
तुज कळेना विचारू ॥ ऐसियासी काय करूं ॥ २ ॥
दृढ केला अभिमान ॥ तेणें जाहालें बंधन ॥ ३ ॥
रामदास स्वामीविण ॥ केला तितुकाही शीण ॥ ४ ॥

( १८ )

काळ जातो क्षणक्षणा ॥ मूळ येईल मरणा ॥ १ ॥
कांहीं धांवाधांव करी ॥ जंव तो आहे मृत्यु दुरी ॥ २ ॥
देह आहे जाईजिणें ॥ भूललासी कोण्या गुणें ॥ ३ ॥
मायाजाळीं गुंतलें मन ॥ परि हें दुःखासी कारण ॥४॥
सत्य वाटतें सकळ ॥ परि हें जातां नाहीं वेळ ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ आतां होईं सावधान ॥ ६ ॥

( १९ )

अंतकाळ येतो येतां ॥ तेथें नये चुकवीतां ॥ १ ॥
अकस्मात लागे जावें ॥ कांहीं पुण्य आचरावें ॥ २ ॥
पुण्याविना जातां प्राणी ॥ घडे यमाची जाचणी ॥ ३ ॥
रामदास म्हणे जना ॥ कंठीं यमाच्या यातना ॥ ४ ॥

( २० )

ज्याच्या उदरासी आला ॥ त्यासि फिरोनी पडला ॥ १ ॥
तोची जाणांवा चांडाळ ॥ देव-ब्राम्हणाचा काळ ॥ २ ॥
झाला स्त्रियेचा लंपट ॥ मायबापासीं उद्धट ॥ ३ ॥
भय पापाचें न धरी ॥ सज्जनाची निंदा करी ॥ ४ ॥
नेणें माय कीं मावसी ॥ कोणें सांगावें तयासी ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ यम केला त्याकारणें ॥ ६ ॥

( २१ )

कोण्ही पुत्र कामा नये ॥ मित्र करी तो ऊपाये ॥ १ ॥

कैचें आपूलें परावें ॥ अवघें ऋणानुबंधें घ्यावें ॥ २ ॥
जिवलग जीव घेती ॥ त्यासी परावे रक्षिती ॥ ३ ॥
जिवलगाचिये परी ॥ मातेहूनी लोभ करी ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ न कळे देवाचें करणें ॥ ५ ॥

( २२ )

घात करूनीं आपुला ॥ काय रडवीसी पूढिला ॥ १ ॥
बहूत मोलाचें आयुष्य ॥ विषयलोभें केला नास ॥ २ ॥
नाहीं वोळखिलें सत्या ॥ तेणें केली आत्महत्या ॥ ३ ॥
नरदेहाची संगती ॥ गेली गेली हातोहातीं ॥ ४ ॥

( २३ )

कोणें कोणासीं रडावें ॥ एकामागें एकीं जावें ॥ १ ॥
एंकवेळ गेली माता ॥ एकवेळ गेला पिता ॥ २ ॥
द्रव्य दारा जाती पुत्र ॥ जिवलग आणि मित्र ॥ ३ ॥
प्राणी संसारासीं आला ॥ तितुका मृत्यु-पंथें गेला ॥४॥
पूर्वज गेले देवापासी ॥ तेची वाट आपणासी ॥ ५ ॥
रामदास म्हणे लोक ॥ करिती गेलीयाचा शोक ॥ ६ ॥

( २४ )

ज्याचें होतें त्याणें नेलें ॥ येथें तुझें काय गेलें ॥ १ ॥
वेगीं होईं सावधान ॥ करीं देवाचें भजन ॥ २ ॥
गती न कळे होणाराची ॥ हे तो इच्छा भगवंताची ॥ ३ ॥
पूर्व संचिताचें फळ ॥ होती दुःखाचे कल्लोळ ॥ ४ ॥
पूर्वी केलें जें संचीत ॥ तें तें भोगावें निश्चित ॥ ५ ॥
दास म्हणे पूर्व-रेखा ॥ प्राप्त न टळे ब्रम्हादिकां ॥ ६ ॥

( २५ )

आतां कोठें धरूं भाव ॥ बहूसाल झाले देव ॥ १ ॥
एकाहूनी एक थोर ॥ मुख्य पूजा पारंपर ॥ २ ॥
माझे कुळींचीं दैवतें ॥ सांगों जातां असंख्यातें ॥ ३ ॥
रामदासा देव एक ॥ येर सर्वही मायीक ॥ ४ ॥
आतां शरण कोणा जावें ॥ सत्य कोणातें मानावें ॥ १ ॥
नाना पंथ नानामतें ॥ भूमंडळीं असंख्यातें ॥ २ ॥

एक मानिती सगुण ॥ एक म्हणती निर्गुण ॥ ३ ॥
एकीं केला सर्वत्याग ॥ एक म्हणती राजयोग ॥ ४ ॥
रामदास सांगे खूण ॥ भक्तिवीण सर्व शीण ॥ ५ ॥

( २७ )

शरण जावें संतजना ॥ सत्य मानावें निर्गुणा ॥ १ ॥
नाना मतीं काय चाड ॥ करणें सत्याचा नीवाड ॥ २
ज्ञान भक्तीनें शिणवावें ॥ भक्ति तयेसी म्हणावें ॥ २॥
रामीं रामदास सांगे ॥ सर्वकाळ संतसंगें ॥ ४ ॥

( २८ )

एक देव आहे खरा ॥ मायें नाथिला पसारा ॥ १ ॥
हेंचि विचारें जाणावें ॥ ज्ञाता तयासी म्हणावें ॥ २ ॥
रामदासाचें बोलणें ॥ स्वमापरी जायी जिणें ॥ ३ ॥

( २९ )

गेला प्रपंच हातींचा ॥ लाभ नाहीं परमार्थाचा ॥ १ ॥
दोहींकडे अंतरला ॥ थोरपणें भांबावला ॥ २ ॥
गेली अवघी निस्पृहता ॥ नाहीं स्वार्थही पूरता ॥
क्रोधें गेला संतसंग ॥ लोभें जाहला वीरंग ॥ ४ ॥
पूर्ण झाली नाहीं आशा ॥ इकडे बुडाला अभ्यासा॥ ५ ॥
दास म्हणे क्रोधें केलें ॥ अवघें लाजिरवाणें झालें ॥ ६ ॥

( ३० )

संग स्वार्थाचा धरिला ॥ तेणें काम खवळला ॥ १ ॥
थोरपण हें मातलें ॥ तेणें अव्हाटें घातलें ॥ २ ॥
कामा मागें आला क्रोध ॥ क्रोधें केला बहू खेद ॥ ३ ॥
लोभ दंभाचें कारण ॥ मोहें केलें विस्मरण ॥ ४ ॥
कामीं लांचावलें मन ॥ झालें बुद्धीचें पतन ॥ ५ ॥
दास म्हणे हें सकळ ॥ अवघें अनर्थाचें मूळ ॥ ६ ॥

( ३१ )

काम क्रोध खवळला ॥ तोचि सन्निपात झाला ॥ १ ॥
यासी औषध करावें ॥ पोटीं वैराग्य धरावें ॥ २ ॥
कुपथ्य अवघें जें झालें ॥ मग तें पुढें ऊफाळलें ॥ ३ ॥
रामदास सांगे भलें ॥ लोक म्हणती पीसाळलें ॥ ४ ॥

( ३२ )

व्यर्थ माया जाळीं गुंतोनी राहासी ॥ हित गमावीसी आपूलें तें ॥ १ ॥
गृह दारा सुत नव्हेत अंतींचीं ॥ मग ईतरांची काय आशा ॥ २ ॥
सर्व हें सांडोनी जाशील बा ह्मणी ॥ काळ तो बांधोनी नेई तूज ॥ ३ ॥
तेथें सोडवीता नसे तुज कोण्ही ॥ एका चक्रपाणीवांचोनीयां ॥ ४ ॥
नको गुंतूं गळीं मायिकासी टाळी ॥ स्वहित सांभाळीं भिक्षु म्हणे ॥ ५ ॥

( ३३ )

वाजे पाऊल आपलें॥ म्हणे मागें कोण आलें ॥ १ ॥
कोण धांवतसे आड ॥ पाहों जातां झालें झाड ॥ २ ॥
भावीतसे अभ्यंतरीं ॥ कोण चाले बरोबरी ॥ ३ ॥
शब्द पडसाद ऊठला ॥ म्हणे कोणरे बोलिला ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ संशयाचीं हीं लक्षणें ॥ ५ ॥

( ३४ )

कांहीं दिसे अकस्मात ॥ तेथें वाटे आलें भूत ॥ १ ॥
वायां पडावें संदेहीं ॥ मुळीं तेथें कांहीं नाहीं ॥ २ ॥
झाड झुडूप देखिलें ॥ जिवीं वाटे कोणी आलें ॥ ३ ॥
रामदास सांगे खूण ॥ भितो आपणा आपण ॥ ४ ॥

( ३५ )

छाया देखुनी आपली ॥ शंका अंतरीं वाटली ॥ १ ॥
ऐसें भ्रमाचें लक्षण ॥ भुले आपणा आपण ॥ २ ॥
मुखें बोलतां उत्तर ॥ तेथें झालें प्रत्युत्तर ॥ ३ ॥
डोळां घालितां आंगोळी ॥ एकाचीं तीं दोन झालीं ॥ ४ ॥
पोटीं आपण कल्पिलें ॥ तेंचि आलेंसें वाटलें ॥ ५ ॥
दास म्हणे हा ऊपाधी ॥ शंका धरितां अधिक बाधी ॥ ६ ॥

( ३६ )

नाहीं एक उपासना ॥ कैंची भक्तीची वासना ॥ १ ॥
नाहीं निश्चय अंतरीं ॥ मन फीरे दारोदारीं ॥ २ ॥
ज्यासी नाहीं एक देव ॥ सातां पांचा ठायीं भाव ॥ ३ ॥
नानाकार झालें मन ॥ कैंचें निष्ठेचें भजन ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ निष्ठेवीण सर्व सुणें ॥ ५ ॥

( ३७ )

जया ज्ञान हें नेणवे ॥ पशु तयासी म्हणावें ॥ १ ॥
कोणें केलें चराचर ॥ कोण विश्वाचा आधार ॥ २ ॥
ब्रम्हादिकांचा निर्मिता ॥ कोण आहे त्या परता ॥३ ॥.
अनंत ब्रम्हांडांच्या माळा ॥ हे तो भगवंताची लीला ॥ ४ ॥
रामदासाचा विवेक ॥ सर्व कर्ता देव एक ॥ ५ ॥

( ३८ )

ज्ञानाविणें जे जे कळा ॥ ते ते जाणावी अवकळा ॥ १ ॥
ऐसें भगवंत बोलिला ॥ चित्त द्यावें त्याच्या बोला ॥ २ ॥
एकें ज्ञानेंची सार्थक ॥ सर्व कर्म निरर्थक ॥ ३ ॥
दास म्हणे ज्ञानावीण ॥ प्राणी जन्मला पाषाण ॥ ४ "

## वेंचे, दासबोधांतील.

### ओव्या—कविवर्णन.

आतां वंदूं कवीश्वर ॥ जे शब्द-सृष्टीचे ईश्वर ॥ नातरी हे परमेश्वर ॥ वंदावे तरी ॥ १ ॥ कीं हे सरस्वतीचें स्थान ॥ कीं हे नानाकळांचें जीवन ॥ नाना सद्विद्यांचें भुवन ॥ यथार्थ होय ॥ २ ॥ कीं हे पुरुषार्थाचें वैभव ॥ कीं हे जगदीश्वराचें महत्त्व ॥ नाना-लाघवें सत्कीर्ति

---

१ येथें कवि शब्दानें केवळ कविता करणारेच विवक्षित नाहींत. निरनिराळ्या विषयांवरचे जे ग्रंथ लिहिणारे आहेत तेही विवक्षित आहेत. २ सर्व शक्तिमान्. याच ओवींत मागें कवींस " शब्द सृष्टीचे ईश्वर " असें म्हटलें आहे, पण ह्यांत ब्रम्हदेवाप्रमाणें कवींस नियमित सृष्टिकर्तृत्व येतें तसें न यावें म्हणून त्यांस परमेश्वर म्हणजे ईश्वरापेक्षां ( ब्रम्ह देवापेक्षां ) मोठे ईश्वर असें म्हटलें. ह्याचें कारण कीं ब्रम्हदेवाचे सृष्टींत मुख तें मुखच, कमल तें कमलच असा नियम आहे पण कवि सृष्टींत मुखाचें कमल, कमलाचें मुख असें पाहिजे तसें होतें. ह्यावरून ब्रम्हदेवापेक्षांही कवींचें सामर्थ्य अधिक आहे असें सुचविलें. ३ कवि नानाप्रकारच्या कलांवर ग्रंथ लिहितात म्हणून त्या कला राहतात ( जगतात ); म्हणून त्यांस कलांचें 'जीवन' असें म्हटलें. ४ महत्व. चतुर्विध पुरुषार्थांचें वर्णन करून त्यांचें वैभव म्हणजे महत्व प्रसिद्धीस आणतात म्हणून त्यांस पुरुषार्थाचें वैभव असें म्हटलें. पुढें जीं कवीवर रूपकें केलीं आहेत तीं बहुतकरून अशाच वर्णनाच्या संबंधानें आहेत असें समजावें.

स्तव ॥ निर्माण कवी ॥ ३ ॥ कीं हे शब्द-रत्नाचे सागर ॥ कीं हे मुक्त[1] सरोवर ॥ नाना-विधीचे[2] वैरागर ॥ निर्माण झाले ॥ ४ ॥ कवी मुमुक्षूचें अंजन[3] ॥ कवी साधकाचें[4] साधन ॥ कवी सिद्धाचें[5] समाधान ॥ निश्चयात्मक ॥ ५ ॥ कवी स्वधर्माचा आश्रयो ॥ कवी मना मनोजयो[6] ॥ कवी धार्मिकाचा विजयो ॥ विजय कर्ते ॥ ६ ॥ कवी वैराग्याचें संरक्षण ॥ कवी भक्ताचें भक्तिलक्षण ॥ नाना स्वधर्मसंरक्षण ॥ ते हे कवी ॥ ७ ॥ कवी प्रेमळांची प्रेमळ स्थिति ॥ कवी ध्यानस्थांची ध्यानमूर्ती ॥ कवी उपासकांची वाढकीर्ती ॥ विस्तारली ॥ ८ ॥ नाना साधनांचे मूळ ॥ कवी नाना प्रयत्नांचें फळ ॥ नाना कार्यसिद्धि केवळ ॥ कवीचेनि प्रसादें ॥ ९ ॥ आधीं कवीचा वाग्विलास ॥ तरी मग श्रवणीं तुंबळे रस ॥ कवीचेनि मति-प्रकाश ॥ कवित्वासी होय ॥ १० ॥ कवी व्युत्पन्नाची[7] योग्यता ॥ कवी सामर्थ्यवंताची[8] सत्ता ॥ कवी विचक्षणाची[9] कुशळता ॥ नाना प्रकारीं ॥ ११ ॥ कवी कवित्वाचा प्रबंध[10] ॥ कवी नाना-धाटी[11]-मुद्रा-छंद ॥ कवी गद्य[12]-पद्य-भेदाभेद ॥

---

१ मुक्त म्हणजे मोत्ये सरोवरापासून होतात त्याप्रमाणें मुक्त (संसारांतून सुटलेले) ह्यांपासून होतात म्हणजे ह्यांचे ग्रंथ वाचून होतात म्हणून ह्यांस ' मुक्तसरोवर ' असें म्हटले. २ जसे दुकानदाराकडे नानाप्रकारचे जिन्नस मिळतात तसे नानाप्रकारचे विधी म्हणजे शास्त्रीय किंवा धर्मप्रकरण नियम ह्यांच्याकडे मिळतात म्हणजे ते पाहिजे त्यानें ह्यांच्याकडून घेऊन जावे म्हणजे समजून घ्यावे. ३ डोळयांत अंजन घातलें म्हणजे डोळयांतला मळ जाऊन दिसूं लागतें त्याप्रमाणें मुमुक्षूस कवींचें ग्रंथ अंजनच होतें, म्हणजे ते वाचल्याने मुमुक्षूंस दिसूं लागतें म्हणजे समजूं लागतें. ४ ज्ञानसंपादक. ह्यांस ज्ञान प्राप्ति करून घेण्यास कवींचे ग्रंथ साधनभूत होतात. ५ ज्ञानसंपन्न. ह्यांस कवींचे ग्रंथ मनाचें समाधान करणारे होतात. ह्यांस ज्ञान तर झालेलेंच असतें म्हणून ह्यास नुसतेंच मनाचें समाधान म्हणजे संतोष होतो. ६ मनास जिंकणारा. कवीचे ग्रंथास असें म्हणण्याचें कारण ते मनोरंजक असल्यामुळें ते मनास इकडे तिकडे जाऊं देत नाहींत आपल्या अटकेंत ठेवतात. ७ व्युत्पन्नाची योग्यता म्हणजे योग्य व्युत्पन्न. तात्पर्य कीं माहितगार किंवा ज्ञानी म्हणून जे आहेत ते हे आहेत. ८ सामर्थ्यवंताची सत्ता म्हणजे सामर्थ्यवंत म्हणून ज्यास म्हणावे ते हे आहेत. ब्रम्हदेवापेक्षां ह्यांचें सामर्थ्य अधिक हें वरती दर्शविलेंच आहे. ९ विचक्षणाची कुशलता म्हणजे मोठे कुशल शोधक म्हणजे किंवा चौकस जे ते हे आहेत. १० रचना, म्हणजे कविता. ११ धाटी म्ह० रीति ( शब्दरचनेचा प्रकार ), मुद्रा म्ह० चिन्ह म्ह० व्यंजक शब्द. छंद म्ह० वृत्त. १२ गद्यपद्य भेदाभेद म्ह० गद्यपद्यांचा भेद म्ह० गद्य कविता आणि पद्य कविता हा भेद. भेदाभेद हा शब्द प्राकृतांत केवळ भेद ह्या अर्थी येतो.

पदप्रकार कर्ते ॥ १२ ॥ कवी सृष्टीचा अळंकार ॥ कवी लक्ष्मीचा शृंगार ॥ सकळ सिद्धींचा निर्द्धार ॥ ते हे कवी ॥ १३ ॥ कवी सभेचें मंडण ॥ कवी भाग्याचें भूषण ॥ नाना सुखांचें संरक्षण ॥ ते हे कवी ॥१४ ॥ कवी देवांचे रुप-कर्ते ॥ कवी ऋषींचे महत्त्व-वर्णिते ॥ नाना-शास्त्रांचें सामर्थ्य ते ॥ कवी वाखाणिती ॥ १५ ॥ नसता कवीचा व्यापार ॥ तरी कैचा असता जगदोद्धार ॥ म्हणोनि कवी हे आधार ॥ सकळ सृष्टीसी ॥ १६ ॥ नाना-विद्या-दातृत्व कांहीं॥ कवीश्वरावीण तों नाहीं ॥ कवीपासून सर्व कांहीं ॥ सर्वज्ञता ॥ १७ ॥ मागें वाल्मीकि व्यासादिक ॥ झाले कवीश्वर अनेक ॥ तयांपासूनि विवेक ॥ सकळ जनांसी ॥ १८ ॥ पूर्वीं काव्यें होतीं केलीं ॥ तरीच व्युत्पत्ती प्राप्त झाली ॥तेणें पंडितता अंगीं बाणली ॥ परम योग्यता ॥ १९ ॥ ऐसे पूर्वीं थोर थोर ॥ झाले कवीश्वर अपार ॥ आतां आहेति पुढें होणार ॥ नमन माझें त्यांसि पैं ॥ २० ॥ नानाचातुर्यांच्या मूर्ती ॥ कीं हे साक्षात् बृहस्पती ॥ वेद-श्रुति बोलें म्हणती ॥ ज्यांच्या मुखें ॥ २१ ॥ परोपकाराकारणें ॥ नानानिश्चय अनुवादणें ॥ शेखीं बोलिले पूर्णपणें ॥ संशयातीत ॥ २२ ॥ कीं हे अमृताचे मेघ वोळले ॥ कीं हे नवरसांचे वोघ लोटले ॥ नानासुखांचें उचंबळलें ॥ सरोवर हे ॥ २३ ॥ कीं हे विवेकनिधीचीं भांडारें ॥ प्रकट झालीं मनुष्याकारें ॥ नाना वस्तूंचेनि विचारें ॥ कोंदाटले हे ॥ २४ ॥ कीं हे आदिशक्तीचें ठेवणें ॥ नाना शक्तींशी आणी उणें ॥ लाधलें पूर्वसंचिताच्या गुणें ॥ विश्व-जनासी ॥ २५ ॥ कीं हीं सुखाचीं तारुवें लोटलीं ॥ अक्षयीं आनंदें उतटलीं ॥ विश्वजनासी उपेगा आलीं ॥ नानाप्रयोगाकारणें ॥ २६ ॥ कीं हे ईश्वराचा पवाड ॥ पाहतां गगनाहूनि वाड ॥ ब्रम्हांड-रचनेहूनि जाड ॥ कवि-प्रबंध-रचना ॥ २७ ॥ आतां असो हा विस्तार ॥ जगासि आधार कवीश्वर ॥तयांसि माझा नमस्कार ॥ साष्टांग-भावें ॥ २८ ॥

१ निरनिराळीं पदें म्ह० पदरूप कविता. ह्या ओवींत मागील प्रबंधादिक पदांचा शेवटील कर्ते ह्या पदाशीं अन्वय आहे. येथें कवि निरनिराळ्या प्रकारांची कविता करतांत ते प्रकार सांगितले. २ नानामतें. ३ उगवेणा.

## वेंचे, मनाचे श्लोकांतील.

### भुजंग प्रयात वृत्त

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ॥ तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडून द्यावें ॥ जनीं वंद्य तें सर्व-भावें करावें ॥ १ ॥
मना वासना दुष्ट कामा नये रे ॥ मना सर्वथा पापबुद्धी नकोरे ॥
मना सर्वथा नीति सोडूं नको हो ॥ मना अंतरीं सार-वीचार राहो॥२॥
मना पाप-संकल्प सोडोनि द्यावा॥मना सत्य-संकल्प जीवीं धरावा ॥
मना कल्पना ते नको वीषयाची॥विकारें घडे हो जनीं सर्व छी छी॥३॥
नको रे मना क्रोध हा खेदकारी ॥ नको रे मना काम नानाविकारी ॥
नको रे मना सर्वदा अंगिकारूं ॥ नको रे मना मत्सरू दंभ-भारू ॥४ ॥
मना श्रेष्ठ धारिष्ट[1] जीवीं धरावें ॥ मना बोलणें नित्य सोसीत जावें ॥
स्वयें सर्वदा नम्रवाचे वदावें ॥ मना सर्वलोकांसि रे नीववावें ॥ ५ ॥
तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी ॥ मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचेपरी त्वां झिजावें ॥ परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ६ ॥
नको रे मना द्रव्य तें पूढिलाचें ॥ अती स्वार्थबुद्धी नको पाप सांचे ॥
घडे भोगणें पाप, तें कर्म खोटें ॥ न होतां मना-सारिखें दुःख मोठें ॥७॥
जगीं सर्वसूखी असा कोण आहे॥ विचारी मना तूंचि सोधोनि पाहे ॥
मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें ॥ तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ॥ ८ ॥
मना मानसीं दुःख आणूं नको रे ॥ मना सर्वथा शोक चिंता नकोरे ॥
विवेकें देहेबुद्धि[2] सोडोन द्यावी ॥ विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ॥ ९ ॥
जिवा क्रर्मयोगें जगीं जन्म जाला ॥ परी शेवटीं काळ घेवोनि गेला ॥
महा-थोर ते मृत्युपंथेंचि गेले ॥ असंख्यात ते जन्मले आणि मेले॥१०॥
मना पाहतां सत्य हे मृत्युभूमी[3] ॥ जितां बोलती सर्वही जीव मी मी ॥
चिरंजीव[4] हे सर्वही मानिताती॥ अकस्मात सोडोनियां सर्व जाती॥११॥
मरे एक त्याचा दुजा शोक वाहे ॥ अकस्मात तोही पुढें जात आहे ॥
पुरेना जनीं लोभ,रे क्षोभ[5] होतो॥म्हणोनी जनीं मागती जन्म घेतो॥१२॥

---

१ धैर्य, म्ह० सोशिकपणा. २ देह हाच आत्मा अशी बुद्धि वास्तविक शुद्ध, शब्द 'देह बुद्धि असा आहे, पण प्राकृत कवि असले अशुद्ध प्राकृत समजून घालतात. ३ मृत्युलोक. ४ चिरकाळ जगणारे. ५ संताप. ऐहिक विषयांवर जो लोभ म्ह० आसक्ति असते ती मनुष्य अकस्मात् मेल्यामुळें पुरेशी होत नाहीं. त्यामुळें चित्ताचा संताप होतो. पण ह्या संतापामुळें ऐहिक विषयांवरचा लोभ निदिध्यासानें दृढ होतो. तोच फिरून जन्म घेण्यास कारण होतो असा भाव.

मना मानसीं व्यर्थ चिंता वहातें ॥ अकस्मात होणार होवोनि जातें ॥
घडे भोग ना त्याग ही कर्मयोगें ॥ मतीमंद तो खेद मानी वियोगें॥१३॥
मना सर्वथा सत्य सोडूं नको रे ॥ मना सर्वथा मिथ्य मानू नको रे ॥
मना सत्य तें सत्य वाचे वदावें॥मना मिथ्य तें मिथ्य सोडोनि द्यावें॥१४॥
समर्थांचिया सेवका वक्र पाहे ॥ असा सर्व-भू-मंडळीं कोण आहे ॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही॥नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१५॥
अहल्याशिळा राघवें मुक्त केली ॥ पदीं लागतां दिव्य होवोनि गेली ॥
जया वर्णितां शीणली वेदवाणी ॥ नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१६॥
सदा सर्वदा देव सन्नीध आहे ॥ कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥
सुखानंद आनंद-कैवल्य-दानी ॥ नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१७॥
असे हो जया अंतरीं भाव जैसा ॥ वसे हो तया अंतरीं देव तैसा ॥
अनन्यास[1] रक्षीतसे चाप-पाणी ॥ नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१८॥
सदा चक्रवाकासि[2] मार्तंड जैसा ॥ उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥
हरीभक्तिचा घाव घालीं निशाणीं[3]॥नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१९॥
जयाचेनि संगें समाधान भंगे ॥ अहंता अकस्मात येऊनि लागे ॥
तया संगतीची जनीं कोण गोडी ॥ जिये संगतीनें मना राम सोडी॥२०॥
सदा बोलण्यासारिखें चालतोहे ॥ अनेकीं सदा एक देवासि पाहे ॥
सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥२१॥
मदें[4] मत्सरें सांडिली स्वार्थबुद्धी ॥ प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी ॥
सदा बोलणें नम्र-वाचा सुवाचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥२२॥
सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं ॥ सदा सर्वदा सत्यवादी विवेकी ॥
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥२३॥
दिनाचा दयाळू मनाचा मवाळू ॥ स्नेहाळू कृपाळू जगीं दास-पाळू ॥
जया अंतरीं क्रोध संताप कैंचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥२४॥
मना कल्पना कल्पितां कल्पकोटी ॥ नहो रे नहो सर्वथा रामभेटी ॥

---

१ अनन्य भावानें शरण आलेल्यास. २ चक्रवाक पक्ष्यांचा जोडा ( नरमादी ) रात्रीं वियुक्त असतो आणि सूर्योदय झाल्यावर संयुक्त होतो. तेव्हां ह्यांच्या संकटाला जसा सूर्य तसा लोकांच्या संकटाला राम असा दृष्टांत घेतला आहे. ३ षड्रिपूंच्या निशाणावर. ४ मदासह आणि मत्सरासह. ५ सत्य सत्य सत्य असें त्रिवार सत्याचें उच्चारण. म्ह० खरोखरच कधींही खोटें बोलत नाहीं असा भाव.

मनीं कामना, राम नाहीं जयाला॥अती-आदरें प्रेम नाहीं तयाला॥२५॥
अती-मूढ त्या दृढ बुद्धी असेना ॥अती-काम त्या राम चित्तीं वसेना ॥
अती-लोभ त्या क्षोभ होईल जाणा॥अती-वीषयी सर्वदा दैन्यवाणा॥२६॥
सुखानंदकारी निवारी भयातें ॥ जनीं भक्तिभावें भजावें तयातें ॥
विवेकें त्यजावा अनाचार हेवा ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥२७॥
जयाचेनि नामें महादोष जाती ॥ जयाचेनि नामें गती पाविजेती ॥
जयाचेनि नामें घडे पुण्यठेवा ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ २८॥
न वेंचे कदा ग्रंथिचा अर्थ कांहीं ॥ मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं ॥
महा-घोर संसार-शत्रू जिणावा॥प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥२९॥
नहो कर्म ना धर्म ना योग कांहीं॥नहो भोग ना त्याग ना सांग कांहीं॥
म्हणे दास विश्वास नामीं धरावा॥प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥३०॥
भजा राम विश्राम योगेश्वराचा ॥ जपा नेमिला नेम गौरीहराचा ॥
निवाला स्वयें तापसी चंद्रमौळी॥तुम्हां सोडवी राम हा अंतकाळीं॥३१॥
मुखीं नाम नाहीं तया मुक्ति कैंची ॥ अहंता-गुणें यातना ते फुकाची॥
पुढें अंत येईल तो दैन्यवाणा ॥ म्हणोनी म्हणारे म्हणा देवराणा ॥३२॥
यथासांग रे कर्म तेंही घडेना ॥ घडे कर्म तें पुण्य गांठीं पडेना ॥
दया पाहतां सर्वभूतीं असेना ॥ फुकाचें मुखीं नाम तेंही वसेना ॥३३॥
अती लीनता सर्व भावें स्वभावें ॥ सदा सज्जनांलागिं संतोषवावें ॥
तयांकारणीं सर्व लावीत जावें ॥ सगूणीं अती आदरेशीं भजावें ॥३४॥
क्रियेवीण नानापरी बोलिजेतें ॥ परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें ॥
मना कल्पना धीट सैराट धांवे ॥ तया मानवा देव कैसेनि पावे ॥ ३५॥
विवेकें क्रिया आपुली पालटावी ॥ अती आदरें शुद्धबुद्धी धरावी ॥
जनीं बोलण्यासारखें चाल बापा॥मनीं कल्पना सोड संसार-तापा॥३६॥
वरीं स्नान संध्या धरीं एक निष्ठा ॥ विवेकें मना आंवरीं स्थानभ्रष्टा ॥

१ यथासांग, पूर्ण, म्हणजे कोणतेंच पूर्णपणें होत नाहीं असें तात्पर्य. २ जो " जपा गौरीहराचा नेम नेमिला." असा अन्वय. म्ह० ज्याला (रामाला) गौरीहराने (शिवाने) जपण्याचा नेम केला होता. ३ शिवाने विष प्राशन केल्यावर त्याच्या आंगाचा फार दाह होऊ लागला त्यावेळीं त्याने रामस्मरण केलें आणि त्याच्या योगाने त्याचा दाह शांत झाला अशी कथा आहे तिचा संबंध येथे दर्शविला आहे. ४ स्थानभ्रष्ट येथें पुढील भ्र हें जोडाक्षर असल्यामुळें मागील नकारास गुरुत्वा येते ह्यामुळें छंदोभंग होतो. पण असले छंदोभंग प्राकृत कवितेंत कोठें कोठें येतात.

दया सर्व भूतीं जया मानवाला ॥ सदा प्रेमळू भक्तिभावें निवाला॥३७॥
सदा सर्वदा सज्जनाचेनि योगें ॥ क्रिया पालटे भक्तिभावार्थ लागे ॥
क्रियेवीण वाचाळता ते निवारीं ॥ तुटे वाद, संवाद तो हीतकारी॥३८॥
तुटे वाद, संवाद त्यातें म्हणावें ॥ विवेकें अहंभाव त्यातें जिणावें ॥
अहंतागुणें वाद नाना विकारी ॥ तुटे वाद, संवाद तो हीतकारी ॥३९॥
हिताकारणें बोलणें सत्य आहे ॥ हिताकारणें सर्व शोधोनि पाहें ॥
हिताकारणें बंड पाखंड वारीं ॥ तुटे वाद, संवाद तो हीतकारी ॥ ४० ॥
जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला ॥ परी वादवीवाद तैसाच ठेला ॥
उठे संशयो वाद हा दंभ-धारी ॥ तुटे वाद, संवाद[1] तो हीतकारी ॥४१॥
जनीं हीत पंडीत सांगूनि गेले ॥ अहंतागुणें राक्षस[2] ब्रम्ह जाले ॥
तयाहून व्युत्पन्न तो कोण आहे ॥ मना सर्व जाणीव सांडून राहे॥४२॥
तुटे वाद, संवाद तेथें करावा ॥ विवेकें अहंभाव हा पालटावा ॥
जनीं बोलण्यासारिखें आचरावें ॥क्रिया-पालटें भक्तिपंथेंचि जावें॥४३॥
फुकाचें मुखीं बोलतां काय वेचे ॥ दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे॥विचारें तुझा तूंचि शोधून पाहें॥४४॥
जनाकारणें देव लीलावतारी ॥ बहूतांपरी आदरें वेषधारी ॥
तया नेणती ते जनीं पापरूपी ॥ दुरात्मे महानष्ट चांडाळ पापी ॥ ४५ ॥
गतीकारणें संगती सज्जनाची ॥ मती पालटे कूमती दुर्जनाची ॥
रतीनायकाची मती नष्ट आहे ॥ म्हणोनी मनातीत होवोनि राहें ॥४६॥
मना अल्प संकल्प तोही नसावा ॥ मना सत्यसंकल्प चित्तीं वसावा ॥
जनीं जल्पसी कल्प तोही त्यजावा॥रमाकांत एकांतजागीं भजावा॥४७॥
मना वासना वासुदेवीं वसोंदे ॥ मना कामना कामसंगीं नसोंदे ॥
मना कल्पना वाउगी ते न कीजे॥मना सज्जना सज्जनीं वस्ति कीजे॥४८॥
नसे गर्व अंगीं सदा वीतरागी ॥ क्षमा शांति भोगी दया-दक्ष योगी ॥
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा॥अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा॥४९॥
धरीं रे मना संगती सज्जनाची ॥ जिणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची ॥
वळे भाव हा वृत्ति सन्मार्गि लागे॥महा क्रूर तो काळ विक्राळ भंगे॥५०॥
जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले ॥ परी जीव अज्ञान तैसेच ठेले ॥

---

१ ज्या संवादानें वाद तुटे तो संवाद हितकारी असा अर्थ. २ राक्षस ब्रम्ह म्ह० ब्रम्हराक्षस.

देह बुद्धिचा निश्चयो त्यां ढळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें टळेना ॥ ५१ ॥
जगीं पाहतां साच तें काय आहे ॥ अती आदरें सर्व शोधोनि पाहें ॥
पुढें पाहतां पाहतां देवें जोडे ॥ भ्रम भ्रांति अज्ञान हें सर्व मोडे ॥ ५२॥
दिसेना जनीं तेंचि शोधूनि पाहें ॥ बरें पाहतां गूज तेथेंचि आहे ॥
करें घेउं जातां कदा आकळेना ॥ जनीं सर्व कोंदाटलें तें कळेना॥५३॥
म्हणे जाणतो तो मनीं मूर्ख आहे॥अतर्क्यासि तर्की असा कोण आहे॥
जनीं मीपणें पाहतां पाहवेना ॥ तया पाहतां वेगळें राहवेना ॥ ५४ ॥
जयें मक्षिका भक्षिली जाणिवेची[1] ॥ तया भोजनाची रुची प्राप्त कैंची ॥
अहंभाव ज्या मानसींचा विरेना॥तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरेना॥५५॥
नकोरे नको वाद हा खेदकारी ॥ नकोरे नको भेद नानाविकारी ॥
नकोरे मना शीकवूं पूढिलाशी ॥ अहंभाव जो राहिला तूजपाशीं ॥५६॥
अहंतागुणें सर्वही दुःख होतें ॥ मुखें बोलिलें ज्ञान तें व्यर्थ जातें ॥
सुखें राहतां सर्वही सूख आहे ॥ अहंता तुझी तूंचि शोधोनि पाहें॥५७॥
फुटेना तुटेना कदा देवराणा ॥ चळेना ढळेना कदा दैन्यवाणा ॥
कळेना वळेना[2] कदा लोचनासी ॥ असेना[3] दिसेना[4] जना मीपणासी॥५८॥
जया मानला देव तो पूजिताहे ॥ परी देव शोधून कोणी न पाहे ॥
जगीं पाहतां देव कोट्यानुकोटी॥जया मानली भक्ति जे तेचि मोठी॥५९
तिन्ही लोक जेथूनि निर्माण झाले ॥ तया देवरायासि कोणी न बोले ॥
जगीं थोरला देव तो चोरिलासे ॥ गुरुवीण तो सर्वथाही न दीसे ॥६०॥
गुरु पाहतां लक्ष कोट्यानुकोटी ॥ बहूसाल मंत्रावळी शक्ति मोठी ॥
मना कल्पना चेटकें घात-पाता॥जनीं व्यर्थरे तो नव्हे मुक्तिदाता॥६१॥
नव्हे चेटकू चाळकू द्रव्य-भोंदू ॥ नव्हे निंदकू मत्सरू[5] भक्तिमंदू[6] ॥
नव्हे उन्मतू वेसनीं संगबाधू[7] ॥ जनीं ज्ञानिया तोचि साधू अगाधू॥६२॥

१ जवणाची. पक्षीं, विषय भागाची. २ कदा लोचनासी वळेना. म्ह० डोळ्यांनीं दिसणारा नव्हे. ३ अमुक प्रकारानें आहे असें सांगतां येत नाहीं असा. ४ जना मीपणासी दिसेना. म्ह० लोकांत अहंपणा असल्यामुळे त्यांस जो दिसत नाहीं. अहंपणा नसेल तर ज्ञान दृष्टीने दिसेल असा भाव. ५ मत्सरी. ६भक्तिशून्य. ७ज्या "ज्ञानिया जनीं वेसनीं संगबाधू न" असा अन्वय. ज्या ज्ञान्याला लोकामध्यें संगतीच्या योगानें वेसन म्ह० दुःख नाहीं म्ह० कोणतीही संगती असली तरी त्याला बाधत नाहीं. इतरांला कुसंगति असली तर ती बाधते, तशी त्याला बाधत नाहीं असा भाव. असा असेल तोच साधु.

नव्हे वाउगी चावटी काम पोटीं ॥ क्रियेवीण वाचळता तेंचि मोठी ॥
मुखें बोलिल्यासारिखें चालता हे॥मना सद्गुरू तोचि शोधूनि पाहें.॥६३॥
नहो तेंचि जालें नये तेंचि आलें ॥ कळों लागलें सज्जनाचेनि बोलें ॥
अनिर्वाच्य तें वाक्य वाचे वदावें॥मना संत आनंत शोधीत जावें॥६४॥
मना नाकळे नाढळे रूप ज्याचें ॥ दुजेवीण[१] तें ध्यान सर्वोत्तमाचें ॥
तयावीण तें ही न दृष्टांत[२] पाहे ॥ तिथें संगनिःसंग दोन्ही न साहे ॥६५॥
न जायें जपासी न जायें तपासी ॥ न जायेंचि काशी न जायें गयेसी ॥
हरी चिंतनेवीण कोठें न जायें ॥ त्रिकाळीं सदा पाय तूं तेचि पाहें॥६६॥
कदा ओळखीमाजि दूजें असेना ॥ मनीं मानसीं द्वैत कांहीं दिसेना ॥
बहूतां दिसीं आपली भेटि जाली ॥ विदेहीपणें सर्व काया निमाली॥६७॥
मना गूजरे तूजला प्राप्त झालें ॥ परी पाहिजे अंतरीं यत्न केले ॥
सदा ऐकतां पाविजे निश्चयासी ॥ धरीं सज्जनीं संगती धन्य होसी॥६८॥
मना संग हा सर्व सोडूनि द्यावा ॥ अती आदरें सज्जनाचा धरावा ॥
जयाचेनि संगें महादुःख भंगे ॥ जनीं साधनेंवीण सन्मार्ग लागे ॥ ६९॥
मना संग हा सर्व-संगासि तोडी ॥ मना संग हा मोक्ष तात्काळ जोडी॥
मना संग हा साधना शीघ्र जोडी ॥मना संग हा द्वैत निःशेष मोडी॥७०॥
मनाचीं शतें ऐकतां दोष जाती ॥ मतीमंद ते साधना योग्य होती ॥
चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगीं॥म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी॥७१

## अभंग-ज्ञानशतक.

संताचे संगतीं काय प्राप्त होतें ॥ तें तुम्हा नीरुतें सांगईन ॥ १ ॥
सांगईन परी मानसीं धरावें ॥ मग उद्धरावें या संसारीं ॥ २ ॥
संसारीचें सार जया नाश नाहीं ॥ तेंची पडे ठाईं संतसंगें ॥ ३ ॥
पापबुद्धी झडे संतांचे संगतीं ॥ नाहीं अधोगती गर्भवास ॥ ४ ॥
गर्भवास संतसंगें मुक्त होय ॥ वेगीं धरी सोय आलीया रे ॥ ५ ॥
आलीया संसारीं स्वहीत वीचारीं ॥ एके भावें धरी संतसंग ॥ ६ ॥

१ दुसऱ्या शिवाय. म्ह० सर्वोत्तमाचें ( रामाचें ) ध्यानांत ( रूपांत ) दुसरें कांहीं नाहीं; त्याचे तेंच आहे. त्यावरूनच तें समजलें पाहिजे असा भाव. २ बरें दृष्टांतानें सांगूं म्हटलें तर " तयावीण तें दृष्टांत ही न पाहे " म्ह० त्याच्या शिवाय त्याला दृष्टांत ही नाहीं.

संतसंग धरी धन्य तो संसारी ॥ बोलीले श्रीहरी भागवतीं ॥ ७ ॥
भागवतगीतासार निरोपण ॥ त्यांचें वीवरण संतसंगें ॥ ८ ॥
संतसंगें कळे सर्व शास्त्रभाग ॥ आणि ज्ञानयोग अभ्यासें ॥ ९ ॥
भयासें साधीतां कधीं नये हाता ॥ तें लाभे तत्वतां साधूसंगें ॥ १० ॥
साधूचेनी संगें अलभ्याचा लाभ ॥ मुक्ती हे सुलभ होत आहे ॥ ११ ॥
आहे एक देव परी तो कळेना ॥ जयासी मीळेना संतसंग ॥ १२ ॥
संतसंग नाहीं जयालागीं जनीं ॥ तया कां जननी प्रसवली ॥ १३ ॥
प्रसवली माता शीणचि उरला ॥ पुत्र नाहीं झाला हरीभक्त ॥ १४ ॥
हरीभक्त नर वंशाचें मंडन[1] ॥ दोषाचें खंडन करीतसे ॥ १५ ॥
झालीयानें कृपा संतसज्जनाची ॥ मग विवेकाची वाट फूटे ॥ १६ ॥
वाट अवघड पाहतां दीसेना ॥ जेथें नाहीं मना समागम ॥ १७ ॥
समागम जातां वाटचो फुटेना ॥ संशय तुटेना बहूवीध ॥ १८ ॥
बहूवीध पंथ कोणें तो धरावा ॥ दुजेपणीं देवा पावीजेना ॥ १९ ॥
पावीजेना देव संतसंगावीण ॥ मार्ग हा कठीण विवेकाचा ॥ २० ॥
विवेकाचा मार्ग विवेकें चालावा ॥ मनाचा त्यागावा संग सर्व ॥ २१ ॥
सर्व त्याग करी पावसी श्रीहरी ॥ परी एक धरीं संतसंग ॥ २२ ॥
संतसंगावीण त्याग हा घडेना ॥ श्रीहरी पडेना कदा ठाईं ॥ २३ ॥
ठाव सज्जनाचा सज्जन जाणती ॥ तेथें नाहीं गती मीपणाची ॥ २४ ॥
मीपणाची गती संगाचें लक्षण ॥ ठाउकी ही खूण सज्जनाची ॥ २५ ॥
संत जन परी कोण ओळखावे ॥ कैसे ते जाणावे साधू जन ॥ २६ ॥
साधूची वोळखी साधु वोळखीला ॥ येर भांबावला माया धरी ॥ २७ ॥
माया धरी प्राणी जवळि चूकले ॥ नाहीं वोळखीले साधू जन ॥ २८ ॥
साधू जन कोण कशी वोळखण ॥ तेंचि निरूपण सांगीतलें ॥ २९ ॥
सांगीतलें आहे मागें थोरथोरीं ॥ तेंची अवधारीं ओलीयारे ॥ ३० ॥
आलीयारे साधू जाणावा कवणें ॥ तयाचें लक्षण असंख्यात ॥ ३१ ॥
असंख्यात परी वोळखीकारणें ॥ साधू पूर्णपणें सारिखाची ॥ ३२ ॥
सारीखाची दीसे जनाचीया परी ॥ परी तो अंतरीं वेगळाची ॥ ३३ ॥
वेगळाचि ज्ञानें पूर्ण समाधानें ॥ स्वस्वरूपीं[2] मनें वस्ती केली ॥ ३४ ॥
वस्ती केली मनें निर्गुणीं सर्वदा ॥ मीपणें आपदा तया नाहीं ॥ ३५ ॥

---

१ भूषण. २ आत्मस्वरूपीं.

तया नाहीं काम तया नाहीं क्रोध ॥ तया नाहीं खेद स्वार्थबुद्धी॥३६॥
बुद्धी निश्चयाची स्वरूपीं तयाची ॥ कल्पना ठाईंची निर्विकल्प[१] ॥ ३७ ॥
निर्विकल्प मद मत्सर सारीला ॥ आणि संहारीला लोभ दंभ ॥ ३८ ॥
दंभ हा लौकीक विवेकें सांडीला ॥ दुरी वोसंडीला अहंकार ॥ ३९ ॥
अहंकार नाहीं दुराशा[२] अंतरीं ॥ ममता ही दोरी मोकळली ॥ ४० ॥
मोकळली भ्रांती शरीरसंपत्ती ॥ वैभव संगती लोलंगता[३] ॥ ४१ ॥
लोलंगता नसे ज्ञानें धालेपणें[४] ॥ ऐसीं हीं लक्षणें सज्जनाची ॥ ४२ ॥
सज्जनलक्षणें सांगेन पुढती ॥ आर्त चित्तवृत्ती लांचावली ॥ ४३ ॥
लांचावली वृत्ती सज्जन सांगतां ॥ होय सार्थकता जयाचेनी ॥ ४४ ॥
जयाचेनी ज्ञानें तरती अज्ञानें ॥ साधूसंगतीनें समाधान ॥ ४५ ॥
समाधानें शांती क्षमा आणि दया ॥ रंक आणि राया सारिखाची ॥४६॥
सारिखाची शोध तेथें नाहीं भेद ॥ सर्वांसी अभेद सर्व काळ ॥ ४७ ॥
सर्व काळ गेला श्रवणें मननें ॥ सत्क्रियासाधनें हरी-भक्ती ॥ ४८ ॥
हरी-भक्ति करी जन तरावया ॥ स्वधर्मा वीलया जाऊं नेदी ॥ ४७ ॥
जाऊं नेदी भक्ती जाऊं नेदी ज्ञान ॥ अनुतापीं मन निरंतर ॥ ५० ॥
निरंतर भाव सगुणीं भजन ॥ येणें बहु जन उद्धरती ॥ ५१ ॥
उद्धरती जन करीतां साधन ॥ क्रियेचें बंधन आचरतां ॥ ५२ ॥
आचरतां साधू जना होय बोधू ॥ लागतसे वेधू भक्तीभावें ॥ ५३ ॥
भक्तीभावें देवप्रतिष्ठा पूजन ॥ कथानिरूपण महोच्छाव ॥ ५४ ॥
महोच्छाव साधु भक्तीचें लक्षण ॥ करी तीर्थाटण आदरेसी ॥ ५५ ॥
आदरेसी विधी करणें उपाधी ॥ लोकांतें सद्बुद्धी लागावया ॥ ५६ ॥
लागावया बुद्धी सत्क्रिया भजन ॥ करीतो सज्जन मुक्तीदाता ॥ ५७ ॥
मुक्तीदाता साधू तोचि-तो जाणावा ॥ जेणें संपादावा लोकाचार ॥५८॥
लोकाचार करी तो जना उद्धरी ॥ ज्ञाता अनाचारी कामा नये ॥५९॥
नये नये निंदूं जनीं जनार्दन ॥ म्हणोनी सज्जन क्रियावंत ॥ ६० ॥
क्रियावंत साधू विरक्त विवेकी ॥ तोचि-तो लौकिकीं मान्य आहे॥६१॥
मान्यता सत्क्रिया लौकीक सोडीला ॥ तोचि उद्धरीला जनीं नाहीं ॥६२॥
जनीं नाहीं मान्य तो सर्व अमान्य ॥ म्हणोनीयां धन्य क्रियावंत ॥६३॥
क्रियावंत तेणें लौकीक सोडावे ॥ आणि वसवावें ब्रम्हारण्य ॥ ६४ ॥

१ विकल्परहित २ दुष्ट इच्छा. ३ चांचल्य. ४ तृप्तपणें.

ब्रम्हारण्य सेवी साधू तो एकला ॥ जना नाहीं आला उपेगासी ॥ ६५॥
उपेगासी येणें जनां पूर्णपणें ॥ तयाचीं लक्षणें निरूपीलीं ॥ ६६ ॥
निरूपीलीं येणें लक्षणें जाणावा ॥ साधू वोळखावा मुमुक्षूनें ॥ ६७ ॥
मुमुक्षूनें गुरू क्रियाभ्रष्ट केला ॥ तरी अंतरला दोहीं पक्षीं ॥ ६८ ॥
दोहीं पक्षीं शुद्ध तया ज्ञान बोध ॥ येर तें अबद्ध अनाचारी ॥ ६९ ॥
अनाचार करिसा कोण आहे जनीं ॥ परी निरूपणीं बोलिजेतें ॥ ७० ॥
बोलीजे साचार सत्य निरूपणीं ॥ घडे ते करणीं सुखें करूं ॥ ७१ ॥
करूं नये कदा मिथ्या निरूपण ॥ करीतां दूषण लागों पाहे ॥ ७२ ॥
पाहें पाहें बापा साधा तें शोधूनीं ॥ ठांकेना म्हणोनी निंदूं नको ॥७३॥
निंदूं नको शास्त्र निंदूं नको वेद ॥ तरीच स्वानंद पावसील ॥ ७४ ॥
पावसील राम जिवाचा विश्राम ॥ अहंतेचा श्रम सांडितांचि ॥ ७५ ॥
सांडितां विवेकें मिथ्या अभीमान ॥ तरी समाधान पावसील ॥ ७६ ॥
पावसील गती शुद्ध निरूपणें ॥ रामदास म्हणे क्षमा करीं ॥ ७७ ॥

## भक्तिपर अभंग.

(१)

भक्ति नलगे भाव नलगे ॥ देव नलगे आम्हाशि ॥ १ ॥
आम्ही पोटाचे पाईक[१] ॥ आम्हा नलगे आणीक ॥ २ ॥
आम्ही खाऊं ज्यांची रोटी ॥ त्यांची कीर्ती करूं मोठी ॥ ३
रामीं रामदास म्हणे ॥ ऐशीं मूर्खाचीं लक्षणें ॥ ४ ॥

(२)

आम्हा अन्न झालें पुरें[२] ॥ अन्नावीण काय नुरे ॥ १ ॥
पोटभरी मिळे अन्न ॥ आम्हा तेंचि ब्रम्हज्ञान ॥ २ ॥
अन्नावांचूनी दूसरा ॥ देव आहे कोण खरा ॥ ३ ॥
भगवंताची नाहीं गोडी ॥ काय म्हणे ते बापुडी ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ मूर्ख बोले दैन्य वाणें ॥ ५ ॥

(३)

अन्न व्हावें पोटभरी ॥ मग तें ज्ञान चर्चा करीं ॥ १ ॥

---

१ चाकर. २ शरीर.

ऐसें बोलती अज्ञान ॥ ज्यांसि नाहीं समाधान ॥ २ ॥
आधीं अन्न तें पाहिजे ॥ मग ध्यानस्थ राहिजे ॥ ३ ॥
अन्नावीण तळमळ ॥ अन्न करीतें सकळ ॥ ४ ॥
कैचा राम कैचा दास ॥ अवघे पोटाचे सायास ॥ ५ ॥.

( ४ )

अन्न देणार श्रीहरी ॥ तोचि प्रतीपाळ करी ॥ १ ॥
ज्या देवाचे आज्ञेवरी ॥ मेघ वर्षती अंबरीं ॥ २ ॥
तयासि चुकलीं बापुडीं ॥ अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥
रामदास म्हणे ऐक ॥ आदि अंतीं देव एक ॥ ४ ॥

( ५ )

देव तारी देव मारी ॥ देव सर्व कांहीं करी ॥ १ ॥
अन्नोदक देवें केलें ॥ सर्व तेणेंचि निर्मिलें ॥ २ ॥
तयासि चुकलीं बापुडीं ॥ अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥
रामदास म्हणे एक ॥ देव त्रैलोक्यनायक ॥ ४ ॥

( ६ )

देव घालितो संसारीं ॥ देव सर्व कांहीं करी ॥ १ ॥
लक्ष चौऱ्यांशीं हिंडतां ॥ तेथें देव सांभाळिता ॥ २ ॥
तयासि चुकलीं बापुडीं ॥ अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥
दास म्हणे वो अंतर ॥ देव कृपेचा सागर ॥ ४ ॥

( ७ )

देव एका भाग्य देतो ॥ एका भीकेसि लावितो ॥ १ ॥
न कळे भगवंताचें करणें ॥ राव रंक तत्क्षणें ॥ २ ॥
तयासि चुकलीं बापुडीं ॥ अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥
रामदास म्हणे पाहीं ॥ देवाविण कांहीं नाहीं ॥ ४ ॥

( ८ )

क्षुधा लागतांचि अन्न ॥ तृषा लागतां जीवन ॥ १ ॥
निद्रा लागतां शयन ॥ आळस येतां चूके मन ॥ २ ॥
मळ मूत्र संपादणें ॥ शौच आचमन करणें ॥ ३ ॥
खाणें लागे नानापरी ॥ सर्व काळ भरावरी ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला ॥ दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥

रामीं रामदास म्हणे ॥ देह सुखवाडा[1] करणें ॥ ६ ॥

( ९ )

सीतकाळींच हूताश ॥ उष्णकाळीं वारा वास ॥ १ ॥
आले पर्जन्याचे दिवस ॥ केले घराचे सायास ॥ २ ॥
नाना व्याधींचीं औषधें ॥ पथ्य करावें निरोधें[2] ॥ ३ ॥
विषयी जनासीं आदर ॥ करणें लागे निरंतर ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला ॥ दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
दास म्हणे सांगों किती ॥ ऐसी देहाची संगती ॥ ६ ॥

( १० )

धनधान्याचें संचित ॥ करणें लागे सावचित्त ॥ १ ॥
अर्थी जातो एकलारे ॥ कलह करावे आदरें ॥ २ ॥
नाना पशू तीं पाळावीं ॥ नाना कृत्यें सांभाळावीं ॥ ३ ॥
सार विचार जतन ॥ करणें लागे सावधान ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला ॥ दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
रामदास म्हणे देवा ॥ जीव कीती हा घालावा ॥ ६ ॥

( ११ )

पोट धंदा जन्मवरी ॥ करूं जातां नाहीं पुरी ॥ १ ॥
करितां संसारीं सायास ॥ नाहीं क्षणाचा अवकाश ॥ २ ॥
अन्ननिर्माण कराया ॥ सर्व काळ पीडो काया ॥ ३ ॥
काम करितां दिवस थोडा ॥ ऐश्या कष्टा नाहीं जोडा ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला ॥ दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
दास म्हणे सावधान ॥ झालें सदृढ बंधन ॥ ६ ॥

( १२ )

शिंक जांभई खोंकला ॥ तितुका काळ व्यर्थ गेला ॥ १ ॥
आतां ऐसें न करावें ॥ नाम जीवीं तें धरावें ॥ २ ॥
श्वास उश्वास निघतो ॥ तितुका काळ व्यर्थ जातो ॥ ३ ॥
पांत्या[3] पातें न लागत ॥ तितुकें वय व्यर्थ जात ॥ ४ ॥
लागे अवचित उचकी ॥ तितुकें वय काळ लेखी ॥ ५ ॥
म्हणे रामीं रामदास ॥ होतो आयुष्याचा नाश ॥ ६ ॥

१ सुखाचें आगर. २ प्रतिबंधानें. ३ डोळ्याच्या पात्यास.

## कलियुग.

### पंचक.

( १ )

आलें भगवंताच्या मना ॥ तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥
जैसा कली राजा आला ॥ धर्म अवघाची बुडाला ॥ २ ॥
नीति मर्यादा उडाली ॥ भक्ति देवाची चुकली ॥ ३ ॥
दास म्हणे पाप झालें ॥ पुण्य अवघेंची बुडालें ॥ ४ ॥

( २ )

विप्रीं सांडिला आचार ॥ क्षेत्रीं सांडिला विचार ॥ १ ॥
मेघवृष्टी मंदावली ॥ पिकें भूमीनें सांडिलीं ॥ २ ॥
बहु वृष्टी अनावृष्टी ॥ दास म्हणे केली सृष्टी ॥ ३ ॥

( ३ )

लोक दोष आचरती ॥ तेणें दोषें भस्म होती ॥ १ ॥
जनीं दोष जाहले फार ॥ तेणें होतसे संहार ॥ २ ॥
रामदास म्हणे बळी ॥ दिसे दिसे पापें कळी ॥ ३ ॥

( ४ )

नाहीं पापाचा कंटाळा ॥ येतो हव्यास आगळा ॥ १ ॥
जना सुबुद्धि नावडे ॥ मन धावे पापाकडे ॥ २ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ पुण्य उणें पाप दुणें ॥ ३ ॥

( ५ )

पुण्य क्षेत्रें तीं मोडावीं ॥ आणि ब्राम्हण्यें पीडावीं ॥ १ ॥
पुण्यवंत ते मरावे ॥ पापी चीरंजीव व्हावे ॥ २ ॥
रामदास म्हणे वाढ ॥ विघ्नें येतीं धर्मा आड ॥ ३ ॥

( ६ )

लोक भीणेचि चालती ॥ त्यासि होताती विपत्ती ॥ १ ॥
धर्मप्रवृत्ती बुडावी ॥ शास्त्रमर्यादा उडावी ॥ २ ॥
रामदास म्हणे देवें ॥ बोध्य होऊनी बैसावें ॥ ३ ॥

---

## मूर्खपण.

### पंचक.

( १ )

येथें कायरे वाजतें ॥ कोठें काय गजबजतें ॥ १ ॥

उगा करीती कोल्हाळ ॥ माझें उठलें कपाळ ॥ २ ॥
हाका मारूनि वरडती ॥ टाळ अवघेची कूटिती ॥ ३ ॥
कोठें कैंचें आले लुटे ॥ वाया झाले टाळकुटे ॥ ४ ॥
वेडिं संसार सांडिला ॥ व्यर्थ गलबला मांडिला ॥ ५ ॥
दास म्हणे या मूर्खाला ॥ हरिकथेचा कंटाळा ॥ ६ ॥

( २ )

हरिकथेचा आला राग ॥ खेळ होतां घाली त्याग[1] ॥ १ ॥
ऐसे प्रकारचे जन ॥ नाहीं देवाचें भजन ॥ २ ॥
कळावंतांचें जो गाणें ॥ ऐकतांची जीव भानें[2] ॥ ३ ॥
करिति लग्नाचा उत्साव ॥ नाहीं देव महोत्साव[3] ॥ ४ ॥
भूत-दया नाहीं पोटीं ॥ खाती लोभाची चोरटीं ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ देव धर्म कोण जाणें ॥ ६ ॥

( ३ )

स्वार्थ केला जन्मवरी ॥ लोभें राहीला श्रीहरी ॥ १ ॥
धन धान्य अहिर्निशीं ॥ गाइ महिषी घोडे दासी ॥ २ ॥
शेत वाडे घर ठावो ॥ प्राणी जीवीं धरी हावो ॥ ३ ॥
माता पिता बहिणी भ्राता ॥ कन्या पुत्र आणि कांता ॥ ४ ॥
व्याही जावई आपुले ॥ इष्ट मित्र सुखी केले ॥ ५ ॥
दास म्हणे वो शेवटीं ॥ प्राप्त झाली मसणवटी ॥ ६ ॥

( ४ )

जन्मवरी शीण केला ॥ अंतकाळीं व्यर्थ गेला ॥ १ ॥
काया स्मशानीं घातली ॥ कन्या पुत्र मुरडलीं[4] ॥ २ ॥
घर वाडा तो राहिला ॥ प्राणी जातसे एकला ॥ ३ ॥
धन धान्य तें राहिलें ॥ प्राणि चर्फडित गेले ॥ ४ ॥
इष्ट मित्र आणि सांगाती ॥ आपुलाले घरा जाती ॥ ५ ॥
दास म्हणे प्राणी मेले ॥ कांहीं पुण्य नाहीं केलें ॥ ६ ॥

( ५ )

दैन्यवाणा झाला प्राणी ॥ चंद्री लागली नयनीं ॥ १ ॥

१ उडी. २ हर्षे. ३ महत्—उत्साह—मोठा उत्साह. ४ परतलीं.

म्हणती ऊचला ऊचला ॥ आतां भूमीभार झाला ॥ २ ॥
घोर लागला अमूप ॥ माणि झाला भेतरूप ॥ ३ ॥
दांतखिळी बसली वाणी ॥ ताठा भरला कर-चरणीं ॥ ४ ॥
डोळे विक्राळ दीसती ॥ झांका झांका मुलें भीती ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ अवघीं सुखाचीं पीसुनें ॥ ६ ॥

( ६ )

एक म्हणती कां पळावें ॥ एक म्हणती कां बैसावें ॥ १ ॥
लोक बोलती मत्सरें ॥ काय मानावें तें खरें ॥ २ ॥
एक म्हणती कां सोडावें ॥ एक म्हणती कां मोडावें ॥ ३ ॥
दास म्हणे हो तत्वता ॥ जाण अवघी बाष्कळता ॥ ४ ॥

## आळस

### पंचक.

( १ )

श्रोतिं व्हावें सावधान ॥ मना आलें तें गाईन ॥ १ ॥
ताल जाती एकीकडे ॥ माझें गाणें भलतीकडे ॥ २ ॥
शेंडा मूळ तें न कळे ॥ माझें गाणेंचि मोकळें ॥ ३ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ जेणें गुंतती शहाणे ॥ ४ ॥

( २ )

राग मूर्छना कळेना ॥ ताळ ध्रुपद वळेना ॥ १ ॥
त्या वेगळें सर्व ठावें ॥ श्रोतिं सावधान व्हावें ॥ २ ॥
अर्थ प्रबंध-विचार ॥ न कळे नाहीं पाठांतर ॥
भक्ति ज्ञानाच्या विश्वास ॥ नाहीं म्हणे रामदास ॥ ४ ॥

( ३ )

निरोपणीं जागवेना ॥ काम क्रोध त्यागवेना ॥
इतुक्या-वेगळें साधन ॥ सांगा अवघेंची करीन ॥ २ ॥
आतां कर्वेना अभ्यास ॥ तोडवेना आशा-पाश ॥ ३ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ रामनाम उच्चारणें ॥ ४ ॥

---

१ कुत्रीं.

( ४ )

'आह्मी भगवंताचे भोळे ॥ बाह्य अंतरीं मोकळे ॥ १ ॥
क्रोध आला तो साहवेना ॥ उणें उत्तर पाहवेना ॥ २ ॥
आह्मां बोलों सके कोण ॥ बोलासाठीं वेंचूं प्राण ॥ ३ ॥
दास म्हणे नीचोत्तरीं ॥ दुःख वाहूं जन्मवरी ॥ ४ ॥

( ४ )

आम्ही भगवंताचीं वेडीं ॥ नेणों बोलाची परवडी ॥ १ ॥
आम्हा घ्यावें ऐसे कळे ॥ फिरोनि द्यावें हें न कळे ॥ २ ॥

# मुक्तेश्वर.

एकनाथास लीलाबाई ह्मणून एक कन्या होती. तिचा मुलगा मुक्तेश्वर; हा जातीचा देशस्थ ब्राम्हण, पैठणचा राहाणारा. ह्याचे बापाचें नांव विश्वंभर बावा. हा जन्मतः मुका होता, परंतु एकनाथाच्या कृपेनें त्यास वाचा फुटली अशी कथा आहे.

मुक्तेश्वरानें भारताच्या अठरा पर्वांवर प्राकृत ओंव्या केल्या होत्या, परंतु त्यांपैकीं पहिलीं चार पर्वें मात्र हल्लीं प्रसिद्ध आहेत. बाकीचीं कोणीं द्वेषानें बुडविलीं असें म्हणतात. मुक्तेश्वरानें प्राकृत रामायणही केलें आहे, परंतु तो ग्रंथ सांपडत नाहीं.

मुक्तेश्वराच्या अंगीं कविताशक्ति चांगली होती. त्याचें वर्णन प्रौढ असून त्याच्या वाणींत माधुर्य हा गुण विशेष आहे.

जन्मशक १५३१ इ.स. १६०९.

### त्यानें केलेले ग्रंथ.

भारत. रामायण. हरिश्चंद्राख्यान. शतमुख-रावणाख्यान.
हे सर्व ग्रंथ ओंवीबद्ध आहेत.

---

## वेंचे, आदिपर्वांतील.

ओंव्या.

### दुष्यंतशकुंतलाख्यान.

कौरववंशीं प्रख्यातकीर्ती ॥ दुष्यंत नामा गुणैकमूर्ती ॥ श्रेष्ठ भूपाळ

१ वाईट भाषणानें. २ पूर्तता.

चक्रवर्ती ॥ वीर्यें शौर्यें आगळा ॥ १ ॥ प्राची प्रतीची दक्षिणोत्तरा ॥ चारी दिशा चतुःसमुद्रा ॥ आक्रमूनि महीमहीध्रा ॥ सुरेंद्र जैसा भूलोकीं ॥ २ ॥ हिंसाकारी अधर्मकारी ॥ अथवा वर्णसंकरकारी ॥ दुष्यंतराज्यीं अनाचारी ॥ स्वप्नींही परी असेना ॥ ३ ॥ धर्मरीती धर्मधन ॥ सेवूनि संतुष्ट सर्व जन ॥ स्वस्वकर्मीं सकळवर्ण ॥ विहिताचारें वर्तती ॥ ४ ॥ रोग दारिद्र्य कीं बंधन ॥ दुःख दुर्भिक्ष अकालमरण ॥ सर्प वृश्चिक तस्कर जाण ॥ दुष्यंतराज्यीं असेना ॥५ ॥ स्वकाळीं पर्जन्य वोपी उदका ॥ रत्न धान्य समृद्धि पिका ॥ पृथ्वी पिके हे मांत्रिकां ॥ फळे जैसी श्रीविद्या॥६॥ विष्णुसमान-सत्ताबळ ॥ प्रतापतेजें सूर्य तेजाळ ॥ धरातुल्य सहनशील ॥ अक्षोभ जैसा सागरु ॥ ७ ॥ निपुण शस्त्रास्त्र-प्रहरणीं ॥ आरूढों जाणे सर्व-वहनीं॥ऐसा भूपाळ-चूडामणी ॥ दुष्यंतराजा भूलोकीं ॥ ८ ॥ सप्त समुद्रींचे लोट ॥ धरा-मंडळीं एकवट ॥ तैसे सेनेचे संघाट ॥ घेऊनि वना चालिला ॥ ९ ॥ वाजी वारण रथ पदाती ॥ संख्या करितां न करवे गणती ॥ सेना-वसनें सर्व जगती ॥ पांघुरविली समर्थें ॥ १० ॥ देखे प्रचंड महागिरी ॥ विशाळ पर्वताचिया दरी ॥ जळें तुंबलीं सरिता सरीं ॥ समुद्रतुल्य अगाध ॥ ११ ॥ नाना वृक्षांची अचाट ॥ डांगें लागलीं घनदाट ॥ माजि निर्झरोदकांचे पांट ॥ सरोवरा धांवती ॥ १२ ॥ मस्तकें उचलूनि दिनकर ॥ छायें रक्षिला अंधकार ॥ माजी श्वापदगणांचे भार ॥ सुखावती सुखवस्ती ॥ १३ ॥ मृग मारूनि असंख्यात ॥ भक्षूनि भंजित अभंजित ॥ पारधी खेळतां झाले श्रांत ॥ ते विश्रांती पावले ॥ १४ ॥ अवलोकूनि तें वन ॥ राजा करी पुढारां गमन ॥ तंव देखिलें कश्यपारण्य ॥ सिद्ध-साधकीं वसविलें ॥ १५ ॥ नदी मालिनी पवित्र-जीवनी ॥ वाहे जैशी देव-तटिनी ॥ तरंगलिंगें सुफेन-सुमनीं ॥ सुपूजिता शोभती ॥ १६ ॥ साष्टांग करूनियां नमन॥ राहवूनि सेना प्रधान ॥ निःसंग एकाकी आपण ॥ कश्यपाश्रमीं प्रवेशे ॥ १७ ॥ अवलोकूनि कश्यपाश्रम ॥ आंत जों पाहे नृपसत्तम ॥ तंव कण्वऋषीचा आश्रम ॥ अति रमणीय देखिला ॥ १८ ॥ आदरें जाऊनि तया निकटीं ॥ आंत पाहे पर्णकुटी ॥ मनुष्यावीण सर्व दृष्टी ॥ गृहसामग्री दिसताहे ॥ १९ ॥ मग गर्जूनि नराधीशें ॥ म्हणितलें आश्रमीं कोण असे ॥ हें परिसोनि इंदिरावेशें ॥ लावण्य कलि-

का प्रगटली ॥ २० ॥कनक-लतिका सौदामिनी ॥ कीं चंद्रकलिका तनुधारिणी ॥ सुवर्ण-केतकी-पत्र वर्णी ॥ सुवर्णखाणी हरिणाक्षी ॥२१॥ रूप-यौवन-चातुर्य लता ॥ बाहेर पातली मुनीश्वर-दुहिता ॥ अत्यादरें धरित्री-कांता ॥ पवित्रासन वोपिलें ॥ २२ ॥ स्वागत वदूनियां वचनीं ॥ अर्घ्यें पाद्यें विधि-पूजनीं ॥ राजा तोषवूनि बहु मानी ॥ कुशल वृत्त विचारिलें ॥ २३ ॥ दर्शनें आनंद जाहला नयना ॥ नामश्रवण करवावें श्रवणा ॥ परिचय-ज्ञानें अंतःकरणा ॥ आप्त भाव भेटवणें ॥ २४ ॥ ऐकोनि चातुर्याची गोष्टी ॥ राजा चमत्कारला पोटीं ॥ म्हणे हे वयें अति धाकुटी ॥ परि विचारें वृद्ध दिसताहे ॥ २५ ॥ राजा बोले या जगती ॥ दुष्यंत नामा चक्रवर्ती ॥ ऐकिला असेल तरी हे मूर्ती ॥ ओळखें दृष्टी सुजाणे ॥ २६ ॥ कण्वऋषीचें दर्शन ॥ इच्छूनि येथें ममागमन ॥ केव्हां होईल बोल वचन ॥ विलंबें कीं अविलंबें ॥ २७ ॥ शकुंतला म्हणे नृपती ॥ मम पिता विवेकमूर्ती ॥ वनफळें घेऊनि शीघ्रगती ॥ आतांच येईल आश्रमा ॥ २८ ॥ यालागीं नरेंद्र-चूडामणी ॥ क्षण एक बैसावें या स्थानीं ॥ इच्छित कामना ऋषि-दर्शनीं ॥ पूर्ण होईल निर्धारें ॥ २९ ॥ राजा पुसे लावण्यराशी ॥ ऊर्ध्वरेता कण्वऋषी ॥ त्यास तूं कन्या झालीस कैशी ॥ हें मज कळलें पाहिजे ॥ ३० ॥ भुजंग वेणीधरा चतुरा ॥ म्हणे गा राजराजेश्वरा ॥ पूर्वी एक तपस्वी घरा ॥ ऋषिदर्शना पातला ॥ ३१ ॥ तेणें पुशिलें तुमचिया ऐसें ॥ त्याप्रति कण्वें कथिलें जैसें ॥ तें मी सांगेन सावकाशें ॥ श्रवण केलें पाहिजे ॥ ३२ ॥ पूर्वी गाधिज मुनींद्रवर्यें ॥ खडतर करितां तपश्चर्यें ॥ देखूनि सांडिला धैर्य ॥ देवेंद्र कांपे चळचळां ॥ ३३ ॥ म्हणे इंद्रपदाची चाड ॥ धरूनि विश्वामित्रें वाड ॥ तपश्चर्या अति अवघड ॥ मांडिली असे निर्धारें ॥ ३४ ॥ यासि उपाय करावा कवण ॥ जेणें तयाचें सुकृत-धन ॥ हारवूनि हा ब्राम्हण ॥ दीन होय सर्वस्वें ॥ ३५ ॥ ते वेळीं अप्सरांमाजि श्रेष्ठ ॥ मेनिका पाचारूनि निकट ॥ तिये म्हणे हें माझें संकट ॥ वारे ऐसें करावें ॥ ३६ ॥ तुंवा जाऊनि तपोवना ॥ कौशिकऋषीच्या दर्शना ॥ विघ्न करावें जेंवि दाना॥दुरुक्ती नाशी क्षणार्धे ॥३७ ॥ मेनिका म्हणे अमरोत्तमा ॥ प्रतिसृष्टीचा अपर ब्रम्हा॥ ज्याचे तपश्चर्येचें तुम्हां॥ भय सर्वदा अपार ॥ ३८ ॥ क्षोभवितां तयाची प्रतिमा ॥ स्वर्गासहित

आम्हां तुम्हां ॥ भस्म करील येथें भ्रमा ॥ संशयाच्या न धरणें ॥ ३९ ॥ सुरेंद्र म्हणे मृगडोळसे ॥ बोलसी तितुकें ठाउकें असे ॥ तथापि आमुच्या कार्योद्देशें ॥ अवश्य गेलें पाहिजे ॥ ४० ॥ शंका सांडोनि करीं गमना ॥ ऐशी होतां सुरेंद्रआज्ञा ॥ मेनिका आली कौशिक-वना ॥ सालंकारा सुवस्त्रा ॥ ४१ ॥ विश्वामित्रासि करूनि नमन ॥ त्याचेच दृष्टीपुढें जाण ॥ क्रीडा कौतुकें सुनर्तन ॥ दाविती झाली विनोदें ॥ ४२ ॥ तियेचा कटाक्षवज्राघात ॥ पडतां मुनिमानसगहनांत ॥ तपो-धैर्याचा पर्वत ॥ चूर्ण झाला क्षणार्धें ॥ ४३ ॥ ऋषीच्या अमोघ वीर्यें धरी ॥ दिव्य गर्भ कन्याकारी ॥ हिमवंतगिरीच्या पाठारीं ॥ सांडूनि गेली अप्सरा ॥ ४४ ॥ वनीं एकलें सुंदर बाळ ॥ पडिलें देखोनि पक्षी सकळ ॥ पक्षमंडपातळीं स्नेहाळ ॥ रक्षिते झाले साक्षेपें ॥ ४५ ॥ चंचूपुटीं मधु सुढाळीं ॥ मुखीं वोपिती क्षुधा-काळीं ॥ श्वापदें येऊं न देती जवळी ॥ झडपोनि लाविती परौतें ॥ ४६ ॥ अकस्मात तेणें पंथें ॥ कण्व ऋषी पावला तेथें ॥ बाळ रक्षिलें शकुंतें ॥ देखोनि करी आश्चर्य ॥ ४७ ॥ उचलोनि ओसंगीं घेतलें ॥ गृहा आणोनी प्रतिपाळिलें ॥ म्हणूनि पिता येणें बोलें ॥ कथिलें तें म्यां यथार्थ ॥ ४८ ॥ शकुंतीं रक्षिलें वेल्हाळा ॥ या लागीं नाम शकुंतला ॥ हा काळपर्यंत भूपाळा ॥ पालन केलें स्नेहाळें ॥ ४९ ॥ वीर्यदानें उपजविता ॥ अन्नदानें प्रतिपाळिता ॥ संकटीं प्राणरक्षिता ॥ हे तिघे पिते बोलिजेती ॥ ५० ॥ पुसलिया प्रश्नाचें उत्तर ॥ तुज सांगितलें साचार ॥ कथा ऐकूनि राजेश्वर ॥ अति संतुष्ट मानसीं ॥ ५१ ॥ म्हणे हे मेनिकेच्या उदरीं ॥ जन्मली ऋषीश्वर-वीर्यें खरी ॥ म्हणून हे दिव्य स्त्री निर्धारीं ॥ मनुष्यलोकीं दुर्लभ ॥ ५२ ॥ आमच्या ठायीं ठेवूनि भाव ॥ भार्या होय तो उपाव ॥ केला पाहिजे॰ म्हणोनि राव ॥ बोलता झाला साक्षेपें ॥ ५३ ॥ राजा बोले अत्यादरें ॥ ऐकें मद्वाक्य साचारें ॥ भार्या होऊनियां चतुरे ॥ मनोरथ पुरवावे ॥ ५४ ॥ ऐकुनि राजमुखीची गोष्टी ॥ सार साक्षी पैं गोरटी ॥ वचनसुमनें श्रवणपुटीं ॥ पूजिती झाली नृपातें ॥ ५५ ॥ धराधीशा धर्मपाळा ॥ तुझिया शुद्ध यशाचळा ॥ कीर्तिशृंग रविमंडळा ॥ भेदूनि गेलें सतेज ॥ ५६ ॥ कुकर्मकुलिश घेऊनि हातीं ॥ अमर त्यातें छेदूं इच्छिती ॥ हा उपाव माझिये मतीं ॥ अयुक्त ऐसा

दिसताहे ॥ ५७ ॥ अमृत म्हणोनि हाळाहाळ ॥ माशी त्याचें कवण फळ ॥ बाळ म्हणोनि धरिला व्याळ ॥ अनर्थ वोजे रोकडा ॥ ५८ ॥ आम्हा स्त्रियांची संगती ॥ भली नव्हे गा मेदिनीपती ॥ मातला काम भद्रजाती ॥ विवेकांकुशें वळवावा ॥ ५९ ॥ राजा म्हणे कनकलतिके ॥ बोलसी तितुकें परम निकें ॥ परस्त्री अभिलाषितां दुःखें ॥ भोगिती हे मानव ॥ ६० ॥ परस्त्री आणि परधन ॥ अखंड वांछी जयाचें मन ॥ तो जीतचि भेतासमान ॥ त्यासी सज्जन नातळती ॥ ६१ ॥ तूं तंव कुमारी ऋषिबाळा ॥ हातीं घेऊनि सुमनमाळा ॥ घालीं मजवर नृपाच्या गळां ॥ होईं अंतुरी सुजाणें ॥ ६२ ॥ अयोग्य वास तुज काननीं ॥ गजमंदिरीं गृहस्वामिणी ॥ होऊनि नानावस्त्राभरणीं ॥ देह शृंगारीं मत्संगें ॥ ६३ ॥ शकुंतला बोले वचन ॥ विध्युक्त न होतां पाणिग्रहण ॥ अविचारें घडतां संगमन ॥ अधःपात दोघांशी ॥ ६४ ॥ नृप म्हणे चातुर्यभरिते ॥ विशालाक्षी लावण्यसरिते ॥ विधि आठ विवाहातें ॥ ऐसें शास्त्रें बोलती ॥ ६५ ॥ अष्टविवाहांमाजि येथें ॥ गांधर्व बोलिजे श्रेष्ठ ग्रंथें ॥ तेणें विधी विवाह त्वरितें ॥ करूनि अंकीं आरूढें ॥ ६६ ॥ तयावरी चंद्रानना ॥ चारुहासा मृगनयना ॥ म्हणे राजया विचक्षणा ॥ विहित धर्म बोलसी ॥ ६७ ॥ कन्या-देह तंव निश्चिती ॥ दिधला पाहिजे पुरुषाहातीं ॥ तुज ऐसा विशिष्ट नृपती ॥ परम दैवें पाविजे ॥ ६८ ॥ तुझिया ऐसें माझिया चित्तीं ॥ वर्तताहे अत्यंत प्रीती ॥ परि वडिलां नेणतां हे रीती ॥ व्यभिचारदोष आणील ॥ ६९ ॥ यालागीं नावेक धरीं धीरु ॥ आश्रमा येईल ऋषीश्वरु ॥ वचन मान्य करूनि अत्यादरु ॥ मज वोपील तुज हातीं ॥ ७० ॥ नरेंद्र म्हणे वो सुजाणी ॥ विचारें आपें आप धनी ॥ आदिमध्यअवसानीं ॥ संगीं आपण आपणिया ॥ ७१ ॥ यालागीं आपुल्या देहदाना ॥ समर्थ करीं तूं आपल्या मना ॥ माझेनि संगें सर्व कामना ॥ पूर्ण तुझिया होतील ॥ ७२ ॥ ऐसें बोलतां धरारमण ॥ शकुंतला हास्यवदन ॥ म्हणे आतां ऐक वचन ॥ नियमाचें अवधारीं ॥ ७३ ॥ तुज पासोनि माझे पोटीं ॥ पुत्र जन्मेल जो या सृष्टी ॥ राज्यधर तो तुझिया पाटीं ॥ पदाधिकारी त्वां करणें ॥ ७४ ॥ ऐशिया नेमा देशील भाके ॥ तरी घडणार तें घडो सुखें ॥ हें ऐकोनि अत्यंत हरिखें ॥ राजा सरके पुढारां ॥ ७५ ॥ हस्त धरोनि स्वहस्तकें ॥ देता झाला त्रिवार भाके ॥

तुझा पुत्र निज निष्टंकें ॥ राज्यासनीं युवराजा ॥ ७६ ॥ हें माझें मति-
ज्ञावचन ॥ भंगूं न शके चतुरानन ॥ तें परिसोनि आग्रहबन्धन ॥
त्यागूनि भावें अनुसरली ॥ ७७ ॥ रायें मानिला दिव्य लाभ ॥ परि
उठावला ऋषिभयाचा कोंभ ॥ इंद्रापराधें गौतमक्षोभ ॥ तैसाचि घडेल
ये ठाईं ॥ ७८ ॥ आतां येथूनि शीघ्रगती ॥ गमन करणें हेचि युक्ती ॥
ऐसें विचारूनि नृपती ॥ भार्येमती अनुवादे ॥ ७९ ॥ म्हणे आतां तुज-
लागून ॥ मूळ धाडीन नगराहून ॥ छत्र चामरें शिबिका यान ॥ दासदा-
सीं समवेत ॥ ८० ॥ ऐसें बोलोनि जाता झाला ॥ दळेशीं नगरा प्रवेश-
ला ॥ मागें मुहूर्तानंतरें आला ॥ कण्वऋषी आश्रमा ॥ ८१ ॥ पुरुषसं-
गें शंकायुक्त ॥ बाहेर नये लज्जाभरित ॥ हें देखोनि सर्वज्ञनाथ ॥ जाण-
ता झाला मानसीं ॥८२॥ म्हणे माझिये निजात्मजे ॥ बाहेर येईं सांडूनि
लज्जे ॥ कर्तव्य होतें तें सहजें ॥ सिद्धीस नेलें प्रारब्धें ॥ ८३ ॥ ऐकोनि
पित्याची अभयवाणी ॥ कन्या येऊनि लागे चरणीं ॥ म्हणे म्यां वं-
रिला भूपाळ गुणी ॥ तो त्वां मान्य करावा ॥ ८४ ॥ कृपानुग्रह वर
प्रसादें ॥ गौरवी आशीर्वचनशब्दें ॥ ऋषि बोले परमाल्हादें ॥ चिरंजीव
तव भर्ता ॥ ८५ ॥ शचीसुरेशासारिखें ॥ दोघें असा अक्षय्य सुखें ॥
विष्णु-शक्तिसुताशीं तुकें ॥ ऐसा पुत्र लाधसी ॥ ८६ ॥ असो तोचि
धरूनि दिवस ॥ चढतां वाढतां मासोमास ॥ शुक्लपक्षीं ताराधीश ॥ वृ-
द्धि पावे पैं जैसा ॥ ८७ ॥ काळ होतां संपूर्ण ॥ पावता झाला पुण्य
जनन ॥ धरामंडळीं देदीप्यमान ॥ अपर भानु पैं जैसा ॥ ८८ ॥ कुमार
सुकुमार देवगर्भ ॥ कीर्ति-प्रासादीं विजयस्तंभ ॥ नानासौंदर्यतरूचा
कोंभ ॥ धरामंडळीं उगवला ॥ ८९ ॥ क्रूर श्वापदांचे गण ॥ बळें करी
त्यांचें दमन ॥ यालागीं ठेविलें अभिधान ॥ सर्वदमन तयाचें ॥ ९० ॥
होका उत्तमाची कुमारी ॥ बहुकाळ वर्ततां माहेरीं ॥ उद्धता होय वि-
हिताचारीं ॥ लोक निंदा करिताती ॥ ९१ ॥ शिखा स्वस्थानीं साजिरी ॥
भर्तृगृहीं पवित्र नारी ॥ शोभा श्लाघ्य मान्यता थोरी ॥ उभयलोकीं ते
पावे ॥ ९२ ॥ यालागीं कण्व म्हणे शिष्यांशी ॥ शकुंतला सुपुत्रासर-
शी ॥ नेऊनि निवेदा रायासी ॥ हस्तिनापुरीं अविलंबें ॥ ९३ ॥ ऋषि-
आज्ञेनें तापस-मेळा ॥ सवें भरत आणि शकुंतला ॥ गजपुरा पातला
डोळां ॥ लोक देखती कौतुकें ॥९४॥ सभामंडपीं असतां नृपती ॥ मुनि-

वरांसह राजयुवती ॥ राजकुमार धरूनि हातीं ॥ उभी ठेली सन्मुख ॥९५॥ आशीर्वाद जयजयकार ॥ करूनि बसला ऋषींचा संभार ॥ शकुंतला आत्म-कुमार ॥ करीं धरूनि होय पुढें ॥ ९६ ॥ बलौदार्य-लावण्य-खाणी ॥ तनुज लाविला जनक-चरणीं ॥ म्हणे राजया अंकासनीं ॥ ठाव देईं बैसावया ॥ ९७ ॥ बहुत दिवस पाहिली वाट ॥ निष्ठुर, नव्हेसि कीं लोभिष्ट ॥ मी तव गृहस्वामिणी श्रेष्ठ ॥ गृहा पातलें आपुल्या ॥९८॥ सत्यप्रतिज्ञा नरेंद्रोत्तमा ॥ आठवूनि आपल्या नेमा ॥ युवराज्यीं भरतनामा ॥ पुत्र आपला अभिषेकीं ॥ ९९ ॥ विश्वमूनि कण्वाश्रमीं ॥ जो अर्थ कथिला वाङ्नियमीं ॥ तो या काळीं क्रियाधर्मी ॥ करूनि दावी यथार्थ ॥ १०० ॥ ऐकूनि शकुंतलेचें वचन ॥ केल्या कर्माची आठवण ॥ मनें जाणतांही आपण ॥ जाला नेणता ते काळीं ॥ १ ॥ म्हणे तूं कैची दुष्ट तापसी ॥ कोण कोठील कोणे देशीं ॥ कोणे ठायीं एकांतवासीं ॥ संग झाला मी नेणें ॥ २॥ माझेनि वयें वय समान ॥ ताल—स्कंध बळ समान ॥ स्वल्पकाळें हा नंदन ॥ झाला कैसा नवल हें ॥ ३ ॥ पाहातां साक्षी न मिळे कांहीं ॥ मज तो अणुमात्र आठव नाहीं ॥ आतां आले पंथें जाई ॥ शीघ्र येथूनि निर्लज्जे ॥ ४ ॥ आतां सांडोनि माझी गोष्टी ॥ संबंधवार्ता न वदें ओठीं ॥ स्वाश्रमा जाऊनि राहटी ॥ आवडे तैसी वर्ते कां ॥ ५॥ ऐसें बोलतां मेदिनीपाळा ॥ क्रोधें संतापली शकुंतळा ॥ जैशी मळयाग्नीची ज्वाळा ॥ स्पर्शों धांवे गगनातें ॥ ६ ॥ आरक्तता लेऊनि नयनें ॥ अंजन क्षाळिलें अश्रुजीवनें ॥ अधर स्फूर्ती जेंवि पवनें ॥ पद्मपत्रें थरकती ॥ ७ ॥ म्हणे धन्य गा पुरुषोत्तमा ॥ उत्तम ऐसेचि रक्षिती नेमा ॥ कर्मसाक्षी अंतरात्मा ॥ तृप्त झाला या वचनीं ॥ ८ ॥ यथार्थ जाणतां अंतःकरणीं ॥ अन्यथा प्रतिपादी जो वचनीं ॥ तेणें कोणती पापकरणी ॥ केली नाहीं सांग पां ॥ ९ ॥ मी एक जाणता सर्वसृष्टी ॥ ऐसा अभिमान वाहसी पोटीं ॥ सकळमूर्खांच्या शेवटीं ॥ कर्म करिशीं त्यांतुल्य ॥ १० ॥ ज्याचा असत्याचार कुकर्मा ॥ देखोनि मलपे अंतरात्मा ॥ त्यासि वोपोनियां यमधामा ॥ दंड करवी सुबद्ध ॥ ११ ॥ आतां असत्य-पर्वतातळा ॥ उभा न राहें कुंभिनी-पाळा ॥ वरि पडेल वज्रशिळा ॥ परम अकीर्ति दोषाची ॥१२॥ मस्तक होईल सहस्र भाग ॥ या बोलास न म्हणे वाउग ॥ न्यायें बो-

लतां उद्वेग ॥ विवेकीया न पवेचि ॥ १३॥ सकळ ऐश्वर्य घेऊनि भेटी ॥ पद्मा पातली पायें लोटी ॥ तो सभाग्य कीं अभाग्य सृष्टी ॥ काय म्हणिजे सांग पां ॥१४॥ अचल श्री अरोग काया ॥ सुगुण पुत्र पवित्र जाया ॥ बहुत जन्म हरिहरांच्या पायां ॥ भजतां व्हें फळ पाविजे ॥ १५ ॥ आतां शेवटील या वचना ॥ साच ऐक गा नरभूषणा ॥ मी जातसें कश्यपारण्या ॥ कण्वाश्रमा सखेद ॥ १६ ॥ या आत्मजा आपुलिया ॥ आदरें अंगीकारावें राया ॥ योग्य न होसी त्यागावया ॥ सत्य सत्य त्रिवाचा ॥ १७ ॥ ब्रम्हवीर्यें माझें जनन ॥ वंचूनि पिता सुव्हज्जन ॥ तुज वोपिलें देहदान ॥ त्यास तूं उत्तीर्ण झालासीं ॥ १८ ॥ ऐशीं प्रियेचीं पवित्र भाषणें ॥ दुष्यंत दूषी आपुल्या वचनें ॥ म्हणे बहु-भाषणी कवणें ॥ जिंकिली वचनें बोलतां ॥ १९ ॥ हीनजातीच्या त्या खुणा ॥ आतां जाणवल्या मना ॥ मेनिका ते पण्यांगणा ॥ धर्म-नष्टा बंधकी ॥ २० ॥ तिचे उदरीं तव उत्पत्ती ॥ तिची निवडिली ऐशी रीती ॥ म्हणोनि खाण तैशी माती ॥ हेंचि लोकीं प्रसिद्ध ॥ २१ ॥ गळां पडोनि विषयस्वार्थी ॥ संबंध लाविशी मज समर्था ॥ अविचारबुद्धि सांडोनि आतां ॥ जाई स्थळा आपुल्या ॥ २२ ॥ क्षोभोनि बोले शकुंतळा ॥ पवित्र विश्वामित्रबाळा ॥ राया भूमंडळपाळा॥ तूंचि अविचारें जल्पसी ॥ २३ ॥ मेनिका त्रिदशपंक्तिपावन ॥ लोकमस्तकीं जिचें गमन ॥ मी ही जाण तिजसमान ॥ देवतादेही दिव्य स्त्री ॥ २४ ॥ नरसिंहा सांडोनि कपट ॥ मांडिये बैसवीं कुमारश्रेष्ठ ॥ सत्य धर्म करीं प्रकट ॥ सर्वां वडिलां देखतां ॥ २५ ॥ सत्यापरतां नाहीं धर्म ॥ सत्य तेंचि परब्रम्ह ॥ सत्यापाशीं पुरुषोत्तम ॥ सर्वकाळीं तिष्ठत ॥ २६ ॥ असत्य तेंचि पैं पातक ॥ असत्य तोचि महानरक ॥ असत्याचेनि संगें दुःख ॥ अनंत जन्म भोगिती ॥ २७ ॥ सत्यामृताची कनकवाटी ॥ जोडिली न सांडें भूतटीं ॥ असत्यविषाची नरोटी ॥ पवित्रहातें नातळे ॥ २८ ॥ ते अवसरीं अशरीर वाणी ॥ गंभीर मेघाचिये ध्वनी ॥ होतां सकळ सभास्थानीं ॥ ऐकती मंत्री आचार्य ॥ २९ ॥ रे रे दुष्यंतराज नृपती ॥ झणी अवमानिशी हे सती ॥ जी क्षोभल्या सर्व जगती ॥ जाळूं सके क्षणार्धे ॥ ३० ॥ यालागिं पुत्र आपुला घेणें ॥ मानिनी मानें सदना नेणें ॥ आतां भ्रतारणेचीं वचनें ॥ न बोलेंचि बहुसाळ ॥ ३१ ॥ ऐशी ऐ-

कतां आकाशवाणी ॥ टाळी पिटली सभास्थानीं ॥ जयजयकारें ध्वनी ॥ परम आल्हाद समस्तां ॥ ३२ ॥ राजा म्हणे वृद्ध हो ऐका ॥ हा सर्व अर्थ मज ठाउका ॥ परि शंकोनियां लौकिका ॥ कृत्रिम वाक्यें बोलिलों ॥ ३३ ॥ पहिलेंचि करितों अंगीकारू ॥ तरी लोक भावितें अनाचारू ॥ कामबुद्धीनें राजेश्वरू ॥ निषिद्धमार्गी राहाटला ॥ ३४ ॥ मग उठोनि लवलाहें ॥ पुत्र कडिये घेतला मोहें ॥ आवडी चुंबूनियां पाहे ॥ वारंवार वदनातें ॥ ३५ ॥ करूनि मूर्द्धाअवघ्राण ॥ आवडीं देऊनि आलिंगन ॥ युवराज्यीं अभिषेचन ॥ करिता झाला तात्काळीं ॥ ३६ ॥ आदरें प्रिया धरूनि हातीं ॥ नेली अंतरगृहाप्रती ॥ आलिंगूनि म्हणे चित्तीं ॥ विषाद कांहीं न मानावा ॥ ३७ ॥ सत्य वाटावया साचारें ॥ वाक्य बोलिलों लोकाचारें ॥ ते तूं न मानूनियां चतुरें ॥ क्षमा करणें मजलागीं ॥ ३८ ॥ म्हणोनि वस्त्रें दिव्याभरणें ॥ वोपिलीं जैशीं शचीरमणें ॥ राजसंपत्ति निज ठेवणें ॥ निवेदिली तिजहातीं ॥ ३९ ॥ पट्टमहिषींमाजी मुख्य ॥ पावली अनेक भोगसुख ॥ पूर्वींच्या नेमाहूनि अधिक ॥ ऐसें आलें प्रतीती ॥ ४० ॥ दुष्यंता नंतर भरत ॥ वीर प्रतापी ख्यात बहुत ॥ दुसरा राजा ब्रम्हांडांत ॥ नाहीं झाला पुरुषार्थी ॥ ४१ ॥

## ओंव्या—सभापर्व. अध्याय ३

धर्मराज मयासुराच्या सभेंत बसला असतां नारदानें प्रश्नरूपानें जी त्यास राजनीति सांगितली ती येथे सांगितली आहे.

### नारदनीति.

नारद म्हणे महाराजा ॥ धर्म-स्वरूप धर्मात्मजा ॥ नामासारखी सुतेजा ॥ करणी निर्मळ असे कीं ॥ १ ॥ ऐश्वर्य लाधल्या संपूर्ण ॥ धर्मी वर्तत असे कीं मन ॥ राज्य-मदें दुरभिमान ॥ तुज संचरला नाहीं कीं ॥ २ ॥ न्यायें अर्जिला जो अर्थु ॥ व्यय करिसी कीं धर्मार्थु ॥ विषय-काम-

१ हीस किंचित्प्रश्न असेंही म्हणतात, पण मूळ शब्द कच्चित्प्रश्न असा आहे. भारतांत नारदानें प्रत्यक प्रश्न कच्चित् (' कीं काय ' ह्या अर्थाचें प्रश्नार्थक संस्कृत भाषेंतील अव्यय ) शब्दानें केला आहे. त्यावरून कच्चित्प्रश्न असें नांव पडून पुढें त्याचा किंचित्प्रश्न असा अपभ्रंश झाला आहे.

लोभानें तुझें चित्तु ॥ विटाळलें नाहीं कीं ॥ ३ ॥ वडील आचरले जो धर्म ॥ तोच चालविसी कीं नेम ॥ विहित-भंगाचा कर्दम ॥ तुज लेपला नाहीं कीं ॥ ४ ॥ धर्मे अर्थ अर्थे धर्म ॥ धर्ममात्रीं पुरुषोत्तम ॥ चढता वाढता सुखोद्यम ॥ नित्यानित्य करिसी कीं ॥५ ॥ धर्मासी अविरोधी जो काम ॥ तोचि सेविसी कीं सुगम ॥ इंद्रिय-लोलुपतेचा भ्रम ॥ प्राप्त झाला नाहीं कीं ॥ ६ ॥ नित्यनैमित्तिकीं कर्मीं ॥ वर्तत आहेसि कीं निष्कामी ॥ काम्य-निषिद्धांची ऊर्मी ॥ लोटिसी कीं आलिया ॥ ७ ॥ अनायासीं ह्रो कीं सायासीं ॥ भाग्यें जोडिल्या संपत्तीसी ॥ विभागूनि समस्तांसी ॥ सेविसी कीं सुजाणा ॥ ८[1] ॥ अनुकूळ अथवा प्रतिकूळ ॥ अदृष्ट झालिया ही विकळ ॥ धर्मापासूनि बुद्धी अचळ ॥ भ्रंश कांहीं न पवे कीं ॥ ९ ॥ अहोरात्रीं साठ घडी ॥ लोटितां पाप-पुण्याची जोडी ॥ किती झाली हें घडी घडी ॥ विचारीत अससी कीं ॥ ॥१०॥ अखंडे-क- नाम-स्मरणीं ॥ देव केला असे कीं ऋणी॥जो पावोनि देह-मरणीं ॥ दास्य करी निजांगें ॥ ११ ॥ मोक्ष-द्वारींच्या द्वारपाळां ॥ आर्जवें भजसी कीं नृपाळा ॥ जे कां हात धरूनि डोळां । सायोज्य-धाम दाविती ॥ १२ ॥ समता संतोष सद्विवेक ॥ चौथा साधु संग देख ॥ यांसीं करूनियां सख्य ॥ मित्र-भावें अससी कीं ॥ १३ । काम-क्रोध-लोभ-त्रया ॥ मोह मद मत्सर यया ॥ वर्जित्या नियोजिल्या ठायां ॥ जाणसीं कीं जाणत्या ॥ १४ ॥ काम नसावा परस्त्रियेच ॥ क्रोध नसावा सत्पुरुषाचा ॥ लोभ नसावा शरीराचा ॥ मोह पुत्राच बाधक ॥ १५ ॥ मद नसावा सुह्रद-जातीं ॥ मत्सर नसावा सर्वांभूतीं तुझी वर्तणुकीची शक्ति ॥ सांग ऐसी आहे कीं ॥ १६ ॥ काम असाव ईश्वर-भजनीं ॥ क्रोध असावा इंद्रिय-दमनीं ॥ तीर्थ-प्रसाद-शेष-ग्रहणीं ॥ लोभ अपार असावा ॥ १७ ॥ मोह असावा सज्जनासीं ॥ म असावा दुर्जनासीं ॥ मत्सर सदा संसारासीं॥असावा तो असे कीं॥१८ राज-चिन्हीं षड्विध[2] गुण॥सप्त[3] उपाय परम गहन ॥ बळाबळांचें लक्षण जाणसीं कीं चौदाही ॥ १९ ॥ आज्ञा कीर्ती द्विज-पालण ॥ दान भेग मित्र-संरक्षण ॥ साही गुणीं तव प्रधान ॥ सालंकार असती कीं

१ हे पुढें ४१ व्या ओवींत सांगितले आहेत. २ हे पुढें ४२ व्या ओवींत सांगित आहेत. ३ हें पुढें ४३ व्या ओवींत सांगितलें आहे.

॥२०॥ जाणती नाना व्यूहरचना ॥ थोडेनि जिंकिती बहुत सेना ॥ ऐसे तुझे विचक्षणा ॥ सेनापती असती कीं ॥ २१ ॥ निर्लोभिये विश्वासीक ॥ वंशज असती कीं सेवक ॥ जे स्वामिकाजीं देख ॥ देह देती सोडून ॥ २२ ॥ वेतन भक्षिती पवित्र ॥ राजद्रव्य ज्यां अपवित्र ॥ ऐसेनि योगें स्वतंत्र ॥ स्वव्यापारीं असती कीं ॥ २३ ॥ उत्तम-मध्यम-कनिष्ठ-पदीं ॥ योग्यायोग्यविचारनिधी ॥ परीक्षूनि विशाळ-बुद्धी ॥ योजिशी कीं नरेंद्रा ॥ २४ ॥ अमात्यपदीं दासीपुत्र ॥ अधम-स्थळीं परम-पवित्र ॥ अपूज्या पुजोनि सत्पात्र ॥ अवमानीत नाहींस कीं ॥ २५ ॥ अचाट कार्य साधी भृत्य ॥ वेतनाहूनि कोटि-गुणित॥द्रव्य देऊनि त्याचें चित्त ॥ तोषवीत आहेस कीं ॥ २६ ॥ आपुले काजीं पावले मरण ॥ त्यांचीं कुटुंबें आश्वासून ॥ आपुल्या कुटुंबासमान॥ पाळिसी कीं दयाळा ॥ २७ ॥ दरिद्र-काळींचीं बाळमित्रें ॥ भेटों आलिया स्नेह-पात्रें ॥ वोळखी देऊनि दर्शन मात्रें ॥ श्रियावंत करिसी कीं ॥ २८ ॥ परगुण परीक्षा जाणणें ॥ चित्त कळवळे पर-वेदनें ॥ हीं मुख्य प्रभूचीं लक्षणें ॥ तुझ्या ठायीं असती कीं ॥ २९ ॥ मंत्रियांच्या राहटी कैशा ॥ देती यशा कीं अपेशा ॥ चार-मुखें नित्य नरेशा ॥ विचारीत अससी कीं॥३०॥ नेमाहूनि आगळें धन ॥ घेऊन प्रजांतें पीडण ॥ करिती जे अयोग्य प्रधान ॥ ते पदा-तीत करिसी कीं ॥ ३१ ॥ राज-द्रव्य देऊनि भाग ॥ भूमिसेवा करिती सांग ॥ न करिती राजा-ज्ञेचा भंग ॥ प्रजा नेमें असती कीं ॥ ३२ ॥ वन-चर-दूतांचिया गोष्टी ॥ राष्ट्र अवलोकिशी कीं दृष्टी ॥ नष्ट-तस्करांचिया राहटी ॥ भंगिसी कीं ऐकतां ॥३३॥ तीर्थ-यात्रे जाती जन ॥ त्यांतें कांडूनि घेती धन ॥ त्यांचें करूनियां हनन ॥ मार्ग-मुक्त करिसी कीं ॥ ३४ ॥ सांगावया क्लेश-गोष्टी ॥ दुर्बळ येऊं इच्छिती भेटी ॥ तयां येतयां आड-काठी॥ तुझ्या द्वारीं नाहीं कीं॥३५॥ पर-राष्ट्र घ्यावया धाडिसी सैन्य ॥ झुंझती त्यांचें करूनि कंदन ॥ त्यांवांचून प्रजातें नागवण ॥ तुझेंने होत नाहीं कीं ॥ ३६ ॥ पिपीलिका लागे जेथें ॥ तात्काळ हात पावे तेथें ॥ दीनां पावतां दुःखातें ॥ क्लेशा-तीत करिसी कीं ॥ ३७ ॥ अंगींचें एक रोम उपडे ॥ तें जैसें ल्हदयांत ठाउकें पडे ॥ तेवीं प्रजा पावतां पीडे ॥ जाणसी कीं तात्काळ ॥ ३८ ॥ तुझिया राज्यामाजी आज्ञा ॥ पुत्र पाळिती पितृ-आज्ञा ॥ न करितां

पुरुषांची अवज्ञा ॥ स्त्रिया स्वधर्मे असती कीं ॥ ३९ ॥ शरीरसंपत्ती मनो-भावा ॥ अर्पून करिती सद्गुरु-सेवा ॥ ऐसे शिष्य नर-पार्थिवा ॥ शिष्य-धर्मे असती कीं ॥ ४० ॥ संधी विग्रह यान आसन॥ द्वैधी-भाव आश्रय जाण ॥ हेचि साही राज-गुण ॥ विचक्षण बोलती ॥ ४१ ॥ साम दान भेद दंड ॥ इंद्र-जाळ मंत्रौ-षध ॥ सप्तोपाय ऐसे सुबुद्ध ॥ पंडित-वर्य बोलती ॥ ४२ ॥ आप-पराचे बळा-बळ ॥ इहींसीं चौदा भेद कुशळ ॥ बोलती हें गूढ सांजळ ॥ करूनि तूं तें दाविलें ॥ ४३ ॥ अथवा आणीक एक प्रकार ॥ चौदा भेद ग्रंथ-प्रकार ॥ बोलती ते सविस्तर॥मागुतेनि परियेसीं ॥ ४४ ॥ अंग-बळ सेना-बळ॥ कोश-बळ दुर्ग-बळ ॥ शस्त्र-बळ मंत्र-प्रधान-बळ ॥ सुह्रद-बळ आठवें ॥ ४५ ॥ वेदत्रय-बुद्धि-बळ॥ ब्राम्हण-शिष्य-सुकृत-बळ॥अन्य रायाचें साह्य-बळ॥ ऐसीं चौदा जाणावीं॥४६॥भृगु विशाळ अंगिरा मुनी ॥ ऐसे प्रगट वदले वाणी॥या वेगळे काय ते गुणी ॥ द्वैपायन स्वयें जाणे ॥४७॥ वर्ष-कार्य एक मास ॥ मासाचें तें एक दिवस ॥ दिवस-कार्य एक निमिष ॥ संपादीत असती कीं ॥ ४८ ॥ व्यास बोलिला गूढार्थु ॥ म्यांही न बोलतां प्रगटार्थु ॥ चतुर श्रोतियांचें चित्तु ॥ संतोषेल कैसेंनीं ॥ ४९ ॥ श्रोत्रिय कुटुंबी निर्धन ॥ साधु सात्विक-वृत्ति क्षीण ॥ त्याचें परिहरूनि दैन्य ॥ सदा पाळण करिसी कीं ॥ ५० ॥ दरिद्र-ब्राम्हणाची जाया ॥ तारुण्य-काळीं अंतरे राया ॥ ऐकोनि त्या चिया विवाह-कार्या ॥ साह्य संपूर्ण करिसी कीं ॥ ५१ ॥ रोगें प्रवासीं पडिले ॥ कारागृहीं जे कां आटकले ॥ ते ते सांभाळूनि भले ॥ क्लेशा-तीत करिसी कीं ॥ ५२ ॥ गृहा पावलिया क्षुधा-पीडितें॥

१ तह. २ लढाई. ३ कूच. ४ मुक्काम. ५ बलिष्ठ आणि दुर्बल अशा दोन्ही शत्रूंशीं नम्रतेने वागणें. ६ बलिष्ठाचा आश्रय. ७ मंत्रोपाय. आणि औषधोपाय. ८ शत्रूची आणि आपली बराबरी आहे किंवा कांहीं न्यूना धिक्य आहे हें बळाबळ पहाणें. ९ बळाबळ पहाण्याचे चौदा विषय म्ह० स्थानें आहेत तीं हीं. १ देश, २ किल्ला, ३ रथ, ४ हत्ती, ५ घोडे, ६ योद्धे, ७ अधिकारी, ८ अंतःपुर, ९ अन्नाचा पुरवठा, १० अश्वरथादिकांची संख्या, ११ नीति, १२ जमाखर्चाचा हिशेब, १३ द्रव्याचा पुरवठा, आणि १४ गुप्त शत्रु. १० आयुर्वेद, धनुर्वेद आणि गांधर्ववेद. ११ वैदिक १२ क्षुधा पीडित. पीडितें हें पीडित ह्या अर्थी पुढील प्रासासाठीं घातलें आहे. प्राकृत कवितेंत प्रासासाठीं पुष्कल शब्द फिरविलेले अढळतात.

ते तृप्त होऊनि पंचा-मृतें ॥ आशी-र्वचनीं स्व-स्थळातें ॥ तुजपासूनि जाती कीं.॥ ५३ ॥ लोक-लाजे त्यजिती प्राण ॥ अधनां धन-लुब्धा चें ऋण ॥ त्या उत्तमांचें ऋण-मोचन ॥ अतिसाक्षेपें करिसी कीं॥५४॥ आवडीचे निज आप्तु. ॥ गुणी जामात श्रियावंतु ॥ तया ऐसे परम आर्तु ॥ याचकातें करिसी कीं ॥ ५५ ॥ तुझे ऋत्विज श्रुति-पारग ॥ सांग संपादिती याग ॥ तूं तें नेणतां कर्म व्यंग ॥ कदां होत नाहीं कीं ॥ ५६ ॥ वाजपेयादि पुंडरीक ॥ अनेक क्रतुक्रिया याज्ञिक ॥ घृता-व दानीं यज्ञ-पुरुष ॥ सदां तृप्त करिती कीं ॥ ५७ ॥ ब्राम्हण स्थापिले वृत्ति-क्षेत्रीं ॥ ते ते अक्षयीं राजपत्रीं ॥ भातें भक्षूनि पुत्रपौत्रीं ॥ विहित-धर्मे असती कीं ॥ ५८ ॥ दुष्ट-ग्रहीं उघडितां मुख ॥ शांतिक करिसी कीं तात्काळिक ॥ त्रिकाळ-ज्ञानी ज्योतिषी गणक॥शुभ-सूचक असती कीं ॥ ५९ ॥ नि-रापेक्ष असती कीं भांडारीं ॥ क्लीब रक्षक अंतःपुरीं ॥ शुची आप्तं तृप्त जठरीं ॥ पाक-कर्ते असती कीं ॥ ६० ॥ विषम देशाचिया संधीं ॥ अविचार शूर ठेविले युद्धीं ॥ दुर्गपर्वतीं स्थिर-बुद्धीं ॥ धैर्यवंत असती कीं ॥ ६१ ॥ बोलों जाणती समयोचित ॥ चतुर जे कां शास्त्र-पंडित ॥ ते ते इष्टसाधनार्थ ॥ योजिसी कीं नरेंद्रा ॥ ॥६२ ॥ जितें-द्रिय ज्ञानवंत ॥ परमपवित्र साधु संत ॥ सभा-चारी सभे आंत ॥ निकट-वर्ती असती कीं ॥ ६३ ॥ दुष्ट दुर्जन क्षुद्र कोपी ॥ वाक्-निष्टुर परमसंतापी ॥ पैशुन्य-वादी महा-पापी ॥ सभा-स्थानीं त्यजिले कीं ॥ ६४ ॥ अपमानिती संत साधू ॥ द्विजां देवां दोष-शब्दु॥ बोलती त्यांचा जिव्हा-छेदु ॥ तात्काळिक करिसी कीं ॥ ६५ ॥ नरक-मोक्ष-पाप-चिन्ह ॥ जितांचि जाणशी सज्ञान ॥ जनाचे मुखीं निंदा स्तवन ॥ हें तंव जाणत अससी कीं ॥ ६६॥ जागा होवोनि अपररातीं॥ सारासारविचार नीती ॥ मोक्षउपायें भवनिवृत्ती ॥ विचारीत अससी कीं ॥ ६७॥ अजिंक्य-शत्रूतें जिकावें ॥ जिकिल्यातें प्रतिपाळावें ॥ शरणा-गतातें रक्षावें ॥ ऐसें करीत अससी कीं ॥ ६८ ॥ वर्ष पालटूनियां जीर्ण ॥ दुर्ग-पर्वतीं नूतन धान्य ॥ यंत्र औषधी अक्षयीं जीवन ॥ संग्रहीत अससी कीं ॥ ६९ ॥ पडलें खचलें जेथें जेथें ॥ तात्काळ स-

१ वाजपेय आणि पुंडरीक हे यज्ञ भेद आहेत. २ सनदां प्रमाणें. ३ विश्वासू. ४ लढण्याच्या प्रसंगी उपयोगी पडणारीं यंत्रे.

रिसें करिती तेथें ॥ ऐसे शिल्पीकार भृत्य ॥ वेतन-भोक्ते असती कं
॥ ७० ॥ पशु पीडती पर्जन्यें ॥ गळती गाईचीं गोठणें ॥ वोढाळ चरत
शाली-वनें ॥ ऐसें होत नाहीं कीं ॥ ७१ ॥ मठ वापिका देवा-गार
भंगल्या जाणोन जीर्णोद्धार ॥ दीप नैवेद्य निरंतर ॥ चालवीत असस
कीं ॥ ७२ ॥ क्षुधित-वृद्ध-दरिद्र-मेळीं ॥ पीडोनि रंड दीन दुर्बळीं ।
कर्दम-पंथें वर्षा-काळीं ॥ मार्ग चालत नाहीं कीं ॥७३॥ आपलें महत्
होईल शून्य ॥ म्हणोनि पुरोहित प्रधान ॥ श्रेष्ठ पातलिया दर्शना
विघ्न करिती ऐसें नाहीं कीं ॥ ७४ ॥ आप्तसुत्द्दां देती त्रास ॥ सं
साधू पावती क्लेश ॥ ऐसिया दुर्गुणीयाचा [1]त्रास ॥ तुज तंव झाल
नाहीं कीं ॥ ७५॥ पर्व-काळीं स्त्री-संलग्न ॥ सूर्योदयीं निद्रासंपन्न ॥ ए
कल्या पंक्तीं मिष्टान्न ॥ भक्षण घडत नाहीं कीं ॥ ७६ ॥ चहूंवर्णीं आ
पुले पुत्र ॥ विहितविद्ये अति-पवित्र॥अनालस अहोरात्र ॥ अभ्यासवीत
अससी कीं ॥ ७७ ॥ उग्र-कामी स्त्री-धन-हर्ता ॥ कुळवंताही त्यागि
ती भर्ता ॥ तैसे तूतें धरत्री-नाथा ॥ प्रजाहीं त्यागिलें नाहीं कीं ॥ ७८॥
याचक त्यागिती पतितातें ॥ कुळें [2]वाळिती जातिभ्रष्टातें ॥ तेवीं सर्व
लोकीं तूं तें ॥ उपेक्षिलें नाहीं कीं ॥ ७९ ॥ सहस्र मूर्खांतें दवडून ॥
एक पंडित ज्ञान-संपन्न ॥ संग्रहूनि त्याचें मन ॥ स्वस्थ ऐसें करिसी
कीं ॥ ८० ॥ एका दुष्टाची संगती ॥ यश-लाभ सुख-संपत्ती ॥ नासूनि
भोगवी अपकीर्ती ॥ ऐसें जाणत अससी कीं ॥ ८१ ॥ आढ्य व्यसनी
अनुरक्त ॥ मित्र उदासीन शत्रु अमात्य ॥ या सातांचें [3]चित्ताकर्षित॥
जाणसी कीं सुजाणा ॥ ८२ ॥ तुवां अथवा तत्रप्रधानीं ॥ रहस्य बो-
लिजे एकांत स्थानीं ॥ तें बाहेर लोकांचे कर्णीं ॥ प्रगट होत नाहीं
कीं ॥ ८३ ॥ दुष्ट बळिष्ठ आज्ञारहित ॥ तदर्थीं अपायविचार गुप्त ॥
प्रगटल्या नाश करिती बहुत ॥ हें तंत्र जाणत अससी कीं ॥ ८४ ॥
एक उघड बोलिजे जनीं ॥ एक पेरिजे महंत-कर्णीं ॥ एक ठेविजे
मनींचे मनीं ॥ हें जाणत आहेस कीं ॥ ८५ ॥ वैरिवर्गाचें वर्त्तन ॥
क्षणक्षणा व्हावया ज्ञान॥गुप्त ठेवून चार-गण॥विचारीत अससी कीं॥८६
तुजसीं दाऊनि आप्तता॥शत्रुसी पाववितो वार्ता॥ ऐसे कोण ते तत्त्वतां॥
वोळखोनि अससी कीं ॥ ८७ ॥ वार्ता आणिती वार्तिक ॥ ते नेणती

१ कुलीन स्त्रियाही. २ वाळींत टाकतात. ३ चित्तांत आणलेलें.

एका एक ॥ नित्यनित्य अनोळख ॥ भेरिसी कीं सुजाणा ॥ ८८ ॥ बहुत लाभे स्वल्पयत्नीं ॥ तेथें आलस्य नसे कीं मनीं ॥ स्वल्प लाभ बहुत हानी ॥ तेथें उद्योग नसे कीं ॥ ८९॥ राज्य रक्षिती झुंझार बळी॥ संपूर्ण अथवा नियम काळीं ॥ वेतन पावोनि तुझ्या दळीं ॥ एक चित्तें असती कीं ॥ ९० ॥ ज्याचेनि कार्य-साधन पुढें ॥ ते प्रावतां वेतन-पीडे ॥ समयीं महाअनर्थ घडे ॥ हें जाणसी कीं नरेंद्रा ॥ ९१ ॥ अर्थ-संग्रह पाहोनि जोडीं ॥ चतुर्थांश वेतनें दवडीं ॥ सकळ वेंचूनि हस्त झाडी ॥ हे तुज खोडी नाहीं कीं ॥ ९२ ॥ अर्थ-व्ययाचे अधिकारी ॥ गणक लेखक प्रथम-प्रहरीं ॥ सिद्ध-पत्रें धरूनि करीं ॥ उभे सन्मुख असती कीं ॥९३॥ आरूढलीया भद्रासनीं ॥ राज-दर्शना येंइजे जनीं ॥ टिळा-माळा-वस्त्रा-भरणीं ॥ देखसी कीं साजिरें॥९४ ॥रक्तां-बरो खड्ग-धार ॥किरीट-कुंडली साळंकार ॥ सुत्द्द-क्षत्रियांचे भार ॥ उभय-भागीं असती कीं ॥ ९५ ॥ श्रेष्ठ-सत्पात्रीं वोपितां दान ॥ योगियां विशेष अर्पितां धन ॥ दुष्ट पुरोहित प्रधान ॥ विघ्न-कर्ते नसती कीं ॥९६॥ नगर रक्षावयाकारणें ॥ कीजेत ग्रामाचीं पट्टणें ॥ घोष घोष ग्राम-तुल्य करणें ॥ ऐसें करीत असती कीं ॥ ९७ ॥ पर्वतसंधी घांट बेटा ॥ वोस रानें पाहोनि चोखटा ॥ तेथें वसवूनियां पेटा ॥ मार्ग मुक्त करिसी कीं ॥ ९८ ॥ नापेक्षितां मेघजळें ॥ सर्वदां पिकें पिकती सकळें ॥ अभंग तडागें पाटस्थळें ॥ पैं निर्मळ असतीं कीं ॥ ९९ ॥ कृषीवलें खंगलीं भणंगें ॥ धन-धान्य ओपूनि अंगें ॥ शेतानि राजभागें ॥ पाळिशी कीं नरेंद्रा ॥१०० ॥ लुब्ध तस्कर लेखन-कारी ॥ राजस्त्रिया राजकुमरी ॥ प्रजालागीं बळात्कारीं ॥ पीडित नाहींत कीं ॥ १ ॥ हिंसक आततायी[1] सिंध ॥ त्यांचा श्रवणीं पडतां शब्द॥ आधीं करूनियां वध॥ मग विचार करिसी कीं ॥ २ ॥ उदर-पीडेचिया महा-मारीं ॥ उत्तमें ही करितां चोरी[2]॥धरूनि आणितां राज-हेरीं ॥ मानें मुक्त करिसी कीं ॥ ॥ ३ ॥ उगाणितां[3] पर-राजातें ॥ जे जे वस्तु लाधली ज्यातें ॥ ते ते मुक्त[4] करोनि त्यातें ॥ तोषवीत असती कीं ॥ ४ ॥ औषधनेम शरीरातें॥

१ अविचारानें दुसऱ्याचा प्राण घेण्यास तयार किंवा प्राण घेणारा. २ चेटकी. ३ जिंकितां. ४ बक्षीस; माफ.

तेथें जाउनि खेळे तन्निकट प्रथम त-त्पदां नमुनी ॥ २८ ॥
होती करीत कंदुक-केली मधुर-गान-मोहिनी तीतें ॥
स्पर्शे प्रथम वसन-हर पवन मग त्यजुनि तोहि नीतीतें ॥ २९ ॥
झाली गाधि-ज-संगें हे कन्या मालिनी-तटीं ठेवी ॥
स्वर्गासि जाय तेथुनि बहु निष्ठुर चित्त करुनि ते देवी ॥ ३० ॥
संरक्षिली वनीं मधु पाजुनि माते विना शकुंतांनीं ॥
असतां विधि-कवच नव्हे कालाच्या ही विनाश कुंतांनीं ॥ ३१ ॥
स्नाना-र्थ मालिनीतें गेलों तों कळविलें हिच्या रुदनें ॥
आणुनि उटजीं केलें म्यां लालन पालन स्वयें मुदितें ॥ ३२ ॥
झाले शकुंत पालक म्हणुनि असे इज शकुंतला नाम ॥
टेवुनि वागविलें हें रत्न गळां जेंवि मालती-दाम ॥ ३३ ॥
ऐसी तात-मुखें श्रुत निज-जन्म-कथा शकुंतला कळवी ॥
पळ वि-स्मित करुनि नृ-पति-मानिची म्वा-लभ्यता-व्यथा पळवी ॥ ३४
नृ-पति म्हणे तरि सुंदरि सु-दांत मुद-तिशय तुला मला हि घडो ॥
स-त्कृतिशीं रसिकाची तुजसीं माझी तशीच गांठ पडो ॥ ३५ ॥
कुळ-शीळ-गुणांहीं तूं योग्या नृ-प-कन्यका महो-दार ॥
घे राज्य सर्व नाहीं त्वद-धिक मज अन्य काम हो दार ॥ ३६ ॥
हांसुनि तीहि म्हणे हो मार्थावें प्रणत-पारि-जातातें ॥
देवा स्वयें वहावें या निज-कारुण्य-वारि-जातातें ॥ ३७ ॥
मज करवीं न तुम्ही बुध गुरु-मर्यादा-तिपात करवा हो ॥
स-त्पात्रीं स्व-धनातें चिंतामणि-कण्व-तात-कर वाहो ॥ ३८ ॥
अन्या धन्या कन्या अन्याय न्याय जाणत्या मागें ॥
गांधर्वेंचि वरातें भजल्या तद्गुरु हि न भरले रागें ॥ ३९ ॥

---

१ वस्त्र उडवून नंतर. २ विश्वामित्र ही. ३ मेनका. ४ आपल्या अप्राप्यतेचे दुःख. ही ऋषिकन्या असेल तर आपणांस वरणार नाहीं अशी चिंता राजाच्या मनांत होती; ती चिंता, ही विश्वामित्र राजाची कन्या आहे असें समजतांच दूर झाली. ५ आनंदाचा अतिशय म्ह० भर. ६ उत्तम काव्याशीं. ७ नम्र झालेल्यास कल्पवृक्षा सारखा ( जो कण्व ) त्यातें. ८ आपलें ( कण्वाचें ) कारुण्य हेंच वारि म्ह० उदक, त्या पासून झालेलें—कमल, तद्रूप जी मी तिला. 'बापानें आपण स्वतःमला आपणांस अर्पावें असा भावार्थ'. ९ वडिलांच्या मर्यादेचें उलंघन.

गुरु-देवता-प्रसादा हो भाजन आपुल्याचि देहातें ॥
सत्कीर्ति जगीं व्हाया सत्पात्रीं आपुल्याचि दे हातें ॥ ४० ॥
सुत युव-राज असो हा वरुनि वर निका शकुंतला आली ॥
झाली, करांत याच्या मधुप-वर-निकाश-कुंतला[1] आली ॥ ४१ ॥
तेव्हां तद्दैव म्हणे योग्य तुला न नर अन्य केलीला ॥
श्री विष्णुसीं तसी तूं यासि करी कण्व-कन्यके लीला ॥ ४२ ॥
राजा दुष्यंत म्हणे लब्ध-मनोरथ प्रियंवदे विरहा ॥
मी ही भ्याडचि, सेना पाठवितों तों असीच देवि रहा ॥ ४३ ॥
दे मज निरोप; हंसे[2] वद विस्मरिजेल काय देवि सर ॥
भिन्न दिसो एकचि वपु हें कोणासहि न काय दे विसर ॥ ४४ ॥
गेला निरोप घेउनि परि मनिं कण्वासि भूप तो भ्याला ॥
चित्तीं ह्मणे अहा मुनि शापिल मज परम विषय-लोभ्याला ॥ ४५॥
आला कण्व मुहूर्तें फळ-पुष्प-समि-त्कुशांसि आणूनी ॥
झाला प्रसन्न भगवान् दिव्य-ज्ञानेंकरूनि जाणूनी ॥ ४६ ॥
कण्व ह्मणे वत्से त्वां केला निश्चित आजि तात-कर[3] ॥
न धर्मी संकोच. नव्हे गांधर्व विधि स्व-धर्म-घात-कर ॥ ४७ ॥
तुज सुत होईल भला निववील यशोमृतें कुलीन-मनें ॥
त्यासि मदा-शीर्वादें करितील समस्त नृप मुली[4] नमनें ॥ ४८ ॥
तातातें नमुनि ह्मणे म्यां दुष्यंतासि वाहिलें काय ॥
भवदा-श्रमीं अतिथिचें नव्हतां प्रिय उचित राहिलें काय ॥ ४९ ॥
त्यावरि कृपा करावी द्या हा वर योग्य होय कन्या या ॥
कण्व ह्मणे हेंहि दिल्हें कां भीसी न करुनीहि अ-न्याया[5] ॥ ५० ॥
झाला शकुंतलेला सुत सु-तपा त्यासि कण्व परिपाळी ॥
गृह-धर्माची कुतुकें दे तो भगवान् विरक्त परि पाळी ॥ ५१ ॥
भरवी मृगार्भकां मग तो भरवी कां न नातवा[6] घांस ॥
झाला असा शिशुपणीं बद्ध करी काननांत वाघांस ॥ ५२ ॥
तो आश्रम-वृक्षांसी शार्दूल-वराह-हस्ति-हरि-सेना ॥
बांधी सा वर्षांचा, शिकवी कण्वो-क्त युक्त परिसेना ॥ ५३ ॥

१ भ्रमर श्रेष्ठा सारखे (कृष्णवर्ण) आहेत केश जीचे अशी. २ ह्या वराला. ३ प्रपंचांतील कृत्याची. ४ मुलीच्या मुलाला. ५ कण्वाचें वचन. ६ बरें—योग्य.

सर्वदमन त्यासि म्हणति करिति सदा सु-वर-वृष्टि जलद मुनी ॥
निरुपम-यश मजाला हा सुख देईल सर्व खल दमुनी ॥ ५४ ॥
कण्व म्हणे मुलि झाला राज्यो-चित सुत मलाहि लाभ वनीं ॥
जा पति-गृहासि शोभे स्त्री-जन पतिच्याचि राहता भवनीं ॥ ५५ ॥
राज्य-सुख पहा, पतिची सेवा करिं, मज उदास मुलि न मनीं ॥
पति-सह वृद्धपणीं ये जरि हें वन-सिंधु-नीर-पुलिन मनीं ॥ ५६ ॥
आज्ञापिले स्व-शिष्य स्व-सुता नेत्रें पुसोनि पाठविली ॥
साश्रु मुनि-जनीं कण्वें शतवार तदीय भक्ति आठविली ॥ ५७ ॥
दुष्यंत-सद्म-पद्मीं ते स्त्री श्री कण्व-भानु-शिष्य-करीं ॥
नेली पुत्र-सुगंधा सह धर्म-नयां-बु-पूर्ण-नगर-सरीं ॥ ५८ ॥
पतिला म्हणे मुनि-सुता द्यावें पुत्रासि यौवराज्य नृपा ॥
स्मृति आहे कीं केली पूर्वी जी काश्यपा-श्रमांत कृपा ॥ ५९ ॥
राजा म्हणे कवण तूं कोणाचा पुत्र काय गे वदसी ॥
काच स्मृतिरपि तापसि मैवं प्रलपात्र भूभुजः सदसि ॥ ६० ॥
साध्वी म्हणे अहो नय-धर्म-ज्ञ तुम्ही नरेंद्र पौरव कीं ॥
वदतां असें कसें हो करितां विश्वास-घात गौरव कीं ॥ ६१ ॥
मृगयेचिये प्रसंगीं हरिणामागें वनांत लागोनी ॥
आलांसि मालिनीच्या तीरीं कण्वा-श्रमासि भागोनी ॥ ६२ ॥
सिद्धा-श्रमांत नव्हता तात, तुला म्यांच पूजिलें वन्यें ॥
जागें काय करावें निपट कपट-निद्रिता जना अन्यें ॥ ६३ ॥
मज्जन्म-वृत्त पुसिलें त्वां, मग म्यां मेनका-सरा माय ॥

१ मनांत मज विषयीं तूं दुःखी होऊं नको. २ शकुंतलेची. ३ " कण्व हाच भानु ( सूर्य ) त्याचे शिष्य हेच कर ( किरण ) त्यांनीं ते स्त्री ( शकुंतला ) हीच श्री ( लक्ष्मी ), पुत्र हाच सुगंध त्यासह, धर्म आणि नय ( नीति ) हेंच अंबु ( उदक ) ह्यानें पूर्ण ( भरलेलें ) तें नगर हेंच सर ( सरोवर ) त्यामध्यें, दुष्यंताचें सद्म ( घर ) हेंच पद्म त्यावर नेली "= सूर्याचे किरण जसे शोभला सुगंधा सह सरोवरांतील कमळावर नेतात, त्याप्रमाणें कण्वशिष्यांनीं ती शकुंतला पुत्रासह नगरांत दुष्यंत--गृहास नेली. ४ युवराजाचा अधिकार. ५ ( का च स्मृतिः अपि तापसि मा एवं प्रलप अत्र भूभुजः सदसि ) = हे ऋषिकन्ये, स्मरण कसलें ! ह्या राजाच्या सभेंत ( तूं ) अशी बडबड करूं नकोस. ६ केवळ निद्रेंच ज्यानें सोंग घेतलें आहे अशास.

कौशिक बाप असें तुज कथिलें तें विसरलासि तूं काय ॥ ६४ ॥
सुत-यौवराज्य- वर मज देउनि गांधर्व विधि करोनि मला ॥
वरुनि न जाणें म्हणसी पूरु-कुळीं तूंचि सु-ज्ञ साधु भला ॥ ६५॥
स्त्रीस म्हणति जाया, सुत-रूपें पति तदुदरांत जन्मति, तें ॥
श्रुति-वचन असावें तुज ठावें, परि मान्य होय सन्मतितें ॥ ६६ ॥
मी जाया सत्कार्या आत्माचि तुझा कुमार हा राया ॥
झाला मांत, परि गळां न धरिशि अद्यापि रत्न-हारा या ॥ ६७ ॥
भूप ह्मणे भग्न-व्रत तात तुझा माय ही तुझी अ-सती ॥
नसतीस तत्सुता तूं, लज्जा कांहीं तरी तुला असती ॥ ६८ ॥
सा वर्षांचा ह्मणसी, इतुक्यांतचि येवढा कसा गे हा ॥
स्वीकारुनि तुज लावूं डाग कसा मृढलोकसा गेहा ॥ ६९ ॥
साध्वी ह्मणे मिळविलें ज्ञान-तपः-कीर्ति-भाग्य मत्तातें ॥
केंचें तुझ्या कपाळीं नीचा अति-तुच्छ-भाग्य-मत्ता तें ॥ ७०॥
जी ब्रह्म-योनि देवी मन्माता मेनका सुरास मता ॥
नीचा तुझीच माता करिल सुधेची कसी सुरा समता ॥ ७१ ॥
जरि मुख्य-सत्य-धर्म-च्युत आपण विश्व-निंद्य जन नीचा ॥
निंदिसि कसें पदातें मत्ताताच्या मदीय-जननीचा ॥ ७२ ॥
पौरव-रौरव-गौरव-कर्ता भर्ता भला मला गमसी ॥
सम-शील-बुद्धि होउनि नीतीनें आज बोलुं लाग मसीं ॥ ७३ ॥
बहुधा तुझें कपाळ न साहे सुत-रत्न-सन्निधानातें ॥
हत-भाग्य न घे देतां दारुनि आणूनि सन्निधानातें ॥ ७४ ॥
क्षिति-पति मत्सुतचि असो तेजाचा मूर्तिमंत हा निकर ॥
हा निकर मांडिला तूं देशील कर स्व-कीर्ति-हानि-कर ॥ ७५ ॥
ऐसें वदोनि उठली जाया तों जाहली नभो-वाणी ॥

१ पति सुतरूपानें जीमध्यें उत्पन्न होतो ती 'जाया'. २ वेदवाक्य. ३ सत्कार करण्यास योग्य. ४ मोडलें आहे व्रत ज्याचें असा. ५ ज्ञान, तप, आणि कीर्ति हेंच ऐश्वर्य. ६ माझ्या बापानें. ७ ब्रम्हदेवापासून उत्पन्न झालेली. ८ आपल्या कुळाला रौरव नांवाच्या नरकांत पाडणारा. ९ ( सर्वांविषयीं ) समान आहे वर्तन आणि बुद्धि ज्याची असा.

दुष्यंता काय करिसि समजावीं आपुली सती राणी ॥ ७६ ॥
त्वां हे विधिनें वरिली, या साध्वीचें विशुद्ध जनु रागें ॥
पुर-राष्ट्र भस्म न करो, समजावीं सुतवतीस अनुरागें ॥ ७७ ॥
पुत्राचें भरण करीं भाग्यें तुज लाधला भर तयातें ॥
ह्मणतील आजपासुनि भुवनीं जन सर्वही भरत यातें ॥ ७८ ॥
स्व-कुळ-पुरोहित ऋत्विक् मंत्री आचार्य साधु जे होते ॥
राजा ह्मणे परिसिलें ह्मणती सारेचि एकदा 'हां' ते ॥ ७९ ॥
म-त्सुत म-द्वनिता हे मी जाणें परि जनासि कळवाया ॥
ऐसें निष्ठुर वदलों तुमची शंका अ-शेष पळवाया ॥ ८० ॥
कळवुनि असें समस्तां त्वरयीं स-प्रेम-बाष्प-भर तातें ॥
आलिंगिलें गुरु- सुत्द्त्-सचिवानुमतेंकरूनि भरतातें ॥ ८१ ॥
कण्व-सुतेसि ह्मणे नृप दयिते साध्वि क्षमा करीं भीरु ॥
त्वत्क्षोभा भ्याला सति हा जन बहु पावका जसा भीरु ॥ ८२ ॥
अ-सकृद्विरह-द ताप-द परि मित्रीं सु-मुखि काय भीरु सती ॥
दयिते नलिनी न धरूनि चित्तीं स्व-प्रेम-भंग-भी रुसती? ॥ ८३ ॥
माझी कीर्ति श्री तूं बोलाया वद न कोरडें जा ये ॥
तत्कंठ कां न दाटे येऊं देऊं नको रडें जाये ॥ ८४ ॥
वदलों शु-ध्यर्थ असें भीतों बहु मानसांत डागातें ॥
निंदिल हंस-वर कसा मधु-रस सेवूनिया तडागातें ॥ ८५ ॥
स्त्री सुखवुनि दुष्यंतें गुरु-सेवा-पुण्य-कीर्ति-लाभ-रत ॥
युव-राज पुत्र केला कविनीं तो सु-बहु कीर्तिला भरत ॥ ८६ ॥
अमृत -मतिम चरित्र प्राशावें श्रवण करूनि आर्यांनीं ॥
गाईल राम-करुणा-घन-भक्त मयूर तींच आर्यांनीं ॥ ८७ ॥

---

१ पोषण कर. २ आनंदाश्रूंच्या पूरासहित. ३ वारंवार वियोग--दुःख देणारा. सूर्या विषयीं. ५ आपल्या वरील प्रीति उडून जाण्याचें भय. असकृद्विरहद तापद (आहे) परि मित्रीं, हे दयिते, सुमुखि, भीरु, सति, नलिनी, चित्तीं स्वप्रेम भंगभी धरूनि रुसती काय? न (नाहीं रुसत) असा अन्वय. ६ माझी कीर्ति, श्री तूं (आहेस); जा (ज्याला) कोरडें (बरकरणीं) बोलाया नये तत्कंठ कां न दाटे? वद (सांग); (हे) जाय रडें येऊं देऊं नको. (हा-अन्वय). ७शुद्धीकरितां—' ह्यानें भलत्याचीच स्त्री वरिली,' असा अपवाद मजवर न यावा म्हणून. ८ बासाणिला.

## सभापर्वांतील द्रौपदीवस्त्रहरण.

पांडवांचें ऐश्वर्य फार वाढलें हें दुर्योधनास सहन न होऊन, त्यानें धृतराष्ट्राच्या अनुमतानें कपटद्यूतांत त्यांचें सर्वस्वहरण करण्याचा संकेत करून त्यांस हस्तिनापुरांत आणविलें, आणि कपटानें त्यांस पणांत द्रौपदी व राज्य ह्यांसह जिंकिलें. मग द्रौपदीस सभेंत आणून तिला नग्न करून तिची विटंबना करणार, इतक्यांत गुप्तरूपें परमेश्वर जो कृष्ण त्यानें तिला वस्त्रें पुरवून तिची अब्रू राखिली, हें ह्या आख्यानांत आहे.

दुसरे दिवशीं नेले [१]पांडु-सुत नव्या सभेंत बाहून ॥
शकुनि ह्मणे खेळों या धर्म ह्मणे अधिक काय याहून ॥ १ ॥
भीष्म द्रोण विदुर कृप धृतराष्ट्र स-कर्ण जे शत भ्राते ॥
[२]खळ होते साधूंचा करणार बळें सभेंत बभ्रा ते ॥ २ ॥
कपट-द्यूतीं लावी प्रथमचि तो साधु[३]-गीत-कथ रथ रे ॥
तो शकुनि ह्मणे जितला तें थोड्यांचेंचि चित्त न थरथरे ॥ ३ ॥
मग धर्म लक्ष दासी पण मांडी जिंकिला ह्मणे शकुनी ॥
कपटें जिंकू पाहे हंसाला जेंवि दुष्ट बक-शकुनी ॥ ४ ॥
धर्म ह्मणे छळ करिशी मर्यादा त्यजुनि ढाळिशी फांसे ॥
शकुने त्यजितां धर्म-व्यवहार-पथासि स-त्सभा हांसे ॥ ५ ॥
मणि-हार दास दासी रथ हय गज कनक-निधिहि तो लावी ॥
जिंकी कपटी जी श्री श्री-दश्रीशीं वि-शंक तोलावी ॥ ६ ॥
कपट-द्यूत विलोकुनि विदुर ह्मणे काय हें अगा रा[४]या ॥
कां भ्रमलासि स्व-करें अग्नि कसा लाविशी अगारा या ॥ ७ ॥

---

१ हा गांधार देशाचा राजा, दुर्योधनाचा मामा, व कपट-द्यूतांत फार निपुण होता. २ ह्या आर्येंत 'खळ' व 'साधूंचा बळें सभेंत बभ्रा करणार' ह्यांचा संबंध भीष्म, द्रोण, विदुर व कृप ह्यांकडे लावावयाचा नाहीं, कारण कीं ते सज्जन असून त्या सभेंत धृतराष्ट्रा बरोबर निरुपायास्तव आले होते. असें, सभापर्व, अ. ६० श्लोक २ ह्या वरून स्पष्ट होतें.

"भीष्मो द्रोणः कृपश्चैव विदुरश्च महामतिः ॥
नातिप्रीतेन मनसा तेऽन्ववर्तंत भारत" ॥

३ साधूंनी गाइल्या आहेत कथा ज्याच्या, असा ( धर्मराज ) ४ हे धृतराष्ट्रा.

मद्वाक्य तुला न रुचे  मरणारा अगदसें अगा बापा ॥
पुत्र कसें ह्मणसी या  नरकीं नेत्या स-विग्रहां[1] पापा ॥ ८ ॥
देवोनि काक घ्यावे  पांच तुवां चित्र-बर्ह शिति-कंठ ॥
घे पंचानन पांच  क्रोष्टा[2] दे; मानवेल शिति-कंठ ॥ ९ ॥
राया कुळार्थ पुरुष, ग्रामार्थ कुळहि समस्त, सोडावें ॥
ग्रामहि देशार्थ, मही  आत्मार्थ, बुधें भलेंचि जोडावें ॥ १० ॥
शकुनि कु-नीति-ज्ञ कुमति  येथुनि आतांचि या खळा दवडा ॥
हा न भला, बुडवाया  शिरला या राज-मंदिरीं कवडा ॥ ११ ॥
इत्यादि विदुर बोले  हें ऐकुनिही अचक्षु त्या[3] न वळे ॥
दुर्योधन-पंचाक्षरि-मंत्रें परमोग्र भूतसा खवळे ॥ १२ ॥
जनकाहूनि परम हित,  पर मँ[4]हित, ज्ञान-सिंधु जो त्यातें ॥
धिक्कारी उडवी त्या  स्व-शिव[5]-गृहाधारभूत जो त्यातें ॥ १३ ॥
अस्मदहित[6]-हित इच्छिसि  लाविसि आम्हां दहांत बालिशता ॥
वाचाळ कृत-घ्न कुटिल  भरत-कुळीं तूंचि पात्र गालि-शता ॥१४॥
तुज काय राज-नीति-ज्ञान अरे साप दुखविला साचा ॥
मृत्यु तसाचि सपत्नहि  कैसा मग लाभ सुखविलासाचा ॥ १५ ॥
जों मृदु लागे तों तों  दडपी शिशु फार ऊन भातातें ॥
तैसें न करावें त्वां  न बसावें हारवून मा[9] तातें ॥ १६ ॥
हित-शत्रु[7] निकट न बरा  जा त्यांप्रति दयित जे तुला असती ॥
टाकुनि जातीच बहु  प्रेमें जरि सतत सांत्विली अ-सती[8] ॥ १७ ॥
शकुनि म्हणे धर्मा त्वां  हारविलें धन समस्त कीं आहे ॥
या वचनासि न पुच्छीं  दत्त-पदाला भुजंगसा साहे ॥ १८ ॥
सुत बंधुहि हारविले  उरलें धन काय गा पणास हित ॥
धर्म म्हणे मी द्यूतीं  बुडविन सर्व-स्व आपणासहित ॥ १९ ॥
धर्मासहि जिंकी खळ  कपटजयें परम अक्षमहि मोतें ॥
जे व्यसन टाकणारे  बुध हा ऐकोत अक्षमहिमा[10] ते ॥ २० ॥

---

१ मूर्तिमान्, अशा. २ दुर्योधन हाच कोल्हा. ३ ही गोष्ट देवाला आवडेल हें तात्पर्य. ४ अत्यंत पूज्य. ५ आपलें कल्याण हेंच गृह त्याला आधारभूत. ६ आमच्या शत्रूंचें कल्याण. ७ हित होऊं न देणारा अनिष्टचिंतक. ८ जारिणी स्त्री. ९ मजला. १० फाशांचा महिमा ( फांसे खेळण्याचा परिणाम ).

शकुनि म्हणे चुकलासि ग्लहयोग्य हि संग्रहीं असोनि धन ॥
जिंकूनि घेतलें कां; समयीं चुकणें नसो असो निधन ॥ २१ ॥
घे आपणासि राया सोडवुनी द्रौपदीस लाव कसा ॥
स्त्रीचा कैवारी नृप धन्य, स्त्रीचा सदैव लावक सा[1] ॥ २२ ॥
धर्म म्हणे शकुने जी रूपें शीलें क्षमागुणें महिला ॥
साजे सखी, अखिन्ना कृत्यभरें, सुमति आमुची महिला ॥ २३ ॥
शर-दुत्पल-पत्राक्षी[2] शर-दुत्पल-पुण्य-गंध-सम-गंधा ॥
अ-स्खलित चालवी गृह-धर्मीं मज यष्टि पथीं जसी अंधा ॥ २४॥
आधीं जिणें उठावें पाहुनि निजलीं असें मग निजावें ॥
रागें[3] जिणें सु-दुर्मिळ तेंहि जिचें ज्वाळसें गगनि जावें ॥ २५ ॥
धौम्यापासुनि गोपांपर्यंत जिणें स्वयें समाचार ॥
घ्यांवा श्रित-ताप-हर[4] श्री-गंगेचा जिचा समाचार ॥ २६ ॥
ती देवी आतां म्यां या द्यूतीं लाविली अहाहा रे ॥
छळिशी द्यूतींच कसा हारे[5] अन्यत्र कांन हा हारे ॥ २७ ॥
धर्म नय-ज्ञो-त्तम जो द्यूतीं स्व-कलत्र-रत्न तो लावी ॥
हांसे जितं[6] म्हणे खळ कविहो ती गोष्ट काय बोलावी ॥ २८ ॥
धिग् धिग् सभ्यजन म्हणे, विदुर अधो-वदन बैसला उगला, ॥
भीष्म-द्रोण म्हणति हा[7], भाच्यांसह शकुनि जय-सुखें फुगला २९
किंजितमिह[8] किंजितमिह ऐसें अ-सकृत् पुसे अ-चक्षु रसें[9] ॥
रडले सभ्य तयांच्या ह्रदयीं तें लागलें वच क्षुरसें ॥ ३० ॥

---

१ स्त्रीचा ( कैवारी नृप ) लावकसा—लावा पक्ष्या सारखा ( होय ), हा पक्षी आपल्या मादीविषयीं फार लंपट असतो असा समज आहे. तात्पर्य—तूं आपला व संपत्तीचा नाश करून स्त्रीचें रक्षण केलें म्हणून तूं स्त्रीलंपट आहेस. २ शरत्काळच्या कमलपत्राप्रमाणें जीचे डोळे आहेत अशी. ३ ती आधीं कधीं रागावयाची नाहीं, रागावलीच तर तिचा राग अग्नीज्वालेप्रमाणें आकाशांत ( वरल्यावर ) तत्काळ निघून जातो; म्ह० त्यापासून कोणास पीडा होत नाहीं हें तात्पर्य. ४ आश्रितांचें दुःख घालविणारा, हें समाचार ( सारखें आचरण ) ह्याचें विशेषण. ५ हा ( मी धर्म ) दुसऱ्या कोणत्याही गोष्टींत न हारे ( पराभव पावत नाहीं ) आणि द्यूतांतच कसा हारे ( पराभव पावतो ) ? ह्यावरून तूं कपटानें मला छळतो आहेस. ६ जिंकिलें. ७ हाय हाय. ८ किं ( काय ), जितं ( जिंकिलें ), इह ( ह्याडावांत ). ह्याडावांत काय. जिंकिलें ? ९ आवडीनें.

सखि-हस्तीं[1] हस्त न वृष पांडव-त्दृदयांत सायका मारी ॥
क्रोधातें भीम गिळी गरळातें जेंवि काय.कामा-री ॥ ३१ ॥
अंध-सुत म्हणे विदुरा कृष्णा दासी सभेसि आणावी ॥
गृह-सं-मार्जन करणें ही सेवा तीस योग्य जाणावी ॥ ३२ ॥
विदुर म्हणे शस्त्र वधी गिळितां तत्काळ बोकडाला, हें ॥
तैसेंच कर्म करिशी रे मंदा मृत्यु रोकडा लाहें ॥ ३३ ॥
हरिच्या पुनः पुन्हा कां काड्या नाकांत घालिशी शशका ॥
यश काय पक्षि-पतिचें येइल हे चार करुनि तुज मशका ॥३४॥
ब्रूयात् क्षमी गभीरोसीति[2] बत युधि-ष्ठिरं प्रभुं को न ॥
निज नीचपण प्रकटिशि तूं श्वान भल्या बरी हि भुंकोन ॥३५॥
पांडव किमपि न वदती तूं वदसि सभेंत शब्द घाणेरे ॥
हे सकळ खळ-तिळांचें रगडुनि करणार पिष्ट घाणे रे ॥ ३६ ॥
दुर्योधन हित कथितां धिक्कार तुला असो असेंच वदे ॥
ज्वरिता जसें स-सित पय, सद्वचन न दुर्जना तसें चव दे ॥३७॥
कल्यंश[3], खळ-शिरो-मणि, कपट-पटु, कटु-स्वभाव, सद्वेषी ॥
तो प्रातिकामि-नामक सूतातें द्रौपदीप्रति प्रेषी ॥ ३८ ॥
सूता जा कृष्णेला घेउनि ये भय नसे तुला लेश ॥
सर्व-ज्ञ न किंचिज्ज्ञ क्षत्ता, ब्रम्हा नव्हे कुलाले[4]-श ॥ ३९ ॥
बहु कातर विदुर सदा वटवट करितो असीच हा नीच ॥
या खोट्याला गमते जी अस्मद्वृद्धि[5] ती स्व-हानीच ॥ ४० ॥
जाउनि तो सूत म्हणे कृष्णे द्यूतांत तूं स्वयें धर्मे ॥
हारविलीस सुयोधन-सदनाप्रति ये करावया कर्में[6] ॥ ४१ ॥
हेंवाक्य त्या सतीतें बहु दुःसह जेंवि वज्र कदलीतें ॥
परि परिसावें धैर्ये त्याशीं जें ती सु-बुद्धि वदली तें ॥ ४२ ॥
सूता काय वदसि हें द्यूतीं हारविति संपदेतें गा ॥

१ मित्र जो दुर्योधन त्याच्या हातावर. २ ( ब्रूयात् क्षमी गभीरः असि इति बत युधिष्ठिरं प्रभुं कः न )=तूं क्षमाशील. गंभीर आहेस असें कोण बरें धर्मराजास ह्मणणार नाही ? ३ कलीचा अवतार. ( दुर्योधन ) ४ कुंभारांतला श्रेष्ठ. हाबीं तशीं मडकीं घडतो, ह्मणून तो सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाची सर पावेल काय ! तसा अल्पस्वल्प जाणतो ह्मणून विदुर सर्वज्ञ समजूंनये. ५ आमचा उत्कर्ष. ६ काम धंदा.

श्री ह्मण, न स्त्री ह्मण, हें त्वद्वचन मनासि कंप देतें गा ४३ ॥
सूत ह्मणे आर्या श्री मग सात्मज बंधु-मंडळी धर्में ॥
हारविली निज मूर्ति द्यूतीं स्त्री शेवटीं अ-सत्कर्में ॥ ४४ ॥
राज्ञी ह्मणे तरि अगा जा पूस सभेंत तूं असें आर्यों ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या ॥ ४५ ॥
सूत सभेंत विचारी धर्मातें कीं असें पुसे आर्या ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या ॥ ४६ ॥
धर्म न कांहींच वदे तों दुर्योधन ह्मणे सभेस तिनें ॥
यावें स्वयें पुसावें, जें पुसणें योजिलें तिच्या मतिनें ॥ ४७ ॥
कृष्णेप्रति सूत ह्मणे देवि न कांहींच धर्म वदला गे ॥
जाणों, सभासदांसहि कठिन त्व-त्प्रश्न-वाक्य-पद लागे ॥ ४८ ॥
पुनरपि सभेंत जाउनि सूत ह्मणे सभ्यहो तुह्मांस सती ॥
द्यूतांत मी जिता कीं अजिता ऐसें मदाननें पुसती ॥ ४९ ॥
दुर्जन-दुराग्रहाचे ज्ञाते सभ्यहि न पाहती च वर ॥
तेथें उत्तर कैचें? नचलेसें न वदती कवि-प्रवर ॥ ५० ॥
कोपे ह्मणे सुयोधन, भीतो भीमासि सूत हा भितरा ॥
दुःशासना स्वयें जा आण तिला कर्म हें नव्हे इतरा ॥ ५१ ॥
तो हरिणी-हरणार्थी अत्युग्र-प्रकृति लांडगासा च ॥
गेला तेंचि कराया दुःशासन दुष्ट दांडगा साच ॥ ५२ ॥
कृष्णेसि ह्मणे चाल द्यूतीं तुज जिंकिलें भज कुरूतें ॥
कुरु-पतिस पहा लज्जा त्यज सेवावें सुखें शत-गुरूतें ॥ ५३ ॥
त्या दुष्टोक्ति-श्रवणें धर्माची संकटीं पडे जाया ॥
सं-रक्षणार्थ धांवे धृतराष्ट्राच्या स्त्रियां कडे जाया ॥ ५४ ॥
पळतां धांवोनि तिला त्या केशांतें धरूनि आकर्षी ॥
ज्यां राजसूय-यज्ञीं अभिषेचिति बहु महर्षि नाकर्षी ॥ ५५ ॥
कृष्णा ह्मणे सभेंत न न्यावें मज मी रजस्वला, आंगा ॥
आच्छादन एकांबर, नेतोसि अशीस आग्रहें कां गा ॥ ५६ ॥

१ श्री ( संपत्ति ) हारविली असें ह्मण, स्त्री हारविली असें ह्मणूं नको. २तुझ्या प्रश्नाच्या वाक्यांतील प्रत्येक शब्द. ३ माझ्या तोंडानें. ४ दुर्जन जो दुर्योधन त्याच्या ( द्रौपदीला आणण्याबद्दल ) दुराग्रहाला जाणणारे भीष्मादिक सभासद. ५ शंभर भावांहून वडील जो दुर्योधन त्यातें.

दुष्ट म्हणे स्व-सभेला तुजला नेतोंचि दूरशी अस कीं ॥
एकांबरा अस तुझी अंगें नग्नें असोत हीं. असंकीं ॥ ५७ ॥
देवी म्हणे अनार्या नाहींच तुझ्या मनांत पाप-दर ॥
ओढूंनको फरफरा घेऊं दे सांवरोनि हा पदर ॥ ५८ ॥
अधम म्हणे द्यूत-जिता दासी तूं लाजसी कशाला गे ॥
चाल उगीच प्रभूशीं हट करितां पाठिला कशा लागे ॥ ५९ ॥
कृष्णा म्हणे पति कसे पाहुनि हें कर्म साहतील न द्या ॥
पद सर्प-शिरीं, तुमच्या रक्ताच्या स्पष्ट वाहतील नद्या ॥ ६० ॥
गुरु-जन-सभेंत कैसा नेसी ओढूनि काय[1] हा नीचा ॥
करितोसि कर्म दुष्टा प्राप्यर्थ बळेंचि काय हानीचा ॥ ६१ ॥
धर्म परम सूक्ष्म असे धर्मात्मा धर्म-नृप नसे चुकला ॥
सावध व्हा कंठीं यम-पाश कसे घालितां अहा उकला ॥ ६२ ॥
ओढुनि सभेंत नेली तेव्हां ती द्रौपदी म्हणे कुरुची ॥
कीर्ति बुडाली हा धिक् कुरु-वृद्धांलाहि मानली कु-रुची[2] ॥ ६३ ॥
अ-न्यायाचल-भिदुरें[3] विदुरें अनवरत शुद्ध-सत्व-रतें[4] ॥
जाऊं दिलें कसें जें गेलें सोडूनि सख्य स-त्वर तें ॥ ६४ ॥
प्रेरियले भेदाया पति-धैर्य-द्विरद-कट[5] कटाक्ष तिनें ॥
प्रथम न म्हणति श्रीच्या म्हणति स्त्रीच्याचि कटकटा क्षतिनें ॥ ६५ ॥
पेटे पांडव-कोपा-नळ कृष्णा-दृष्टि होय तद्धमनी ॥
काय करितील होते निज मर्यादा[6]-गुणेंचि बद्ध मनीं ॥ ६६ ॥
दुःशासनासि म्हणती भीमा-दिक निज-मनांत हे बाळे[7] ॥
हूं सुप्त सर्पिणीतें मेली मानूनि ओढ हे बाळ[8] ॥ ६७ ॥
केश धरुनि दुःशासन तीस बळें फिरफिरोनि दे हिसके ॥
भावि-तमः प्रशमीं न क्षमही होऊन तेज देहिं[9] सके ॥ ६८ ॥
दासी दासी ऐसें अ-सकृत् तो खळ म्हणे[10] स-हासें तितें ॥

---

१ हा ( माझा ) देह. २ वाईट गोष्टीची आवड. ३ अन्यायरूप पर्वतास केवळ वज्रासारख्या. ४ निरंतर शुद्ध सत्वगुणामध्यें रममाण म्ह० अखंड शांतवृत्तीचा, अशा; ५ आपले पति जे पांडव त्यांचें धैर्य हाच हत्ती त्याचें गंडस्थल. ६ मर्यादारूप दोरीनें. ७ हे मुला. ८ बाल, केश. ९ ( द्रौपदीच्या ) देहीं क्षम तेज होऊन ही भावितमःप्रशमीं न शके, असा अन्वय=द्रौपदीच्या आंगीं योग्य पातिव्रत्यतेज होतें, तरी अवश्य पुढें होणाऱ्या दुःखाचा उपशम करण्याविषयीं तें समर्थ झालें नाहीं. १० हांसत हांसत.

जाणो क्षमालि[1] सिकवी जें जें अरि करिल तूं सहा सति तें॥६९॥
दासी-दासो म्हणतां दुर्योधन शकुनि कर्ण मानवंती॥
हांसति खळ, सभ्य रडति दुष्टें छळितां सभेंत मानवंती॥ ७० ॥
गांगेय म्हणे सुभगे धर्म परम सूक्ष्म यास्तव स्पष्ट॥
ऐसेंचि असें मजला वदवेना हा विचार बहु कष्ट॥ ७१ ॥
वदला जितोस्मि[4] ऐसें धर्म, शकुनिनें तयावरि स्व-मतें॥
पण करविला तुझा या-वरुनि तरि न तूं जिता[5] असें गमतें ॥७२॥
द्यूतांत पर-स्वं[6]-पण स्थापाया[7] निःस्वं[8] जन नव्हे शक्त॥
स्त्रीचें भर्तृ-वशत्वहि[9] पाहोनि न मी वदों शके व्यक्त॥ ७३ ॥
कुरु-वृद्धं[10] असें बोले, उपहासें ताप ते कितव देती॥
सभ्यांसि निर्णयार्थ प्रार्थुनि पुनरपि अशंकित[11] वदे ती॥ ७४ ॥
द्युतीं अनतिनिपुण[12] नृप कितवांनीं आणिला बळेंचि कसा॥
दावुनि कर्पूर जसा घालावा लोचनीं बळें चिकसा॥ ७५ ॥
केलें तसेंचि हरिलें कपटें सर्वस्व शेवटील पणें॥
नृप जिंकिला शकुनिनें याला नरकीं च शेवटीं लपणें॥ ७६ ॥
केलें स्व-परिभवांत[13] द्यूत, पुन्हां भूप लाउ दार-पणं[14]॥
या बुद्धिनें शकुनिनें दाखविलें आपुलें उदार-पण॥ ७७ ॥
ऐसें असतां द्यूतीं अ-जिता मी कीं जिता, करा सवदा॥
पुण्याचा, पुशिलें हें सत्य पहा जोडितें करास वदा॥ ७८ ॥
कुरु- गुरु वचन तसें जरि संदिग्ध वदाल तरि न भागावें॥
अजि सभ्य हो जरि गुरुहि न हरी संदेह तरि नभां[15] गावें ॥७९॥

---

१ क्षमारूप सखी. २ हर्षपावती ३ पूज्य द्रौपदी. ४ (जितः अस्मि) मी जिंकला गेलों आहें. ५ जिंकिलेली. ६ दुसऱ्याच्या धनाचा पण. ७ लावण्यास. ८ निर्धन. ९ पतीच्या स्वाधीन असणें. धर्म स्वतः जिंकला गेला यास्तव स्त्रीच्या संबंधानें निःस्वच झाला; म्हणून द्रौपदी हें दुसऱ्याचें धन पणास लावण्यास त्याला अधिकार राहिला नाहीं ह्यावरून पाहतां, तूं जिंकली गेली नाहींस असें वाटतें; परंतु स्त्री ही सर्वदा भर्त्याच्या स्वाधीन, तस्मात् भर्त्याची जी गति तीच तिचीही असावयाची, म्हणून धर्म जिंकला गेला तेव्हां तूंही जिंकली गेलीस, असें वाटतें; ह्यासाठीं अमुकच गोष्ट खरी असें मला स्पष्टपणें सांगतां येत नाहीं; हें तात्पर्य. १० भीष्म. ११ शंका न धरितां. १२ फार निष्णात नव्हे असा राजा (धर्म). १३ आपला पराजय अंतीं आहे ज्याच्या असें; हें द्यूताचें विशेषण. १४ बायकोचा पण लाऊ (लावो). १५ तर शून्यास गावें म्ह० दुसऱ्या कोणाचीही आशा राहिली नाहीं हें तात्पर्य.

न वदे कोणी हि किमपि दुःशासन घाबरी करी तीतें ॥
त-द्रीति सम कवि ह्मणो ग्राम-हरीच्या बरीक रीतीतें ॥ ८० ॥
तें पाहुनि भीम ह्मणे राया आह्मां समक्ष कृष्णेची ॥
हे दुर्दशा बरी कां पूर्ति असेकीं न अक्ष-तृष्णेची ॥ ८१ ॥
आहेत कितव पुष्कळ पुष्कळ त्यांच्या घरांत बटकी ही ॥
स्नेहें ते हि न त्यांतें पण करिति मदुक्ति काय लटकी ही ॥८२॥
श्री बुडविली महेंद्र-श्री-तुल्या मज तिची नसे परवा ॥
परं वाम-लोचनेच्या ऐकों न शकेंचि या विलाप-रवा ॥ ८३ ॥
या साध्वीस न दुःख-द पर-करचि तुझा स्व-कीर्ति-हानि-कर॥
हा निकर पातकांचा कैसा केला खळें महा निकर ॥ ८४ ॥
रे सहदेवा स-त्वर पुष्कळसा अग्नि आण जाच कसा ॥
जाळूं याचे हे कर आम्हां हा सोसवेल जाच कसा ॥ ८५ ॥
श्वेताश्व म्हणे बापा भीमा जीमाजि वास अ-शिवाचा ॥
केवळ बाळपणीं ही वदलासि न तूं कधींहि अशि वाचा ॥ ८६ ॥
सद्गुण सु-सेव्य हा गुरुदेव-प्रिय यास जेंवि हार उनीं ॥
घालिसि तापांत कसा गति कोण पुढें स्व-सत्व हारउनी ॥ ८७ ॥
आम्हां व्यसनार्तांची धर्म-स्थिति हेचि बाज पावें गा ॥
त्वां मोडावें न इला स्व-स्वास्थ्य-सुखार्थ बा जपावें गा ॥ ८८ ॥
हें काय बरें या गुरु-घातें रिपु परम मुदित होतील ॥
स्व-मुखीं विष अमृत-रस व्याळ-मुखीं कोण सु-ज्ञ ओतील॥८९॥
निववी अ-सुरांत जसा साधु प्रल्हादराय कवि-कर्ण ॥
धृतराष्ट्र-सुतांत तसा एकचि नय-निपुण-नायक विकर्ण ॥ ९०॥
भीष्म-धृतराष्ट्र-विदुर-द्रोण-कृप-नृपांसि बोल तो लावी ॥
कीं समयीं न वदावी तरि मग केव्हां सदुक्ति बोलावी ॥ ९१ ॥
बोला हो बोला हो बोला हो सर्व सभ्य बोला हो ॥
अ-समय मौनें तुमच्या सु-ज्ञपणाच्या न हानि मोला हो ॥९२॥
चार व्यसनें-मृगया स्त्री पान द्यूत यांत जो सक्त ॥

---

१ फांशांनीं खेळण्याच्या हव्यासाची. २ इंद्राच्या संपत्तीसारखी. ३ परंतु. ४ सद्गुण इत्यादि विशेषणें गुरुकडे आणि हाराकडे श्लिष्ट आहेत. ५ हा हिरण्यकशिपूचा मुलगा. ६ कवींचे कान; हें निववी ह्याचें कर्म. ७ उत्तम नीतिज्ञांत श्रेष्ट. ८ शब्द-घोष.

तो धर्म-च्युत तत्कृत[1] सत्कृत न महा-जनांत हें व्यक्त ॥ ९३ ॥
धर्म ज्याच्या नादीं, लावुनि जिंकूनि शकुनिनें आर्या ॥
पण आपणचि करविला पांचांची[2] आपुली सती भार्या ॥ ९४ ॥
द्युतीं साधारण धन पण करुनि नव्हेचि एक हारविता ॥
गिळिल[3] दुराग्रहराहू त्यजिना परि मद्विचार हा रविता ॥ ९५ ॥
सभ्यांमाजि वदाया विहित असें बोलतोंचि अजि तत्त्व ॥
हरि-कीर्ति सती हेही तुल्या यांचें समान अ-जित-त्व[4] ॥ ९६ ॥
तें साधु साधु साधु ध्वनि करिती म्हणति बोल कानाहीं ॥
प्यावे असेचि, तूं कीं विदुर तिजा स्पष्ट बोलका नाहीं ॥ ९७ ॥
न्याय-मृकंडु-सुताच्या[5] दु-स्तर-धृतराष्ट्रजाब्धि-साधु-वटा[6] ॥
सभ्या भला भला विधु लाजेल तुझ्या चि मानसा धुवटा ॥ ९८ ॥
कर्ण म्हणे वाचाळा रे सर्व-स्व-ग्लहांत हे आली ॥
अ-जिता कशी तुझी मति मति-मंदा विदुर-बुद्धिची आली ॥ ९९ ॥
वरकड हे काय मुके वक्ता धर्म-ज्ञ तूंच बैस उगा ॥
न भला स्वभाव हा तुज बालिश-जन-पंक्तिला न बैस उगा ॥ १०० ॥
न वदति सभ्य, न पांडव, जरि हे कृष्णा म्हणे अहो सांगा ॥
अ-जिता असती तरि हे तैसेंचि स्पष्ट न वदते कांगा ॥ १०१ ॥
म्हणसील सभेंत सती ना-णावी तरि सती न हे असती ॥
असतो एक सतीचा उपभोक्ता, पांच हे[7] हिला असती ॥ २ ॥
आनर्यंन[8] सभेंत इचें कीं हें एकांबरत्व न विचित्र ॥
नग्नत्व हि नवल नव्हे, न चुना बहु नासिकेसि ज्या श्वित्र ॥ ३ ॥
दुःशासना न याचे ऐकावे फोल बोल, हा बाळ ॥

१ मान्य केलेलें. २ स्वतःची ( पांचांची मिळून ). ३ 'दुराग्रह राहू गिळील परि मद्विचार हा रविता त्यजीना'=माझें भाषण ह्यांच्या ( दुर्योधनादिकांच्या ) दुराग्रहामुळें व्यर्थ होईल, तरी माझे विचार मला प्रकट केल्याशिवाय राहवत नाहीं; हा भाव. ४ अजिंक्यपणा. ५ न्याय हाच मृकंडुसुत (मार्कंडेयऋषि) त्याच्या. ६ तरण्यास कठिण जो धृतराष्ट्रपुत्र हाच समुद्र, त्यामधल्या उत्तम वटवृक्षा. प्रलयकाळीं समुद्रानें दशदिशा व्यापून टाकिल्या असतां त्यांत मार्कंडेय ऋषि बुडूं लागला, त्यावेळीं जसा त्याला एक वटवृक्ष आधार झाला ( अशी कथा आहे ); त्याप्रमाणें धृतराष्ट्रसुत, न्याय बुडवूं लागले असतां त्याला तारण्यास तूंच एकटा आधार झाला आहेस. ७ हे ( पांडव ) उपभोक्ते. ८ आणणें.

गीष्पतिपुढें मिरवितो साक्षरता दाखवूनि गाबाळ ॥ ४ ॥
वदतो बुधांत भलतें बोलाया न स्त्रियांतहि सकोनी ॥
हूं, घे पांडव-वस्त्रें या दासीचें हि वस्त्र हिसकोनी ॥ ५ ॥
तें ऐकतांचि वस्त्रें टाकुनि उघडेचि पांच ही बसले ॥
भीष्म म्हणे हें दुःसह त्वद्दयांत असें न शर-कदंब सले ॥६॥
दुःशासन सोडाया झोंबे स्व-कुळाहि[1]तोदया लुगड्या ॥
तेव्हां स्मरली कृष्णा कृष्णा दीनाचिया दयालु गड्या ॥ ७ ॥
तो दुर्जन आधीं ही साधूच्या करुनि हानि रीतीची ॥
नग्न सभेंत कराया पाहे खळ धरुनि हा निरी तीची ॥ ८ ॥
जैं दुर्दशा कराया दुर्दैवें सिद्ध नीच हा केला ॥
तैं दीन-बंधुला ती कृष्णा मारी मनींच हाकेला ॥ ९॥
हे नाथ रमा-नाथ व्रज-नाथ हरे मुकुंद कंसारे ॥
गोविंद कृष्ण केशव दीनार्ति-हरे[2]-स्त्व-मेव संसारे ॥ ११० ॥
काळें हि सख्या न तुझ्या दासीस पहावयासहि सकावें ॥
त्वद्भगिनी-वस्त्र खळें नग्न करायास काय हिसकावें ॥ ११॥
जीहुनि नसे सुभद्रा तुज बहु मान्या अ-कीर्ति हे तीची[3] ॥
धांव दयाब्धे होते विश्वांत तुझ्या अ-कीर्ति हेतीची ॥ १२॥
भगिनी ऐसें वदलें परि फारचि लाजलें न हें लटिक ॥
प्रभुजी रक्षा तुमच्या दासांची मी ल्हानशी बटिक ॥ १३ ॥
जिंकिल काय खळा तो जिंकी द्यूतीं न धर्म जो डावा ॥
सु-ज्ञें पंक-पतित-पर[4]-धेनूद्धरणेंहि धर्म जोडावा ॥ १४ ॥
क्लेत्यर्थ उद्धरीं मज उद्धरिलें जेंवि सागरीं महिला ॥
त्वद्दासांची होती त्या अमृतीं[6] आजि या गरीं महिला ॥ १५ ॥
बा ढळतां तिळहि पदर भावी व्यजनांसि राग रामा जी ॥
ती खळ-सभेंत उघडी पडते न पडून सागरामाजी ॥ १६ ॥

१ स्वकुळाचा नाश होण्याकरितां. २ ( दीनार्तिहरः त्वं एव संसारे )=संसारांत तूंच दीनाचें दुःख हरण करणारा ( आहेस ). ३ त्या तुझ्या बहिणीची (माझी). ४ चिखलांत पडलेली दुसऱ्याची जरी गाय असली तरी तिला वर काढण्याच्या योगानें. ५ पुण्य संपादावें. ६ तशा विलक्षण सुखांत. ७ पंख्याच्या वाऱ्यानें पदर किंचितूही ढळला असतां जिला त्याचा ( पंख्याचा ) राग येई; ती ( मी ) आजदुष्टांच्या सभेंत अगदीं उघडी पडत आहे; ह्यापेक्षां समुद्रांत बुडती तरी बरें होतें, हा भाव.

भो भगवन् भो वत्सल भो हत-चाणूर[1]-मल्ल भागावें[2] ॥
विश्वें तुझेंचि दुसरें न यश श्री-प्राण-वल्लभा गावें ॥ १७ ॥
आजि अ-सत्पर[3]-पुरुष-स्पर्श न अपराध अन्य केला हो ॥
झांका प्रसाद-पदरें नकु-जन[4]-दृक्-स्पर्श कन्यकेला हो ॥ १८ ॥
अवतरला उतराया जो दुःसह दुष्ट-भार[5] महिवरला ॥
अहि-वर[6]-लास्य-पटु प्रभु करुणोक्तें[7] द्वारकेंत गहिवरला ॥ १९ ॥
परमेश्वर रूप धरी स्व-पर-जन[8]-हितोदया लुगडियांचे ॥
निववाया सभ्यांसह मन नयनहि तो दयालु गडियांचे[9] ॥ १२० ॥
ह्या अंबरावतार श्रित-लज्जा-रक्षणार्थ अकरावा ॥
प्रभु-मत असे सद्वनीं आग्रह वेषीं कदापि न करावा ॥ २१ ॥
शेले शालू साड्या क्षीरोदक लांब रुंद पाटावे ॥
झाला अनंत वस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावें ॥ २२ ॥
पद-सेवा-र्थचि भजती अनवरत महा-विभूति[10] जी[11] निपट ॥
तो कृष्णा-वपु झांकी होऊनि महा-विभूति-जानि[12] पट ॥ २३ ॥
पहिलें वसन व्यसन-प्रतिपादन[13]-पटु करें कु-मति सोडी ॥
तों दुसरें आहेचि प्रथमा-धिक वस्त्र त्यासही ओढी ॥ २४ ॥
कृष्णा-देह सदंबर-रत्ना-कर[14] त्यासि खळ-भुजा[15] टिटवी ॥
उपसी परि गांभीर्यें आपण न उंहूं[16] म्हणोनि त्यां[17] विटवी ॥ २५ ॥
मानिति मायां[18] केवळ अल्प सभेंतील भूमि-तळ पट हो ॥
म्हणति अदित्यादि[19] सत्या या मेल्यांचें स-मूळ तळपट हो ॥ २६ ॥
जें झाकिलें अनंतें दिव्यें भव्यें सदंबरें सुघडें ॥
तें साधु-काय[20] काय क्षुद्र-मति[21] करील नागवें उघडें ॥ २७ ॥

---

१ मारला आहे चाणूर नांबाचा मल्ल ज्यानें. २ धावून येण्याचे श्रम घ्यावे. ३ दुष्ट परकी मनुष्याचा स्पर्श. ४ दुष्टांच्या दृष्टीचा स्पर्श. ५ दुष्टांचा भार ६ सर्प-श्रेष्ठ जो कालिया (त्याच्या फणांवर ) नृत्य करण्याविषयीं चतुर. ७ द्रौपदीच्या दीन भाषणानें. ८ आपल्या भक्तांचें हित व्हावें म्हणून. ९ मित्रांचें ( पांडवांचें ) ह्याचा संबंध ' मन, नयन ' ह्यांकडे. १० मोठे ऐश्वर्यवंत. ११ ज्या (कृष्णास). १२ लक्ष्मी आहे जाया ज्याची तो. १३ दुःख देण्यांत कुशल. १४ द्रौपदीचा देह हाच उत्तम वस्त्रांचा समुद्र. १५ दुःशासनाचा हात हीच टिटवी. १६ नको. १७ त्या टिटवीस. १८ पट माया ( मावण्यास ) सभेंतील भूमितळ केवळ अल्प, ( असें लोक ) मानिति; असा अन्वय. १९ कश्यपाची बायको अदिति आदिकरून महापतिव्रता स्त्रिया. २० द्रौपदीचें पवित्र शरीर. २१ दुष्टबुद्धीचा ( दुःशासन ).

तो शतशः पट झट्झट फेडुनि भागे सभेंत बेडावे ॥
किति खळ-बळ, जळ-निधिचे कीं दुस्तर-तर तरंग फेंडावे[1]॥२८॥
होय सभेंत हलहला स्वन कृष्णेसि प्रशंसिती राजे ॥
छी, ते खळांसि म्हणती गेले भवनद-पर-तीरा[2] जे ॥ २९ ॥
भीम म्हणे राजे हो तरि पूर्व-ज-गति न हो मला परिसा ॥
जरि दुःशासन-वक्षःक्षत-ज[3] न सेवीन मी स्वयें हरिसा[4] ॥१३० ॥

---

## वनपर्वांतील नलोपाख्यान.

सोमवंशांतील वीरसेनाचा मुलगा नळ राजा ह्यास स्वयंवरांत विदर्भ देशाच्या भीमराजाची कन्या ( दमयंती नावाची ) हिनें वरिलें. ही कथा ह्या आख्यानांत आहे.

श्री-वीरसेन-सुतनळ निषधे-श्वर[5] सु-गुण-मणि-करंडक[6] हो ॥
ब्रम्हण्य प्रभु दुर्गत-दारिद्र्य-समुद्र-वर-तरंडक[7] हो ॥ १ ॥
तो पुण्य-श्लोक रणीं करितां रिपु-वीर-हानि[8] वासवसा ॥
तत्कीर्ति म्हणे गा श्री-धी[9] हो या योग्य हा निवास वसा ॥ २ ॥
वैदर्भ[10] भीम-राजा होता बहु खिन्न हीन संतानें[11] ॥
तो भेटोनि सुखविला दमनानें[12] स्वपद-[13]लीन संतानें ॥ ३ ॥
नृप-दास्य-तुष्ट[14] मुनिचें मन त्या मुनिला म्हणे सखे दमना ॥
झाला शुद्ध करावा संतति-सुख-पात्र हा स-खेद-मना[15] ॥ ४ ॥
ब्रम्हर्षिवरें[16] दमनें वर दिधला त्या नृपासि संततिचा ॥
झाले तीन सुत, सुता चवथी गाती गुणौघ[17] संत तिचा ॥ ५ ॥

---

१ फोडावे. २ संसाररूप नदीच्या पलीकडील तीराला. ३दुःशासनाच्या उरांतील रक्त. ४ सिंहासारखा. ५ निषध देशाचा राजा. ६ ( सु+गुण+मणि+करंडक )=चांगले गुण हेच मणि (रत्नें) ह्यांचा करंडा, म्ह० उत्तम गुण ज्याच्यामध्यें परमेश्वरानें एकत्र सांठविले आहेत. ७दरिद्रीलोकांचें दारिद्र्य हाच समुद्र त्यांतील (तो तरण्यास) उत्तम नौकारूप–मोठा दानशूर हें तात्पर्य. ८ शत्रुभूतवीरांचा नाश. ९ संपत्ति व विद्या ह्या दोघींचा बहुधा एकत्र वास नसतो; परंतु नलापाशीं त्या दोन्ही होत्या. हें तात्पर्य. १०विदर्भ देशांतील. ११संततीनें हीन म्ह० रहित. १२ऋषिविशेष. १३आपल्याला शरण आलेला. १४ राजाच्या सेवेनें संतुष्ट झालेल्या. १५ खेदयुक्त आहे मन ज्याचें. १६ ब्रम्हर्षींमध्यें श्रेष्ठ. १७ गुणांचा समुदाय.

ठेवी दम, दांत, दमन, दमयंती, हीं अशीं तयां नावें ॥
ज्या मुनि[1]-वर-प्रसाद-प्रभवातें त्रि-भुवनेंहि मानावें ॥ ६ ॥
भीम-नृपति.दुग्धोदधि दमयंती श्रीच वपु सु-रुचिर तिचें ॥
पाहूनि देह दिवसों दिवस दिसे दीन जरि सुरुचि[2] रतिचें ॥ ७ ॥
जाणो कळे भविष्यद्[3]दमयंतीची स्मरा रुचिर-तरता[4] ॥
हर-दृग[5]-नळीं जळाला रतिच्या विटलाचि तो शुचि-रत[6] रता ॥ ८ ॥
ती पाहिल्यावरि गमे कोणासहि न स्व-रूप सुंदरसें ॥
श्री-वनमाळेंहि पुढें मिरवील स्व-मद[7] काय कुंद रसें ॥ ९ ॥
श्री-कृष्ण रुक्मिणीला श्री-कृष्णा रुक्मिणी जशी आतां[8] ॥
दमयंतीस नळ नळा दमयंती आयकों जनें गातां ॥ १० ॥
नळ नृ-प ह्मणे शिवा[9] ती नवरी हो मन दुजीस न वरी हो ॥
भैमी ह्मणे शिवे तो नवरा [10]हो प्रेम नित्य नव राहो ॥ ११ ॥
एका समयीं धरिला हंस नळें तो म्हणे कृपा कर गा ॥
सोड मला जरि व्हावी ती दमयंती वधू नृ-पा कर-गा[11] ॥ १२ ॥
करिन तुझें गुण-वर्णन जेणें होइल तुझीच नवरी ती ॥
सत्य-प्रिय हित वदती शुद्धात्मे[12] न धरितीच नव रीती ॥ १३ ॥
नळ-मुक्त[13] राजहंसा सह हंसांची नभःपथें[14] आली ॥
आली प्रमदवनीं[15] तों भैमी ही घेउनि प्रिया आली ॥ १४ ॥
भैमी[16] म्हणे मराळ-ग्रहणेच्छा[17] मन्मनांत आली हो ॥
एकासि तरि धरूंया विखरा मुक्ता वनांत आली हो ॥ १५ ॥
इतरा हंसांनीं त्या नेल्या बहु लोभवूनि दूरवर ॥
भैमी त्यास धरू ये ज्या दे असु-दान दान-शूर-वर ॥ १६ ॥
एकांतीं तीपाशीं स्तविला निषधें-द्र तो खगानें हो ॥

---

१ मुनिश्रेष्ठाच्या वराच्या प्रभावास. २ उत्तम आहे कांति ज्याची असें. ३ पुढें होणारी. ४ अधिक सौंदर्य. ५ शिवाच्या तृतीय नेत्रांतील अग्नीमध्यें. ६ शृंगार रसांत निमग्न; अथवा शुक्र याची सप्तमी शुचि म्ह० शोकांत निमग्न; असे दोन्ही अर्थ एथें संभवतात. ७ आपला गर्व. ८ आतां म्ह० सांप्रत कृष्ण व रुक्मिणी हीं दोघें जशीं एकमेकास शोभतात असें लोक म्हणतात; तशीं पूर्वीं नल व दमयंती हीं परस्परांस अनुरूप होतीं असें लोक गात होते; हें आम्हीं ऐकतों असें कवि म्हणतो. ९ हे पार्वति. १० होवो. ११ हस्तगत. १२ निर्मल अंतःकरणाचे. १३ नळानें सोडलेला. १४ आकाशमार्गानें. १५ क्रीडेच्या बागेंत. १६ भीमराजाची मुलगी दमयंती. १७ हंस धरण्याची इच्छा.

जाणो राधेला दे खग-भगवद्वेणु[1] तोख गानें हो ॥ १७ ॥
पुण्य-श्लोक निषध-पति नळ खळ-बळ-जलधि[2]-वाडवा-नल गे ॥
लोकां महो-त्सव[3]-प्रद तोचि सदा[4] त्यांसि पाडवा नलगे ॥ १८ ॥
स्मर-बुध- दस्र-रुचिरतर[5] ऐसें ह्मणणार जे न ते लटिके ॥
हय्यंगवीन जैसें सुरसिक-रसने[6] पुढें न तेल टिके ॥ १९ ॥
अनु-पम[7] अनु-रूप[8] अन-घ[9] जरि वरिला त्वां नृपा-त्म-जे न नळ ॥
होइल केवळ ताप-द[10] कीं जो नर नळ न होय तो अनळ ॥ २० ॥
नळ-कस्तुरीस टाकुनि कां तूं घेतीस अन्य नर माती ॥
जरि वरिती न हरीप्रति घेती म्हणवूनि धन्य न रमा ती ॥ २१ ॥
नर-रत्न तोचि तूंचि स्त्री-रत्न उदंड आडनावांचीं[11] ॥
न बुडविति न वा तारिति चित्रें बरवीं हि आड-नावांचीं[12] ॥ २२ ॥
ती सु-मति म्हणे आर्या त्वां तिकडे ही असेंचि कळवावें ॥
साधो हळुहळु मृदु मधु[13] हित मित बोलोनि चित्त वळवावें ॥ २३ ॥
आज्ञा म्हणोनि येथुनि कळवुनि हें प्रेम तेथुनि उडाला ॥
हंस प्रत्युपकारी हर्षीं काम-ज्वरीं नळ बुडाला ॥ २४ ॥
झाली स्मर-ज्वरार्ता[14] द्याया ही योग्य हें पिता समजे ॥
जाणति न सांगतां सुख अ-सुख पराचें जगीं सदा सम[15] जे ॥ २५ ॥
योजी स्वयं-वरोत्सव[16] रायांसि सुख प्रकाम दे वार्ता ॥
आले नाहूतहि[17] मति कोणाची तें न काम-देवार्ता[18] ॥ २६ ॥
देवर्षि[19]-मुखें परिसुनि शक्र करी धरुनि हरिख गमनातें ॥

---

१ हंसरूपी कृष्णाचा वेणु. २ दुष्टांचें सैन्य हाच समुद्र ह्याला वाडवाग्नी सारखा. ३ मोठा आनंद देणारा. ४ पाडवा लोकांस एक दिवस मात्र आनंद देतो, परंतु नल सर्वकाळ आनंद देणारा होता; असा भावार्थ. ५ मदन, बुध व अश्विनी-कुमार (हे तिघेही रूपाविषयीं प्रसिद्ध आहेत) त्यांपेक्षांही हा सुंदर. ६ रुचि घेण्यांत मार्मिक अशा लोकांच्या जिभेपुढें. ७ ज्याला उपमा नाहीं असा. ८ योग्य. ९ निष्पाप. १० उत्तरार्ध-नळास टाकून तूं जर इतर पुरुष (अनळ) वरशील तर तो तुला संताप देणारा होईल; कारण, जो नळ नव्हे तो अनळ म्ह० अग्नि होय. ११ नररत्न, स्त्रीरत्न अशा नांवांचीं मनुष्यें पुष्कळ आहेत, परंतु त्या नांवांच्या अर्थास अनुसरून तुम्हा दोघां वाचून कोणी सापडायाचीं नाहीत असा भाव. १२ विहिरी आणि नावा ह्यांची १३ मधासारखें गोड. १४ कामव्यथेनें पीडित. १५ प्राणिमात्रावर सारखी दृष्टि ठेवणारे. १६ मुलीनें आपल्या इच्छेनुरूप वरास वरण्याचा समारंभ. १७ (न+आहूत)=न बोलाविलेले. १८ (कामदेव+आर्ता)=मदनानें पीडित. १९ नारद.

त्याच्या विमान येइल काय न येतांचि हरि-खग[1] मनातें ॥ २७ ॥
जों निकट कुंडिनाच्या[2] आले यम-वरुण-भू-भृदर्य-नळ[3] ॥
तों तोहि सकळ-सद्गुण-निधि[4] पुण्य-श्लोक वीर-वर्य[5] नळ[6]॥२८॥
ते सुर म्हणति अहाहा नळचि सकळ-पुरुष-वर्य वीर-मणी ॥
नवरी नवरील कशी याला पाहोनि सु-मति ही रमणी ॥ २९ ॥
आम्हांलाचि न केवळ लावितसे व्यक्त लाज हा रविला ॥
आम्ही निज-तेजो-मद याज पुढें सर्व आज हारविला ॥ ३० ॥
न सुचति जरि भलतैशी[7] युक्ति प्रिय-कार्य-साधिका[8] मुकते ॥
त्या साधु-संगति-महा-लाभासहि[9] सर्व सा-धि कामुक ते ॥३१ ॥
भेटोनि त्यासि म्हणती कार्य-परें सर्वथा न लाजावें ॥
हो अस्मद्दूत वि-मुख[10] न असें[11] सत्य-व्रता नला जावें ॥ ३२ ॥
होतों दूत नळ म्हणे कार्य वदा कोण हो तुम्ही चवघे ॥
ओळख देउनि म्हणती आम्ही भैम्यर्थ पातलों अवघे ॥ ३३ ॥
भैमी स्वयें वरू या आम्हां चौघां जणांत अन्यतमा[12] ॥
हें कार्य दूत होगा जा गा बा तिजकडेचि धन्य-तमा ॥ ३४ ॥
स-स्मित-वदन नळ म्हणे प्रभुजी जो हेतु सुर-वरा-गमनीं[13] ॥
माझ्याहि तोचि सर्वा हि मृगांच्या तुल्य सु-रव-राग[14] मनीं ॥३५॥
दूत करुनि मज तिकडे कार्यास्तव पाठवूं नको पावा[15] ॥
कोणावरिहि सुनय न[16] स्वातिक्रम आठवून कोपावा ॥ ३६ ॥

---

१ विष्णूचा गरुड. उत्तरार्ध—दमयंतीकडे येण्याची इंद्राला इतकी उत्कंठा झाली कीं, अतिवेगवान् जो गरुड तोही त्याला वाहनार्थ आवडेना, मग विमानाची कथा कशाला! २ कुंडिन हें भीमक राजाच्या राजधानीचें नाव. ३ (यम+वरुण+भूभृदरि+अनळ)= यम, वरुण, (पर्वतांचाशत्रु) इंद्र आणि अग्नि. ४सान्या सद्गुणांचा ठेवा. ५ वीरांमध्यें श्रेष्ठ. ६ हा 'आला' ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ७ एखादी ८ इच्छिलेलें कार्य साधणारी. ९ (नलरूप) साधूच्या संगतिरूप मोठ्या लाभास; तात्पर्यकीं, ते (इंद्रादिदेव) कामुक व साधि (दमयंती कशी प्राप्त होते ह्या काळजींत पडलेले) होते, त्यामुळें, आपणांप्रमाणें तिच्या प्राप्तीकरितांच आलेल्या नळाला त्यांनीं दूत करून तिजकडे पाठविलें, ही त्यांनीं कार्यसाधक युक्ति योजिली नाहीं; ह्यामुळें त्यांचा मनोरथ सिद्धीस गेला नाहीं खरा, तरी त्यानीं असें केलें नसतें तर महान् साधु जो नल त्याच्या संगतीचा त्यांना लाभ झाला तोही झाला नसता. १०प्रतिकूल, पराङ्मुख. ११होऊन. १२ कोणालातरी एकाला. १३ देवश्रेष्ठांच्या आगमनांत. १४ मधुरध्वनीविषयीं आवड. १५ कृपाकरा. १६ (सुनय स्वातिक्रम आठवून कोणावरीहि न कोपावा, असा अन्वय.) तात्पर्य—तुम्ही व मी एकाच कार्याकरितां आलों आहों. म्हणून त्याच कामासाठीं तुम्हीं मला तिकडे दूत करून पाठवितां ह्यांत नीतीचें उल्लंघन होतें.

शक्र म्हणे वदलासि प्रथम तसें वचन मग असें वदसी ॥
अचळ करींच असावा व्यवहारीं शब्द संगरीं सदसी ॥ ३७ ॥
भू-प म्हणे या कर्मीं पवन हि होईल मज न सांगाती ॥
अंतःपुर-प्रवेशीं जी प्रभुची साधु युक्ति सांगा ती ॥ ३८ ॥
शक्र म्हणे जा गा तूं चिंता आधींच करिशि कां गा ती ॥
आम्हांसि हें कठिण जरि तरि सु-ज्ञ प्रभु म्हणोनि कां गाती? ॥ ३९ ॥
शक्र-वरें नळ गेला शिरला अंतःपुरीं सुखें सुर-सा ॥
भैमीच्या ह्या याच्या ती सेवी रूप-संपदा सुरसा ॥ ४० ॥
भैमी हर्षे त्याच्या विधुच्या तशि कुमुदिनी न आगमनीं ॥
सत्कारूनि म्हणे जी यावें मद्वा-षणें न आंग मनीं ॥ ४१ ॥
सुंदर- वर कोण तुम्ही गुरुच्या वाटो न हें परा-ग मना ॥
कीं जें जें अंतःपुर तें तें हि विषय नव्हे परा-गमना ॥ ४२ ॥
आलां कसे अ-वारित कार्यार्थ प्रकट आर्यकों दावा ॥
वाटे कर्णीं तुमचा वाङ्मय सौवर्ण काय कोंदावा ॥ ४३ ॥
वाहों लागे गुरु-घन-रस-पूरित वीरसेन-भू-पनळ ॥
सुंदरि मी पाशि-पितृप-पावक-पुरुहूत-दूत भूप नळ ॥ ४४ ॥
सु-मुखि प्रार्थिति बहु तुज ऐसें प्रभु लोक-पाळ ते चवघे ॥
अवघे उणेचि रस तूं दिव्य रसाचीच सर्वदा चव घे ॥ ४५ ॥
सुज्ञे तवां वरावा आम्हां चवघां जणांत अन्यतम ॥
धन्यतमत्व तुला यों न शिवो पळ दयित-विरह-जन्य तम ॥ ४६ ॥
हांसोनि म्हणे भैमी प्रणति-प्रिय देव गुरु असें म्हणती ॥

---

१उत्तम खड्ग. उत्तरार्ध—व्यवहारीं शब्द अचळ असावा; व संगरीं करीं सदसि अचळ असावा, असा अन्वय. २ह्या अंतःपुरप्रवेशरूप कार्यांत. वायु ही मजबरोबर यावयास भिईल म्ह० वारा देखील जेथें शिरूं शकत नाहीं. ३नलाच्या, ह्याचा संबंध आगमनाकडे ४ अपराध. ५ तुमचें अंतःपुरांत येणें. ६मोठा अपराध. ७योग्य—पात्र. ८ परक्याच्या येण्याला. ९कोणी आटकाव न केलेले असे. १० (कार्यार्थ प्रकट दावा, आयकों)=कोण त्या कामा करितां आपण आलां हें स्पष्ट सांगा, तें मला ऐकूं द्या. ११वाणीरूप, सोन्याचा, पक्षीं, उत्तम (अकारादि ) वर्णांनीं युक्त. १२ मोठा आणि पाण्यानें गच्च भरलेला हें पनळाचें विशेषण. तात्पर्य कीं गंभीर व अत्यंत रसाल असें भाषण करण्यास नलानें आरंभ केला. १३ वरुण, यम, अग्नि व इंद्र यांचा दूत. १४अतिशय कृतार्थता. १५ येवो. १६पतीच्या वियोगापासून उत्पन्न होणारें दुःख. तात्पर्य तूं मनुष्यास वरिलें तर तुला पतिवियोगाचें दुःख सोसावें लागेल, ह्या करितां आम्हा देवां पैकीं एकास वर.

त्यांहीं क्षमा करावी स्वीकारावी यशोर्थ मत्प्रणती ॥ ४७ ॥
वरिले हेचि चरण म्यां त्यजितां ज्वलनांत काय होमीन ॥
यज्जीवन[1] जीवन तो दुग्धीं वांचेल काय हो मीन ॥ ४८ ॥
नळ-नृप म्हणे सु-बुद्धे या दासावरि तिहीं न कोपावें ॥
मदधिक कोटि-गुणें ते आग्रह कांहीं धरूं नको पावें ॥ ४९ ॥
मृत्यु असो, पर-वंचन करुनि सुधेच्या जिणें नको पानें ॥
त्वत्पाणि-ग्रहणें मी देवांच्या बहु शिणेन कोपानें ॥ ५० ॥
विदुषी[2] म्हणे म्हणा जा कीं म्यां कथिलें परोपरी पण ती ॥
प्रणति प्रभूंसि करिती अनुकंप्या मी स्वयं-वरा[3] म्हणती ॥ ५१ ॥
स-त्संमत स्वयं-वर-विधिनें वरितां तुम्ही न अपराधी ॥
काय करूं त्यजुनि तुम्हां माझी पळ अनुसरे न अपरा[4] धी ॥५२॥
होईल देह रंगीं सुर-पति-नर-पति-समक्ष नल-गामी[5] ॥
हा जन तुमच्याचि असे इतरा कोणाचियाहि न लगामीं ॥ ५३ ॥
होय अ-कृत[6]-कार्यहि नळ सुर-वर-संमत खरें निवेदून ॥
सत्यें जसा तसा न प्राज्यैंहि सुधा-रसें निवे दूनँ[7] ॥ ५४ ॥
रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती ॥
जाणो चकोर ते ती मूर्त ज्योत्स्नाचि ताप-दमयंती[8] ॥ ५५ ॥
साहे न परो-त्कर्षा ज्याची मति सच्छळीं[9] सदाऽनळसा[10] ॥
बैसे तिघां जणां सह हरिहि अधिष्ठूनि त्या सदीं[11] नळसा ॥ ५६ ॥
रंगीं पाहों जातां दिसले चौघेहि ते धवासम[12] जे ॥
भैमी देव-कृत-च्छळ ऐसें चित्तांत तेधवां समजे ॥ ५७ ॥
पांचा नळांत जेव्हां काय दिसेनाचि भेद लव[13] तीस ॥
बुद्धि म्हणे कां भीसी गुरु-चरणीं त्यजुनि खेद लवतीस[14] ॥ ५८ ॥
कर जोडूनि म्हणे ती नळ भर्ता भीम-कन्यकेला हो ॥
प्रभुजी स्वप्नांतहि जरि संकल्प नसेल अन्य केला हो ॥ ५९ ॥
नळ पति इतर पुरुष पितृबंधु जरि मनांत मानिले असती ॥

१ ज्याचें वांचण्याचें साधन. २ शाहणी. ३ स्वतः पती पाहून त्यास वरणारी. ४ दुसऱ्याकडे. ५ नलाकडे जाणारा. ६ केलें नाहीं कार्य ज्याणें. ७ दुःखित. ८ शमविणारी. ९साधूंचा छल करण्या विषयीं. १०सर्वदा आलस्य—रहित. ११ सभेला. १२पति जो नळ त्यासारखे. १३ लेशमात्र. १४ नम्र होत आहेस.

तरि ताराल इला हो प्रभुजी कैसी तरेल जी अ-सती ॥ ६० ॥
तीचा बलवान् निश्चय सुर-धृत[1] नळ-रूप घे हिराऊनी ॥
बहु तेज प्रकट करी शुचि सत्व-गुणछळीं[2] हिरा ऊनीं ॥ ६१ ॥
शुद्ध सवां[3]-ग कुश नलंद[4] परि उपभोगो-चितत्व[5] नलदासी ॥
देसें मनांत आणुनि दमयंती सु-मति होय नल-दासी ॥ ६२ ॥
पति-रूप सोडवुनि तो लोके-शांचा[6] प्रसाद साधूनि ॥
घाली नळासि माळा स्तविली प्रेम-प्रसन्न साधूंनीं ॥ ६३ ॥
नल तीस म्हणे कुलजे त्वां जैंरि[7] देवांसमक्ष मज वरिलें ॥
जों सा-सु[8] तों तुझा मी होतांहि प्रेम ऊन मजवरिलें ॥ ६४ ॥
झाला विवाह गेला स्व-पुरा नळ मग तिशीं सदा रमला ॥
भूमि म्हणे ताराया अवतरला विष्णु हा स-दार[9] मला ॥ ६५ ॥

## विराट पर्वांतील उत्तर गोग्रहण.

पांडव अज्ञात वास करण्या करितां विराट नगरीं राहिले होते. तेव्हां विराटाचा सेनापति कीचक ह्यानें द्रौपदीविषयीं दुर्वासना दर्शविल्या मुळें भीमानें त्यास ठार मारिलें. हें ऐकून विराटापासून फार त्रास पावलेला त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा ह्यानें दुर्योधनास सुचविलें, कीं ही संधी विराट नगरावर स्वारी करण्यास बरी आहे. तो विचार दुर्योधनास पटून त्यानें त्या नगराच्या दक्षिणेच्या बाजूस सैन्यासह सुशर्म्यास पाठविलें आणि आपण स्वतः मोठें सैन्य घेऊन त्याच्या उत्तरेच्या बाजूस आला. ह्या प्रकरणांत उत्तरे कडील सैन्यानें विराटाच्या गाई हरण केल्या, हा प्रकार ह्या आख्यानांत वर्णिला आहे ह्या साठीं ह्यास उत्तर गोग्रहण म्हणतात.

मत्स्य-पुरो-त्तर[10]-भागीं प्रातःकाळींच ये सुयोधन हो ॥
ज्यासि जय-प्राप्ति मनीं म्हणती[11] भीष्मा-दि ही सु-योध न हो ॥ १ ॥

---

१ देवांनीं घेतलेलें. २ हिरा उन्हांत जसा (जास्ती) तेज प्रकट करितो तसा शुद्ध जो सत्वगुण तो (त्याचा छळ केला असतां) जास्त सामर्थ्य प्रकट करितो. ३ (सव+अंग)=यज्ञाचे अंगभूत. ४ वाळा. ५ उपभोगाला योग्य असणें. तात्पर्य कीं, जसे देव पवित्र तसा नल ही पवित्र, ते जसे प्रेमार्ह, तसा हाही प्रेमार्ह; पण ते गुरु म्हणून प्रेमार्ह, व हा संगमार्ह म्हणून प्रेमार्ह असें समजून तिनें नलालाच वरिलें. ६ इंद्रादि लोकपालांचा. ७ ज्यापक्षीं. ८ (स+असु)=जिवंत. ९ स्त्रीसहित. १० मत्स्य देशाच्या राजधानीच्या उत्तरेच्या बाजूस. ११ ज्यासि (दुर्योधनास) जयप्राप्ति न हो (असें) भीष्मादिही सुयोध मनीं म्हणती, असा अन्वय.

सहसा व्रजांत गांठुनि बहु ताडुनि करुनि बद्ध-भुज गवळी ॥
षष्टि सहस्र सु-गोधन तो कुरु-कुळ-चंदन-द्रु-भुजग वळी ॥२॥
गोपा-ध्यक्ष रथावरि बैसुनि धांवे नृपासि सांगाया ॥
चित्तीं म्हणे बुडाया कुर्व-धमा हरिसि धेनु कां गा या ॥ ३ ॥
तो राज-गृहीं जाउनि रायाच्या उत्तरा-ख्य तनयातें ॥
नमुनि म्हणे हो नेतो दुर्योधन धेनु करुनि अ-नयातें ॥ ४ ॥
कवची खड्गी धन्वी व्हा चित्तीं रामचंद्रहि असा ध्या ॥
बैसा रथीं जय-श्री गो-विप्रा-वन-परासि न अ-साध्या ॥ ५ ॥
उत्तर म्हणे असें जरि मी एकाकी लहान परि सवतें ॥
यश जोडितोंचि असता सारथि तरि कथन मज न परिसवतें ॥६॥
कर्णा-दिकांसि देता समरीं वैराटि-केसरी करिता ॥
जिष्णुपुढें अ-सुर-जनीं कोणी वैरा टिके सरी करिता ॥ ७ ॥
मिळवा कोण्ही तरि हो धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥
कुरु-भट-समूह पाहुनि मज जेंवि हिमासि सु-दधि-सार थिजो॥८॥
ऐसे बहुतचि बोले तो बालिश बोल बायकांमाजी ॥
चित्र-पटें-कटकसें शिशु-भाषण येईल काय कामा जी ॥ ९ ॥
उत्तर म्हणे कुरु-कटक न पशूंस यशासहि स्वसे नेतें ॥
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्व-सेनेतें ॥ १० ॥
माझें सारथ्य करू तुझिया वचनें बृहन्नडा गमला ॥
हाचि सदु-पाय वत्से लागो अपकीर्तिचा न डाग मला ॥ ११ ॥
ती धांवत जाय म्हणे गानादिक हें बृहन्नडे राहो ॥
समयीं सारथ्य-गुणा नुघडूनि कदर्युचा न डेरा हो ॥ १२ ॥
उठल्या उत्साहाच्या त्यां शांत श्रीमदु-दधिवरि लहरी ॥
धरितां हनु न-नु म्हणतां रसिकाचें कां न सुदधि वरिल हरी॥१३॥

---

१ कौरवांचें कुळ हाच चंदनवृक्ष ह्याजवरचा सर्पच, ( दुर्योधन ). २ कुरुकुलांतील नीचा. ३ कवची, खड्गी व धन्वी असा. ४ गाई आणि ब्राम्हण ह्यांचें रक्षणीं जो तत्पर त्यास. ५देणारा झाला असता. ६विराटपुत्र हाच सिंह. ७हत्तीपणा. ८इंद्रापुढें. ९तूप. १० चित्र पटावरील सैन्याप्रमाणें. ११ "कृपणानें डेन्यांत पुरून ठेविलेलें द्रव्य कधींच कोणाच्या उपयोगीं न पडल्यामुळें व्यर्थ होय; तसा तुझा सारथ्यगुण समयीं प्रकट न होईल तर व्यर्थ होय." असें तात्पर्य. १२ प्रेमळ भक्तानें आर्जवानें दिलेलें सुदधि ( उत्तम दहीं ) हरी नु (नको ) न म्हणतां कां न स्वीकारील ? तसें युद्धप्रिय अर्जुनास दुर्योधनाबरोबर युद्ध करण्याची प्रार्थना कशी न रुचेल ?

वाद्य असो नृत्य असो हो अभिनय किमपि[1] गीत अथवा हो ॥
जाणोनि करें म्हणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो.॥ १४ ॥
वैराटि म्हणे नर्तक हो कीं वादक तथैव गायन हो ॥
सारथि हो यासमयीं एकहि वश कौरवासि गाय न हो ॥ १५ ॥
ऐसें वदे कवच दे त्या श्रित-कुशला-वहास[2] ल्यायाला ॥
तद्धारणीं चुके तो कन्या पाहूनि हांसल्या याला ॥ १६ ॥
स-त्वर बृहन्नडा नृप-सुत-रथ घेऊनि जाय बाहेर ॥
त्यासि म्हणे हेरावें म्हणसी कुरु[3]-कटक काय बा हेर ॥ १७ ॥
कुरु-कटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला ॥
स्व-पर-बळाबळ[4] नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥१८॥
बोले बृहन्नडे हें कुरु-बळ कल्पांत-सिंधुसें गमतें ॥
ने रथ पुरांत माझें नयन मनहि पाहतां बहु भ्रमतें ॥ १९ ॥
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रोण भीष्म ज्या कटकीं ॥
त्यांत मरेनचि शिरतां काट्यावरि घालितां चिरे पट[6] कीं ॥ २० ॥
पार्थ ह्मणे राज-सुता आतां वदतोसि हें अहा काय ॥
शय्येवरि न पडाया योग्य रण-क्षिति वरीच हा काय ॥ २१ ॥
तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि आतां असें कसें वदसी ॥
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकळा सदसी ॥ २२ ॥
निज[7]-वृत्ति-रसीं लोभी हो साधो बुद्धि अन्यथा न करीं ॥
निज-हित-लोभें धरितो शिशुहि मुखीं एक अन्य थान करीं॥२३॥
मरतीच न दाखविती[8] पाउलहि पळोनि तोंड लेंक विर्त्या ॥
म्हणती सद्यः कीर्ति-प्रज्ञा-घ्न-स्पर्श[9] तोंडलें कवि त्या ॥ २४ ॥
ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटक-बागुलासि पोर पळे ॥
शत्रु-प्रताप-दाव-ज्वालांनीं तो कुरंग होरपळे ॥ २५ ॥
वाटे पुढें पळे ती स्त्री-संग[10]-विरक्त-धी कुमार[11]-मणी ॥
पुत्र-स्नेहें धांवे त्या मागें शंभुची उमा रमणी ॥ २६ ॥

---

१ ( किं+अपि ) = कोणतें ही; हें गीताचें विशेषण. २ (श्रित+कुशल+आवहास ) आश्रितांचें कल्याण करणाऱ्या ( अर्जुनाला ). ३ बा, कुरुकटक हेरावें म्हणसी काय ! हेर ( पहा ) असा अन्वय. ४ आपलें व शत्रूचें बळ व अबल. ५ प्रलयकालच्या समुद्रासारखें. ६वस्त्र. ७क्षत्रियाच्या कर्मांची (युद्धाची) आवड धर. ८बापाला. ९कीर्ति आणि प्रज्ञा(बुद्धि) ह्यांचा नाश करणारा आहे स्पर्श ज्याचा; हें तोंडल्याचें विशेषण. १० स्त्रीसंगा विषयीं विरक्त आहे बुद्धि ज्याची, हें कुमार मणी ह्याचें वि० ११ कुमार श्रेष्ठ-कार्तिकस्वामी.

उत्तर ह्मणे नको गे पायां पडतों बृहन्नडे सोड ॥
जोड दिली, दुखवुं नको केवळ पितृ-कर-तळस्थ हा फोड ॥ २७॥
कुरवाळोनि ह्मणे गा राज-सुता योग्य तूं न कांपाला ॥
मृदुलत्व म्लानत्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला ॥ २८ ॥
तुज उत्साह नसे तरि करितों घेउनि धनूस मी रण हो ॥
मज मेघासि कराया शर-वृष्टि सहाय तूं समीरण हो ॥ २९ ॥
बैस रथीं तूं माझ्या सारथि हो तरणिचा जसा अरुण ॥
न्यावा चमूवरि तुवां रथ तरुणीप्रति जसा स्मरें तरुण ॥ ३० ॥
आतां सोडवितों पशु खल-बल पल न लगतांचि पळवीतों ॥
मी विजय असें तुजचि न सकळां ही कौरवांसि कळवीतों॥ ३१॥
धृत-रश्मि कुमार ह्मणे दारुक कीं आज मातली लाजो ॥
दंड करावा या कुरु-सेनेला योग्य मातलीला जो ॥ ३२ ॥
काढूनि शंखवलयें ल्याला पुं-भूषणें सितें वस्त्रें ॥
बांधूनि केश माथां प्राङ्मुख होऊनि आठवी अस्त्रें ॥ ३३ ॥
जातां कुरु- कटकावरि वाजविला दिव्य देवदत्त-दर ॥
तो होय जना जैसा कल्पां-तीं रुद्र-देव दत्त-दरें ॥ ३४ ॥
भ्याला उत्तर त्यातें जिष्णु ह्मणे पावलासि कांप दरें ॥
अद्यापि बांधिलेंसे तुझिया मतिनें अ-धैर्य कां पदरें ॥ ३५ ॥
हांसोनि ह्मणे हरि-सख हो गाढासन विकंप-धी धीट ॥
नधरीं बा दर हा दरें सादरें दे वाजवूं पुन्हा नीट॥ ३६ ॥
द्रोण ह्मणे न दिसे जय कां करितां आननें नत पहारे ॥
आला विजय ज्याचें श्री-शंभु-तपापुढें न तप हारे ॥ ३७ ॥

---

१ तुला हवी ती देणगी देतों. २बापाच्या करतळावर असणारा. ३ हा मा, (करतळावरील फोडा प्रमाणें बाप मला जपतो) हें तात्पर्य. ४बाणांची वृष्टि, पर्जन्य, जलवृष्टि. ५ शंखाची केलेलीं वलयें ( चुडे ). ६ पूर्वाभिमुख. ७ महादेव. ८ दिलें आहे भय ज्यानें असा. ९ दृढ आहे आसन ज्याचें असा(हो)—घळकट बैस. १० निर्भय. ११ भय. १२ शंख. १३मनापासून. १४ज्याचें तप (तपश्चर्या) श्रीशंभुच्या तपापुढें (सामर्थ्यापुढें) न हारे असा अन्वय. ह्याची कथा अशी आहे कीं, पाशुपतास्त्र मिळावें म्हणून अर्जुन हिमालयावर शिव-प्रसादार्थ उग्र तप करीत असतां त्याच्या बलाची परीक्षा पाहाण्याकरितां शिवानें भिल्लाचें रूप घेतलें आणि एक रानडुकर उत्पन्न केला. तो रानडुकर अर्जुन तप करीतहोता तेथून कांहीं अंतरावरून जातांना त्यावर दोघांनीं एकदम बाण सोडून त्याचा प्राण घेतला, आणि तो मीं मारिला मीं मारिला असें म्हणून दोघे ही त्या विषयीं भांडूं लागले आणि हातघाईवर आले. तेव्हां अर्जुनानें महान् पराक्रम करून शिवाला जेर केलें; तेणें करून शिव प्रसन्न होऊन त्यानें अर्जुनास पाशुपतास्त्र दिलें; ह्या कथेस लक्षून हें लिहिलें आहे.

गांधार ह्मणे गुरुजी पण न करुनि पूर्ण हा भंकटला हो ॥
पुनरपि वन-वास करू गुरु-घातक[1]-पातक भंकट लाह्रो ॥ ३८ ॥
कर्णाश्वत्थामांसि ह्मणे तुमचे विजयी असोत हात रणीं ॥
शर[2]-पटलोच्छादित हो अर्जुन-शस्त्र-प्रताप हा तरणी ॥ ३९ ॥
गुरुजीस काय पुसतां चापीं गुण मह्रचेंचि चढवा हो ॥
यांला हेंचि ह्मणावें कीं आम्हां धर्म-शास्त्र पढवा हो ॥ ४० ॥
पढवावें मात्र इहीं भेदावें पर-[3]हृदब्ज कटुक वचें ॥
कीं दूरूनि दिसावे प्रेक्षक-दृष्टीस युद्ध-पटु कवचें ॥ ४१ ॥
प्रार्थुनि पुढें करावें हे यज्ञीं कीं सुभोजनावसरीं ॥
सिंधूंत तरेल कशी जी केली केलि[4]-हेतु नाव सरीं ॥ ४२ ॥
खळ-कृत गुरु-[5]निंदेतें वर्णिल कधीं न विस्तरें सु-कवी ॥
कीं तीं श्री-गुरु-भक्ति-प्रेमा-मर-[6]पादपांकुरा सुकवी ॥ ४३ ॥
त्यासि कृप म्हणे कर्णा सुज्ञांहीं ऐकतांचि डोलावें ॥
ऐसेंचि बोलणें जरि तरि पुरुषानें दहांत बोलावें ॥ ४४ ॥
तूं नीति-विरुद्ध वदसि साहस हें फळ न दे वचनें-यज्ञ ॥
अद्भुत कर्म करूनिहि बा न वदति एकही वच नय-ज्ञ ॥ ४५ ॥
घालूं पाहसि दंष्ट्रा उपडाया अहि-मुखांत आंगोळी ॥
ऐसें साहस करितां होइल तनुची क्षणांत रांगोळी ॥ ४६ ॥
कंठीं बांधूनि शिळा बाहु-बळें सागराशि तरशील ॥
परि साहसें न विजया; हें शील नसो, असो इतर शील ॥ ४७ ॥
सर्वहि मिळोनि भांडूं कर्णा व्हावें न साहसा मान्य ॥
यत्नें नृप-यश रक्षूं आजि नव्हे श्वेत-वाह सामान्य ॥ ४८ ॥
द्रौणि म्हणे एकाकी तूंचि क्षम जिष्णु-वारणा सूतें ॥
बहुधा बद्ध कर्मीलचि लूतेचें जिष्णु[11]-वारणा सूत ॥ ४९ ॥

१ गुरुहत्या करणाराचें पातक. २ बाणांच्या समुदायानें, पक्षीं, मेघांनीं झांकलेला. ३ दुसऱ्याचें हृदय हेंच कमळ. ४ क्रीडा हाच आहे उद्देश जीचा अशी. ५ गुरुनिंदा. ६ श्रीगुरुभक्तीचें प्रेम हाच कल्पवृक्षाचा अंकुर, त्यास. ७ शुष्क तोंडचा यज्ञ. ८ हा साहसाचा स्वभाव. ९ अर्जुनाचा पराभव करण्यास. १० सारथी कर्ण; हा सारथ्याच्या राधानावाच्या बायकोस लहानपणीं सापडला व तिनें त्यास वाढविलें म्हणून त्याची सूत, सूतपुत्र, राधेय अशीं नावें आहेत. ११ ऐरावताला.

करिसि वि-कथ्थन जिंकुनि नेलें नसतां हि गोधन शिवेतें ॥
स-त्त्विय शुचि यश कर्णा भलत्या न करुनि शोध न शिवे तें॥५०
पावोनि सर्व महितें वि-गुणाहि गुरूसि जे कुल-ज नर ते ॥
सत्कारिति अलि कमलीं तेंवि गुरू-पदीं महा-कुल[1]-जन रते॥५१॥
राधेया[2] उद्धत तूं हा दुर्योधन हि फार उद्धत रे ॥
गुरु-निंदक हो स्पष्ट व्यसनांत बुडे अ-शुद्ध शुद्ध तरे ॥ ५२ ॥
सिंव्हासीं द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ॥
कां भ्रमलासि कसा त्वां जय पावावा रणांत उरणा[3] रे ॥ ५३ ॥
दुर्योधन नमुनि म्हणे गुरुजी मज अरि-करीं न सोपावें ॥
तेजो-जनना[4]र्थ असें वदलों त्वन्मत्सरीं नसो पावें ॥ ५४ ॥
हांसोनि द्रोण म्हणे आम्हां कोपो नदेचि वत्सलता ॥
नसतें क्षमाकवच[5] तरि त्वद्दयीं त्व-च्छब्द अशनिवत् सलता ॥५५ ॥
भीष्मासि मग म्हणे नृप पुसतों अ-ज्ञात-वास-पण पुरला ॥
कीं कांहीं मासतरी पक्षतरी दिनतरी असे उरला ॥ ५६ ॥
भीष्म म्हणे गांधारे पांडव पंडित खरे न दभ्र[6]-मती ॥
न भ्रमले. जे प्राकृत तेचि मनीं धरुनिया मद भ्रमती ॥ ५७ ॥
कामी कोपी लोभी जे संसारांत पावति भ्रमते ॥
प्राकृत पंडित पांडव असते तरि हे हि केंवि न भ्रमते ॥ ५८ ॥
शास्त्र[7]-मतें मास-द्वय पांचां वर्षांत अधिक लेखावें ॥
अ-ज्ञात-वास यास्तव सरलाचि असेंचि तत्व देखावें ॥ ५९ ॥
तेरा वर्षांत अधिक दश पक्ष द्वादश क्षपा पडती ॥
चांद्र-शरन्मानें[8] हे संख्या संख्यावंदा[9]-दृता घडती ॥ ६० ॥
एवंचें[10] चांद्र-मानें तेरा ही स्पष्ट सारिले अब्द ॥
सत्य-प्रतिज्ञ पांडव लागों देतिल न आपणा शब्द ॥ ६१ ॥
येतां अ-न्याय-लवें अल्पायासेंहि इंद्र-पद पदरा ॥

---

१ मोठ्या कुलांत झालेला जन. २ राधापुत्रा कर्णा. ३ हे मेंढ्या ४ ईर्षा उत्पन्न व्हावी म्हणून. ५ क्षमारूप चिलखत. ६ अल्पबुद्धीचे. ७ शास्त्रमानानें. ८ चांद्रवर्षाच्या मानानें—चांद्रमानानें वर्षाचे दिवस सुमारें ३५४ व सौरमानानें सुमारें ३६५ $\frac{1}{4}$ असतात. चांद्रमानाचा सौरमानाशीं मेळ घालण्यासाठीं चांद्रमानाच्या पांच वर्षांत सुमारें २ महिने अधिक धरितात. ह्या मानानें १३ वर्षांत चांद्रमानाचे ५ महिनें व १२ दिवस जास्त धरिले जातात. ९ ( संख्यावत् + आदृता ) ज्योतिःशास्त्र जाणणाऱ्या पंडितांस मान्य. १० ह्याप्रमाणें पाहिलें असतां.

हूं[1] न म्हणतील काळापासुनिही पावतील हे न दरा ॥ ६२ ॥
युद्धें करूनि पाक्षिक जय त्यांतहि विजय पातला सम्ररा ॥
सम रामा[2]शीं व्हा हो शम राज्य-सम-र्पणें हटें न मरा ॥ ६३ ॥
कुर्व-धम म्हणे युद्धचि हो सख्य न हो पितामहा यासीं ॥
शक्रहि बुडेल यातें मद्धृतं[3] पद ओपितां महायासीं ॥ ६४ ॥
पार्थ म्हणे वैराटे रथ कुरु-कटका समीप राहूं दे ॥
गोधन हरावयास्तव भट आले कोण कोण पाहूं दे ॥ ६५ ॥
तो गुरु[4], तो गुरु-नंदन, तो कृप, तो कर्ण, तो पितामह, रे ॥
यांहीं धेनु वळाव्या शिव शिव गोपाळ रामकृष्ण हरे ॥ ६६ ॥
रे उत्तरा शकुनिचा[5] या व्यूहांत न दिसे मला भाचा ॥
त्या वांचुनि यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा ॥ ६७ ॥
हें कटक सोड तिकडे चाल तुझ्या हरुनि गोधना खळ तो ॥
प्राण-त्राण[6]-परायण जिकडे निर-पत्रपा[7]-ग्रणी पळतो ॥ ६८ ॥
उत्तर निज तुरगातें द्याया अरुणासि[8] कौतुक पिटाळी ॥
तों गर्जोनि कुरु-कटक-कर्णीं बसवी ध्वज-स्थ कपि[9] टाळी॥६९॥
कोठें जाल उभे रे मत्स्ये-श्वर-धेनु-पश्यतो[10]-हर हो ॥
सोडा गोधन नाहीं तरि वधिन तुम्हांसि वश्य तो हर हो ॥ ७० ॥
खल-बल-जलधि-निमग्ना धेनु उसळल्या अलाबु जाल्या हो ॥
हांसुनि विजय मनिं म्हणे कां गोप-सख्या[11] मला बुजाल्या हो॥७१॥

१ हें स्वीकारार्थक अव्यय. २ रामचंद्र जसा नीतीस्तव राज्य त्याग करून वनवासास गेला, तसे तुम्ही न्यायास अनुसरून पांडवास राज्य द्या; असा भाव. ३ मद्धृत पद ( मी घेतलेलें राज्य ) यातें ( अर्जुनातें ) ओपितां शक्रहि महायासीं ( मोठ्या संकटांत ) बुडेल—असा अन्वय. ४ कौरव पांडवांचा गुरु, द्रोणाचार्य. ५ शकुनीचा भाचा—दुर्योधन. ६ प्राण राखण्या—विषयीं तत्पर ७ ( निर्+अपत्रपा+अग्रणी ) निर्लज्जां मध्यें श्रेष्ठ. ( दुर्योधन ) ८ सूर्याचा सारथी अरुण हा सूर्याच्या घोड्यांना जो वेग देतो, त्यापेक्षांही उत्तर आपल्या घोड्यांस ज्यास्त वेग देता झाला; असा भाव. ९ एका समयीं अर्जुन व मारुति ह्यांचा एक मेकाच्या बळाविषयीं कांहीं पण पडला असतां अर्जुनास कृष्णाचें साहाय्य असल्यामुळें त्यांत मारुति हरला; तेव्हां कृष्णमतें असा नियम ठरला कीं, "मारुतीनें प्रत्येक युद्धप्रसंगीं अर्जुनाच्या ध्वजावर बसून आपल्या गर्जनेनें शत्रूंस भयभीत करावें." ह्या वरूनच अर्जुनास कपिध्वज हें नांव पडलें आहे. १० विराट राजाच्या गाईचे चोर. ११ गवळ्याच्या ( कृष्णाच्या ) मित्रास. जो गोपसख त्यास गायींनीं बुजूं नये हें तात्पर्य.

गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छ-भार वाहोनी ॥
राहूनि निश्चल क्षण विजय निवे त्यांकडेचि पाहोनी ॥ ७२ ॥
येतांचि विक्रम-लवें श्री-हरिचा दयित दास वीर गडी ॥
हरि करि-घटेसि जैसा त्या कुरु-सेनेसि वासवी रगडी ॥ ७३ ॥
त-त्काळ उत्तरें तो नेला कर्णाकडेचि रथ, वातें ॥
घन गिरिकडे, सुवैद्यें त्वौ-षध रुग्णाकडेचि अथवा तें ॥ ७४ ॥
दव जेंवि तृणा-वरणा[1] वृष भस्म करी महा शरा-वरणा ॥
पार्थ म्हणे करितो गिरिश-कमंडलुशीं[2] पहा शराव रणा ॥ ७५ ॥
होते यदं-श-शेष-श्वास-ज्वलनांत[3] हे समिद् धरणी ॥
त्याचा सखा धनंजय होय खल-शलभ-लया समिद्ध[4] रणीं ॥७६॥
मग गगन-ग-नग-भिं-न्मुख-सुर-मत-गुरुसींहि[5] अ-नर्व[6] मुनि नर तो॥
कलह करी कीं इतरीं गुरु-कलहीं यासि जन वमुनि न रतो॥७७॥
गुरुला विविध शरांची वाहे तो राग-राशि लाखोली ॥
भेटे अस्त्र-तति तया जशि पाहों[7] सागरा शिला खोली ॥ ७८ ॥
करिती सूर्या-स्तो-दय एक मुहूर्तांत एक शतदा ते[8] ॥
त्यांत न एका-समही होती मेघा असेहि शत दाते ॥ ७९ ॥
द्रोणा-र्जुन तुल्य-क्रिय बिंब प्रतिबिंबसेचि[9] ते गमती ॥
किति कुरु-कटकें भेक्षक वृत्र-घ्नाचींहि लोचनें भ्रमती ॥ ८० ॥
अश्वत्थामा धांवे रक्षाया संकटांत जनकास ॥

---

१ गवताच्या आच्छादनास. २ महादेवाच्या कमंडलूबरोबर. ३ ज्या कृष्णाचा अंश जो शेष त्याच्या श्वासाच्या अग्नीमध्यें. प्रळय काळीं प्रखर सूर्यकिरणांनीं पृथ्वी तापून ती आग शेषाच्या मस्तकास पोचली असतां तो फूत्कार करितो, व त्यायोगानें सर्व पृथ्वी जळून जाते; अशी कथा आहे. ४ फार पेटलेला. ५ गगनांत गमन करणारे आणि नगभित् ( पर्वताचा भेद करणारा ) म्हणजे इंद्र तो आहे प्रमुख ज्यांत असे जे सुर म्ह० देव त्यांना मान्य जो गुरु( द्रोण ), त्याबरोबर. ६पुराणऋषि. अर्जुन हा नर नारायणां पैकीं नराचा अवतार होय. उत्तरार्ध—यासि ( क्षत्रियधर्मास अनुसरून मात्र केलेल्या कलहास ) वमुनि (खेरीज करून) इतरीं गुरुकलहीं ( दुसऱ्या कोणत्याही गुरूच्या कलहांत ) जन न रतो; असा अन्वय. ७ पाहण्यास. ८ एकानें आपल्या बाणांच्या वृष्टीनें सूर्य झाकून टाकावा, व दुसऱ्यानें त्या बाणांचा छेद करून पुनः सूर्याचा उदय करावा, असे ते एक एक ( प्रत्येक ) मुहूर्तांत शेकडों वेळां करीत होते; हा भाव. ९ कोणतें ही प्रतिबिंब ( प्रतिछाया ) ज्या पदार्थाचें असतें, त्या पदार्थास ( त्या प्रतिबिंबाचें ) बिंब म्हणतात. पदार्थ आणि त्याचें प्रतिबिंब हीं जशीं सर्वांशीं सारखीं असतात, तसे द्रोण व अर्जुन पराक्रमानें आगदीं सारखे भासले.

जन कासया विते सुत कसिते[1] न करावया भजन कास ॥ ८१ ॥
सांवर्तिक[2] मेघांच्या लाजाव्या द्रौणि-सायकां[3] धारा ॥
स-ताताहुनि होइल सुत म्हणवायासि हाय कां धारा ॥ ८२ ॥
बहु कल्पना सु-कविसा विजयहि बहु शर-परंपरा[4] व्याला ॥
भंगू पाहे समरीं गुरु-पुत्रासहि जसें पराव्याला ॥ ८३ ॥
प्रतिरव-मिषें[5] शरांनीं भरतां कुंथावयासि नभ लागे ॥
देवी म्हणति सख्यांनो दारुण हा क्षात्र-धर्म न भला गे ॥ ८४ ॥
झाले भाते समरीं आणाया गुरुसुतीं उणीव रिते ॥
देती सामग्री जय तरि कां सद्रीतिला गुणी वरिते ॥ ८५ ॥
भंगे अश्वत्थामा अश्वत्था मा कंचित्[6] सदा हरिला ॥
तसि इतरासि जयश्री नित्य हरिजनासि तो तिणें वरिला ॥ ८६ ॥
सुरपुष्पवृष्टिला[7] न स्पर्शो[8] देती तया तदिषुवृष्टी[9] ॥
कीं मधुपचुंबितो[10] त्या पतितो[11] त्यांच्या पडो नये दृष्टी ॥ ८७ ॥
हरुनि यशोधन गोधन योध न गणितां क्षयासि नेऊन ॥
त्या नृपपुत्रास म्हणे चाल पुरा हें मनींच ठेऊन ॥ ८८ ॥
झांकी वपुला क्षतजें, बसतां मर्मी अरीषु, न्हाल्याला[12] ॥
झाला सारथि पहिल्या योषावेषासि[13] तो पुन्हा ल्याला ८९ ॥
विजयी विराट इकडे ये पूजिति पौर विप्रजन यातें ॥
येतांचि सभेंत पुसे प्रेमें त्या उत्तरा स्वतनयातें ॥ ९० ॥
जन कथिति धेनु कुरुनीं वळिल्या येऊनि उत्तराशेला[14] ॥
त्वत्कीर्तिनें[15] पसरिला स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला ॥ ९१ ॥
गेला कुरु जिंकाया आहे सारथि बृहन्नडा, गमला ॥

---

१ सुत भजन(सेवा)करावया (जर) कास न कसिते,(तर)जन(त्यांस)कासया विते ? असा अन्वय. २ प्रलयकालसंबंधी. ३ अश्वत्थाम्याच्या बाणांस. उत्तरार्ध-हाय म्हणवायास ( अरे रे हा कुपुत्र निघाला म्हणून दुःखाचे उद्गार काढविण्यास) सुत सत्ताताहुनि (पराक्रमी बापापेक्षां) धारा (कर्मा योग्यतेचा) कां होईल? असा अन्वय. तात्पर्य,अश्वत्थामा द्रोणापेक्षां पराक्रमानें कमी नव्हता. ४ बाणांच्या पंक्ति. ५ प्रतिध्वनीच्या मिषानें. ६ फक्त शनिवारींच अश्वत्थ ( पिंपळ ) ह्यापासीं लक्ष्मीचा वास असतो, अशी प्रसिद्धि आहे. ७ देवांच्या पुष्पवृष्टींस. ८ अर्जुनाला. ९ अर्जुनाच्या बाणवृष्टि. १० भ्रमरांनीं चुंबिलेल्या. पक्षीं, मद्यपालोकांनीं चुंबिलेल्या. ११ पडलेल्या, पक्षीं, भ्रष्ट. १२ मर्मी बाण लागून रक्तानें भिजलेल्या शरीरास झांकी. १३ स्त्रीवेषास. १४ उत्तरदिशेला. १५ त्वत्कीर्तिनें स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला पसरिला, हा अन्वय, तुझ्या कीर्तीनें उत्तरापुढें पदर पसरून, मासें रक्षणकर अशी विनंति केली. तुझी कीर्ती राखण्या करितां तो युद्धास गेला; हें तात्पर्य.

सत्य कुमारचि, वदला लागो अपकीर्तिचा न डाग मला ॥ ९२ ॥
भूप म्हणे कुरु होतिल वारे, करितील आजि अभ्र मुला ॥
दुःख सुदेष्णेला जें शिरतां सिंव्हांत कलभ अभ्रमुला ॥९३ ॥
देवीं कुमार आला सोडविल्या धेनु पळविलीं कटकें ॥
न वय प्रमाणं तेजस्विजनीं म्हणति कवी न तें लटकें ॥ ९४ ॥
धर्म म्हणे आयकिलें दूतांचें वचन चांगलें कानें ॥
राया सुखरोमांचित केलें कीं आजि आंग लेंकानें ॥ ९५ ॥
सारथि बृहन्नडा ज्या तद्विजयें करुत बायका नवला ॥
चिंतामणिगल बालक जो दुर्लभ त्यासि काय कानवला ॥ ९६ ॥
गाजत वाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ॥
ाज मागें मत्स्यांचा हा रिपुशशिराहुबाहु राणा हो ॥ ९७ ॥

## संशय रत्न माला.

संसारसागरांत बुडत असतां परमेश्वरानें आपणास तारावें म्हणून मोरोपंतानें त्याचा धावा केला. भक्ताविषयीं अत्यंत प्रेमळ असा ईश्वर भक्ताच्या हाकेसरसा धांवत यावयाचा, असें असून त्याला यावयास उशीर लागला; हें पाहून, मोरोपंत विलक्षण प्रेमसूचक अनेक प्रकारचे संशय घेत आहे. पुढील आर्यांत ते संशय वर्णिले आहेत, म्हणून ह्या प्रकरणास 'संशय रत्न माला' ( संशयरूप रत्नांची माला ) असें नांव दिलें आहे.

उठतां बहु त्वरेनें कोठें जातां असें तुम्हां देवीं ॥
पुसती झाली जाणो, पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥

---

१ सत्य कुमारचि गमला म्हणजे खरोखर कार्तिक स्वामीच वाटला. २ मुलाला. (उत्तराला). ३ सुदेष्णा ही विराटाची बायको, तिला. ४ हे राजा. ५ अंगांत मोठा पराक्रम असण्यास वय मोठें असावें लागत नाहीं; हें तात्पर्य. ६ चिंतामणि ( इच्छिलेलें देणारें रत्न ) ज्याच्या गळयांत आहे असा बाळक. ७ शत्रु हाच चंद्र त्याला राहूसा रखा (ग्रासणारा) आहे बाहू ज्याचा; हें 'राणा' ह्याचें विशेषण. ८ लक्ष्मी. ९ कोणी कामा करितां बाहेर जात असतां त्याला कोठें जातां असें कोणी विचारिलें तर तो अपशकुन समजून त्याने बाहेर जाऊं नये असें आहे; ह्या गोष्टीस अनुलक्षून हें लिहिलें आहे.

किंवा नारद आला आलापीत स्वकीय सच्चरितें ॥
प्रेमळ गीत तुम्हांला हरि हरिणा परिस बहुत वश करितें ॥ २ ॥
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें ॥
शरणाऽऽगत-भय-शमना यास्तव येणें तुझें नसे घडलें ॥ ३ ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ॥
तच्छुभ-दैव-समीरें त्यावरि करुणा-घन प्रभू वळला ॥ ४ ॥
अथवा येतां झालां तन्मय शिव-तांडवांत कैलासीं ॥
केला असेल गरुडें गर्व पुन्हां काय त्याच बैलासीं ॥ ५ ॥
बहुधा बळिचें द्वार क्षणभरि हि सोडितां नये देवा ॥
न चुकावी छल-पाप-प्रायश्चित्तार्थ साधुची सेवा ॥ ६ ॥
प्रायःसुमुहूर्ताचा शोध करायासि लागला वेळ ॥
होय महत्कार्य परी प्रभुचा तों नित्य सहज हा खेळ ॥ ७ ॥
कीं मी भागवतांचा भाग असें आणिलें मनीं स्वामी ॥
हें सत्यचि परि कैंचा हा भेद प्रभुवरा तुझ्या धामीं ॥ ८ ॥
किंवा तुज एकाकी पाहुनि खळ दैत्य आडवे आले ॥
फुटतां सागर सिकता-सेतूचें काय त्यापुढें चाले ॥ ९ ॥
किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं ॥
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं ॥ १० ॥
किंवा चुकतें कांहीं स्तवनीं तेणेंचि मागुता बससी ॥
तरि हें मन्मूर्खत्व प्रभु तूं दोषज्ञ ही तसा नससी ॥ ११ ॥
कीं कळवाया कर्में धर्में तुज दाविली असेल वही ॥

---

१ गात, गात २ तुमचीं स्वतःचीं. ३ अहो हरि. ४ शरण आलेल्याचें भय नाहींसें करणाऱ्या. ५ त्याचें शुभकारक दैव हाच समीर म्हणजे वायु, त्यानें. ६ येत असतां (वाटेंत) कैलासपर्वतावर शिवाच्या नृत्यांत तर तुम्ही तल्लीन झालां नाहीं ना? ७ एकदा विष्णु कैलासीं शिवदर्शनार्थ गेला असतां त्याचें वाहन गरुड ह्यानें बळाच्या गर्वानें नंदीच्या नाकांत बोटें घालून उपहास केला, तेव्हां त्यास मोठा क्रोध येऊन त्यानें गरुडाला श्वासानें नाकांत ओढून घेतलें; अशा रीतीनें त्याचा गर्वपरिहार केला; अशी कथा आहे. ८ (वामनावतारीं बळीचा) छळ केल्या मुळें जें पाप लागलें त्याच्या प्रायश्चित्ताकरितां. ९ मज सारख्या मोठ्या पातक्यास तारणें हें महत्कृत्य खरेंच. १० मी (ईश्वर) भक्तांच्यामात्र वाट्यास येणारा म्ह० त्यांसच प्राप्त होणारा. ११ युद्धा करितां आडवे आले. १२ वाळूच्या बांधाचें.

त्वद्दृष्टि-पुढें राहे ऐसा पापांत त्यां नसे लव ही ॥ १२ ॥
मीं[1] द्विजराज मयूर-त्राण न केलें अशी धरो लाज ॥
मस्थानीं परि गरुडें सिद्ध असावेंचि लागतां काज ॥ १३ ॥
अथवा स्वस्थचि अससी कीं घेतो नाम रक्षणीं शूर ॥
हें सत्य परि प्रबळ हि बळें[2] दुर्बळ जरि रणीं धणी दूर ॥ १४ ॥
कीं भीतो भ्रांत वृथा मृग-जळ-मग्नासि काय तारावें ॥
सत्यचि हें, परि शिशुचें भय जाया बागुलासि मारावें ॥ १५ ॥
कीं कांहीं व्रत-नियमीं बोलों चालों नये असें झालें ॥
तरि दीन-रक्षणाहुनि अधिक-फळें[3] व्रत कधीं मना आलें ॥ १६ ॥
कीं हाक ऐकतांचि प्रभुला हा रक्षणार्हसें वाटे ॥
वाटे या दुःशीलें[4]-ग्रीष्मीं नव नवें[5] दया-नदी आटे ॥ १७ ॥
कीं पावावें समयीं सदय मनांतून योजिलें जरि तें ॥
तरि जेवीं रुक्मिणीचे[6] चित्ता माझें अधीर मन करितें ॥ १८ ॥
किंवा पुराण[7]पुरुषा संमति बहु भागलासि या कामीं[8] ॥
तुज नीज लागलो तों सजलों मारावयासि हाका मी ॥ १९ ॥
किंवा बरी परीक्षा केल्या वांचूनि न प्रसाद करां ॥
तरि वरि तसाच आंतहि उगाळितां कोळसा प्रयासें[9] करा ॥ २० ॥
कीं धाडिलें पुढें निज नाम करो सर्व[10] सिद्धता आधीं ॥
ऐसें प्रभो म्हणावें तरि तुमचीं चरण-सारसें साधीं ॥ २१ ॥
कीं आर्जविलों[11] नाम-प्रतिनिधि हा अमृत उधळितो स्वैर ॥
न पुसे, न भी, न ऐके, यास्तव दोघांत[12] लागलें वैर ॥ २२ ॥
कीं संमति अभय दिलें कलिला चालावया बरें राज्य ॥

---

१ मी द्विजराज ( पक्ष्यांचा नायक—गरुड ) असतां मयूरत्राण ( मयूरपक्ष्याचें, पक्षीं मोरोपंतांचें रक्षण ) केलें नाहीं; अशी त्यास लाज वाटत असेल. २ सैन्य. ३ (दीनरक्षणापेक्षां ) अधिक आहे फल ज्याचें असें व्रत. ४ हा मी ( मोरोपंत ) जो अत्यंत दुष्ट स्वभावाचा हाच ग्रीष्म ऋतु, ह्यांत ( हे ईश्वरा ) तुझी. ५ भरपूर दयारूप नदी आटे (अटली). ६ तुम्ही जरी प्रसंगीं पावावयाचा संकेत केला असेल तरी तुम्ही अतिप्रिय असून दुर्मीळ आहां म्हणून रुक्मिणीचें मन तुम्हांविषयीं जसें अधीर होतें त्याप्रमाणें माझें मन अधीर होतें हा भाव. ७ म्हतारा व पक्षीं अनादि. ८ दीनांचा उद्धार करण्याच्या कामांत. ९हातास श्रम (मात्र होइल.) १० ज्याना डौल लागत नाहीं अशीं. ११ तुझा नाम हाच प्रतिनिधि ह्याचें ( कोणी ) आर्जव केलें असतां तो यथेच्छ मोक्ष देतो; व तुम्हाला पुसत नाहीं इ०. १२ तुम्हा दोघांत.

परि कोण प्राणि सदय शिंपील बळें दवानळीं आज्य ॥ २३ ॥
किंवा म्हणसि समर्थोऽहं[1] कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं ॥
दीनाऽवनाविणें[2] क्षण देइल दयिता[3] दया कशी वर्तु[4] ॥ २४ ॥
कीं अक्ष-क्रीडेनें[5] हरिलें मन, सर्व कार्य जी चुकवी[6] ॥
तरि बद्ध-मूळ[7] एकचि भजदवन-व्यसन[8] वर्णिती सुकवी ॥ २५ ॥
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे, नसावेंची ॥
वसवा पुरें, पुरे कां म्हणतां, धनवंत कण कसा वेंची[9] ॥ २६ ॥
कीं बहु काळ विसरला फारचि संकोचला सखा लाजे ॥
येत असेल हळु हळू म्हणुनचि एकहि न पादुका वाजे ॥ २७ ॥
कीं श्री-भुज-बंधांतुनि व्हावें त्वां मुक्त म्यांहि तेव्हांची ॥
स्त्री-जित नसोनि होते स्त्रीची समजाविशीच केव्हांची ॥ २८ ॥
कीं नाम स्पर्श-मणि स्पर्शे परि काय करिल खापर मी ॥
संदयहि घालील कसा दुर्दैवाला सुखीं सखा परमीं ॥ २९ ॥
कीं प्रथम मदपराधें तारूं ना म्हणुनि वाहिल्या आणा ॥
प्रभुजी पुरे प्रतिज्ञा, भारत-रणे-वृत्त[10] तें मनीं आणा ॥ ३० ॥
कीं याचकांसि देतां सरले चारीहि[11] मुक्ति-धन-राशी ॥
भक्तिच मज द्या, द्यावें देवाला अमृत योग्य न नराशी ॥ ३१ ॥
कीं जरि म्हणाल असता जन्म-शुचि[12] स्व-पद-नीरजा मिळतो ॥
तरि झकवितां मला अजि चुकला नव्हताचि कीं अजामिळ तो ३२
कीं वाटलें खळाला मुक्ति न द्यावी जशी सुधा सर्पा ॥
तरि ती अघाऽदिकांला द्या सु-वरा भक्तिमात्र मज अर्पा ॥ ३३
कीं अकृपा नावडती आवडती स्त्री कृपा तिचें प्राज्य ॥

---

१ समर्थः ( समर्थ ) अहं ( मी ) कर्तुं ( कोणती ही गोष्ट करावयास ) अकर्तुं (को० गो० नकरावयास); अन्यथा कर्तुं (को० गो० उलट करावयास). २ दीनांच्या रक्षणावाचून. ३ तुमची आवडती दया. ४ वागावयास. ५ सोंगटीं खेळण्यानें. ६ (कार्य करण्यांत ) विघ्न आणितें. ७ दृढ झालेलें. ८ भक्तांचें रक्षण हेंच व्यसन ( छंद ). ९ वेंचतो ( संग्रह करितो ). १० कृष्णानें ' मी शस्त्र धरणार नाहीं ' ही प्रतिज्ञा अर्जुनाचें रक्षण करण्या-करितां मोडली; त्या कथेस अनुलक्षून हें लिहिलें आहे. ११ सरूपता, सलोकता, सायुज्यता, आणि समीपता असे मुक्तीचे चार प्रकार आहेत. १२ जन्मापासून पवित्र.

लोक-त्रयांत् देवा पहिलीचें[1] काय एक मी राज्यें[2] ॥ ३४ ॥
कीं गमलें जरि आधीं[3] म्हणतों दावा स्व-पाद यां[4] लोकीं ॥
जो जो वांछिल जें जें तें द्यावें हें मुधा दयालो कीं ॥ ३५ ॥
कीं आज काल ज्याचा तेणें अधिकार घेतला रागें ॥
तरि हें अश्रद्धेय प्रभ्वंतर[6] ऐकिलें नसे मागें ॥ ३६ ॥
कीं भेटि बहु-दिसां भय भेटाया दीन-बंधुला वाटे ॥
तरि भेटावें विधिनें[7] गेले जाताति साधु ज्या वाटे ॥ ३७ ॥
कीं स्त्री-पूर्व-शिखंडी त्यातें समरांत भीष्म पाहेना ॥
मी ही पहिला पापी तैसें करितां[9] सुकीर्ति राहेना ॥ ३८ ॥
कीं भीशी मज एका उद्धरितां लागतील फार झटें ॥
तरि कोणाहि न कळतां न्यावा झांकूनि दास पीत-पटें ॥ ३९ ॥
कीं लक्षभोजनापरि केला संकल्प संपला देवा ॥
तरि दाते क्षुद्विकलों[1] मग न म्हणति काय या बसा जेवां ॥ ४० ॥
कीं एक मीच उरलों पापी हें बीज ठेविलें जतन ॥
वर्तन[11] स्वकीय मज कां करितें[12] त्वन्नाम मंगलायतन[13] ॥४१ ॥
कीं कार्यबहुत्वें तुज फावेंना यावया जगत्पाळा ॥
तरि रूप घ्या दुजें, ती विद्या कंठीं वसे जशी माळा ॥ ४२ ॥
कीं मागें गुप्त उभा असिसि प्रेमें उभारुनी बाहे[14] ॥
तरि काय बाळकाचें तूं सादर बोल ऐकशी बा हे ॥ ४३ ॥

१ अकृपेचें. २ अधिकार चालविण्याचें स्थान. ३ योग्यता येण्याच्या पूर्वी ४ मृत्युलोकीं आपलें दर्शन (मला) द्या असा अर्थ. ५ विश्वास न ठेवाया जोगें. ६ दुसरा ईश्वर. ७ बारा वर्षानंतर आप्तांची भेट घेणें झाल्यास सांबाच्या देवालयांत भेट घ्यावी असा कांहीं विधि आहे; त्याविधीनें. ८ पूर्वी स्त्री असून ( पुढें पुरुष झालेला) शिखंडी.—कौरव पांडवांच्या युद्धांत भीष्म आटोपेना तेव्हां पांडवानीं, शिखंडीला पुढें करून मागून अर्जुनानें बाण मारावे, असें योजिलें. ह्यांत उद्देश हा कीं भीष्म स्त्रीवर कधीं बाण सोडणार नाहीं. ह्या गोष्टीस लक्षून कवि देवास म्हणतो. ९ मी पूर्वींचा पापी म्हणून मला न पाहणें असें कराल तर. १० भुकेनें व्याकुल झालेल्यास. ११ उपजीविकेचें साधन. १२ तुझें परम मंगलकारक नांव माझ्या मुखीं येत असतां मी खचीत तरल्या वांचून रहाणार नाहीं हा भाव. १३ कल्याणाची जागा. १४ हात.

## वनपर्वांतील जयद्रथकृत द्रौपदीहरण.

धर्मादि पांडव वनवासांत असतां एके दिवशीं मृगया करण्या करितां ते सर्व वनांत गेले होते. आश्रमांत द्रौपदी एकटीच होती. त्याच दिवशीं जयद्रथ ह्या नांवाचा राजा विवाह करण्याचे उद्देशानें सैन्यासह चालला असतां त्या आश्रमा जवळ उतरला होता. तेथें द्रौपदी त्याचे दृष्टीस पडली. तेव्हां तो तिच्या सौंदर्यानें मोहित झाला, आणि तिला आपले रथावर टाकून घेऊन चालला. पुढें लागलींच पांडवांनीं त्यास गांठून त्याचा पराभव करून द्रौपदीस परत आणिलें. हें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे.

रा[1]या धृतराष्ट्राचा प्रिय जामा[2]ता विवाह[3]-काम वनीं ॥
आला जयद्रथाख्य स्व-बळ[4]-भरें कांपवीत ती अवनी ॥ १ ॥
मृगयार्थ पांडुनंदन गेले असतां निजाश्रम-द्वारीं ॥
होती उभी द्रुपदजा, जैसी शंपा नवांबुभृद्वारीं[5] ॥ २ ॥
तीतें पाहुनि झाला तो रावण-साचि पात्र अन्याया ॥
मित्रासि म्हणे चित्ता हेचि बहु-मता नकोचि अन्या या[6] ॥ ३ ॥
जा कोटिका सख्या तूं पूस तिचें वृत्त होय मत्करगा[7] ॥
ऐसें आधीं चतुरा सामें[8] निजकार्य सिद्धिमते[9] कर गा ॥ ४ ॥
सांगुनि निज वृत्त तिचें वृत्त पुसे तीस कोटिक विहितसें[10] ॥
स्वल्पांत तीहि सांगे बोलों शकती न कोटि-कवि-हि तसें ॥ ५ ॥
कळलें कोटिक-वदनें ती कृष्णा स्वभगिनी[11] असें नातें ॥
तन्हि भय न धरी लज्जे- सह पळ कामातुरीं असेना तें ॥ ६ ॥
कृष्णेसि म्हणे माझी राणी हो लाजतीस कां, बस ये, ॥
अंकावरि घेऊं दे आइक सुखकर मदुक्त थांब सये ॥ ७ ॥
राज्य[12]च्युत-संगें श्रम-पात्र करिसि दिव्य देह कां गे हें ॥
श्रीमद्गेह मिळाल्या सेवावीं निर्धनें चि कां गेहें ॥ ८ ॥

---

१ जनमेजया. २धृतराष्ट्राची दुःशला नांवाची मुलगी जयद्रथास (सिंधुदेशाच्या राजास) दिली होती. ३लग्न करण्याची ज्यास इच्छा आहे असा ४आपल्या सैन्याच्या भारानें. ५(नव—अंबु-भृत् वारीं) नव्या मेघसमुदायांत. ६ह्या मला. ७माझ्या हस्तगत. ८सामोपचारानें ९सिद्ध झालेलें असें. १०मुरवतीनें. ११जयद्रथाची बायको दुःशला ही धृतराष्ट्राची कन्या व पांडवांची चुलत बहीण ह्यामुळें जयद्रथाच्या मेहुण्यांची बायको जी द्रौपदी ती त्याला बहिणी सारखीच '.अशा लोक व्यवहारास अनुसरून' कवीनें येथें भगिनी हा शब्द योजिला आहे १२ राज्यभ्रष्ट ( पांडव ) ह्यांच्यासंगतीनें.

त्वां फेडिलेंचि त्यांचें तत्संगें कृश करूनि देह रिण ॥
हो मद्दयिता देइन मन[1] तुज गानासि जेविं दे हरिण ॥ ९ ॥
कृष्णा म्हणे कुबुद्धे खद्योतीं कीटकाधमीं मलिनीं ॥
द्युमणिमति सोडूनि प्रिय-भाव[2] धरील काय रे नलिनी ॥ १० ॥
क्षणमात्र स्वमीं ही वरिली कुशलेच्छुनें[3] न विटलीला ॥
हे आवडली बहुधा त्वन्मतिला जीवनासि विटलीला[4] ॥ ११ ॥
स्पर्शीच मृति-मद हा वीर-परिग्रह[5] महाहिचा मणि कीं[6] ॥
अंड-घटीं[7] द्युमणि-द्युति योग्या नांदावयासि कीं मणिकीं ॥ १२ ॥
त्यजितिल भट तुज समयीं त्यजिति हरि[8] जसे नगासि नग-दाहें[9] ॥
भीम-प्रिया प्रियसखी लवहि न साहेल लंघन गदा हें ॥ १३ ॥
कामांध खळ करीना अन्य करी लेश तरि विवेक पिसा ॥
धांवोनि बळात्कारें हां हां म्हणतां हि तो शिवे कपिसा[10] ॥ १४ ॥
पावे व्यसन अनाथा जाणो विजनांत तापसी ते तें ॥
खळ दे तिला जसा तो पाप-मति दशास्य ताप सीतेतें ॥ १५ ॥
कृष्णेनें भावि नरक-पाताच्या प्रत्ययासि जड लाहो ॥
म्हणउनि कष्ट निजोत्तर-पटें[11] आसुडितांचि दुष्ट पडला हो ॥१६॥
धौम्यासि म्हणे धांवा मजला हें मूर्त पातक[12] विटाळी ॥
रक्षा मज कीर्तीसहि कीं स्वपर-व्यसन-पात[13] कवि टाळी ॥१७॥
पुनरपि कपिसाचि पिसा क्षिप्र धरायास तीवर उगारे[14] ॥
तों धांउनि धौम्य म्हणे न उठ धराया सती-वर उगा रे ॥ १८ ॥
ती नमुनि म्हणे मुनिला न वदावें व्यर्थ दुष्ट हा निपट ॥
वोढिल तरि जीवनही पावेल न एक मात्र हानि पट ॥ १९ ॥

---

१ तुला वश होईन. २ काजव्याविषयीं आपला आवडता पति अशी बुद्धि. ३ आपलें कल्याण करून घेण्याची ज्यास इच्छा आहे त्यानें. ४ तुला आपल्या जिवाचा कंटाळा आला आहे, म्हणून तुला अशी बुद्धि झाली; हा भाव. ५ ही (मी) वीरपत्नी. ६ मोठ्या विषारी सर्पाचा मणिच केवल. ७ ब्रम्हांडोदरांत. ८ सिंह. ९ वणव्यानें पर्वत पेटले असतां. १० माकडासारखा. ११ (जयद्रथानें) ओढलेलें आपलें अंगावरील वस्त्र (द्रौपदीनें) जोरानें ओढतांच. १२ जयद्रथ हेंच मूर्तिमंत-पातक. १३ आपलें व दुसऱ्याचें संकटांत पडणें शाहणा टाळतो. १४ उठून धरावयास धांवला.

भद्रदाङ्गिनें बैसो हे दुष्टरथीं वृकोदर-गदासी ॥
न हरि-प्रसाद-कविची आपन्ना खळ-वृकोदरंग दासी ॥ २० ॥
बसतां स्वरथीं हर्षे तो जेविं दशास्य जानकी-लाभें ॥
धरि पर-रथासी ती कीं स्पर्शाया अंत्यजा न कीला भें ॥ २१ ॥
ती बहु त्यासि दटावी कार्पासा काय दापिना कीला ॥
काय बधेल पराला त्यजुनि सती कायदा पिनाकीला ॥ २२ ॥
जरि तूळ-राशि-मध्य-स्वबिळीं नेईल आखु वातीतें ॥
तरि वाति आखुतें बा सहसा भक्षील आखु वा तीतें ॥ २३ ॥
तत्काळचि साध्वी-धर्षण-कर जङ्कि महातपा मरतो ॥
धौम्य मुनि असें सांगे हित परि जोडी न हात पामर तो ॥ २४ ॥
कृष्णाहि म्हणे काय न कांपिल गिळितां वृकानना शस्त्री ॥
वधि दशमुखा मग करिल एक-मुखाचाहि कां न नाश स्त्री ॥२५॥
अप-शकुनज्ञ युधिष्ठिर समजोनि अनिष्ट सानुज परतला ॥
जो मृगयेंत न चित्तें त्यजुनि दया राम-नाम-जप रतला ॥ २६ ॥
तों मार्गीं भृत्याची भार्या धात्रेयिकाचि आढळली ॥
धांवे पडेहि असकृत् नग-शिखराहुनि जशी शिळा ढळली ॥२७॥
वृत्त कथुनि कोपानल दीप्त करायासि पांडु-योध-मनीं ॥
सरला सुवंशजाती झाली धात्रेयिकाचि हो धमनी ॥ २८ ॥
रिपुला गांठाया ते पांडव देती भरें न घटिकेतें ॥
खळ-बळ बहु भी जाणों न पळहि साधूपुढें अघ टिके तें ॥२९॥
गांठिति रिपुकटकातें हरिणाच्या सिंह जेविं कळपातें ॥
रक्षील काय पतिला तें व्यसनीं होय जें विकळ पातें ॥ ३० ॥
स्वरथावरुनि भूवरि उतरुनि देवीस, जरिहि नाकद न ॥
वरिलें पलायन खळें कीं न पहावेंचि लोचना कदन ॥ ३१ ॥
धर्म स्वरथीं स्त्रीतें मुनितें घेउनि म्हणे पुरोध्यातें ॥

१ शुक्राचार्यांची. २ खळ ( जयद्रथ ) रूप लांडग्याच्या पोटांत गेलेली. ३ आपलें अर्धांग देणाऱ्या महादेवास. ४ (हें धौम्याचें भाषण) कापसाच्या ढिगामधील आपल्या बिळांत. ५ पतिव्रतेची अब्रू घेणारा जरी मोठा तपस्वी असला तरी तो मरतो. ६ ह्या नांवाची. ७ सरळ, पक्षीं, निष्कपट. ८ चांगल्या वेळूची केलेली, पक्षीं, चांगल्या कुळांत झालेली. ९ जें कटक. १० पराभवानें ११ स्वर्ग देणारें. ( पलायनाचें विशेषण ).

व्हा शांत असेंचि प्रिय राज्य-श्रीमोचनें पुरो ध्या तें ॥ ३२ ॥
अर्जुन भीमासि म्हणे न करावें व्यर्थ भीत-भट-कदन ॥
गेला पळोनि बहुधा दुष्ट जयद्रथ न दाखवी वदन ॥ ३३ ॥
भीम म्हणे सपुरोहित राया तूं आश्रमांत जायेतें ॥
निववी, तेंचि करावें तेणें, जें स्वच्छ कर्म जो येतें ॥ ३४ ॥
जा सहदेवा नकुळा तूं ही जा या तिघांसि सांभाळा ॥
लावावा गेलें धन येतां हातासि बोल कां भाळा ॥ ३५ ॥
येतों आतांचि नको साधाया शत्रु-वध मला उशिर ॥
कृष्णा असो, जा आर्या, त्वच्चरणा तो न अधम लाउं शिर ॥ ३६ ॥
धर्म म्हणेरे बा त्या निज भगिनीच्या न उग्र हो तिलकीं ॥
नित्य सुता सौभाग्य-क्षय-शोकें पितर साश्रु होतिल कीं ॥ ३७ ॥
कृष्णा म्हणे अहो जरि मत्प्रिय करणें वधाचि तरि त्यातें ॥
मारावेंचि नयज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें ॥ ३८ ॥
क्रोशमितांतर असतां बीभत्सु म्हणे शरांस कळवा जी ॥
आलों असें अरिसं तो दूर न जावा वधा सकळ वाजी ॥ ३९ ॥
अर्जुन-नामांकित-शर-हत हय पाहून फार तो भ्याला ॥
बहु पाप-जीवितें हि त्या प्रिय, जैसें पाप-वित्त लोभ्याला ॥ ४० ॥
धांवोनि त्यासि सार्जुन भीम महाबळ पळांत आटोपी ॥
ज्याचें चित्त म्हणे स्व-क्रोधौं औवां खलाब्धि आटो पी ॥ ४१ ॥
अर्जुन म्हणे उभारे सिंहत्व त्यजुनियां न कुतरा हो ॥
उतराहो क्षण, पाहों जा यम-भट हो तळीं न उतरा हो ॥ ४२ ॥
रे रे जयद्रथा हें योग्य नव्हे तुज पलायन परत रे ॥

---

१ शांत व्हा, राज्यश्री मोचनें ( आपलें राज्य सोडविल्याच्या योगानें ) असेंचि प्रिय ( इष्ट ) पुरो ( मिळो ) तें ध्या ( असें चिंता. ) . २ ज्याला जेंकर्म उत्तम येतें तें त्यानें करावें. ३ अर्जुन मात्र मजबरोबर असूंद्या. ४ हे धर्मा. ५ तो अधम ( जयद्रथ ) तुला शरण न येवो; तसें झाल्यानें त्याची तुला दया येईल, हा भाव. ६ आपल्या बहिणीच्या ( दुःशलेच्या ) तिलकाविषयीं म्ह० कुंकाविषयीं कठोर होऊं नको, म्ह० जयद्रथास मारून तिला वैधव्य देऊं नको. ७ कन्येच्या वैधव्याच्या दुःखानें. ८ गांधारी व धृतराष्ट्र. ९ कोसभर अंतर. १० जयद्रथास ११ दुष्टाचारामध्यें घालविलेलें आयुष्य. १२ हे क्रोधरूप वडवानला. हा खल( जयद्रथ ) हाच समुद्र पी, हा आटू दे.

अभिमुख मरोनि जरि पळ पळतां न महा-बलायन पर तरे[1]॥४३॥
भीम रथावरुनि उडी टाकुनि धावुनि धरी तया अरितें ॥
वाटे प्रभुचें भीमाकृति खल-बल-दलन-लब्ध-यश-अरि तें[2] ॥४४॥
व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु निघे ॥
कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळांशि ओतुनि घे ॥ ४५ ॥
बुकली भीम, बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो ॥
कीं तो साध्वी-धर्षण-दोष-फलानुभव रोकडा लाहो ॥ ४६ ॥
विकळ जयद्रथ होतां वारी धर्मानुजा गुडाकेश ॥
कीं तत्सत्सेव्य-गुणा[3] कोप न दूषू जसा गुडा केश ॥ ४७ ॥
भीम म्हणे गुरु-दुःखद तो स्त्रीजित[4] साचि हा दया-जित कीं ॥
चालों नदेचि कर्मं मी करितों जीं हितोदया जितकीं ॥ ४८ ॥
हा धर्म दया-जित तुज योग्य सखा स्त्री-जिता दशरथा रे ॥
शर सह्य पार जातां त्वदयींच जनापवाद-शर थारे[5] ॥ ४९ ॥
वत्सा जैसा तो गुरु होतोसि तसाचि तूंहि कां पावें ॥
या पापातें पाहुनि सन्नयनें न नरकें हि कांपावें ॥ ५० ॥
देवूं दे प्राणांत प्रायश्चित्त स्वकीय हा नर कीं ॥
मूर्खहि सुत्दृद्रसावा स्वर्गीं चिरकाळ कीं महानरकीं ॥ ५१ ॥
वधसम विडंबन असें समयींच स्मरण शास्त्र-पाटव दे ॥
अर्धेंदुशरें त्याच्या माथां काढूनि पांच पाट वदे ॥ ५२ ॥
मी पांडव-दास असें स्वमुखें सर्वत्र बोलशील तरी ॥
देईन जीवित तुला तारी विपदब्धि-माजि शील-तरी ॥ ५३ ॥
वंदुनि म्हणे जयद्रथ ऐसेंच म्हणेन मी सदा साचें ॥
मारूं नका बुक्यानीं रक्षावें जीवित स्वदासाचें ॥ ५४ ॥

---

१ पर(शत्रु)जरि महाबलायन(महाबलिष्ठ) (तरी)पळ पळतां न तरे, अभिमुख मरोनि तरे. २ भीमाचें स्वरूप घेणारें, दुष्टांच्या सैन्याच्या नाशापासून मिळविली आहे कीर्ति ज्यानें असें प्रभूचें (विष्णूचें) तें अरि (चक्र—सुदर्शन) च वाटे. ३ त्याच्या (धर्माच्या) सज्जनांनीं सेव्य अशा (दयारूप) गुणास. ४ तो दशरथ. बायको (कैकयी) म्हणेल तसें वागणारा. ५ बाण शरीरांतून पार निघून जातो (म्हणून) तो सह्य (होय); (परंतु) लोक निंदारूप बाण त्वदयांत रुतून राहतो (म्हणून तो असह्य) असा भाव. ६ धर्म.

ज्या-पासुनी धरावी प्रबळतरारातिच्या[1]हि भी मानें ॥
बांधुनि केतुस्तंभीं खळ नेला स्वाश्रमासि भीमानें ॥ ५५ ॥
प्रेषूनि[2] कोटरेतें प्रेम्यानें जेविं बाण राखविला ॥
तैसाचि निजाज्ञेनें जेणें तो त्या प्रभूसि दाखविला ॥ ५६ ॥
धर्म तशासि विलोकुनि भीमासि म्हणे अगा महाबाहो ॥
सोड न विलोकवें मज द्या या असु मृत्युला न हा बाहो ॥ ५७ ॥
भीम म्हणे देवीला सांगा ती जरि म्हणेल सोडीन ॥
नाहीं तरि मी याचा सत्यंचल-कर्ष[3] पाणि तोडीन ॥ ५८ ॥
कां सोडितां असों द्या हा निज दासांत दास राबावा ॥
या काम-हता रक्षा पायांचा द्याचि आसरा बावा ॥ ५९ ॥
कृष्णा धर्मासि म्हणे देवा सोडावयासि सांगा जी ॥
मज देखवे न शिवती निर्दयते-सह अकीर्ति आंगा जी ॥ ६० ॥
धर्म म्हणे रे साधो जाऊं दे सोड दे मला बा हें ॥
जातें त्यजुनि भलेपण न विटावें सुयश तें[4] तया बाहें ॥ ६१ ॥
भीम म्हणे मी पांडव-दास असें तीन वेळ मोठ्यानें ॥
हा खळ म्हणो, भल्याला विनवावें धरुनि पाय खोट्यानें ॥ ६२ ॥
धर्म म्हणे गा भीमा तुज जरि आम्ही प्रमाण तरि सोडीं ॥
न वदे निष्ठुर कांहीं अभय-वितरणें सदीड्य[5] यश जोडीं ॥ ६३ ॥
भीमें गुरु-मंत्र-वश-व्याघ्रें मृगसाचि सोडितां नमनें ॥
धर्मासि करि, वरि लवे मात्र शिरें, दुष्ट अंतरीं न मनें ॥ ६४ ॥
नृप त्यासि म्हणे घ्याया भुजगीच्या झोंबतां नर मणीतें ॥
वांचेल परि पराच्या चित्तेंहि स्पर्शतां न रमणीतें ॥ ६५ ॥
जा, यावरि न करावें पाप असें मागतों, मला दे हें ॥
जें कर्म धर्म-शर्मद[6] त्यासचि संपादितो भला देहें ॥ ६६ ॥

---

१ ज्या भीमापुढें पराकाष्ठेचा बळकट शत्रुही गर्वहीन होतो; हा भाव. २ पुत्र-प्रेम्यानें कोटरेला पाठवून जसें बाणासुराचें रक्षण केलें;—बाणासुर व कृष्ण ह्यांचें युद्ध चाललें असतां शेवटीं आपल्या पुत्राचा नाश होतो असें पाहून बाणासुराची आई कोटरा नग्न होऊन रणांगणांत कृष्णापुढें येऊन उभी राहिली, तेव्हां कृष्णानें खालीं मान घातली, नंतर बाणासुर युद्धांतून परतला, अशी कथा आहे. जेणें (धर्मानें). प्रभूसि (धर्मास). ३ सतीचा पदर ओढणारा हात. ४ (अशा कर्मानें आपणापासून जाणाऱ्या) सुयशास बाहें (बोलाव) म्ह० राख. ५ साधूंनीं स्तुत्य. ६ पुण्यकारक व सुखकारक.

खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवूनि बोळविला ॥
लकुच कटुचि अमृतकरा-करवींहि शर्करेंत घोळविला ॥ ६७ ॥
हर-दर्शनार्थ गंगा-द्वारीं तपतां तया कृपापर तो ॥
भेटोनि म्हणे घे वर कष्टापासोनि मति नृपा परतो ॥ ६८ ॥
मुद्धांत पंचपांडव-परिभव हो मत्करें असेंच वदे ॥
प्रभु-कर्णीं तें बहु कटु वच जाणो गर मुखीं रसें चव दे ॥ ६९ ॥
शंभु म्हणे नारायण-सख नर अर्जुन पुराण ऋषि तातें ॥
धनसें पाशुपतहि म्यां त्यासि दिलें जेविं अमृत तृषितातें ॥७० ॥
मजपासीं तुज द्याया तद्भंगावह असा नसेच वर ॥
हो मशक-मक्षिका-हर गरुडा नाशी असें नसें चवर ॥ ७१ ॥
यश एकदांचि अर्जुन-रहितहि चवघां रणांत भंगुनि घे ॥
मेरु असो, बहु हें ही जरि लंघुनि कुळ-गिरीशि पंगु निघे ॥७२॥
झाला गुप्त महेश्वर तो बालिश मनुजदेव वेदां त्या ॥
प्रभुसहि विटवी मागुनि जें तैशाही न देववें दात्या ॥ ७३ ॥
मागावा कामाद्यरि-परिभव-वर वरदनायका परि तो ॥
सत्परिभव-वर मागे, खळ न पराहित निजाहितहि करितो ॥७४॥
स्वगृहा जाय जयद्रथ विसरुनियां दुःख तें परिभवाचें ॥
दासा-समंजसत्वें क्षोभे मन शांतही परि भवाचें ॥ ७५ ॥

## अभंग-सीतागीत.

रामें वनवासांतून आल्यावर सीतेच्या जावा तिला चौदा वर्षांत घडलेली हकीकत विचारूं लागल्या. तेव्हां सीतेनें त्यांस अयोध्येस परत येईपर्यंत झालेलें सर्व वर्तमान सांगितलें, तें ह्यांत वर्णिलें आहे.

यज्ञासाठीं भूमी नांगरीतां धन्या ॥ सांपडली कन्या सीता देवी ॥ १ ॥
जनकाची पुत्री दुर्जना दुर्मिळा ॥ ती भार्या उर्मिळा लक्ष्मणाची ॥ २ ॥

---

१ दयाशील शिव. २ हे जयद्रथा. ३ ह्या नांवाचें अस्त्र. ४ अर्जुनाचा पराजय करण्यासारखा. ५ हें चवराचें विशेषण. ६ मोठ्या पर्वतास. ७ ज्ञानस्वरूप. ८ जयद्रथाच्या मूर्खपणामुळें. ९ धन्य जो जनकराजा त्यास.

जनकाचा बंधु होता एकनिष्ठ ॥ वयानें कनिष्ठ श्रेष्ठ गुणें ॥ ३ ॥
तेणें भरतासी मांडवी दुहिता ॥ दिली जी सुहिता[1] दोहीं कुळीं ॥ ४ ॥
शत्रुघ्नाला दिली दुजी श्रुतकीर्ती ॥ जीची गाती कीर्ती पतिव्रता ॥ ५ ॥
चवघी बहिणी भाग्यें झाल्या जावा ॥ त्यांचा गीतीं[2] गावा सुसंवाद ॥६॥
वनवासवृत्त सीतेसी पुसती ॥ प्रेमें त्या सुसती तिघीजणी ॥ ७ ॥
सीता म्हणे ऐका वनवास-कथा; ॥ परी मनीं व्यथा न धरावी ॥ ८ ॥
चित्रकूटाहूनी पादुका घेऊनी ॥ वियोगें[3] देउनी तुम्हीं आलां ॥ ९ ॥
आम्हींही तेथूनी तशींच निघालों ॥ वनांत रिघालों तिघे जणें ॥ १० ॥
लक्ष्मण भावोजी मागें पुढें स्वामी ॥ मज आहें धामीं ऐसें वाटे ॥ ११ ॥
न बाधेची मज उष्ण क्षुधा तृषा ॥ तुम्हांपाशीं मृषा न बोलावें ॥ १२ ॥
जेव्हां कांहीं वाटे चालतां मी भागें ॥ मुरडोनी मागें विलोकीती ॥१३॥
बाई काय सांगों स्वामीची ती दृष्टी ॥ अमृताची वृष्टी मज होय ॥ १४॥
अत्रीच्या आश्रमीं नेलें मज वाटे ॥ माहेरची वाटे खरेंखुरें ॥ १५ ॥
अनसूया सती करी वेणी फणी ॥ आनंदाची धणी दिली मज ॥ १६ ॥
आजवरी ओली चंदनाची ऊटी ॥ आली नाहीं तुटी माळागुणीं ॥ १७ ॥
ऋषींतें वंदीत गेलों गोदातटीं ॥ जेथें पंचवटी पुण्यस्थान ॥ १८ ॥
भावोजीनीं केली माझी बहु सेवा ॥ ती त्या महादेवा ठावी असे ॥१९॥
तेथें शूर्पणखी भार्या व्हाया आली॥तिला माझी भ्याली चित्तवृत्ती॥२०॥
भावोजीनीं तिचा कर्ण-नासा-छेद[4] ॥ केला कीं ते वेद-शास्त्रार्थज्ञ[5]॥२१॥
तिचा भाऊ खर होऊनीया क्रुद्ध ॥ करावया युद्ध आला बाई ॥ २२ ॥
चवदा सहस्र राक्षस पापिष्ठ ॥ रणीं केले पिष्ट स्वामीनीं ते ॥ २३ ॥
तिणें घ्राण-रक्तें मूख मळवीलें ॥ वृत्त कळवीलें रावणासी ॥ २४ ॥
छळाचा उपाय मनीं आठवीला ॥ दुष्टें पाठवीला मायामृग[6] ॥ २५ ॥
स्वर्ण-रत्न-मय मृग म्यां देखीला ॥ तो सत्य लेखिला[7] मनामध्यें ॥ २६॥
गृहा आणावया मागें हरीणा मी ॥ दुःख परीणामीं नेणोनीया ॥ २७ ॥
मज रक्षावया लक्ष्मणा ठेवूनी ॥ निघाले घेऊनी धनुर्बाण ॥ २८ ॥
मायामृगामागें जगदेकशूर[8] ॥ गेले बहू दूर अरण्यांत ॥ २९ ॥

---

१ फार हितकारक. २ गीतांत. ३ आम्हाला वियोग दुःख उत्पन्न करून. ४ कान व नाक यांचा छेद. ५ वेद आणि शास्त्र ह्यांचा अर्थ जाणणारे. ६ कपटानें झालेला मृग. ७ खरा मानिला. ८ जगतामध्यें अद्वितीय शूर.

कपटी राक्षस जाणोनीया प्राण ॥ घ्यावयासी बाण मोकलीला ॥३० ॥
तो बाण लागतां त्हदय विदारी ॥ दुष्ट हाक मारी स्वामीवाणी ॥ ३१ ॥
हा सीते हा बंधो लक्ष्मणा ये धांवें ॥ अंतकाळीं पावें भेटावया ॥ ३२॥
मज वाटे माझ्या स्वामींचीच हाक ॥ शिरे कंप धाक त्हदयांत ॥ ३३ ॥
मी म्हणे भावोजी धांवा रक्षा प्राण ॥ हे घ्या चापबाण उठा वेगीं॥३४॥
भावोजी म्हणती राक्षसाची माया ॥ कोण रामराया पाहों शके ॥ ३५॥
वाटलें तें वाक्य सत्य परी खोटें ॥ झालें दुःख मोठें माझ्या मनीं ॥ ३६॥
न वदावें तेंची बोलील्यें मी कोपें ॥ चित्त शब्दरोपें विदारीलें ॥ ३७ ॥
वांछितोसी दुष्टा अग्रजांचा घात ॥ माझ्या आंगा हात लावावया॥३८॥
हात लावीतांची सोडीन मी प्राण ॥ शिरीं पाद-त्राण कोण वाहे ॥ ३९॥
माझ्या दृष्टीपुढें नको राहों जाच ॥ नरकींचा जाच मूर्त तूंची ॥ ४० ॥
ऐशी बाई माझी ऐकतांची वाणी॥डोळां आलें पाणी भावोजींच्या॥४१॥
मातेनें दापीतां वत्स पित्याकडे ॥ जाय तैसें घडे लक्ष्मणासी ॥ ४२ ॥
साधूसी गांजीतां झालें सध्यां फळ ॥ सज्जनाचा छळ करूंनये ॥ ४३ ॥
वाटेंत धनुष्यें ओढोनियां रेघ ॥ गेले दयां-मेघ स्वामीकडे ॥ ४४ ॥
तों आला रावण होवोनी संन्यासी ॥नकळे अन्यासी छद्म त्याचें॥४५॥
भिक्षा द्याया गेल्यें रेघेच्या बाहेर ॥ सासूर माहेर बुडवाया ॥ ४६ ॥
न लंघीतें जरी धनुष्याची रेखा ॥ तरी त्याचा लेखा काय होता ॥ ४७॥
रेघेच्या बाहेरी जसा दिला पाय ॥ झाला महाकाय दशमुख ॥ ४८ ॥
जसा हरीणीतें हरीतो लांडगा ॥ तसा तो दांडगा हरी मातें ॥ ४९ ॥
त्या पाप्याच्या स्पर्शें देह हा कोमेला॥आकाशीं तो मेला रथीं चढे॥५०॥
हा राम लक्ष्मण ऐशी हाक माजी ॥ जटायु मामाजी आयकती ॥ ५१ ॥
सखे दशरथ मामाजीचे आप्त ॥ सोडवाया प्राप्त झाले दैवें ॥ ५२ ॥
जातीचे ते गृध्र वृद्ध मोठे शूर ॥ रथ केला चूर रावणाचा ॥ ५३ ॥
चंचू-नखायुध गृध्र युद्ध-दक्ष ॥ रावणाचें वक्ष विदारी तें ॥ ५४ ॥

---

१ रामचंद्राच्यासारखी. २ शब्दरूप बाणानें. ३ वडीलभावाचा. ४ पाय राखणारा — जोडा. ५ तत्काळ. ६ दयेचा घन ( लक्ष्मण ). ७ रावणाचा पाड ८ मोठें आहे शरीर ज्याचें असा. ९ एका गिधाड पक्ष्याचें नांव, तो दशरथराजाचा मित्र होता म्हणून त्यास सीतेनें मामाजी म्हटलें आहे. १० चोंच आणि नखें हींच आहेत आयुधें ज्याची.

अन्यायें रावण छेदी त्यांचे पक्ष ॥ मज वाटे लक्ष-बंधू-घात ॥ ५५॥
मूर्छीत मामाजी पडले भूवरी ॥ स्कंधीं वाहे अरी मला बाई ॥ ५६ ॥
रडतां काढीले पांच सात नग ॥ वस्त्रखंडीं मग बांधीले म्यां ॥ ५७ ॥
पर्वतीं वानर देखिले म्यां मग ॥ त्यांमध्ये ते नग सोडियेले ॥ ५८ ॥
शत[1]गांवें सिंधू त्यांत एक लंका ॥ तेथें ने कलंका लावावया ॥ ५९ ॥
नेऊनीयां ठेवी अशोकवनांत ॥ न शोक मनांत माये माझ्या ॥ ६० ॥
सहस्र राक्षसी करीती रक्षण ॥ चिंता-तीर[2] क्षण न सांपडे ॥ ६१ ॥
[3]दिव्यान्[4]नाचा ज्यांत नानापरी थाट ॥धाडी नित्य ताट शक्र-भार्या॥६२॥
दिव्यान्नाचें ताट ये मज जवळ ॥ भक्षीं मी कवळ एक दोन ॥ ६३ ॥
फिरले घेऊनी मारीचाचे[5] प्राण ॥ दिव्य धनु-बाण-पाणी[6] मागें ॥ ६४ ॥
मार्गीं लक्ष्मणजी करीती वंदन ॥ श्रीरघुनंदन-चरणांतें ॥ ६५ ॥
म्हणती वत्सा त्वां कां आज्ञा मोडिली॥एकटी सोडिली कां ती वनीं॥६६॥
भावोजीनीं सर्व वृत्त कळवीलें ॥ मुख मळवीलें अश्रू-पातें ॥ ६७ ॥
ऐकोनी बोलीले स्वामी झालें खोटें ॥ राक्षसांनीं मोठें विघ्न केलें ॥ ६८ ॥
दोघांच्या ह्रदयीं धडधड करी ॥ आले झडकरी धांवोनीयां ॥ ६९ ॥
पर्णशाळेमध्यें देखीले कावळे ॥ स्वामींचा मावळे धैर्य-सूर्य ॥ ७० ॥
केला आधीं फार शोध मग शोक ॥ धन जातां लोक करी जैसा॥७१॥
शोधीतां वनांत मामाजी पाहीले ॥ धरूनी राहिले कंठीं प्राण ॥ ७२ ॥
पुसती बापाजी झाली हे कां गती ॥ मामाजी सांगती अर्ध शब्दें ॥७३ ॥
स्वामीपाशीं माझें सांगतां हरण ॥ पावले मरण शोक-भरें ॥ ७४ ॥
हा तात हा तात म्हणूनी रडले ॥ मूर्छीत पडले घडीभरी ॥ ७५ ॥
मामाजीची सांग संपादिली क्रिया॥त्या काळीं हे प्रिया नाठवीली ॥७६॥
पुन्हा वनीं मातें रडत शोधीती ॥ लक्ष्मण बोधीती नानायत्नें ॥ ७७ ॥
आलिंगिल्या वल्ली वियोगें भ्रमले ॥ शोधीतां भ्रमले रात्रंदीस ॥ ७८ ॥
वनीं कबंधानें[11] केला होता घात ॥ चार कोस हात लांब त्याचे ॥ ७९ ॥

---

१ सुमारें चार कोश २ काळजीचा शेवट, मी नेहमी चिंताग्रस्त असें हा भाव. ३ स्वर्गांतील अन्न. ४ इंद्राणी. ५ मारीच हा मृग झालेला राक्षस. ६ धनुष्य आणि बाण ज्यांच्या हातीं आहेत असा. ७ वाईट ८ प्राणव्याकुळ झाल्यामुळे शब्दोच्चार पूर्ण होत नव्हता, म्हणून अस्पष्ट शब्दांनीं. ९ मेलेल्याचे उत्तर संस्कार. १० मी ( सीता ). ११ राक्षस—विशेष; ह्यास डोकें नव्हतें.

धरीतां खड्गांनीं केला भुज-च्छेद ॥ शापताप देख निवारीला ॥ ८० ॥
मतंगमुनीच्या आश्रमीं शबरी ॥ व्हाया यश बरी युक्ति[2] सांगे ॥ ८१ ॥
हनुमंतावरी केली अनुकंपा ॥ या प्रभूनीं पंपा-सरोवरीं ॥ ८२ ॥
सुग्रीवासीं भेटी ऋष्यमूकीं झाली ॥ त्याची दृष्टी धाली पहातांची ॥ ८३ ॥
त्याच्या मुखें वृत्त आयकीलें मग ॥ आणूनी ते नग दाखवीले ॥ ८४ ॥
सुग्रीव वानर सूर्याचा तनय ॥ ज्या स्वमीं अनय नाहीं ठावा ॥ ८५ ॥
दोषावीणें रागें सुग्रीवासी जाची ॥ त्याच्या अग्रजाची बुद्धी खोटी ॥ ८६ ॥
बंधूची स्त्री वाळी बळात्कारें भोगी ॥ सुग्रीव तो जोगी केला होता ॥ ८७ ॥
एकें बाणें वाळी स्वामीनीं मारीला ॥ सुग्रीव तारीला संकटांत ॥ ८८ ॥
वानरांचें राज्य दिलें सुग्रीवाला ॥ तो फार निवाला ऊपकारें ॥ ८९ ॥
माजी वार्ता कोणा न कळे किमपी ॥ पाठवीले कपी शोधावया ॥ ९० ॥
न लागतां माझा शोध कपी सारे ॥ म्हणती ते हा रे दुरदृष्टा ॥ ९१ ॥
मारील सुग्रीव लंघीला आवधी ॥ मरावें नवधीं करूं नये ॥ ९२ ॥
समुद्राच्या तीरीं पर्वतीं रडले ॥ मराया पडले उपोषीत ॥ ९३ ॥
धिक्कार आम्हांला झालों सेवाचोर ॥ व्यर्थ मृत्यु थोर खेद वाटे ॥ ९४ ॥
श्रीरामाची भार्या सोडवीतां मेला ॥ जटायू तो गेला सद्गतीसी ॥ ९५ ॥
ऐसी जी बोलीले वाणी दे कंपा ती ॥ विचारी संपाती गृध्रराज ॥ ९६ ॥
वार्ता वाटे कानीं पडतां शंपा ती ॥ रडला संपाती बंधू-शोकें ॥ ९७ ॥
त्याणें सांगीतली त्यांला माझी शुद्धी ॥ त्या कवीची बुद्धी समदृष्टी ॥ ९८ ॥
शत गांवें वाई मारुती उडाला ॥ पुण्यें न बुडाला सागरांत ॥ ९९ ॥
[11]पुरीं शोधी होय सशोक मनांत ॥ अशोकवनांत मग आला ॥ १०० ॥
तो रात्रीं रावण [12]माथीं बडबडे ॥ बुद्धी गडबडे मारुतीची ॥ १०१ ॥
पाण्यापरीस मीं पातळ तो केला ॥ मग रागें मेला असें म्हणे ॥ १०२ ॥
दों मासांत मान्य न, होतां हे [13]मारा ॥ राक्षसी हो चारा मांस मज ॥ १०३ ॥

---

१ कबंध हा मूळचा एक गंधर्व असून ऋषीच्या शापानें राक्षस झाला होता; सांप्रत रामानें त्याचा वध केल्यामुळें तो शापमुक्त झाला; हें तात्पर्य. २ ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीव वानर आहे त्याचें साह्य घे म्हणजे तुला सीतेचा शोध लागून तुझें कार्य होईल अशी युक्ति शबरीनें रामास सांगितली. ३ पर्वत विशेष. ४ वाळीची. ५ हारे दुष्ट दैवा. ६ दुसरा विचार करूं नये. ७ सेवेंत कुचराई करणारे. ८ मुक्तीस. ९ जटायूचा वडील भाऊ. १० शोध. ११ लंकापुरांत. १२ मी त्यास वश व्हावें म्हणून माझें आर्जव करीत होता व बडबडत होता. १३ ही सीता.

ऐसें राक्षसींला सांगोनी तो जाय ॥ म्हणे हाय हाय हनू-मंत ॥ १०४ ॥
हळूच मारुती सद्गुण-समुद्रा ॥ वर्णी मग मुद्रा मज दावी ॥ १०५ ॥
निववी त्दृदय प्रियसखी मुद्रा ॥ काय सुधा क्षुद्रा नीववील ॥ १०६ ॥
मज म्हणे चाल बैस माझे स्कंधीं ॥ तूं दुर्गा मी नंदी दास तुझा॥१०७॥
तेव्हां मी बोलिल्यें नेशील बा खरें ॥ परी नव्हे बरें असें जाणें ॥१०८॥
युद्धीं मारितील या मेल्यासी स्वामी॥तेव्हां मूख बा मी दाखवीन॥१०९॥
मग तें अशोक-वन कपी मोडी ॥ राक्षसांचें झोडी बळें सैन्य ॥ ११० ॥
मारीला समरीं रावणाचा अक्ष ॥ कुमार जो दक्ष रण-रंगीं ॥ १११ ॥
इंद्रजिताला तो दाटूनी सांपडे ॥ हनूमंत पडे ब्रम्हे-पाशीं ॥ ११२ ॥
रावणें वानर मानूनिया तुच्छ ॥ पेटवीलें पुच्छ जाळावया ॥ ११३ ॥
पुच्छ पेटतांची हनूमंत ऊडे ॥ लंकेमध्यें हूडे वाडे जाळी ॥ ११४ ॥
देवांनीं वदनीं घातली आंगोळी ॥ लंकेची रांगोळी पाहोनीयां ॥ ११५॥
विचारोनी मज जाय स्वामीकडे ॥ पायांवरी पडे हनूमंत ॥ ११६ ॥
माझा समाचार, ऐकोनी हर्षले ॥ प्रेमाश्रू वर्षले स्वामी माझे ॥ ११७ ॥
स्वामींस मद्वृत्त करी सुप्रसन्न ॥ जैसें दिव्य अन्न क्षुधार्ताला ॥ ११८॥
हनूमंतावरी झाली दया मोठी ॥ उपकार कोटी मानीयेले ॥ ११९ ॥
निघाले घेवोनी वानरांची सेना ॥ धरणी दिसेना सूर्यप्रभा ॥ १२० ॥
रावण धर्माच्या वाटे न लागला ॥ सांगोनी भागला बिभीषण ॥ १२१ ॥
नायके रावण क्रोधानळें पेटे ॥ श्रीमंतांसी भेटे सिंधूतटीं ॥ १२२ ॥
म्हणे गुण-कल्प-वृक्षांच्या अरण्या॥दयाळा शरण्या रक्षीं मज॥१२३॥
स्वामींचें शरणा-गर्ता प्रेम प्राज्य ॥ दिलें लंकाराज्य वंदितांची ॥१२४ ॥
भेटला सागर जोडोनीयां करा ॥ म्हणे सेतु करा तारा मज ॥ १२५ ॥
शत गांवें सेतु समुद्रीं रचीला ॥ पर्वतीं खचीला मार्ग मोठा ॥ १२६ ॥
सेतुपथें सिंधु लंघूनीयां आले ॥ वार्तामृतें धाले कर्ण माझे ॥ १२७ ॥
दूत पाठवीला दुर्जन-भंगद ॥ तेजस्वी अंगद वालि-पुत्र ॥ १२८ ॥
स्वामींचा निरोप दोंहीं लोकीं पथ्य ॥ सांगीतला तथ्य अंगदानें ॥१२९॥
खळ नेघे वाक्य स्वामींचें तोखद ॥ न सेवी ओखद गतायुष्य ॥१३० ॥
म्हणे आम्हांपुढें बोलतें वांकडे ॥ मर्यादा माकडें टाकीली कीं ॥१३१ ॥

१ रामाला. २ नामाक्षरयुक्त आंगठी. ३ ब्रह्मास्त्राच्या पाशांत ४ धरणीवर. ५ रामाला. ६ दुर्जनांस भंग ( पराभव ) देणारा. ७ इहलोकीं व परलोकीं. ८ संतोष करणारें. ९ ज्याचें आयुष्य सरलें आहे तो म्ह० मरणोन्मुख झालेला.

राक्षस हो धरा मारा धांवा चावा ॥ पळ न वांचावा मर्कट हा ॥१३२॥
अंगासी राक्षस झोंबले चवघे ॥ झाडोनी अवघे पिष्ट केले ॥ १३३ ॥
उडतां मोडिली स्वर्ण-वज्र-[1]सभा ॥ मळविली प्रभा रावणाची ॥ १३४ ॥
धर्ममर्यादेच्या [2]संकोचें धोपले ॥ अधर्म कोपले राक्षसाच्या ॥ १३५ ॥
ज्यांला चावावया वज्राहुनी गाढा ॥काळाच्याही दाढा न शकल्या१३६
ते राक्षस लक्ष कोटी-बळ-पूर्ण ॥ वानरांनीं चूर्ण नखीं केले ॥ १३७ ॥
रक्तनद्या तेथें शतशा वाहिल्या ॥ देवांनीं पाहिल्या डोळेभर ॥ १३८ ॥
मारीले प्रधान रावणाचे पोर ॥ त्यांत बळी थोर इंद्रजित ॥ १३९॥
रावणाचा भ्राता कुंभकर्ण काळ ॥ तेणें कपी-[3]पाळ धरीयेला ॥ १४० ॥
बहिणीची तैशी त्याची [4]करी गति ॥ स्वयें कपी-पति सुटोनीयां ॥१४१॥
जसे बरे गरे बहु कपी भट ॥ तेणें गटगट गिळीयेले ॥ १४२ ॥
पळाया त्यां वाट मिळे कर्णीं नाकीं॥मिथ्या वर्णीना कीं जानकी मी१४३
प्रभूनीं हरीलें तत्तेज सर्व तें ॥ नुरावें पर्वतें वज्रापुढें ॥ १४४ ॥
माझे स्वामी झाले त्या तमा तरणी॥त्यांची मात रणीं काय सांगों॥१४५॥
इंद्रासी असह्य इंद्रजित परी ॥ मारीला तो अरी भावोजीनीं ॥ १४६ ॥
वाहूनी मस्तकें तोषवीला भर्ग ॥ कांपवीला स्वर्ग कैलासही ॥ १४७ ॥
तो काय सामान्य परी झाला गर्व ॥ त्याचें तेज सर्व वायां गेलें॥१४८॥
मारीला प्रभूनीं सहपरीवार ॥ उतरीला भार धरणीचा ॥ १४९ ॥
उर्मिळे मूर्छित तुझे माझे धणी ॥ झाले होते रणीं सेने-सह ॥ १५० ॥
वांचवीले सर्व हनूमंतें बाई ॥ सांगों याचे काई उपकार ॥ १५१ ॥
[5]ओषधीपर्वत समूळ खाणीला ॥ घडींत आणीला, जैसा चेंडू ॥ १५२ ॥
हनूमंतें आम्हां दिलें चुडेदान ॥ ऐसा नाहीं आन आप्त कोणी ॥ १५३ ॥
उठले वानर, अमृत-वृष्टीनें ॥ स्वामींच्या दृष्टीनें हेंचि सत्य ॥ १५४ ॥
शिबिकेंत मज घालोनी आणिलें॥देह म्यां न्हाणिलें, अग्नि-कुंडीं॥१५५॥
त्या काळीं देवांनीं केली पुष्प-वृष्टी ॥ आनंदानें सृष्टी कोंदाटली॥१५६॥
आले दश-रथ मामाजी विमानीं॥धन्या जीवीं मानी आपणा मी॥१५७॥
देवांची प्रार्थना मामाजींची आज्ञा ॥ केली सर्व प्राज्ञा सुखवाया॥१५८॥

---

१ सोनें व हिरे ह्यांनी बनविलेलें सभास्थान. २ प्रतिबंधानें. ३ वानरांचा नायक (सुग्रीव). ४ कुंभकर्णाची बहीण शूर्पणखा तिचें नाक व कान जसे लक्ष्मणानें कापिले त्याप्रमाणें सुग्रीवानें कुंभकर्णाचे कापिले; हें तात्पर्य. ५ द्रोणाचल.

मांडीवरी मज, घेतलें स्वामीनीं ॥ घनीं सौदामिनी जना वाटे ॥ १५९ ॥
भृंग-युक्त पति पुष्पक विमानीं ॥ पुष्प[१] कवि मानी जें बैसले ॥ १६० ॥
स्वामीनीं समुद्रीं दाखवीला सेतू ॥ भवाब्धींत हेतू तराया जो ॥ १६१ ॥
रुंद दहा गांवें लांब शत गावें पाप न तगावें जो देखतां ॥ १६२ ॥
दाविली किष्किंधा भेटविली तारा ॥ सुग्रीवाची दारा जाऊबाई ॥१६३॥
ऐसा भरतासी शत्रुघ्नाशीं बोल ॥ प्रभूनीं तो फोल केला नाहीं ॥ १६४ ॥
संतती संपत्ती वाढे होय हित ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६५ ॥
न बाधे पर्जन्य वात उष्ण शीत ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ ६६ ॥
धन्यधन्य होय संसारीं जीवित ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६७ ॥
काळापासूनीही नव्हे चित्त भीत ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६८॥
अंतीं वसे स्वर्गीं अमृतातें पीत ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६९ ॥
श्रीरामातें ध्यावें, श्रीरामातें गावें ॥ श्रीरामातें भावें आठवावें ॥१७०॥
श्रीरामदयेचा मेघ त्या समोर ॥ प्रेमें दास मोर नाचताती ॥ १७१ ॥

## केकावली. परमेश्वर प्रार्थना.

केका म्हणजे मोराचा शब्द आणि त्याची आवली म्हणजे पंक्ति. मयूरपंतानें आपणास मयूरपक्षी कल्पून आपण ईश्वरास मारलेल्या हाकांना केकावली अशी संज्ञा दिली आहे.

### पृथ्वी छंद.

तुझ्या बहुत शोधिले[२] अघनिधी पदाच्या रजें ॥
न तें अनृत वर्णिती बुध[४] जनीं सदाचार जें ॥
असें सतत ऐकते[५] सतत बोलते मीच तें[६] ॥
प्रमाण न म्हणों जरी उचित माझिया नीचते[७] ॥ १ ॥
तसाचि उरलों कसा पतित मी नसें काय कीं ॥

१ पति जें पुष्पक विमानीं बैसलें (तें) कवि (तें विमान) भृंगयुक्त पुष्प मानी असा अन्वय. २ शुद्ध केले. ३ पापाचे राशीच केवळ. (असे लोक). ४ जनीं सदाचार (चांगलें आचरण करणारे) बुध (ज्ञानी पुरुष) जें (प्रथम चरणांतलें) वर्णिती तें अनृत (खोटें) न (नाहीं). ५ ऐकणारे व बोलणारे (लोक). ६ ते प्रमाण न (ते खरे नाहींत). ७ हलकेपणास.

कृपाचि सरली असें हि न घडे जगन्नायकीं. ॥
नसेन दिसलों कसा, नयन सर्वसाक्षी रवी ॥
विषाद धरिला म्हणो न सुरभी विषक्षीर[1] वी. ॥ २ ॥
मला निरखितां भवच्चरणकन्यका[2] आपगा ॥
म्हणे अगइ ऐकिलें हि न कधीं असें पाप गा ॥
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला ॥
न घालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला ॥ ३ ॥
सदैव नमितां, जरी पद ललाट केलें[3] किणें ॥
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें[4] ॥
नता करुनि मुक्तही म्हणसि मी बुडालों रिणें ॥
आशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ॥ ४ ॥
दयाब्द वळसील तूं तरि न चातकां सेवकां ॥
उणें किमपि, भाविकां उबगशील तूं देव कां ॥
अनन्यगतिका[5] जना निरखितांचि सोपद्रवा[6] ॥
तुझेंचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा[7] ॥ ५ ॥
कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं[8] ॥
तयांत[9] अविशुद्ध[10] मी शलभ जेविं दावानळीं ॥
क्षणार्त पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे ॥
स्मरादिरिपु[11] मन्मनीं, अहि न काळ[12] भेका कसे ॥ ६ ॥
धना परिजना घरीं तुमचिया उणें कायसें ॥
न लाभ मणिहेम-भूपतिस[13] जोडिल्या आयसें ॥
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती ॥
गुणा न म्हणतां उणाअधिक[14] आदरें सेविती ॥ ७ ॥

---

१ कामधेनु (जरी कोपली तरी) विषरूप क्षीर (दूध) न वी म्हणजे देत नाहीं. २ तुमच्या पायाची कन्या (पायापासून उत्पन्न झालेली) नदी (भागीरथी). ३ ललाट (कपाळ) किणें (घट्यानें) पद (स्थान) केलें.—कपाळास जरी घट्टे पडले असा अर्थ. ४ आपल्या चरणकमला वांचून ५ नाहीं (आपणावाचून) दुसरा थारा ज्याला. ६ पीडिताला. ७ कळवळयास. ८ नळराजाविषयीं. ९ त्या कळीच्या झपाट्यांत. १० अत्यंत अपवित्र. (सांपडलों आहें) ११ कामादि शत्रु. १२ अहि (सर्प) भेका (बेडकाला) काळ कसे न, (होतील)? १३ मणि-हेम-भू-पतिस जोडिल्या आयसें लाभ न, असा अन्वय. १४ गुणानें कमी किंवा ज्यास्त असें न म्हणतां त्यास आदरानें सेवितात.

अतर्क्य महिमा तुझा, गुणहि फार बा हे विधी ॥
श्रुतिज्ञहि म्हणे सदा, स्तविल आमची केंवि धी ॥
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती ॥
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती ॥ ८ ॥
तुम्ही परम चांगले बहुसमर्थ दाते असे ॥
सुदीन जन मी तुम्हां शरण आजि आलों असें ॥
पुम्हांहि कथितों बरें श्रवण हें करा यास्तव ॥
समक्ष किति आपुला सकळलोकराया स्तव ॥ ९ ॥
किती श्रवण झांकिती प्रभुहि काय ते पोळती ॥
पुसाल जरि कोण ते, पदरजीं तुझ्या लोळती ॥
बरें तुजचि सोसवें स्तवन, कृत्तिवासा गरा ॥
न पी, तरि कसें घडे हितकरा दयासागरा ॥ १० ॥
गमो मधुर हें विष स्तवन, सेवितां माजवी ॥
करी मलिन सद्यशोमुख, हलाहला लाजवी ॥
हरापरिस तूं बरा प्रभुवरा सदा जो पिशी ॥
असा रस समर्पि त्या अमृत आपुलें ओपिशीं ॥ ११ ॥
प्रभो शरण आलिया वरि नव्हां कधीं वांकडे ॥
म्हणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे ॥
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा खरें ॥
घनांबु न पडे मुखीं उँघडिल्या विना पांखरें ॥१२॥
शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण ॥

१ तुमच्या तोंडावर. २ कित्येक प्रभुहि, ( समर्थ स्तुतिपात्र असेही लोक ) कोणी आपली स्तुति समक्ष करूं लागलें असतां, जसे काय ते पोळतात व (आपले) हात कानावर ठेवितात. ३ ( जर ) महादेव विष न पिता तर ( लोकांची ) कशी अवस्था झाली असती ? म्हणून भक्तांकरितां स्तवनरूपविष तुम्हाला सोसणें अवश्य आहे हें तात्पर्य. ४ चांगली कीर्ति हेंच मुख. ५ महादेवापेक्षां तूं बरा; कारण तो एकदाच विष प्याला आणि तूं ( स्तुतिरूप विष ) नित्य पितोस. ६ देतोस. ७ चातकपक्ष्यानें तोंड उघडल्याखेरीज पर्जन्याचें पाणी त्याच्या तोंडांत पडत नाहीं, तद्वत् तुम्हास शरण आल्याशिवाय तुमचा प्रसाद व्हावयाचा नाहीं. हा सारांश. ८ अदयता ( निर्दयपणा ) ह्या नावाचा.

प्रभो चुकतसों तरी करिशि तूंचि संरक्षण ॥
नसेचि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती ॥
रुचे विषय ज्यां मिळे अमृत ते न मद्या पिती ॥ १३ ॥
म्हणा मज उतावळा गुणचि घेतला घाबरें ॥
असो मन असेंचि बा भजकबर्हिमेघा बरें ॥
दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें ॥
धरील मन आधिनें बहु परिश्रमे चाकसें ॥ १४ ॥
कृतांतकटकामलध्वज जरा दिसों लागली ॥
पुरःसरगदांसवें झगडतां तनू भागली ॥
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ॥
नहों जरि उतावळा स्वरिपु कांपितो हा गळा ॥ १५ ॥
अवश्य करणें खरें प्रणतरक्षण स्वोचित ॥
उशीर मग कां बसों कृपण मीहि कां शोचितें ॥
नव्हे प्रभुवरा तुम्हां उचित एकटें धांवणें ॥
कृतांत शिवला नसे तंव दिसे बरें पावणें ॥ १६ ॥
कथा-सुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती ॥
शिशूंस जरठांस ही निरखितां रसें दाटती ॥
दुहोत भलते सदा तरि न लेश ही आटती ॥
स्ववत्स-मलें भक्षिती परि न सर्वथा बाटती ॥ १७ ॥
असो वरि कसा तरी विमल भाव ज्याचा करां ॥
तयावरि दया, पचे वर असाचि द्या चाकरा ॥
वृथाचि गमतें दिलें बहुहि जें न दासा जिरे ॥
पुसोनि अधिकार द्या, सुकर तें सदा साजिरें ॥ १८ ॥

---

१ शरण येणें. २ उतावळेपणा हा तुम्ही माझा गुणच घेतला, ( दोष नव्हे असें मी समजतों. ३ भक्तरूप मोरांस मेघासारखा. ४ हें जग. ५ यमाच्या सैन्याचा पांढरा ध्वज तद्रूप जरा ( म्हातारपण ). ६ अग्र भागीं येणाऱ्या रोगांबरोबर. ७ आपला शत्रु-मृत्यु. ८ शरणागताचें रक्षण. ९ आपल्या ( मोठेपणास ) योग्य. १० शोक करीत. ११ गडबडीनें तुम्ही मोठे श्रीमान् आहां; त्यासाठीं एकटे पायीं धांवत येणें तुम्हांस योग्य नव्हे. तर ( गरुडावर बसून लौकर या ) असा भाव. १२ कथारूप कामधेनु. १३ त्यांस पान्हा फुटतो. १४ आपल्या वत्सांचा मल म्ह० पुरीष, पक्षीं, पातक.

तुझ्या समचि हें गुणें अणु उणें नसे नाम, हां ॥
दिसे अधिक ही तसा गुण तुला असेना महा ॥
सदैव भलत्यास ही सुलभ आणखी गायका ॥
छळी न, न अधोगति क्षणहि दे, जगन्नायका ॥ १९ ॥
छळाल कृपणासि कां अजि दयानिधे, कांपिती ॥
भटासि भट संगरीं परि न कातरा दापिती ॥
कराल तितुकी कृपा बहु अहो शरण्या तमीं ॥
बुडोनि शरणागत भ्रमतसे अरण्यांत मी ॥ २० ॥
तयीं प्रभुवरा तसे सदय कां असे आज हो ॥
विचारुनि पहा बरें निजमनीं महाराज हो ॥
वनोवनिं फिरां पिशापरि म्हणा अहोरात्र हा ॥
नसे कुशल भाषणीं परि असे कृपापात्र हा ॥ २१ ॥
न जें प्रिय सदोष तें प्रिय सदोष ही चांगलें ॥
स्वतोक पितरां रुचे जरि हि कर्दमीं रांगलें ॥
तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ॥
जरीं मळविशी रजोमलिनकाय तूं अंबरें ॥ २२ ॥
प्रसिद्ध तुमचे महा सदय पाय, जीवांकडे ॥
चुकी म्हणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे ॥
न निष्ठुर पिता म्हणे मनिं न हो प्रजा टोणपी ॥
अपथ्यरुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ॥ २३ ॥
असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले ॥
न निष्ठुरपणें कृपा करुनि ते भवीं तारिले ॥

---

१ तिसऱ्या व चवथ्या चरणांत सांगितलेला गुण. २ अनधिकाऱ्यासही. ३ विष्णूनें वामनावतारीं बळीशीं कपट केलें व त्यास अधोगति दिली म्ह० पाताळांत घातलें; ही गोष्ट श्लेषानें सांगून कवीनें ईश्वरापेक्षां नामाचें महत्त्व वर्णिलें आहे. ४ अज्ञानांधकारांत. ५ संसाररूप अरण्यांत. ६ रामावतारीं सीता रावणानें नेली असतां तीविषयीं. ७ असे निर्दय. ८ धुळीनें मळले आहे शरीर ज्याचें. ९ वस्त्रें. १० पिता ( बाप ) निर्दय नसतो; फक्त त्याच्या मनांत इतकेंच असतें कीं, आपली संतति मूर्ख न व्हावी, म्हणून तो तीस शासन करितो. ११ प्रकृतीस न मानणाऱ्या पदार्थाविषयीं ज्याला आवड आहे असा—आम्हाला विषयाची गोडी असल्यामुळें पहिल्यानें कठिण वाटणारा असा जो सन्मार्ग तो कसा गोड लागेल ? हा अर्थ ४ थे चरणांत स्पष्ट केला आहे.

जगज्जनक तूं मुलें सकळ जीव, यां भातुकें ॥
दटावुनिहि देशि बा अमृत नेदिजे घातुकें ॥ २४ ॥
पिता जरि विटे विटो न जननी कुपुत्रां विटे ॥
दयामृत-रसार्द्रधी[1] न कुलकंजलें[2] त्या किटे[3] ॥
प्रसादपट[4] झांकिती परि परा गुरूंचे[5] थिटे ॥
म्हणूनि म्हणती भले न ऋण जन्मदेचें फिटे ॥ २५ ॥
अशी तरि कृतज्ञता हरि तुझ्याच ठायीं अगा ॥
सख्या अणुचि मानिसी करुनि सुप्रसादा अगा[6] ॥
भुले सुकविवाग्वधू[7] तव गुणा अनर्घ्या नगा ॥
म्हणेल जन कोण कीं यश पुनः पुन्हां तें न गा[8] ॥ २६ ॥
करा श्रवण येवढें अपटु लोक हांसो मला ॥
अहो जरि गिळावया प्रिय कुमार घे सोमला ॥
तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी ॥
तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय जी ॥ २७ ॥
सुसंगति सदा घडो सुजनवाक्य कानीं पडो ॥
कलंक मतिचा झडो विषय सर्वथा नावडो ॥
सदंघ्रिकमळीं[9] दडो मुरडितां हटाने अडो ॥
वियोग घडतां रडो मनें[10] भवच्चरित्रीं जडो ॥ २८ ॥
न निश्चय कधीं ढळो कुजन-विघ्नबाधा टळो ॥
न चित्त भजनीं चळो मति सदुक्तमार्गीं वळो ॥
स्वतत्त्व त्वद्दया कळो दुरभिमान सारा गळो ॥
पुन्हा न मन हें मळो दुरित आत्मबोधें जळो ॥ २९ ॥
दयामृतघना अहो हरि वळा मयूराकडे ॥
रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ॥
असा अतिथि धार्मिकस्तुत[11]पदा कदा सांपडे ॥
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे ॥ ३० ॥

---

१ दयारूप अमृत रसानें स्निग्ध आहे अंतःकरण जीचें अशी. २ कुलाला कलंक लावणारा जो कुपुत्र त्याच्या योगानें. ३ मळत नाहीं, म्ह० तिची त्याच्यावरची ममता कमी होत नाहीं. ४ प्रसादरूप वस्त्रें. ५ श्रेष्ठ बापाचे. ६ पर्वतप्राय. ७ सु कवींची वाणी हीच उपवर कन्या. ८ नका गाउं. ९ साधूंच्या चरणकमळीं आसक्त होवो. १० दडो इत्यादि क्रियापदांचा कर्ता. ११ धर्मशील जनानीं स्तविलीं आहेत पदें ज्याचीं.

## सुदाम चरित्रांतील पृथुकोपाख्यान.

कृष्णाचा सखा सुदामा नांवाचा अति दरिद्री ब्राम्हण त्याचे भेटीकरितां द्वारकेंस गेला. तेव्हां त्यानें आपल्या अतिशय गरीबीमुळें नुसते पोहे त्यास नजर करण्यासाठीं नेले होते, असें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे. म्हणून ह्यास ' पृथुकोपाख्यान ' हें नांव दिलें आहे.

साक्या.

गावीं संत-चरित्रें हो तारक मधुर पवित्रें हो ॥ ध्रु० ॥
हरिचा सखा सुदामा ब्राम्हण निःस्पृह आत्मज्ञानी ॥
होता गृहीं यदृच्छा[1]-लाभें परम सुखातें मानी ॥ १ ॥
त्या विप्राची भार्या आर्या मलिना कृशा कुचैला ॥
पतिपद[2]-भजनें सर्षप मानी भवदुःखाभिध[3]-शैला ॥ २ ॥
तें एकदा पतीच्या पाशीं बहु भीत भीत गेली ॥
अवाङ्मुखी कंपित-तनु साध्वी कर जोडुनिया ठेली ॥ ३ ॥
भय-गद्गद[4]-कंठी ते साध्वी म्हणे पतीतें स्वामी ॥
श्रीपति तो स्वसखा हें कथितां नित्य तुम्ही निजधामीं ॥ ४ ॥
भेटाया त्या दीनबंधुला द्वारावतिला जावें ॥
गातां ध्यातां परि सखयातें नेत्रें अवलोकावें ॥ ५ ॥
भजकाला आत्मा ही देतो ऐसा उदार तो कीं ॥
दीनजनाचा कल्पवृक्ष ही कीर्ति तयाची लोकीं ॥ ६ ॥
मोक्षहि देतो तेथें देणें अर्थ काम हें काय ॥
यास्तव जाउनि पहा कुटुंब-त्राणार्थें यदुराय ॥ ७ ॥
देइल कांहीं दयाळु तो प्रभु रक्षाया हीं बाळें ॥
तुम्हाला स्व-सख्याचें दर्शन घडेल बहुता काळें ॥ ८ ॥
ऐसें स्त्रीचें प्रिय हित भाषण ऐकुनि मुनी सुखावे ॥
आलें मनांत कीं जाउनियां प्रभुचे पाय पहावे ॥ ९ ॥
स्त्रीस म्हणे आनंदें तो द्विज जातों सखा पहाया ॥
तच्चरणावरि निज तनु मनही पुष्पांजळी वहाया ॥ १० ॥

१ आपोआप जें मिळेल तेणें—करून. २ नवऱ्याच्या पायाच्या सेवेनें. ३ भव+दुःख+अभिधा+शैल=संसार संबंधी दुःख हेंच आहे अभिधा म्ह० नांवज्याला असा शैल म्ह० पर्वत. ४ भयानें दाटला आहे कंठ जीचा.

आहे कांहीं गृहीं उपायन दे हो सत्वर आणी ॥
रिक्त-पाणिनें न विलोकावा गुरु ऐशी स्मृतिवाणी ॥ ११ ॥
ऐसें परिसुनि भिक्षा मागुनि चार मुष्टि पृथुकांशी[2]॥
आणुनि बांधूनि चैल-खंडीं अर्पी निजकांताशी ॥ १२ ॥
घेउनि मुनि उपायनाला तो बहुहर्षेचि निघाला ॥
भेटेल कसा प्रभु हें स्वमनीं चिंतित जाता झाला ॥ १३ ॥
हरिला त्द्दयीं चिंतित जातां मार्ग जाहला थोडा ॥
बहुधा केला हरिसंदर्शन-कामें प्रेमा घोडा ॥ १४ ॥
अमरावती-समाना द्वारा-वती पुरी कनकाची ॥
विलोकिली दिव्य राजधानी विश्वाच्या जनकाची ॥ १५ ॥
काय तिची वर्णावी शोभा सत्यवती जिस लाजे ॥
मी धन्य म्हणुनि जीच्या योगें रत्नाकर बहु गाजे ॥ १६ ॥
जेथिल लोक विशोक स्वसुखें तुच्छ मानिती स्वर्गा ॥
लाजति सुरवर योगी ज्ञानी नागरिकांच्या वर्गा ॥ १७ ॥
त्या नगरींत मुनी तो गेला जैसा वैकुंठातें ॥
ब्रम्हण्यदेवपुरींत नाहीं निरोध पळ विप्रातें ॥ १८ ॥
एका परीस एक सुरम्यें यादवगृहें अपारें ॥
विप्रावांचुनि जेथें न शिरे आज्ञा नसतां वारें ॥ १९ ॥
त्यांतहि सोळा सहस्र आणिक अष्टोत्तर शत गेहें ॥
स्त्रीसुतयुक्तें केलीं शोभित हरिनें अनेक-देहें ॥ २० ॥
त्यांतुनि एका गृहांगणीं तो गेला ब्राम्हण दीन ॥
सुख पावला स्वचित्तीं जैसा ब्रम्हानंदीं लीन ॥ २१ ॥
श्रीरुक्मिणी-पलंगीं तेव्हां होता जगन्निवास ॥
तेथें कळलें कीं भेटाया आलासे निजदास ॥ २२ ॥
झडकरि उठला दयाळु माधव वस्त्रादिक नावरितां ॥
धांवत आला पुढें रमेला सांडुनि दासाकरितां ॥ २३ ॥
ये ये बंधो ऐसें सद्गद बोलत धांवत आला ॥

१ रिकाम्या हाताच्या मनुष्यानें. २ फडक्यांत. ३ कृष्णाला पाहण्याची अत्यंत आवड आहे ज्याला अशा सुदाम्यानें. ४ प्रेम (पु०). ५ ब्राम्हणांविषयीं दयाळु जो देव म्ह० कृष्ण, त्याच्या पुरांत. ६ विश्वाचा आधार कृष्ण.

कडकडुनी भुज-युग्में[1] स्वसखा त्द्दयीं धरिता झाला ॥ २४ ॥
मित्रांगस्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधू ॥
लोचन-पद्मापासुनि[2] गळती प्रेमाश्रूचे बिंदू ॥ २५ ॥
धरुनि स्वसखा करीं हरीनें पर्यंकीं बसवीला ॥
सात्विकभावें[3] भक्ति प्रेमा देवें बहु दाखविला ॥ २६ ॥
जळ घाली रुक्मिणी पदावरि मणि-कनकाच्या पात्रें[4] ॥
प्रक्षालन केलें श्रीनाथें सुखरोमांचित गात्रें ॥ २७ ॥
शंभुशिरीं ज्याचें चरणोदक वेद जयाचे बंदी ॥
तो तीर्थरूप तीर्थांचाही मुनिपादोदक वंदी ॥ २८ ॥
गंधालेपें[5] धूपें दीपें पुष्पें गुरुसमान ॥
ब्रम्हण्य देव मुनितें पूजी वाढवुनी बहु मान ॥ २९ ॥
व्यजन चामरें घेउनि हातीं शैब्या[6] घाली वारा ॥
तें परिसुनियां आला तेथें अंतःपुरंजन[7] सारा ॥ ३० ॥
हरिस्त्रिया त्या म्हणती अगाई कोण विप्र हा आला ॥
जगद्गुरूसहि अग्रजापरिस पूज्य कसा हा झाला ॥ ३१ ॥
कृष्ण सख्यातें करीं धरुनियां सांगे गोष्टी गोडा ॥
त्यांशीं सर्व रसाधिक परि तें अमृत न पावे जोडा ॥ ३२ ॥
देव म्हणे मी बंधो गुरूची[8] आलों घेउनि आज्ञा ॥
संपादिला तदुत्तर[9] पाणि-ग्रहणविधी[10] कीं प्राज्ञा ॥ ३३ ॥
बहुधा गृहीं उदासीन तुझें मन धनवांछा कांहीं ॥
नाहीं हें मज पूर्वीपासुनि अवगत आहे पाहीं ॥ ३४ ॥
परि लोक-संग्रहास्तव[11] मीही करितों गृहस्थ धर्म ॥
योगचि[12] हा फळवांछा टाकुनि सर्व करावें कर्म ॥ ३५ ॥
गुरुकुळवास[13] तुला स्मरतो कीं जेणें तरतो मूढ ॥
त्वरितचि होतो अक्षय-सुखद-स्वात्मपदीं[14] आरूढ ॥ ३६ ॥

१ दोन्ही हातांनीं. २ कमळासारख्या नेत्रांतून ३ रोमांचादिक जे ८ प्रकारचे सात्विक भाव आहेत त्यांहीं करून. ४ रत्नजडित सोन्याच्या भांड्यानें. ५ गंधाच्या उटीनें. ६ रुक्मिणी. ७ जनानखान्यांतील जन म्हं० स्त्रिया. ८ कृष्णाचा जो गुरु सांदीपनि त्याची. ९ त्यानंतर. १० विवाह. ११ लोकांची स्वधर्माचरणीं प्रवृत्ति व्हावी या उद्देशानें. १२ ईश्वर प्राप्तीचें साधन—मोक्ष साधन. १३ गुरूच्या घरीं राहून त्याची सेवा करणें. १४ अविनाशि अशा प्रकारचें सुख देणारें स्वात्मपद म्हं० मुक्ति.

सांदीपनिगुरुच्या पत्नीनें काष्ठें आणायासी ॥.
पाठविलें विपिनाला स्मरतें तें माझ्या हृदयासी ॥ ३७ ॥
गेलों आपण वनासि तेव्हां झाली अकालवृष्टी ॥
कल्पक्षयचि निशाकाळीं तो झाला गोचर दृष्टी ॥ ३८ ॥
प्रातःकाळीं श्रीगुरु आला आम्हा शोधायाला ॥
श्रांत शिष्य देखतां स्वत्हृदयीं फार दया-कुळ झाला ॥ ३९ ॥
धरुनि पोटिशीं आशीर्वादें गौरविलें बहु सकळां ॥
दिल्या चतुर्दश विद्या त्द्द्या शुद्ध चतुःषष्टि कला ॥ ४० ॥
हें सारें मजला आठवतें स्मरतें तुज कीं नाहीं ॥
गुरुप्रसादें शिष्यजनाला नसे उणें सुख कांहीं ॥ ४१ ॥
हें ऐकुनियां तो श्रीदामा म्हणे प्रभो सर्वज्ञा ॥
लोकविडंबन सारें केलें वदतों करुनि अवज्ञा ॥ ४२ ॥
अम्हांला ताराया-करितां गुरुकुळनिवास केला ॥
तुझ्या प्रसादें या दासाचा सारा संशय गेला ॥ ४३ ॥
वेदमया कल्याणाऽऽधारा जगद्गुरो तुज कवणें ॥
सर्वज्ञाला अज्ञ-मनुष्यें काय ज्ञान शिकवणें ॥ ४४ ॥
देव म्हणे सखया मज द्याया काय उपायन आजी ॥
अणिलें असेल देउनियां तें वांछा पुरवीं माजी ॥ ४५ ॥
भक्तें प्रेमें अणुही दिधलें तें मज पुष्कळ होतें ॥
बहुहि अभक्तें समर्पिलें परि अल्पचि भासे हो तें ॥ ४६ ॥
पत्र, पुष्प, फल, जळ, जें मजला भक्त आदरें अर्पी ॥
तें विश्वात्म्याला मज बंधो सुधारसाहुनि तर्पी ॥ ४७ ॥
हें परिशिलें परंतु स्वमनीं मुष्टिचतुष्टय पोहे ॥
द्यावे प्रभुला हा धीर तरी त्या विप्रला नोहे ॥ ४८ ॥
संकोचला अधोमुख बसला विप्र न बोले कांहीं ॥
बुडतचि होता मुनि तो केवळ लज्जा-नदी-प्रवाहीं ॥ ४९ ॥
सखा कृतार्थ कराया निघ्या चिंध्या आपण पाहे ॥
पृथुकमोटली सापडतां प्रभु बहु-हर्षाला लाहे ॥ ५० ॥
सोडुनि गांठी पृथुकमुष्टि तो वदनीं घालुनि भक्षी ॥

१ कृष्णाचा गुरु. २ लोकांसारखें वागणें. ३ भीड-मुर्वत न धरितां. ४ ज्ञानस्वरूपा. ५ पोह्यांची गाठोडी.

तों तों लाजे विप्र प्रभुच्या मुखपद्मासि न लक्षी ॥ ५१ ॥
भूतात्म्याला मजला तोंपति पोहे हे बहु फार ॥
याहुनि न रुचे भुवनीं बंधो अन्य उपायनें-सार ॥ ५२ ॥
ऐसें स्तवुनि उपायन दुसरी मुष्टि श्रीपति उचली ॥
तों रुक्मिणी धरी कर धांवुनि म्हणे मला हे रुचली ॥ ५३ ॥
द्यावा प्रसाद हा सर्वांला भक्षूं वोडेंकोडें ॥
सेवन करितां तुम्हांला तों हें ब्रम्हांडहि थोडें ॥ ५४ ॥
इहपर भवजनाला येणें सर्वहि समृद्धि झाली ॥
पुरे मुष्टिपृथुकांचें भक्षण ब्रम्हांडावलि धाली ॥ ५५ ॥
पोहे नेले हिरोनि भगवत-पैरपद्मजा-सतीनें ॥
प्रार्थुनि रिझवुनि हंसवुनि रमवुनि निजपतिला सुमतीनें ॥५६॥
षड्रसयुक्तें चतुर्विधान्नें भोजन झालें रातीं ॥
ब्रम्हाद्यऽलभ्य-पंक्ति लाधली दैवें विप्रवरा ती ॥ ५७ ॥
निजपल्यंकीं मृदुशयनावरि विप्राला यदुराय ॥
निजवुनि परमादरें हळूहळु करें चुरी मग पाय ॥ ५८ ॥
स्वर्गसुखाहुनि बहु सौख्याला विप्र पावला रातीं ॥
प्रातःकाळीं उठतां आज्ञा मग दे कंसाऽराती ॥ ५९ ॥
पोंवितगेला दूर जगत्पति कंठ दाटला भारी ॥
मित्रवियोगें प्रभुच्या वाहे नेत्रांपासुनि वारी ॥ ६० ॥
माझें स्मरण असोंदे ऐसें म्हणे सगद्गद-कंठ ॥
आलिंगुनि वंदुनि विप्राला परते मग वैकुंठ ॥ ६१ ॥
ब्राम्हण देववियोगें व्याकुळ होउनि सावध झाला ॥
भगवद्दर्शनलाभ घेउनी स्वांतीं पुष्कळ धाला ॥ ६२ ॥
मनीं म्हणे द्विज मजला कांहीं कृष्णें न दिलें वित्त ॥
मी मागावें तेंहि विसरलों स्वमुखें भुललें चित्त ॥ ६३ ॥

१ तृप्त करितात. २ उत्तम नजराणा. ३ ह्या लोकीं व पर लोकीं. ४ तुमच्या भक्तांस. ५ भगवत्सेवेविषयीं तत्पर जी पद्मजा म्ह० लक्ष्मी तद्रूप जी सती म्ह० पतिव्रता रुक्मिणी. ६गोड, अंबट, तिखट, खारट, तुरट, कडू; असे सहा रस. ७ खाद्य, पेय, लेह्य व चोष्य अशीं चार प्रकारचीं अन्नें. ८ ब्रम्हादिक देवांसही मिळण्यास कठीण. ९आपल्या पलंगावर. १०कंसाचा अराति म्ह० शत्रु कृष्ण. ११पोंचवीत. १२कृष्ण.

स्त्री परि हांसेल घरां जातां यासि करावें काय ॥
हांसो सुखें परंतु वदान्यश्रेष्ठ खरा यदुराय ॥ ६४ ॥
दरिद्र मी वित्ताच्या लाभें होइन मत्त उदंड ॥
आतांचें-परि मग न घडेल प्रभुचें स्मरण अखंड ॥ ६५ ॥
यास्तव करुणानिधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें ॥
धन न दिलें हें बरवें केलें दीनजनाच्या तातें ॥ ६६ ॥
असें मनीं चिंतित निजमार्गें आला स्वगृहापाशीं ॥
तों त्याच्या दृष्टीला पडला सहसा तेजोराशी ॥ ६७ ॥
म्हणें काय हें कैसें झालें गृह जें माझें होतें ॥
तेथें कैशी स्वर्णपुरी[1] ही काय जाहलें हो तें ॥ ६८ ॥
विस्मित होउनि पाहे तो मुनि नानोपवनें[2] रम्यें ॥
कनकपुरीच्या मध्यें सदनें रत्नांचीं अनुपम्यें[3] ॥ ६९ ॥
नरनारीजन देवसमान स्वालंकृत[4] अति गेहीं ॥
रत्नभूषणें वस्त्रें रविसम दीप्ति जयाच्या देहीं ॥ ७० ॥
आला स्वामी म्हणुनि पुढें मग नागरीक जन धांवे ॥
वाजत गाजत गृहासि आणिति मुनिला पूजुनि भावें ॥ ७१ ॥
देवांगना तशी शुभगात्री विप्राची स्त्री गेहीं ॥
पति आला हें परिसुनि झाली सुखरोमांचित देहीं ॥ ७२ ॥
देव-स्त्रीसम दासीशत-युत[5] आली धांवुनि दारा ॥
पतिस विलोकुनि त्वदयीं[6] भेटे साध्वी परमोदारा[7] ॥ ७३ ॥
नेला गृहीं पति निजहस्तें धरुनि करीं बहुमानें ॥
दिव्य समृद्धि विलोकुनि जाणें मुनि तद्बीज[8] ज्ञानें ॥ ७४ ॥
म्हणे मुनी मी जन्मापासुनि दरिद्र केवळ पापी ॥
हरिदर्शनाविणें कोण दुजा या भाग्यपदीं स्थापी ॥ ७५ ॥
महाविभूतियदूत्तमदर्शन[9] समृद्धि-कारण साचें ॥
कामद मेघ-श्याम पुरवितो कामितें[10] निजदासाचें ॥ ७६ ॥

---

१ सोन्याची नगरी. २ नानाप्रकारच्या बागा. ३ ज्यांला उपमा नाहीं अशीं. ४ उत्तम प्रकारें अलंकारांनीं शोभविलेले. ५ शेंकडो दासी सहित ६ आलिंगन देई. ७ फार मोठ्या मनाची. ८ त्या समृद्धीचें कारण. ९ मोठा ऐश्वर्यवान् जो यदूत्तम म्ह० यदुकुलांत उत्तम–श्रीकृष्ण त्याचें दर्शन. १० इच्छिलेलें.

देवाचे-पूरि देवप्रभुनें समर्चिलें मज हस्तें ॥
तीर्थपदें मत्पदावनेजन धरिलें कीं निजमस्तें ॥ ७७ ॥
केली माझी सेवा देवें नीजविलें स्वपलंगीं ॥
सुगंधलेपन केलें प्रभुनें निजहस्तें-चि मदंगीं ॥ ७८ ॥
मज दीनातें बंधो बंधो ऐसें वदला स्वामी ॥
अन्वर्थना प्रकट केली कीं दीनबंधु या नामीं ॥ ७९ ॥
सौव्हद मैत्री सख्य दास्य त्या- देवाचेंचि असावें ॥
जन्मों-जन्मीं तद्भजनाचें प्रेम मनांत वसावें ॥ ८० ॥
केलें कृतार्थ भुवनहि माझ्या सख्या मुकुंदा स्वामी ॥
तूं करुणांबुदजीवन सुखकर मयूर चातक आम्ही ॥ ८१ ॥
ऐसा भगवत्सखा सुदामा स्त्रीसह भजे प्रभूतें ॥
इहपर नित्य पावता-झाला तेणें सुखें प्रभूतें ॥ ८२ ॥
दीनोद्धारण चरित्र विभुचें पावन गोड उदार ॥
रामनंदनें मयूरेश्वरें फार मानिलें सार ॥ ८३ ॥
वाणी पवित्र करावयास्तव पृथुकोपाख्यान सुखें ॥
लेशमात्र वर्णिलें पुनरपि मयूरेश्वरें स्वमुखें ॥ ८४ ॥
रसिक विष्णुभक्तांहीं हें शिशुभाषण परि परिसावें ॥
दोष निवारुनि गुण घेउनियां स्वसुखानें नाचावें ॥ ८५ ॥
गावीं संतचरित्रें हो तारक मधुर पवित्रें हो ॥ ॥ ध्रु० ॥

## सावित्री आख्यान.

मद्रदेशच्या अश्वपतिराजाची कन्या सावित्री (सावित्रीदेवीच्या अवतार) हिनें शाल्वदेशच्या द्युमत्सेनराजाचा मुलगा सत्यवान् ह्यास वरिलें. सत्यवान् अल्पायुषी होता. तो मृत होतांच यम जातीनें त्याचा प्राण

१ ज्याच्या पायाच्या ठिकाणीं तीर्थें आहेत अशा श्रीकृष्णानें. २मत्+पद्+अवन. जन=ज्यांत माझे पाय धुतले आहेत असें पाणी. ३ माझ्या अंगाला. ४ नावाच्या अर्थास अनुरूप अशी कृति. ५ एथें बहुधा एकार्थकच अशा अनेक शब्दांची योजना करून कवीनें सुदाम्याचा प्रेमभर दाखविला आहे. ६ दीनाचा उद्धार करणारें. ७एकदां आर्या वृत्तानें लिहिलें असून आतां आणखीं साकी वृत्तानें लिहिलें आहे म्हणून 'पुनरपि' म्हटलें आहे.

घेऊन चालला असतां सावित्रीनें त्याचे मागून जाऊन यमास आपल्या भाषणानें संतुष्ट केलें आणि आपल्या बापास पुत्रप्राप्ति, सासरा आंधळा व राज्यरहित होता त्यास डोळ्यांची व राज्याची प्राप्ति, असे वर त्या पासून संपादिले; व शेवटीं सत्यवानाचा प्राणही परत आणिला; हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे.

धर्म पुन्हा त्यासि म्हणे मार्कंडेया मुनीश्वरा आर्या ॥
आढळली तुज लोकीं सत्वाढ्या आमुची जशी भार्या ॥ १ ॥
मुनि त्यासि म्हणे होती सावित्रीनाम अश्वपतितनया ॥
तच्चरित श्रवण करीं ऐकाया योग्य साधु पतित न या ॥ २ ॥
होय प्राप्त विधिस्त्री-सावित्रीच्या वरेंचि ती राया ॥
यत्कीर्ति जना म्हणती कर देत्यें रे अघाब्धितीरा या ॥ ३ ॥
झाली भक्तसुता ती श्रीसावित्रीच उद्धरायाला ॥
श्री क्षीरधिला जन्मुनि जें दे यश तेंच शुद्ध रायाला ॥ ४ ॥
अश्वपति म्हणे वत्से चिंता मज हेचि एक परमा गे ॥
झालीस दानयोग्या परि कोण्हीही तुला न वर मागे ॥ ५ ॥
जा शोधुनि ये वत्से वरुनि मनें मानल्या कुलीनातें ॥
कीं तुजकडेचि आहे शतपुत्रांचेंहि गे मुली नातें ॥ ६ ॥
स्ववर पहा जा ऐसें योग्य जनीं तोचि तीसचि वदाया ॥
गुरुच्या वचनें गेली आपण घेऊनि ती सचिवं दाया. ॥ ७ ॥
अनुरूप वर विलोकुनि आली तों त्या नृपा परम हर्षी ॥
सांगत होता सुकथा श्रीनारद जों कृपापर महर्षी ॥ ८ ॥
ती द्रोघांतें वंदी तों तीस ब्रम्हकाय-भू पाहे ॥
स-स्मित असें पुसे कीं त्वत्तनया होय काय भूपा हे ॥ ९ ॥
कोठें गेली होती श्वशुरगृहाहूनि काय आणविली ॥
हा सचिवांनीं अंसुनी दानोचितता इची न जाणविली ॥ १० ॥
भूप म्हणे परिसावें तेंचि तुवां सर्व साधु-कुलगीतें ॥

१ सत्व गुणानें युक्त म्ह० कसाही प्रसंग गुदरला तरी जिचें धैर्य ढळत नाहीं अशी. २ अश्वपति नामक राजाची मुलगी. ३ ह्या चरित्रास. ४ ब्रम्हदेवाची बायको ५ पातकसमुद्राच्या तीरास. ६ लक्ष्मी. ७ देण्यास योग्य. ८ शंभर पुत्रांच्या ठिकाणीं तूं आहेस. ९ मंत्री आणि आप्त ह्यांस. १० हर्ष देई. ११ ब्रम्हदेवाच्या शरीरापासून झालेला—नारद. १२ खेद सूचक अव्यय. १३ सर्व साधूंच्या समुदायानें स्तविलेला.

म्यां पाठविलें होतें स्ववर पहाया स्वयें स्वमुलगीतें ॥ ११ ॥
वद वत्से काय कसें वर बरवा पाहिला न लाजावें ॥
ह्या गुरुनें धन्य असें म्हणूनि स्वमुखें तुला मला जावें ॥ १२ ॥
सांगे ती सावित्री नृप द्युमत्सेन शाल्वपति[2] आहे ॥
जरि वृद्ध अंध रिपुहृत[3]राज्य वनस्थ[4]हि न काळजी वाहे ॥ १३ ॥
कुल- शील- सत्त्व- गुण- निधि तो पुत्र- कलत्रमात्रपरिवार ॥
परिवार सर्व सम त्या कीं मथिला स्वांतरस्थ[5] अरिवार[6] ॥ १४ ॥
तो श्वशुर मानला मज चित्तें त्याचा कुमार म्यां वरिला ॥
जरि लाजविति सख्या अनुसरली गौरी हरा न त्या हरिला ॥१५॥
नारद म्हणे नृपा हे चुकली योजूनि सत्यवान् नवरा ॥
न वरावा जरि गुणवान् योजू अन्या असे उणें न वरा ॥ १६ ॥
भूप म्हणे सर्वज्ञा देवा उमजे असेंचि सांग मला ॥
गुणवान् युवा कुलजवर जरि तरिहि तुला अयोग्य कां गमला १७
काय इणें न धरावें अधनत्वें भूप जन- वरा जीवीं ॥
कां न प्राशावें मधु मधुपानें कूपज- नव- राजीवीं ॥ १८ ॥
मुनि सांगे वर्षांतीं येइल त्या भूप-पुत्रका व्यसुता[9] ॥
अन्य वरू वृतहि कच त्यजुनि वरी भूप-पुत्र काव्यसुता[10] ॥१९॥
भूप म्हणे न वरावा वत्से जरि सुगुणसागर लवायु[11] ॥
शीतल मंद सुगंधहि वद सेवावा कसा गरल- वायु ॥ २० ॥
ती सुमति म्हणे ताता न त्यजुनि पयोधिला नदी परते ॥
न पतंग- चित्त-वृत्ति क्षणही रत्नीं त्यजूनि दीप रते ॥२१॥
वरिला तो वरिलाचि स्पर्शावा या न अन्य कायातें ॥
हा दृढ निश्चय माझा स्तवितील कुलीन कन्यका यातें ॥ २२ ॥
आयुष्य असो किति तरि मज तदितर[12] पुरुष तुजसमचि राया ॥

१ द्युमत्सेन नांवाचा. २ शाल्व देशाचा राजा. ३ शत्रूंनीं हरण केलें आहे राज्य ज्याचें असा. ४ अरण्यांत राहणारा. ५ आपल्या अंतःकरणांत राहणारा. ६ काम-क्रोधादिक शत्रूंचा समुदाय. ७ राज श्रेष्ठास. ८ विहिरींत उत्पन्न झालेल्या नव्या कमलांत. ९ गतप्राणता ( मरण ). १० शुक्राचार्यांची मुलगी ( देवयानी ) ११ अल्पायुषी. १२ सत्यवानाहून निराळा.

मन न चळेलचि येइल जरि चरचर हा गळा यम चिराया ॥२३॥
देवर्षि म्हणे त्यासचि दे साध्वी-व्रत-परा सुता राया ॥
शुचि निश्चयाहुनि अधिक अमृतरस नसे परासु ताराया ॥२४॥
होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव हो ॥
येतों बसा प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुम्हा सदाशिव हो ॥ २५ ॥
गेला मुनि जो भगवत्- कीर्ति- महा- काम-धेनुचा दुहिता ॥
नेउनि दिली नृपें ती सद्विधिनें सत्यवत्-करीं दुहिता ॥ २६ ॥
झाली तपोवनांत स्वीकारुनि वल्क तापसी ते तें ॥
अद्भुत सत्त्व जिचें बा तितका नव्हताचि ताप सीतेतें ॥२७॥
वेद श्वशुर श्वश्रू स्मृति ती स्वाचारपद्धतीच सती ॥
मुनि म्हणति या नृपाच्या उटजीं सिद्धि स्नुषामिषें वसती॥ २८ ॥
तो सत्यवान् म्हणे हे पितृ-राज्यश्री तपोवनांत पती ॥
हो आपन्मुक्त म्हणुनि बहुधा आपणहि या मिषें तपती ॥२९॥
तत्सद्गुणें प्रमुदितें झालीं केवळ मनांत न तिथें तीं ॥
सकळें सदेव तापस-वृंदेंहि तपोवनांत नति घेतीं ॥ ३० ॥
ती स्वमनांत म्हणे तुज तनु रडविल सर्व काळ जीवा हे ॥
सोड इला वेड्या बुध न कुसंगति धरुनि काळजी वाहे ॥३१॥
ऐसें चित्तीं बोले मोजी उर्वरित दिवस महिने ती ॥
नसतें तसें तरि सुखें वय भोगुनि तदधिक श्रमहि नेती ॥ ३२ ॥
उरतां चार दिवस ती करि वांचाया पति व्रतारंभा ॥
तन्नियमीं प्रियवाक् ती शुकीं विलोकी न तीव्रता रंभा ॥३३॥
श्वशुर म्हणे त्रिदिन-व्रत झालें कीं वंश धन्य केला गे ॥
कर पारणा क्षुधा बहु पूर्व-वयामाजि कन्यके लागे ॥ ३४ ॥
ती संकल्पीं आहे भूयोऽस्तीं पारणा करायाची ॥

---

१ पतिव्रतेच्या आचरणाविषयीं तत्पर. २ गेले आहेत प्राण ज्याचे असा. ३ भगवंताची कीर्ति हीच कामधेनु तिचें दोहन करणारा (धार काढणारा.) ४ ती सावित्री. ५ सदाचाराचा क्रम. ६ सुनेच्या रूपानें. ७ बापाची राज्यलक्ष्मी ८ विपत्ती पासून मोकळा झालेला. ९ ह्या सावित्रीच्या रूपानें. १० तप करिते. ११ देवासहित ऋषींचे समुदाय. १२ सावित्रीच्या नियमांत. १३ मधुर भाषण करणारी—हें रंभेचें विशेषण.

ऐसें श्वशुरश्वश्रूचरणातें जोडुनी करा यांची ॥ ३५ ॥
फल-मूलार्थ निघे पति त्यासि म्हणे मजहि सत्तमा न्याहो ॥
वन पाहिन.तुम्हां हे न प्रथम-प्रार्थना अमान्या हो ॥ ३६ ॥
चित्राश्व म्हणे दयिते गमली वनसरणि काय कोमळ ती ॥
श्रमशिल शिबिकास्थांही दुर्गवन-पंथांत बायको मळती ॥ ३७ ॥
उपवास तीं दिसांचा तूं आधींच प्रिये सुमृदुला गे ॥
न्यावें कसें चरणयुग नवनीता परिसही सुमृदु लागे ॥ ३८ ॥
मज सोसेल कशी जी न पहावे स्त्रीव्यथा नरा नीचा ॥
श्रमदा प्रमदा-त्वदया कथितीहि कवी कथा न रानींच्या ॥ ३९ ॥
येणारचि तरि साध्वी श्वश्रूश्वशुरांसि पूस मग ये तें ॥
योग्य तुज मजहि मानिति गुर्वाज्ञाधिक सुबुद्धि न गॅयेतें ॥ ४० ॥
सावित्री त्यांच्याही आज्ञेतें तत्प्रसाद साधुनि घे ॥
उटजांतूनि सतीसह वंदुनि तो स्वपितृपाद साधु निघे ॥ ४१ ॥
ती न स्त्री रक्षाया त्यासि निघे आत्त-मूर्ति जनकांशी ॥
परम शिव जींत नांदे म्हणुनि जिला म्हणति सूज्ञजन काशी॥४२
जे पक्षी जे श्वापद-संघ अधिष्ठूनि कानना वसती ॥
त्यांचें तद्वचनाऽमृत-पानार्थ पुसेल कां न नाव सती ॥ ४३ ॥
पात्र भरूनि फळांनीं काष्ठें फोडी वनांत सत्वरतें ॥
पाहूनि तत्कलत्रें स्मरलें मुनिवच मनांत सत्वर तें ॥ ४४ ॥
जों साध्वी हळुच म्हणे हा नाथा नियत-मानदा रुचिरा ॥
मूर्ति श्रमत्यें श्रमत्ये मति कीं जी प्रिय-तमा न दारु चिरा ॥४५॥
तोंचि म्हणे तो उठल्या करित्या स्मृति-हानि वेदना लागे ॥
शूल-शत शिरीं जाणों सखि अक्षम हों निवेदनाला गे ४६ ॥
तुझिया मृदु-शीताऽंकीं शिर ठेवुनि वाटतें निजावें गे ॥

१ विनती करी. २ सत्यवान्. ३ वनांतला मार्ग. ४ पालखींत बसलेली. ५ रानांतील खडतर मार्गांत. ६ फार नाजूक. ७ गया क्षेत्रास. ८ आपल्या बापाचे पाय. ९ बापाचा आशीर्वाद. १० ज्या आशीमध्यें. ११ ज्या आशीला १२ आश्रय करून. १३ त्या सत्यवानाचें वचन रूप अमृत घ्यावें म्हणून. १४ धैर्यशील–हें तत्कलत्रें ह्याचें विशेषण. १५ स्मरण नाहींसें करणाऱ्या–अशा वेदना. १६ मी १७ मृदु आणि शीतल अशा मांडीवर.

त्वत्स्पर्श अमृत म्हणवुनि यामत्तापें पळोनि जावें गे ॥ ४७ ॥
मांडी देउनि पतिचें मस्तक हस्तकमळें सुधी रगडी ॥
दे धैर्य सतीस तिचा निज-निश्चय जो खरा सुधीर मडी ॥ ४८ ॥
सीता दशकंठा जसि तशि सत्वें भी न तीव्र-तापा हे ॥
तों पाशपाणि[1]-पुरुषा-प्रति पति-पार्श्वीं पतिव्रता पाहे ॥ ४९ ॥
क्षितिवरि पतिशिर उतरुनि सविनय झडकरि उठोनि कर जोडी ॥
नमुनि म्हणे देव तुम्ही अशि कैंची अन्यदर्शनीं गोडी ॥ ५० ॥
केलेंचि धन्य दर्शन-दानें येऊनि कानना मातें ॥
अजि देवेश निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ॥ ५१ ॥
देव म्हणे सति यम मी; कां आलां ? न्यावया तुझ्या पतितें ॥
हें दूत-कार्य कीं जी; जें सेवक-कृत्य वेगळें सति तें ॥ ५२ ॥
हा सत्यवान् सुकृतवान् गुणवान् न्यावा न सेवकांनीं कीं ॥
ज्या कर्मीं योग्यत्व स्वामीचें तें न सेवकांनीकीं[2] ॥ ५३ ॥
अंगुष्ठ-मात्र पुरुषा-प्रति यम पाशेंकरुनि आकर्षी ॥
तैं हाय हाय म्हणती बहुसद्गद-कंठ साश्रु नाकर्षी ॥ ५४ ॥
त्यांतें बांधुनि घेउनि यमधर्म प्रभु निघे अवाचीतें[3] ॥
भ्याला सतीस बहुधा जें ब्रम्ह-लिखित बरें न वाची तें ॥ ५५ ॥
त्या-मागें तीहि निघे धर्म म्हणे भागलीस जा परत ॥
स्नेह-ऋण फेडिलें त्वां करुनि स्वपति-क्रिया[4] रहा स्मरत ॥ ५६ ॥
साध्वी म्हणे प्रभो पति जिकडे जावीच मूर्ति हे तिकडे ॥
स्वगुरु-व्रत-प्रसादें[5] मद्गतिसि[6] न रोधितील हेतिकडे[7] ॥ ५७ ॥
संत म्हणति सप्तपदें सहवासें सख्य साधुशीं घडतें ॥
सन्मित्रचि न व्यसनीं अन्याऽखिल-मित्र संकटीं पडतें[8] ॥ ५८ ॥
तुज संत म्हणति पितृपति समवर्ती[9] धर्मराज बापा हें ॥
सत्ययश म्हणुनि याही कन्येसि दया करुनि बा पाहें ॥ ५९ ॥

---

१ पाश आहे हातीं ज्याच्या अशा पुरुषाला. २ चाकरांच्या मंडळींत. ३ दक्षिण दिशेस. ४ उत्तर कार्य. ५ माझ्या वडिलांच्या आणि व्रताच्या सामार्थ्यानें. ६ माझ्या गमनाला. ७ शस्त्रें व डोंगराचे कडे. ८ साधु ज्याचा मित्र आहे, असा कोणी ही दुःखांत पडत नाहीं; त्यावांचून इतर सर्व जरी मित्र असले, तरी तो संकटांत पडतो. ९ सर्वांशीं सम दृष्टीनें वागणारा.

ऐसें सती वदे तो बोल शशी देव तोहि सागरसा ॥
प्रेमें उचंबळे हो धरि कारुण्यें द्रवासि साँग रसा ॥ ६० ॥
धर्म म्हणे साध्वि बहु श्रमलीस स्वा-श्रमासि जा मागें ॥
जो मागशील तो वर देतों घे इष्ट तें मला मागें ॥ ६१ ॥
देवा व्हावे चक्षु-स्तेज-संपन्न आश्रमा-माजी ॥
मामाजी ऐसें द्या मति साहेनाचि त्याश्रमा माजी ॥ ६२ ॥
दिधलें धर्म म्हणे परि जातचि होती तशीच मागूनी ॥
देव म्हणे पुनरपि जा वत्से घे वर दुजाहि मागूनी ॥ ६३ ॥
ती सुमति म्हणे राज्य-भ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो ॥
पावुनि भवत्प्रसादें निज-पद बहु काळ सासु राहो तो ॥ ६४ ॥
होईल जा धर्म म्हणे परि करि अनुगमन सबहु-मान सती ॥
कीं ज़ी हंसी हंसावांचुनि मानील न बहु मानस ती ॥ ६५ ॥
पुनरपि मार्गी काढी जें धर्म-रहस्य जेविं नव-पुंसती ॥
तें होय वशीकरणचि कीं भासों दे तयाशि न वपु सती ॥ ६६ ॥
धर्म म्हणे गे बाई करिसी कां व्यर्थ या श्रमास तिजा ॥
वर घे नकोचि भागों आलीस सुदूर आश्रमा सति जा ॥ ६७ ॥
त्यासि म्हणे सावित्री संपन्न असो पिता सुतनय-शतें ॥
हा लक्ष्मीसुत-कवि किति लिहिल सतीचें उमासुत न यश तें॥६८
उडुपा उडुसें धर्मौ-दार्या लाजोनि अभ्र मुरडे हो ॥
सावित्रीच्या सुयशीं न दिसे पति म्हणुनि अभ्रमु रडे हो ॥ ६९ ॥
ऐसें शिरोनि चित्तीं घेउनि भारीहि तीन वर देवा ॥
सोडीना सोडविल्यावांचुनियां ती सती नवर-देवा ॥ ७० ॥
देव म्हणे तूं स्वच्छा स्वच्छायाशीच मागती सति घे ॥
वर घेउनि जा चवथा देतों मागोनि मागतीस तिघे ॥ ७१ ॥
व्हा सुप्रसन्न वत्से तज हो सुतशत असें वदा न्या हो ॥

१ पर्वतांसहित. २ पृथ्वी. ३ जिवंत. ४ मानस सरोवर. ५ नवीन काढलेली युक्ती. ६ " तयासि वपु न भासों दे " " त्याचें देहभान नाहींसें करी." ७ उत्तम शंभर पुत्रांनीं. ८ लक्ष्मी हें मोरोपंताच्या आईचें नांव. ९ गणपति. १० यमाच्या औदार्यास. उत्तरार्द्ध-सावित्रीचे अतिशुभ्र यशानें विश्व इतकें भरून गेलें होतें, कीं, अभ्रमूचा पति ऐरावत हा अत्यंत शुभ्र असल्यमुळें त्या यशांत बुडून कोठें दिसे-नासा झाला. तेव्हां ती रडूं लागली. तात्पर्य, सावित्रीचें यश अगदीं निर्मळ असून सान्या त्रैलोक्यांत भरलें होतें. यशाचा वर्ग शुभ्र आहे असें कवि मानितात.

सुयशोराशि स्वर्गीं लज्जा-मद सुरनगा वदान्यां हो ॥ ७२ ॥
भुलला धर्म द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला ॥
न करुनि विचार जावी मागें म्हणवुनि म्हणे तथाऽस्तु तिला ॥७३॥
हळुचि म्हणे सावित्री पावेन वरेंकरुनि संततिला ॥
तुमचा प्रसाद म्हणुनि प्रेमें गातील सर्व संत तिला ॥ ७४ ॥
तरि मत्पति मज द्या कीं तुमची पावेल मान सत्या गी ॥
यश रक्षाया प्राणहि सत्य-गुणासक्त-मानस त्यागी ॥ ७५ ॥
रोमांचित धर्म म्हणे बाई गातिल तुझा प्रभाव सती ॥
पतिशीं अविना-भावें वसशिल रविशीं जसी प्रभा वसती ॥ ७६ ॥
राज्य चतुःशत वत्सर करिल तुझा कांत सोडिला जा गे ॥
हा त्वन्महिमा जागो सीतेनें जेवि जोडिला जागे ॥ ७७ ॥
तें वृत्त वर्तमान स्वल्पहि नकळे तिच्या वरा पार्शीं ॥
जातां यम सावित्री धांवत आली कले-वरापाशीं ॥ ७८ ॥
पुनरपि तशीच बसली अंकीं घेऊनियां स्वपति-शिर ती ॥
जशि चेतना धवांगीं होय इची जीवितांत प्रांत शिरती ॥ ७९ ॥
वनदेवता म्हणति त्या बा गा मूर्च्छोत्थिता चकोरा हो ॥
स्वस्थ, ज्योत्स्ना कीं हे व्रत उठचि नमावया नको राहो ॥ ८० ॥
नेत्रें उघडुनि पाहे तो दयितेच्या मुखासचि वनीं ती ॥
दे त्यासि जसि नृपासि व्यसनीं देती सुखा सचिव-नीती ॥ ८१ ॥
स्त्रीस म्हणे सुभगे त्वां मृदु मांडी मांडिली उशी रमला ॥
आत्मा निद्रेशीं रवि मावळला लागला उशीर मला ॥ ८२ ॥
कथिन उद्यां झाली बहु रात्रि बळ असेल तरि उठा राया ॥
देतें हात चला जी घेत्यें फळ-भाजना कुठारा या ॥ ८३ ॥
नेत्रें पसोनि,पदरें पतिस म्हणे भेटतील मामाजी ॥
बाई म्हणतां रडतां पडतां दाटून कां श्रमामाजी ॥ ८४ ॥
भेटवित्यें त.ताला मातेला या उठा असें वदली ॥
आली घेउनि अद्भुत वाटे कलभाशि सांवरी कदली ॥ ८५ ॥

१ सत्याविषयीं तत्पर आहे मन ज्याचें तो. २ सोडिलो. ३ वियोग न होतां. ४ राहतें. ५ झालें काय व होत आहे काय. ६ पाशांत असतां. ७ तिच्या जिवांत जीव आला ८ मूर्छा जाऊन सावध झालेला. अशा. ९ मंत्र्यांनीं सांगितलेली चांगली मसलत. १० हे सुंदरि-प्रिये.

आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें नुरे गंध ॥
परि भूप पुत्र-मोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥ ८६ ॥
त्याला म्हणती गौतम दाल्भ्य भरद्वाज धौम्य तापस हा ॥
बागा उगा मुहूर्तोपस्थित दुर्दैव-दत्त ताप सहा ॥ ८७ ॥
सावित्री शुभलक्षण गुणसंपन्ना महासती बा हे ॥
जी जी साध्वी स्वधवाऽनुमतें द्वारस्था महास ती बाहे ८८ ॥
वाखाणिति बहु पाहति मुनि-दारहि भासुरव्रतें तिला जे ॥
साध्वीच देवता ही साध्वीला बा सुरव्रततेति लाजे ॥ ८९ ॥
शोकें रडतां डोळे जावे गेले कधीं न यावे गा ॥
दिसतें कल्याण पुढें होऊंचि नको अधीन या वेगा ॥ ९० ॥
ऐसें समजाविति त्या राजाला जों दयापर महर्षी ॥
तों झाले अवलोकुनि सावित्रीसह तया परम हर्षी ॥ ९१ ॥
मुनि म्हणती हा आला नेत्रें उघडुनि पहा सदारा या ॥
मोठा भाग्याचा तूं प्रमुदित यांसह रहा सदा राया ॥ ९२ ॥
दे आलिंगन अंकीं घे मस्तक-पद्म हुंग वाराया ॥
आत्माऽऽत्मज-तापातें दे आशी राजसत्तमा राया ॥ ९३ ॥
पुसतां विलंबकारण चित्राश्व म्हणे शिरोव्यथा-शयन ॥
मुनि म्हणति हें नव्हे वद वत्से हो तूंचि आमुचें नयन ॥ ९४ ॥
सावित्रीनें कथिलें तें वृत्त अशेष साधुसद नमुनी ॥
तेव्हां झाले अतुल प्रीति-क्रीडेशि केलि-सदन मुनी ॥ ९५ ॥
मार्कंडय म्हणे बहु वर्णावें काय जेविं शिवसेवा ॥
मज काळापासुनि तशी मुक्तकरी त्यांशि ती[11] [12] मनुजदेवां[13] ॥ ९६ ॥
दुसरे दिवशीं प्रकृति प्रार्थिति येऊनि आपल्या पतितें ॥
या राज्य करा सचिवें वधिला हरिली स्वभूमि ज्यापतितें ॥ ९७ ॥
मुनि म्हणति अनुभवावें स्वस्थ-मनें राज्यपद नता राया ॥
न तपोवन वर तुज बहु सावित्रीयुक्त सदन ताराया ॥ ९८ ॥

१ पुत्रशोकानें. २ क्षणभर प्राप्त झालेलें दुर्दैवानें दिलेलें दुःख. ३ सहन कर. ४ दारांत उभा राहिलेल्या. उत्तरार्द्ध--आनंद हा पतिव्रतेच्या नेहमी दारीं उभा असतो, म्हणजे तिला अति सुलभ असतो, हें तात्पर्य. ५ ऋषिपत्नी. ६ उत्कृष्ट आचारयुक्त. ७ कल्पवल्ली. ८ मस्तक व्यथमुळ निजणें. ९ साधूंचा समुदाय १० क्रीडेचें स्थान. ११ मन्यवानाला. १२ सावित्री. १३ हे धर्मराजा. १४ प्रजा.

सिंहा-सनीं बसविला सावित्रीच्या व्रतेंचि हा नियम ॥
वर-सामर्थ्य म्हणा परि गेला होता करुनि हानि यम ॥ ९९ ॥
सावित्रीनें केला उभय-कुलोद्धार हा असा राजा ॥
कृष्णाहि अशीच स्तुति येती न मुखाशि या असारा जा ॥ १०० ॥
राम-घन-मयूर म्हणे निववालचि सुरसिकांशि केका हो ॥
शंभुहि म्हणे न सेविति मद म्हणुनि झुरसि कौशिके कां हो ॥ १०१

---

## उद्योगपर्वांतील कृष्णशिष्टाई. ( गीतिच्छंद ).

पांडवांचा अज्ञात वास संपल्यानंतर त्यांनीं आपला राज्याचा हिस्सा आपणांस मिळावा, व दुर्योधनाशीं सल्ला व्हावा म्हणून कृष्णास शिष्ट ( वकील ) करून हस्तिनापुरास पाठविलें; हें ह्या आख्यानांत आहे.

धर्म म्हणे श्रीकृष्णा बुडतों मी सत्य जाण तार मला ॥
भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं सनकादि जाणता रमला ॥ १ ॥
जेणें न बुडे कुरुकुळ धर्म, यश, न्याय, त्याचि सदुपाया ॥
सांग, सख्या भ्रमला हा जन केवळ तूंचि आप्त यदुपा या ॥ २ ॥
श्रीकृष्ण म्हणे देवा जातों मी त्याकडे हित वदाया ॥
काय सुयोधन न शके पचवाया वृत्र-हा-हि तव दाया ॥ ३ ॥
धर्म म्हणे हितहि तया अहित, अहि तसाचि तो परम खळ गा ॥
व्यसनीं भल्यासि पाडी दुष्ट गजा जेंवि पिहित-मुख खळगा ॥ ४ ॥
शौरि म्हणे राजेंद्रा यद्यपि बलवान् तथापि, शुनकानें ॥
हरिचें काय करावें, परिसो तो हित-कथा पिशुन कानें ॥ ५ ॥
जिंकिल काय हरा तो जिंकी कुतुकेंचि मन्मथ नरा जो ॥
करिल हरि-मथन शश तरि करिल सुयोधनहि मन्मथन राजा ॥ ६ ॥
योजीन युक्ति सामीं सांदीपनिच्या तुझ्या बहु नव्याही ॥
प्राणापरीस बहु मज जेंवि तुम्ही तेंवि तो बहु न व्याही ॥ ७ ॥

---

१ हे धर्मराजा २ द्रौपदी. ३ निरर्थक. ४ राम हाच मेघ त्याला मोरासारिखा मोरोपंत कवि. ५ हे वारागसि. ६ या (साधर्मान) यदुपा (हे कृष्णा) तूंचि आप्त (आहेस.) ७ हे धर्मराजा. ८ गवतानें वगैरे झाकलें आहे तोंड ज्याचें असा. ९ तो खळ दुर्योधन. १० ज्याला. ११ दुर्योधनाचा मुलगी लक्ष्मणा ही कृष्णाचा मुलगा सांब त्यास दिली होती, म्हणून तो व्याही.

माय करी बाळाचें नित्य श्रमवूनि काय जेंवि हित ॥
तेंवि करितसे मन्मति होय निजदयेसि काय जें विहित ॥ ८ ॥
देईल अंश सुयोधन तरि आम्हा पावला सदाशिव हो ॥
म्हणतोसि तूंहि मीहि कीं प्रज्ञा-चक्षुचें[1] सदा शिव हो ॥ ९ ॥
श्रीराम जसा प्रेषी शिकवुनि सामोक्ति[2] अंगदा साच्या ॥
धर्म तसा प्रभुला, जो कार्या देणार अंग दासाच्या ॥ १० ॥
भीम म्हणे केशवजी मृदु बोला उग्र तो सुयोधन हो ॥
बा त्यासीं सख्यचि हो युद्धीं हत एकही सुयोध न हो ॥ ११ ॥
इतर असो लाजेलचि त्या नित्य मदांध सुरगज गदीशा[3] ॥
दुर्योधना गुरु असें म्हणतिल गरळांध उरग जगदीशा ॥ १२ ॥
श्रीकृष्ण म्हणे हरि भीमा जरि तूं महा-भुज गदीनें[4] ॥
भ्यालासि होय जैसा चिंतुनि गरुडा महाभुजग दीन ॥ १३ ॥
आम्हां तुझा भरंवसा बहु कीं खळ मर्दिशील तूं अगदीं ॥
निर्वीर्यत्त्व[5] चिकित्सा-समयीं[6] आलें चिरार्जितीं[7] अगदां ॥ १४ ॥
भीम म्हणे हा घ्याया सुत-शोक पित्यासि[8] यादवा[9] लाजे. ॥
भस्मचि होतील सकळ ते सांपडतील या दवाला[10] जे ॥ १५ ॥
अर्जुन म्हणे सख्या जें कीर्ति-कर असेल तेंचि कर जा गा ॥
सांगावें काय तुझा प्रणतत्राणीं असेचि कर जागा ॥ १६ ॥
कृष्णाहि म्हणे कृष्णा म्हणसि जिला प्रियसखी पहा हे ती ॥
विसरो तुझी न समयीं ईस श्रित-भव्यदा[11] महा-हेती ॥ १७ ॥
बहु गहिंवरोनि दावुनि दुःशासन-पाणि-कृष्ट[12]-केश वदे ॥
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकरा तीस अभय केशव दे ॥ १८ ॥
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे ॥
दुर्योधनप्रमुख[13]खळ-खद्योत-तदन्य-पद्म-भानु निघे ॥ १९ ॥

१ बुद्धिच आहे चक्षु ज्यास म्ह० अंध त्याचें-धृतराष्ट्राचें २ सामाविषयीं भाषणें ३ गदा धारण करणाऱ्यांत श्रेष्ठ अशा ( दुर्योधनास. ) ४ गदी+ इंन-गदा धरणाऱ्यांत श्रेष्ठ ५ निःसारपणा. ६ रोग दूर करण्याचे वेळीं. ७ पुष्कळ दिवस संपादन करून ठेविलेल्या औषधांत. ८ कौरवांचा बाप ( धृतराष्ट्र ) त्यास. ९ हे कृष्णा. १० हा ( मी जो भीमरूप ) वणवाच त्याला. ११ आश्रितांचें कल्याण करणारी. किंवा कृष्णाचें संबोधन. १२ दुःशासनानें हातानें ओढलेले केस दाखवून. १३ दुर्योधन आदिकरून जे दुष्ट हेच काजवे त्यांस, व त्या दुष्टांहून इतर म्ह० ( सुजन ) तेच पद्म त्यांस सूर्यासारखा. दुष्टांचें दमन करणारा व साधूंस संतोष देणारा असा कृष्ण.

धर्म म्हणे शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्धि कीर्ति-सह देवा ॥
मातेसि नमुनि वद कीं आहे आरोग्य साधु सहदेवा ॥ २० ॥
तूं जेंवि देवकीला भेटसि तैसेंच भेट आतेला ॥
आम्हाहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला ॥२१॥
कृष्णा कळेल तैसें वद कुंतीला न दुःख बाधावें ॥
पंकीं धेनु श्रमती पुण्यश्लोका मुरारि बा धावें ॥ २२ ॥
धृतराष्ट्र भीष्म बाल्हिक विदुर कृप द्रोण सर्व शुचि तज्ज्ञ ॥
जे त्यांसि भेट वद हित सांगो तुज काय, तूंचि उचितज्ञ ॥ २३ ॥
म्या पुसिलें कुशल असें कर्णासि सुयोधनासि सांगावें ॥
येतां पंचम, दाटुनि कर्ण-कटु पिकें शिकोनि कां गावें ॥ २४ ॥
ऐसें अजात-रिपु नृप सूचित सुचवूनि शौरिला परते ॥
मग विजय म्हणे देवा येऊं द्यावें न मज पुढें पर ते ॥ २५ ॥
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे पथांत नाकर्षी ॥
राजर्षि ब्रम्हर्षि स्वयश जयांच्या मनासि आकर्षी ॥ २६ ॥
इच्छा पुसतां वदले बा तुज सम अन्य बोलका नाहीं ॥
प्राशूं धृतराष्ट्र-सभेमाजि तुझे धन्य बोल कानाहीं ॥ २७ ॥
दे या अयास याया आज्ञा सदया महो-दया परिसा ॥
यापरि साधु-मनोरथ जाणोनि म्हणे मुकुंद या परिसा ॥ २८ ॥
सामार्थ प्रभु येतो ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं ॥
बहु तृषित अंध चातक मेघागम जेंवि काय केकांनीं ॥ २९ ॥
मार्गी सभा दसर्व हि बहु साहित्य प्रति-स्थळीं करवी ॥
कीं आपणा वरि दया-दृष्टि करावी यदूत्तमें बरवी ॥ ३० ॥
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हेचि निष्कपट ॥
मैंदाचें स्वीकारिल कवण विचक्षण अमूल्य निष्क पट ॥ ३१ ॥

---

१बाळा सहदेवाला सहदेव सर्वांत लहान असल्यामुळें असें म्हटलें आहे. २कुंतीला. ३कुंती हीच गाय. ४हा शंतनु राजाचा भाऊ व भीष्माचा चुलता. ५ज्ञाते. ६कोकिळास पंचमस्वर ( गोड ) येत असतां त्यानें शिकून ( दाटून ) कर्णकटु कां गावें ?—धर्मराजा अगदीं सरळ स्वभावाचा व अजात शत्रु होता म्हणून त्यानें कर्ण दुर्योधनास ( ते दुष्ट असतां ही ) कुशल विचारिलें हें तात्पर्य. ७ हे सदया, महोदया, ( भक्तांचा मोठा उत्कर्ष करणाऱ्या ) परिसा, या अयास ( हे आम्ही जे लोखंड ह्यांस ) याया ( येण्याला ) आज्ञा दे.

धृतराष्ट्र म्हणे विदुरा जो साधुमनें स्व-सद्गुणें हरितो ॥
येइल वृकस्थळाहुन आम्हां भेटावया उद्यां हरि तो ॥ ३२ ॥
दासी शत दासांहि शत आठ महा नाग रुक्म-रथ सोळा ॥
देईन तो हि सन्मणि . शुचि तेजाचाचि जो गमे गोळा ॥ ३३ ॥
विदुर म्हणे कपट मनीं प्रेम वरि असें करूं नको पावें ॥
तुज वरि न ईश्वरानें करुणा परती करून कोपावें ॥ ३४ ॥
पांचां पुत्रां द्यावों पांच न होउनि खळासि वश गावें ॥
तें तों न करिसि जेणें प्रभुनें स्वमुखें करूनि यश गावें ॥ ३५ ॥
गुळखोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा ॥
सत्य प्रेमचि दावुनि सुज्ञें तो विश्वपाळ कवळावा ॥ ३६ ॥
कपटादरें वळो परं पर परमेश्वर कसा वळेल हरी ॥
कृष्ण-कृपामृतनिधिची अकपट विनेताकडे वळे लहरी ॥ ३७ ॥
येतो साम कराया होय यशोर्थीच तो यशा लाहो ॥
देणार तुम्ही हय गज रथ दासी दास हे कशाला हो ॥ ३८ ॥
समजाल तरि करिल हरि हर्षे पावोनिया बिडा लास्य ॥
नाहीं तरी खेदद त्या सर्व, जसे प्रस्थिता बिडालास्य ॥ ३९ ॥
तेव्हां सुयोधन म्हणे सत्य न सोडील सख्य हरि त्यांचें ॥
न पुरेल कृष्ण-मानस-हरणीं बळ मेरूच्याहि हरित्यांचें ॥ ४० ॥
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुम्ही अहो तात ॥
भ्याले म्हणेल मान्य न अवमानाला कुलीन होतात ॥ ४१ ॥
त्रिभुवनपूज्यतम प्रभु सत्यचि हें किंच तो असे व्याही ॥
पर संप्रति सेव्य नव्हे सेवूं कृष्णेतरा असेव्या ही ॥ ४२ ॥
जें वैर वाढलें तें आतिथ्यें करुनि काय हो शमतें ॥
अवमान नव्हे जेणें तें क्षत्रोचित असें मला गमतें ॥ ४३ ॥
वृष्णिपें वृकस्थळाहुनि येतां भीष्मादि सुज्ञ ते सर्व ॥
जन सामोरे गेले अंडुक जाला सुयोधना गर्व ॥ ४४ ॥

१ वृकप्रस्थ ( गांवाचें नांव ). २ ईश्वराहून अन्य. ३ कपट सोडून ईश्वरास शरण गेलेल्या कडे. ४ बाहेर जाणारास जसें मांजराचें तोंड, ( मांजर आडवें आलें तर ) दुःखद होतें. ५ आणि. ६ क्षत्रियाला योग्य. ७ यादवांचा पति ( कृष्ण ) ८ गर्वानें दुर्योधन सामोरा गेला नाहीं, हें तात्पर्य.

धृतराष्ट्रगृहा नेती राजपथीं हळुहळूच हरि हरितें॥
त्यां पशु म्हणेल तो पशु त्यांचें सरूपत्व अतुळ हरिहरि तें॥४५॥
भेटे धृतराष्ट्राला तत्कृत पूजेसि बहुत भाउनि घे॥
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा निववावयासि भाउ निघे॥४६॥
विदुर म्हणे अमृतकरा निववूं आलासि या चकोराला॥
मुक्तार्पितमाळाश्री देतें त्वद्ध्यान याचकोराला॥४७॥
आहेत सुखी पांडव देवा आलासि काय सामास॥
खळ न वळेल झिजविला जरि करितां बोध काय सा मास॥४८॥
विदुरासि भेटल्या वरि भेटे सर्वाभराज कुंतीतें॥
जीस असुख सह्य गमे दे जें भेदूनि त्दृदय कुंतीं तें॥४९॥
वैकुंठाच्या कंठीं घालुनि मिठी रडे पृथा आर्या॥
ब्रम्हास्रहि गहिंवरवी महिवर वीरेंद्र-पांडुची भार्या॥५०॥
प्रभुला म्हणे मुकुंदा बा तूंचि करिसि सुखी सखेदास॥
संप्रति आहेत कसे मद्‍बाळक ते तुझे सखे दास॥५१॥
प्रियसुतविरह सुदुःसह देहविरह बहु बरा सुसह देवा॥
पावेन कधीं बा मी म्हणतें स्व बहिश्चरासु सहदेवा॥५२॥
वत्सा सहदेवा मी मेल्यावरि हाय नच वदावें हो॥
तेरा पळेंहि नसती माता, हें हायन चवदावें हो॥५३॥
प्रभु अश्रु पुसोनि म्हणे जें संकल्पित घडेल सत्वर तें॥
आत्याबाई कवणें ऐसे श्रम भोगिले न सत्वरतें॥५४॥
मच्चित्त कौरवांचे चिंतुनि असाधु-वाद तव्मळतें॥
असतों मी तैं तरि न व्यसनमळें धर्मपादतळ मळतें॥५५॥
आहे स-दार सुखी देवि नमस्कार हे तुला साजे॥

१ घोडे. २ आश्चर्यवाचक हे शब्द आहेत. कृष्ण मूर्ति चांगली सर्वांचे दृष्टीं पडावी म्हणून घोडे हळू चालत होते हें तात्पर्य. ३ धृतराष्ट्राचा भाऊ (विदुर). ४ तुझें चिंतन करणाऱ्या याचकाच्या त्दृदयाला मोत्याच्या कंठीचो शोभा येते म्ह० मोत्यांच्या कंठीनें जशी वक्षस्थळास शोभा येते त्याप्रमाणें तुझ्या चिंतनानें अंतःकरणास समाधान वाटतें. ५ संधि करावयास. ६ सहा महिनें-पुष्कळ दिवस हा अर्थ. ७ भाला धारण करणारा. ८ दुःखितास. ९ देहाचा नाश. १० बाहेर संचार करणारा प्राण. ११ पुत्रवियोग झाला असतां माता (आई) तेरा पळें ही वाचावयाची नाहीं; परंतु मी १३ वर्षें वाचलें आहें, म्हणून मला माता हें नांव शोभत नाहीं, हें तात्पर्य. १२ दुर्भाषणें.

ऐसें सांगुनि वंदी तें त्या श्रित-शर्म-हेतुला साजे ॥ ५६ ॥
समजावुनि कुंतीतें भेटे दुर्योधना असेव्या ही ॥
कीं तो स्वस्नुषा स्वसुता देउनियां जाहला असे व्याही ॥ ५७ ॥
लघु म्हणति जे सुयोधन- दुःशासन-शकुनि-कर्ण वेनातें ॥
परिरंभ-पात्र केले प्रभुचें सौजन्य वर्णवेना तें ॥ ५८ ॥
पूजुनि घे प्रभु होइल जलनिधिला तृप्तिदायक विहीर ॥
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय कवि-हीर ॥ ५९ ॥
भोजन करा म्हणे शठ देव म्हणे मज कशास होकारितां
जेवा तम्हीच दाटुनि आदर आग्रह कशास हो करितां ॥ ६० ॥
असतों जरि अन्नार्थी प्रथमचि म्हणतों अवश्य मी तुजला ॥
प्रेमार्थी पांडवसख हा अन्नाकारणें नसे सुजला ॥ ६१ ॥
प्रभुला म्हणे सुयोधन तिकडे हिकडे हि सम असे नातें ॥
ज्याकारणें करावा अस्मदनादर तुवां असेना तें ॥ ६२ ॥
देव म्हणे केवळ ते न सोयरे मदसु सर्व वसु देव ॥
मान्य जसे अक्रूरो- द्धव-बळ-भद्रोग्रसेन-वसुदेव ॥ ६३ ॥
जे तत्सख तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरे अगा राया ॥
द्विषदन्न न सेवावें म्यां येऊंही नये अगारा या ॥ ६४ ॥
खोटा सुयोधन म्हणुनि विदुरगृहा जाय देव नच खोटा ॥
गोपोच्छिष्टा वळला वळता कां वासुदेव न चखोटा ॥ ६५ ॥
दुःसंग-नक्र-दत्त क्लेश निवारूनि सर्व विदुर-गजा ॥
मुक्त करी हरि, लाजे गातां गुण-कीर्ति सर्वविदुरग जा ॥ ६६ ॥
शत-संख्य वाजवी ज्या जेववितां माय देवकी चिटक्या ॥
तो नित्य-तृप्त भगवान् विदुरगृहीं भोजनांत दे मिटक्या ॥ ६७ ॥
आले ढेंकर दिधल्या मिटक्या बहुसाळ मारिले फरके ॥
उरकें सर्वा मागुन अशन परि न ताटचाटणें उरके ॥ ६८ ॥
ज्याच्या चरणें स्वरजाकरवीं प्रणतासि मोक्ष देवविला ॥

१ ह्या नांवाचा राजा महा पातकी व दुष्ट होता; त्यालाही जे सुयोधनादि लघु (लहान). ( तो काय आमच्या पुढें ! ) असें म्हणती. २ पांडवांकडे व आम्हांकडे. ३ गोपाळांच्या उच्छिष्टास. ४ दुःसंग हाच नक्र ह्यानें दिलेले. ५ विदुररूप गजेंद्रास. ६ ( सर्व वित्+उरग ) सर्वज्ञ शेष. ७ चुटक्या.

देव विलास-मनुज-तनु विदुर-प्रेमें यथेष्ट जेवविला ॥ ६९ ॥
मग रात्रौ एकांतीं सर्वज्ञाला हि साधुराय कवी ॥
पाय रगडितां दुर्जन-दुर्योधन-दुर्मतासि आयकवी ॥ ७० ॥
पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रि-रज निसरे ॥
त्या दानवबंधुची ती चिंता न सरे परंतु रजनि सरे ॥ ७१ ॥
प्रातःकाळीं सशकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला ॥
प्रातर्विधि करुनि प्रभु जाय प्रज्ञांबका पहायाला ॥ ७२ ॥
जनदृष्टि-चातकी जी तूर्य-रवें करुनि देत ओ तीतें ॥
प्रभुमेघ दर्शनामृतें दुर्लभ जें तन्मुखांत ओती तें ॥ ७३ ॥
मग जी जलदश्यामा करुणा बसली नवासनावरि ती ॥
जीच्या उपासक जना प्रति विषयाच्या न वासना वरिती ॥ ७४ ॥
केवळ जवळ बसविला विदुर प्रेमें करूनि मापानें ॥
तद्यश न मोजवेल ब्रम्हांडा येवढ्याहि मापानें ॥ ७५ ॥
टकमक पाहत होते प्रभुमुखचंद्राकडेचि चातकसे ॥
नसतील जोडिले श्रवणांहि बसाया मनासि हात कसे ॥ ७६ ॥
सभ्य श्रुतिवदनातें परसरिति सेवावया भगवदुक्ती ॥
प्राशावयासि जेंवीं स्वच्छ स्वात्यंबुला जलधिशुक्ती ॥ ७७ ॥
देव म्हणे धृतराष्ट्रा राया मोठी जगीं तुझी पदवी ॥
पद विद्यांचें तूं परि परिस मज बळेंचि आपता वदवी ॥ ७८ ॥
जें मेळविलें चंदन-सम झिजवूनि परसुखार्थ आंगातें ॥
केवळ कृपाळु-पूर्वज-सद्यश मळविसि बळेंचि कां गा तें ॥ ७९ ॥
दुःख परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी ॥
जोडावी कीर्ति असी कुळरीति तुम्हीं कधीं न मोडावी ॥ ८० ॥
मुख्य स्वबंधु पांडव तन्नाशातेंचि हे अकवि टपती ॥
विश्वस्ता मीनातें परदारातें जसें बक विटपती ॥ ८१ ॥
वाढिव धर्म प्रेमें वाढवि मज जेंवि नंद नवनीतें ॥

१ लीलेनें मनुष्य देह ज्यानें धारण केला आहे असा. २ प्रज्ञा चक्षु-धृतराष्ट्रास. ३ जन दृष्टि जी चातकी तीतें प्रभु-मेघ तूर्यरवें करूनि ओ देत जें दुर्लभ दर्शनामृत तें तन्मुखांत ओती. ४ कृष्ण रूप. ५ लक्ष्मीपतीनें. ६ कान हींच वदनें त्यानें. ७ स्वाति नक्षत्राच्या उदकास. ८ दुर्योधनादि मूर्ख.

सत्पुत्रांनीं भवनीं सुरतरुनीं न सुख नंदनवनीं तें ॥ ८२ ॥
म्हणतो युधिष्ठिर नको पायें लोटूं मला अवनतातें ॥
वचनकरापथ्याचें न करावें काय हो अवन तातें ॥ ८३ ॥
ऊमिले तसेचि कथिले होते त्वां त्यांसि अब्द तेरा जे ॥
धन्य म्हणत होते जे लाविति तुलाचि शब्द ते राजे ॥ ८४ ॥
सुखसंततिसुकृतर्द्धि–प्रीति–श्रीपुण्य–कीर्ति यालाभें ॥
साम करीं साधूंशीं नाहीं तरि पावलेंचि यांला भें ॥ ८५ ॥
बहु सत्य बहु प्रिय बहु–हित बहुमत बहु दुराप बहु रुचिर ॥
शुचि रम्य क्षीरधिजाननचंद्रचकोर बोलिला सुचिर ॥ ८६ ॥

## आर्या–भीष्मपर्वांतील युद्धप्रकरणीं.

युद्धारंभीं यदुपति वदला विजया रथातळीं उतर ॥
दुर्गेसि हात जोडीं होईल खल–बल–समुद्र हा सुतर ॥ १ ॥
त्रिभुवन इच्या प्रसादें जेंवि वसंततुनें समस्त वन ॥
शोभे, म्हणुनि करावें त्वां केवळ दुर्बलासम स्तवन ॥ २ ॥
स्वरथा–खालें उतरुनि नमुनि म्हणे विजय विजय दे दुर्गे ॥
त्वत्पदभजनीं बहु सुख म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला दुर्गें ॥ ३ ॥
वासरमणि–कोटिरुचे हास–रस–वशीकृतस्मरारातें ॥
कासरनगासने हा दास रणीं विजयपात्र हो मातें ॥ ४ ॥
त्वदुदारता जसी तसि न सुरांच्या बहुमतां अगा साधो ॥
ऐसें स्तवितांचि शिवा दर्शन देउनि म्हणे अगा साधो ॥ ५ ॥
द्याया मज यश लोकां सुख गृध्रां तो कुलाय मास मरे ॥
मरतिल तसेचि तव रिपु मानुनि समरीं तुला यमासम रे ॥ ६ ॥
देउनि विजयवर असा जाली अंतर्हिता भवानी ती ॥
सदवन असदनवन या नित्य जिच्या बहुमता भवा नीती ॥ ७ ॥

---

१ आज्ञेंत राहणाऱ्या मुलाचें. २ सुखादिकांला. ३ लक्ष्मीच्या मुखचंद्राविषयीं चकोरासारखा कृष्ण. ४ गे दूर हो. ५ कोट सूर्यांप्रमाणें आहे तेज जीचें. ६ आपल्या सुंदर हास्यानें स्वाधीन केला आहे मदनाचा शत्रु शिव जीनें. ७ महिषासुर व विंध्याचल ह्यां वर बसणारी. ८ कल्पवृक्षास. ९ महिषासुर.

युद्धारंभीं भीष्म-द्रोण-[1]संमुखाखिलाप्तवधभीता ॥
शक्रसुता त्रिजगद्गुरु-कृष्णें उपदेशिली स्वयें गीता ८ ॥
गतमोह तमोहरसा सजला त्हृतगोपमुग्ध सारथि जो ॥
तत्तेजें न गळे पर-बळ तरि अनळेंहि दुग्ध-सार थिजो ॥ ९ ॥
बहुविध-वाद्य-रव अमर-नाथादि-विमान दाटले खांत ॥
वर्णिति नरनारायण कोण तयांचे न भाट लेखांत ॥ १० ॥
भीष्म पुढें करुनि उठे प्रथम सुयोधन करावया कदन ॥
भीम पुढें करुनि उठे धर्म प्रभु जो सुकीर्तिचें सदन ॥ ११ ॥
भीमाचा सिंहध्वनि कोणासहि आयकों न दे वाद्यें ॥
सोडुनि समाधि मस्तक डोलविलें आयकोनि देवाद्यें ॥ १२ ॥
येउनि वराप्सरा अव-लोकी राजन्यसंगरा जा जी ॥
ती तदितर वांछीना जेंवि सती अन्यसंग राजा जी ॥ १३ ॥
वृद्धतरुण भीष्मार्जुन परि न रणीं न्यून अधिक ते गमले ॥
सम लेखांपि तयांतें जाणुनि तद्भुज-पराक्रमीं रमले ॥ १४ ॥
सूं सणणण सणणणणण वाजति शर-निकर कायहानि-कर ॥
वदले सुर मुनि करितो नररूपें रुद्र काय हा निकर ॥ १५ ॥
शरधी जलधी फुटले कीं देवें पाश एकदां तुटले ॥
कीं काळ व्याळ, करटि-घोटक-भटभेक खावया सुटले ॥ १६ ॥
कवि योजुनि उपमा गजहरनरशरततिस वाहुटळ लाजो ॥
अतुल-बल न कां गरगल-[10][11]कलहींहि न विजयबाहु[12] टळला जो ॥ १७ ॥
देवाऽसुराऽहव न बहु त्या कौरवपांडवाहवाहून ॥
शोणित-नदींत गेले सभटरथद्विरदवाह वाहून ॥ १८ ॥
तिसरे दिवशीं राया भीमानें अतितरोग्रकोपानें ॥

---

१ भीष्म द्रोण आदिकरून संपूर्ण आप्तांचा वध होईल म्हणून भ्यालेला जो शक्रसुत अर्जुन, त्यास. २ ज्यानें गोपस्त्रिया हरण केल्या तो कृष्ण ज्याचा सारथी आहे असा. (अर्जुन) ३ अर्जुन व कृष्ण (वर्णिति ह्याचें कर्म) ४ महादेवानें. ५ क्षत्रियांच्या युद्धास. ६ हे धृतराष्ट्रा. ७ शरीरांचा नाश करणारे. ८ कृष्ण सर्प. ९हत्ती, घोडे. व योद्धे हेच कोणी बेडूक त्यांस गिळावयास. १०हत्तींचा नाश करणाऱ्या अर्जुनबाणसमुदायास उपमा वाहुटळ योजून कवि लाजो. ११ विष आहे कंठांत ज्याच्या अशा शिवा बरोबर युद्ध करण्यांत. १२ अर्जुनाचा बाहु. १३ योद्ध्यांसह रथ हत्ती व घोडे.

दुर्योधन नृप मूर्छित केला भेदुनि उरांत रोपानें ॥ १९ ॥
असतां तुम्ही पति पृथा-पुत्र मथिति या मदीयपृतनेतें ॥
नवल ज्वलदनलाचें सर्वस्वें बळ हरोनि घृत नेतें ॥ २० ॥
जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें ॥
पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य थानातें ॥ २१ ॥
राया भलतें वदसी पथ्य हित स्वगुरुवच न आइकसी ॥
अन्य असोत वदेल स्वसुताप्रति अहित वचन आइ कसी ॥२२॥
कैसा जिकावा हो करुनि बळें आहवा युवा जीनें ॥
बा जिंकिला कधींतरि जवनें तरुणेंहि वायु वाजीनें ॥ २३ ॥
मी आजि साग्रजानुज शक्रसुताचें करीन वारण गा ॥
बहु हेंहि पदभरिहि जरि सारील अनव करी नवा रणगा ॥ २४॥
असि करुनियां प्रतिज्ञा विष्णुपदानंदनें अतित्वरितें ॥
पांडवचमूपतीचें मथुनि चमू पाडिलें पतित्व रितें ॥ २५ ॥
जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महाजवन तो बा ॥
बहु हाय हाय म्हणति प्राकृत, बुध हंत हा, यवन तोबा ॥२६॥
गरुडहि अहीस न तसा न करि-कुळालाहि तेंवि हरि खपवी ॥
दुर्योधनासि जैसा दे भीष्म न हरिस तेंवि हरिख पवी ॥ २७ ॥
धर्मकटक खांडववन भीष्म विजय विजय तोचि हरि गमला ॥
शरदव रक्त ज्वाला रूपक याहूनि होय बहु न मला ॥ २८ ॥
पडतांचि गांठ जाले समर-चमत्कार फार न वदवती ॥
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शतकलश-सदृश नव दवती॥ २९॥
वाटे तुमचा उरविल कृष्णांचे जीव न स्थविर तात ॥
दिसले शरांत ते[11] नग कल्पांबुधिजीवनस्थ विरतात ॥ ३० ॥
शांतनव सिंह गमला पळतां नर रथ हि तो पळ ससाच ॥
ससखं प्रभुहि वसंतीं बहु[12] फुलला होय हा पळस साच ॥ ३१॥

---

१ सेनापति. २ पेटलेल्या अग्नीचें ३ दुसरें मूल. ४ तरुण-अर्जुन ५ मी म्हातार्‍यानें. ६ वडील व धाकट्या भावांसह ७ इंद्राला. ८ अर्जुन. ९ इंद्र. अर्जुनानें अग्नीस खांडव वन जाळावयास दिलें; तेव्हां इंद्राचें व अर्जुनाचें युद्ध झालें अशी कथा आहे. १० भीष्म. ११ कृष्णार्जुन. १२ अर्जुन व कृष्ण ह्यांस भीष्माचे पुष्कल बाण लागून त्यांच्या अंगांतून रक्त वाहूं लागले असतां, ते फुललेल्या पळसासारखे दिसूं लागले.

जोंजों ह्याणी खर शर तो रिपुयवसदव[१] तारकोपाया[२] ॥
तोंतों लागे हळुहळु कमलाधव सदवतार कोपाया ॥ ३२ ॥
जो मातृस्नेहाचा चिर्त्तीं स्नेहें निजें विसर घाली ॥
तो भीष्मावरि कोपे स्वमधुहराउपरि[४] जेंवि सरघाली[५] ॥ ३३ ॥
चक्र करीं धरुनि रथा-खालें टाकुनि उडीस जंव धांवे ॥
वाटे त्या सिंहानें सर्वहि भीष्मादि ते गज वधावे ॥ ३४ ॥
धांवुनि यत्नें धरि परि वोढुनि ने देव त्यासि वोढकसा ॥
जाणों म्हणे भुजबळें पाहूं जरि वोढितोसि वोढ कसा ॥ ३५ ॥
कर जोडुनि भीष्म म्हणे येतां मारावयासि याहो या ॥
हा सत्यसंध केला मुक्तहि साधूंसि गावया होया ॥ ३६ ॥
केला उभा सिताश्वें चरणीं घालुनि मिठी पदीं दशमीं[६] ॥
प्रभु तत्त्व असें कळवी कीं प्रेमबळेंचि पदनता वश मी ॥ ३७ ॥
पाय धरुनि पार्थ म्हणे त्यागुनि धन काय जीप्रति ज्ञाते ॥
बहु जपले तद्गुरुनीं त्यागावी काय जी प्रतिज्ञा ते ॥ ३८ ॥
या दासाकरवींच क्षिप्र तुम्ही या यशास करवाल ॥
नखहि नको ज्या कार्या त्या काढावा कशास करवाल ॥ ३९ ॥
यापरि हित प्रिय पृथा-पुत्रोक्ति अमान्य कां करील हरी ॥
सन्मित्रोक्ति करी जें अमृतरसाची न तें करी लहरी ॥ ४० ॥
बहु काय वदों राया तिसऱ्या दिवसाचिया चरमयामीं ॥
भूमितळा मांसमया देखत होतां नभा शरमया मी ॥ ४१ ॥
भीष्मासि म्हणे राजा व्हावी ऐसी रणांत मदवस्था ॥
झाला मला सुदुःसह हा ऐसा होय ताप न दवस्था[७] ॥ ४२ ॥
शिरला भीम व्यूहीं जेंवि अजकुळांत लांडगा शिरतो ॥
दैवेंचि रक्षिलें मज कापित होताचि दांडगा शिर तो ॥ ४३ ॥
या तुमच्या पावांच्या दुर्बलसेनासमान वध सेना ॥
हें झाल्या कां स्वर्गी जोडुनि एनास मानव धसेना ॥ ४४ ॥
झालीं युद्धें शतशः सर्व-प्रेक्षक-मनोहरें सरसें ॥

१ शत्रु रूप तृणास वणव्यासारखा. २ तारण्याचें साधन (कृष्ण) त्यास. ३ पाहतो. ४ आपला मध हरण करणाऱ्यावर. ५ मधमाशांचा थवा. ६ दहाव्या पावलीं. ७ वणव्यांत सांपडलेल्यास.

होय रणांगण रक्तो-त्पलवनचितपद्मरागभूसरसें ॥ ४५

भीष्म ग्रीष्म-तरणिसा अर्जुन हेमंत-तरणिसा गमला ॥
देव म्हणे बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाचि राग मला ॥ ४६ ॥

हो शूर दूर ओसर ह्मणणार महा-प्रभाव हा रविला ॥
हार विलासिजनेंसा येणें कैसा प्रभाव हारविला ॥ ४७ ॥

झाला धीर परि परि-म्लान सखा जातिपष्पगुच्छकसा ॥
तुच्छ कसा हा प्रवया चिरडिल भलता अहींद्रपुच्छ कसा ॥४८॥

हा पांडवांशि भस्मचि करिल उपेक्षा करूनये याची ॥
पदरा अकीर्ति आश्रित-सुहृदवन पथकरून येयाची ॥४९॥

आणुनि मनीं असें ज्या धन्य म्हणति सर्व विप्र तो दास ॥
भीष्म वधाया धांवे हरि हस्तें कवळुनि प्रतोदास ॥ ५० ॥

देव रथातें सोडुनि धांवे देवापगाविलापार्थ ॥
कीं दुस्तरारिसागरें न बुडो कांसेसि लाविला पार्थ ॥ ५१ ॥

पार्थाप्रति प्रयत्नें तो बळ-कारुण्य-सिंधु राखाया ॥
क्रोधें गर्जत धांवे सिंह जसा मत्तसिंधुरा खाया ॥ ५२ ॥

एह्येहि देव देव श्रीकृष्ण नमोस्तु ते असें बोले ॥
बोले गळ प्राज्यप्रेमाश्रुभरें करूनियां डोले ॥ ५३ ॥

भीष्म म्हणे त्वद्धस्तें व्हाया समरांत शांत नवसा जो ॥
होता करीत तो हा जेंवि हरि-हतेभ शांतनव साजो ॥ ५४ ॥

जरि मारिसील मज गति-लाभ तुजहि कीर्तिलाभ गुरुतर तो ॥
विश्वगुरो प्राकृतही तारुनि शरणागतासि गुरु तरतो ॥ ५५ ॥

तूं हरिसा हरि साचा हरिणी सुरसिंधु मोहि पाडससा ॥
पाड, ससाध्वस हो अरि, हरिशीं पावेल काय पाड ससा ॥५६ ॥

१ तांबड्या कमलांच्या समुदायानें युक्त व माणकांची ज्यास जमीन आहे अशा सरोवरा सारखें सर्व रणभूमीवर रक्ताचे प्रव ह वाहूं लागले, व त्यांत मनुष्यांचीं मस्तकें ( तोडलेलीं ) तरंगत होतीं हें तात्पर्य. २ हा शूर ( व ) महाप्रभाव ( अर्जुन ) हा दूर, ओसर, ( असें ) रविला म्हणणार, ( त्या ) येणें ( ह्या अर्जुनानें ) विलासि जनें हारसा प्रभाव कैसा हारविला; हा अन्वय ३ आश्रित व मित्र ह्यांचें संरक्षण न करण्याचें पत्करल्यामुळें. ४ यावयाची. ५ ( देव+आपगा+विलाप+अर्थ ) गंगेला पुत्राच्या मरणानें विलाप करावयास लावावें म्हणून. ६ एहि एहि ( ये ये ) ते नमः अस्तु ( तुला नमस्कार असो ).- ७ मृत. ८ सिंहानें मारलेला हत्ती. ९ मार.

ब्रम्हांड भस्म व्हावें ज्याच्या दररक्तचक्षुच्या[1] पातें ॥
तो तूं आंगें मारूं पाहसि मज दावुनि मतापातें ॥ ५७ ॥
झालों धन्य त्रिजगीं भास पळ प्राकृतास मारकसा ॥
त्या प्रभुनेंही केला भस्म स्वातिक्रमेच्छु मार.कसा ॥ ५८ ॥
धांवुनि धरी धनंजय मागुनि त्या माधवासि बाहूंनीं ॥
मग दृढ चरणींच मिठी घाली पहिलीच रीति पाहूनी ॥ ५९॥
दूर उसळला तेव्हां कोपावेशें मुकुंद कंदुकसा ॥
राहे उभा प्रभु गमे इभसा धृत-चरण भक्त अंदुकसा ॥ ६० ॥
पार्थ म्हणे श्रीधर्मा-वरि धरितिल जे असिप्रति ज्ञाती ॥
मरतील, त्यजसी कां आयुध न धरिन असि प्रतिज्ञा ती ॥ ६१ ॥
मारिन भीष्मातें मी इतरांतेंही भवद्दयाधारें[3] ॥
बा त्वत्प्रसाद ज्यावरि केवळ मेर्वग्रही[4] तया धारें ॥ ६२ ॥
कुरुकुंजरासि गेला होता यदु-सिंह तो खरा खाया ॥
परते पर तेथूनि प्राण-प्रिय-मित्र-तोख राखाया ॥ ६३ ॥
कृष्णा स्वरथीं चढतां समरचमत्कार मग नवा तातें ॥
दाखविला वाहों दे न शर-व्रज-पूर्ण गगन वातातें ॥ ६४ ॥
भीष्मशरव्रज दावचि पांडवभटनिकर तो गमे घास ॥
क्षण सोसवे न कोणासहि जैसा वायुवेग मेघास ॥ ६५ ॥
जेंवि महावात करी अभ्रांचा नलगतां पळ विसकट ॥
त्वत्तात-शरव्रात ध्वंसुनि सर्वांसही पळवि सकट ॥ ६६ ॥
बहु वधिले उरले जे ते केले बाहुजप[6] पराभूत ॥
पाहों शकले न जसे श्रीनरहरि-मंत्र-जपपरा भूत ॥ ६७ ॥
तों मावळला दिनकर होय बहुश्रम साध्वस, मग तिंहीं ॥
केला अवहार[7] परि-श्रांतांहीं लंघिताध्वसमगतिहीं[8] ॥ ६८ ॥

१ किंचित् डोळे लाल करून पाहिलें असतां २ महादेवानें. ३ तुझ्या कृपेच्या आश्रयानें. ४ मेरु पर्वताचें शिखर ही. ५ हे धृतराष्ट्रा तुझा जो तात ( बापासारखा ). ( भीष्म हा धृतराष्ट्राचा चुलता होता ) त्याच्या बाणांचा समुदाय. ६ क्षत्रियश्रेष्ठ. ७ पसरलेल्या सैन्याचें एकीकरण. ८ लांबून चालून आलेल्या मनुष्याप्रमाणें ज्यांची ( मंद ) गति आहे अशा.

## द्रोण पर्वांतील युद्धप्रकरणीं.

भीष्म पडतांचि गेले सर्वांचेही पळांत आवांके ॥
नसतां धुरंधुर वृषभं बाळवृष भेरं करूनि आ वांके ॥ १ ॥
रवि-रुचिचें तीमागें संपादे स्वल्प काज वातीस ॥
विसरविल काय? तेज प्रकट करुनि अल्प काजवा तीस ॥ २ ॥
कुरुराज म्हणे गुरुजी सेनापति शत्रुबळविरामा व्हा ॥
तुमची आम्हा पळवू अहितमदा जेंवि पळवि रामा-व्हा ॥ ३ ॥
द्रोण म्हणे सेनापति होतों म्हणतोस जरि परि स्पष्ट ॥
धृष्टद्युम्नासि न मी वधिन करीन त्वदर्थ बहु कष्ट ॥ ४ ॥
मी समर पांडवांसीं करिन हरिन अरि-नराधिपति-कटकें ॥
भट केंवि टिकेल इतर गरुड निरखिजेल काय गा चटकें ॥ ५ ॥
गुरुरथवेग असह्यचि झाला त्या विष्णुपत्त्ररथवेगा ॥
केला पांच दिवस बहु युद्धचमत्कार तो न कथवे गा ॥ ६ ॥
धृष्टद्युम्नें वधिला अन्यायें सकळ सैन्य हळहळतें ॥
गुरुमरण तसें देतें जैसें दे मोह दैन्य हळ-हळ तें ॥ ७ ॥
धृतराष्ट्र विलाप करी बहु आपण आपणासि निंदुनि घे ॥
स्मृति हरपे, करॅपेचि न तन्नयनातंनि अश्रुबिंदु निघे ॥ ८ ॥
बहुजन बुडवुनि शोकीं दुष्टा दुर्योधना बुडालास ॥
मकरालय लंघाया मत्ता मशका कसा उडालास ॥ ९ ॥
गज गोष्पदीं बुडाला हा दैवा सिंधु शोषिला मशकें ॥
न शकें सोसाया हें वधिला तो केसरी कसा शशकें ॥ १० ॥
मी माझें हें घातक लागो या आजि आग मोहाला ॥
न मनांत अहंममताभ्यधिका लोकांचिया गमो हाला ॥ ११ ॥
सांग रणकथा काढिल नसतां मनिं मोह काय बाप रडें ॥
वांकेल ताजव्याचें भारावांचोन काय बा॰परडें ॥ १२ ॥

१ सूर्याच्या कांतीला. २ शत्रूच्या सैन्याच्या नाशाकरितां, अथवा (नाश करणाऱ्या) हें संबोधन समजावें. ३ शत्रूकडील राजांची सैन्यें. ४ विष्णूच्या पक्ष्याच्या (गुरुडाच्या) वेगास ५ह्याचा कर्ता अश्रुबिंदु. ६ समुद्र. ७ गाईच्या उमटलेल्या पावलाच्या पाण्यांत. ८ अहंभाव व ममता. ९ अहंपणा व ममता ह्यांपेक्षां अधिक (मोहक).

संजय म्हणे नृपा मन लावूनि अनश्वरीं सुखीं[1] न रडें ॥
हो सावध काळानें जों नाहीं घातलें मुखीं नरडें ॥ १३ ॥
पुत्राप्त-राज्य-मोहें होय जरि तुज व्यथा परि स्मराया ॥
मोह श्रोत्याचा[2] मी कथिन गुरुवरें[3] कथा परिस राया ॥ १४ ॥
मग आम्ही ते करिते-झालों स्वजयार्थ आहवारंभा ॥
भट म्हणती वीररसें शृंगाररसांत वाहवा रंभा ॥ १५ ॥
भट गांठिती भटांतें अहि अहितें जेंवि पतग पतगातें ॥
कीं हरि हरितें अत्यद्भुत होय द्वंद्व-युद्ध-शत गा तें ॥ १६ ॥
करिते झाले युद्ध क्रुद्ध शरभ-सिंह-देव-दानवसे ॥
मानवसे गमले न स्नेह कणहि तन्मनीं तदा न वसे ॥ १७ ॥
रविला झांकी गगनीं कुरुगुरु बहुशरभरीं तिमिरें[4] विखरी ॥
लीलेनें नरकेसरि लक्ष चिरी शरभरींति मिरवि खरी ॥ १८ ॥
धर्माला गांठाया धांवे तो विप्र[5] कटक विसकटुन ॥
वाटे तदेकविशिखाहुनि सिंधुजगरल[6]घट कविस कटु न ॥१९
रक्तनदी वाहविली राया त्या शत्रुसिंह-शरभानें ॥
केवळ कुरुकटकाचीं हरिलीं विखरुनि अनंत-शर भानें ॥ २० ॥
पार्थाचा प्रलयघनाधिक दारुण देवदत्त दर वाजे ॥
दरवाजे से डोळे झांकिति आइकति भीतिद रवा जे ॥ २१ ॥
शर्मा रथ धर्मा धनु बाहु आते सुपूर्व[9] पांच विती ॥
ज्यां त्यांशि पूतनाशी[10] विजय-विशिख-वृष्टि पळ न वांचविती २२
शरतिमिरीं कृष्ण म्हणे मच्चेतोंबुजनवातप[11] क्वा-[12]सि ॥
चित्र अपक्वाहि फळप्रकरा पाडी न वात पक्वासि ॥ २२ ॥
वेष्टा धनंजयाला आत्मवशें सत्य[13]पांड वेष्टाया ॥
चेष्टा करूं न द्याव्या गोपाळा सत्य पांडवेष्टां[14] या ॥ २३ ॥

---

१ अक्षय सुखाकडे मन लावून म्ह० मोक्ष सुख प्राप्त करून देणाऱ्या मार्गाकडे मन वळवून. २ श्रोता जो तूं, त्याचा. ३ व्यासाच्या प्रसादानें. ४ अंधार पाडी. ५ द्रोण. ६ समुद्रांतून निघालेल्या विषाचा कलश. ७ अर्जुनानें. ८ त्यांस मूर्छा आणिली. ९ 'सु' आहे आद्यक्षर ज्यांचें असे म्ह० सुशर्मा, सुरथ, सुधर्मा, सुधनु, व सुबाहु. १० पूतना राक्षसी प्रमाणें. ११ माझ्या चित्तरूप कमलास विकसित (करणाऱ्या) नूतन आतपा (अर्जुना). १२ क्व (कोठें) असि (आहेस) १३ ब्रम्हांड. १४ पांडवांस इष्ट असणाऱ्यास.

धीर धरुनि धर्मज्ञें धीरें धर्में धनुष्य चढवीलें ॥
दाखविलें तें गुरुला जें होतें आपणासि पढवीलें ॥ २४ ॥
भीमावरि न गणुनि शरवृष्टीची झड करी करी[1] लगट ॥
वाटे जनासि काळचि तो त्याला झडकरी करील गट ॥ २५ ॥
कुरुकटका तप्तकरी पार्थ, ग्रीष्मीं जसा पतंग जगा ॥
तों भेरिला तयावरि भगदत्तें[2] काळसा मतंगज गा ॥ २६ ॥
देव, गजांसि[3] म्हणे रे गर्व अयःस्तंभसमरदा[4] न वहा[5] ॥
हा[6] मत्सख नर सिंहचि वज्रधरासह्यसमरें[7] दानवहा[8] ॥ २७ ॥
होय पुढेंचि न मागें पार्थ-शराहतहि[9] शतमखसख[10] सरे ॥
मुनि म्हणति अर्जुनीं तव शक्ति जसी सागरांत खसखस रे॥२८॥
प्रकट करूं दे समरीं श्रीदेवी जेंवि सैरिभासें[11] कला[12] ॥
तेंवि विजयचापलता[13] मग दवडी दूर वैरिभा[14] सकला ॥ २९ ॥
विजयविशिखार्त[15] होतां पूर्वा दुष्करहि आयकोन करी[16] ॥
भगदत्ताचें कथिलें अधनाचें जेंवि बायको न करी ॥ ३० ॥
तिसरे दिवशीं चक्रव्यूह सुदुर्भेद्य युक्तिनें रचिला ॥
जो धीर-वीर-हीर प्रवर-प्रकरें करोनियां खचिला ॥ ३१ ॥
व्यूहातें भेदाया धर्म झटे करुनि यत्न सानुजनी[17] ॥
परि लोपवि प्रतापा गुरु तपना जेंवि रत्नसानु[18] जनीं ॥ ३२ ॥
सौभद्र[19] म्हणे शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज, वा ॥
हरिपोत दंतियूथीं कीं दहनीं करुनियां पतंग जवा ॥ ३३ ॥
भीमादि सबळ सर्वहि ते उठले व्यूहकोट फोडाया ॥

---

१ भगदत्तानें भीमाच्या अंगावर घातलेला सुप्रतीक नांवाचा हत्ती. २ कौरवांकडील एक योद्धा ( राजा ). ३ भगदत्ताच्या हत्तीला ४ लोखंडाच्या खांबासारखे आहेत दांत ज्याचे अशा ५ वाहूं नको, ह्याचें कर्म, गर्व. ६ हा अर्जुन. ७ इंद्राला ( ही ) असह्य आहे युद्ध ज्याचें असा. म्ह० इंद्रापेक्षां बलिष्ठ ८ दानवांस मारणास. ९ अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध. १० इंद्राचा सखा ( भगदत्त ). ११ महिषासुरास. १२ युद्धचातुर्य. १३ अर्जुनाचें धनुष्य, १४ शत्रूंचें तेज. १५ अर्जुनाच्या बाणांनीं पीडित. १६ भगदत्ताचा हत्ती—भगदत्तानें सांगितलेली दुर्घट ही गोष्ट पूर्वीं ऐकत होता; परंतु जखमी झाल्यानंर त्यानें सांगितलेलें ऐकेनासा झाला. ज्याप्रमाणें दरिद्र्याची बायको त्याची आज्ञा मानीत नाहीं, तद्वत्. १७ आपल्या धाकट्या भावांसह. १८ मेरु पर्वत. १९ सुभद्रेचा मलगा—अभिमन्यु.

इकडुनि कौरवकटकहि होय पुढें शत्रु-सैन्य मोडाया ॥ ३४ ॥
रथ थडकले, भडकले हय, शस्त्रज वह्नि धडकले वरते ॥
अन्योन्य द्व्यंगुलेंही[1] राहों देती न धड कलेवर ते ॥ ३५ ॥
पावत असतां दोन्हीं करुनि सुतुमुलाऽहवास वध सेना ॥
व्यूहीं सौभद्रशिरे चित्तीं हि जयांत वासव धसेना ॥ ३६ ॥
प्रभुचा मर्मी हाणी सर्वांसहि तीन तीन शर भाचा ॥
वाटे बहु सिंहाशीं समर करी कुपित पोत शरभाचा ॥ ३७ ॥
अंध म्हणे रे संजय हें त्या पौत्रास वर्ष सोळावें ॥
लोळावें मांडीवरि तेणें द्रोणादिकांसि घोळावें ॥ ३८ ॥
न पवे सुनीतिचें[2] परमार्थाची वाट लेंकरूं काय! ॥
सत्यचि कथिशी परि हें मज लटिकें वाटलें करूं काय ॥ ३९ ॥
संजय म्हणे म्हण अनृत भीष्माचा एकला पणतु मुलगा ॥
करिता झाला गुहसा बहुतांनीं वेढिला रण तुमुल गा ॥ ४० ॥
कुरुसैन्यांत गमे ज्या— परि रंभाकाननांत[3] वारा हो ॥
त्या विजय-श्री देउनि[4] परिरंभा कां न नातवा राहो ॥ ४१ ॥
अक्षत-धनु तों वरि हें वीरशिरोरत्न नावरायाचें ॥
यास्तव सर्वहि रक्षूं आजि करुनि यत्न नाव रायाचें ॥ ४२ ॥
कर्ण करी चर्माचे श्रित-विघ्नाचे जसे गणप[5] टुकडे ॥
तरि पाहोंहि न शकले वीर विशस्त्राहि त्या रणपटुकडे ॥ ४३ ॥
त्या सौभद्रावरि बळ-सागर गरगर गदेसि फिरवीत ॥
दुःशासनसुत धांवे निजभुजभुजग[6]प्रताप मिरवीत ॥ ४४ ॥
युद्ध-चमत्कार रुचिकर सुचिर प्रकटुनि महागद[7] भ्रांते ॥
अन्योन्य-कृताऽ घातें बा मूर्छा पावले अदभ्रा[8] ते ॥ ४५ ॥
आधीं उठोनि उठतां सौभद्रशिरीं प्रभो[10] गदा घाली ॥
विवश करी ती दुष्परि-हार्या जेवि प्रभोगदाघाली[11] ॥ ४६ ॥

१ दोन बोटें. २ सुनीति नांवाच्या स्त्रीचा मुलगा ध्रुव. ३ केळीच्या बनांत. ४ त्या नातवा ( अभिमन्यूला ) विजयश्री परिरंभा देऊन कां न राहो ! म्ह० त्यास जय कां नाहीं मिळणार ? ५ गणपति. ६ आपल्या बाहूची सर्पाप्रमाणें चपलता दाखवीत. ७ गदायुद्धांत प्रवीण. ८ दुःशासनाचा पुत्र व अभिमन्यु. ९ पुष्कळवेळ असणारी–मोठी. १० हे धृतराष्ट्रा. ११ दुःखदेणारी पातक पंक्ति.

पडली जशी [1]कंराया प्रेक्षक सुर विरस मस्तकोपरि ती ॥
भूवरि सौभद्रतनुंहि. ओकुनि सरुधिर समस्त कोप रिती ॥ ४७ ॥
धर्म ह्मणे हा हा म्यां मंदें दाटुनि कुमार मारविला ॥
बहुवीरसूत दिसल्या अधिक सुभद्रा उमा रमा रविला ॥ ४८ ॥
तुज उत्तरे मुलि दिल्हा म्यां कापायास मान विश्वास ॥
कलि-काल काय बुडविल मज बहु पापासमान विश्वास ॥४९ ॥
संशप्तक वधुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते ॥
प्रभुसि ह्मणे कां कांपे मन कांपविले जरि त्वयें पर ते ॥ ५० ॥
कंठ गहिवरें भरला शिरली त्द्दयांत केशवा धडकी ॥
येतें रडें वृथा कां बा माजी प्रकृति काय गा रडकी ॥ ५१ ॥
अतुल प्रताप लोकीं ज्या खलबल-जलधि-वाडवाऽऽभाचा ॥
तो कृष्णा आज तुझा मज आला कां न आडवा भाचा ॥ ५२ ॥
तुमच्या भुज-शस्त्रांतें धिकू हा निःसार हो खटाटोप ॥
शिर ज्या न रक्षवे तो कार्याचा काय ओखटा टोप ॥ ५३ ॥
कुंतीस काय सांगू कृष्णेला दाखवूं कसें वदन ॥
दुष्कर मला सुभद्रा- सांत्वन दुर्दर्श उत्तरासदन ॥ ५४ ॥
कां माझें उर न उले कवि पवि कीं ह्मणति तोकशोकाला ॥
लोका लाजे मन कीं जावें यश हारवूनि ओकाला ॥ ५५ ॥
हा वत्सा रक्ताक्षा झाले त्वत्सुगुण आजि घातकसे ॥
बा वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे ॥ ५६ ॥
मारिन जयद्रथ करिन यश भुवनीं विशिखजाल वितत रणीं ॥
हें न घडतां जळेन ज्वलनीं होतां हि अस्तमित तरणी ॥ ५७ ॥
कृष्णोत्तरासुभद्रा-धेनूंच्या मथुनि मोह-यवनातें ॥
भवनातें येउनि तो प्रभु विजयाच्या करी सम्प्रवनातें ॥ ५८ ॥
शयनीं निजोनि पाहे परमेश्वर परि न पळहि निज लागे ॥
चित्तीं चिंतेशि ह्मणे त्वां वरिला कोण जडहि निजला गे ॥ ५९ ॥
देव निशीथीं शयनीं बैसे मग दारुकासि आणवुनी ॥

---

१ कलियुगाचा काळ. २ शत्रुसैन्य रूप समुद्राला वडवाग्नीसारखा नाशक. ३ व्यर्थ. ४ अस्तपावलेला. ५ समाधानातें. ६ ज्यास चिंता लागली त्यास झोंप यावयाची नाहीं हें तात्पर्य.

त्यासीं वदे प्रतिज्ञा  पार्थाची प्रथम सर्व जाणवुनी ॥ ६० ॥
भक्तीं जसा मदात्मा  देहींहि तसा न दारुका रमला ॥
या विजय-वद-वचना  द्यावा लागे सदा रुकार भली ॥ ६१ ॥
निज-रक्षणाधिक ध्वज-रक्षण राजासि दारुका पडतें ॥
मोलें राज-शिराहुनि  बहु असतें काय दारु कोपड तें ॥ ६२ ॥
देव ह्मणे  अर्जुनजी  व्हा सिद्ध रथस्थ तपन-कोपार्थ ॥
तैं कां न ह्मणेल मनीं  ब्रह्मपदाद्यर्थ तप नको पार्थ ॥ ६३ ॥
करुनि प्रदक्षिणा द्विज-वृंदासि  रथासि तो कवि नयानें ॥
मग वंघोनि अधिष्ठी  जनका कीं जेंवि तोक विनयानें ॥ ६४ ॥
झाला निज-दासाचा  ज्या स्तविति सुधीर विप्र तो दास ॥
श्री-नलिनीचा  चक्र  त्यजुनि धरि सुधी रवि प्रतोदास ॥ ६५ ॥
पांसुनिकरहि प्रभुच्या हेतु बहुप्रीतिचा बुका साच ॥
वाटे न कौस्तुभाला  जपला जगदीश चाबुका साच ॥ ६६ ॥
कृष्ण रथीं चढले मग  तोंहि चढे पुत्र सत्यकाचा हो ॥
जेंवि हररथीं विधि हरि  दुसरा दृष्टांत सत्य काचा हो ॥ ६७ ॥
द्रोणें रचिला सैंधव-रक्षार्थ व्यूह-नायक व्यूह ॥
परमार्थ रक्षणक्षम  अपराजित जेंवि काय कव्यूह ॥ ६८ ॥
सेनाग्रीं वाजविती  नर नारायण सखे दरवरा जे ॥
ते मोरसे, भुजगसे  ऐकति होउनि सखेद रव राजे ॥ ६९ ॥
रोमांचकंचुकाला  कडकडतां कृष्ण-कंबु कपि ल्याला ॥
पर सोडी भानाला  सिंहरवें जेंवि जंबुकपिल्याला ॥ ७० ॥
हांसोनि  द्रोण ह्मणे  पार्था मजला न जिंकितां आजी ॥
जिंकावया जयद्रथ  शक्य नव्हे मज-सवें करीं आजी ॥ ७१ ॥
ऐसें वदोनि मार्गण-वृष्टि तयावरि महा-तपा सोडी ॥

---

१ वेदवाक्य जसें उल्लंघितां येत नाहीं तसें अर्जुन जें म्हणतो तें मला मोडतां येत नाहीं, हा आशय. २ ध्वजाचें लांकूड व वस्त्र. ३ सूर्यास राग आणावा म्हणून; म्ह० तूं सूर्यापेक्षां तेजस्वी दिसलास म्हणजे त्यास राग येईल. ४ सत्यलोकादिकांच्या प्राप्त्यर्थ. ५ श्री ( लक्ष्मी ) हीच कमलिनी, तिला रवीसारखा ( कृष्ण ). ६ सात्यकि. ७ सुरस अर्थ अथवा मोक्ष ह्यास राखण्याविषयीं समर्थ. ८ अबाध-सर्वांस मान्य. ९ कवीची कल्पना. १० मारुति. ११ युद्ध.

जैसी आटोपाया मत्तगजशिरीं महात पासोडी ॥ ७२ ॥
मारुनि सात्यकि धृष्ट-द्युम्न तसे कुरुबळासि तुडवीती ॥
कुनृपतिराष्ट्रांसि जसे दुष्काळ व्याधि चोर बुडवीती ॥ ७३ ॥
द्रोण न थारे क्षण पर-कटकांत जसा न रुद्र थारावा ॥
तच्चापरवा पांडव भीति जसे अहि गरुडरथाऽऽरावा ॥ ७४ ॥
इषुंनीं झांकुनि घेती ते करुनि छत्र-केतु विध्वस्त ॥
तो अप्रकाश त्यांचा आप्तकुमुदखेदहेतु विध्वस्त ॥ ७५ ॥
अरि एक क्रोश पुढें लर्क्षु न ज्या ज्या शरा विजय सोडी ॥
क्रोश पुढें गेल्या वरि मागें तो तो तदीय शिर तोडी ॥ ७६ ॥
श्वभ्रूकर जेंवि शिरे गेहीं जरि न म्हणती सुना सीर ॥
व्यूहीं तेंवि कुरुचमू धिक्कारुनि तो धरासुनासीर ॥ ७७ ॥
श्रमला जयद्रथाच्या जायासि न शक्त हा निकट कांहीं ॥
हें योजुनि वेढियला पार्थ करायासि हानि कटकांहीं ॥ ७८ ॥
त्या समयीं पार्थ म्हणे देवा संश्रित-शुभाकरा वाजी ॥
श्रमले कीं श्रम-शमना घडि-भरि तरि रथ उभा करावा जी ॥ ७९
उतरे रथावरुनि नर पळवी कुरुकटक कृत-पराभव तें ॥
करि निर्मनुष्य मंडल तो एक क्रोश आपणा-भवतें ॥ ८० ॥
स्वस्थ-स्वांतें क्रीडे कुरु-बळ-पंकज-वनांत पार्थ-करी ॥
मंत्र-बळें सुसरोवर निर्मुनि शरगृह अनातपार्थ करी ॥ ८१ ॥
शर जेंवि किरण भवते जें कौरव-कटक तोचि परिवेष ॥
रविच कविमतें अर्जुन तेजें रूपें हि, भिन्न परि वेष ॥ ८२ ॥
निःशंक कुरुबळीं नर जेंवि हरिशताऽवृतीं हि शरभ वनीं ॥
पर्वी शिवालयींसा शिरला देवर्षि शीघ्र शर-भवनीं ॥ ८३ ॥
प्रभुनें मुक्त करुनि हय चुचकारुनियां हळुच कौशल्यें ॥

१ स्थिर झाला नाहीं म्हणजे शत्रु सैन्यास अत्यंत दुःसह झाला; हें तात्पर्य. २ गरुडाच्या शब्दास. ३ बाणांनीं झांकल्यामुळें त्यांचें अदर्शन, हें आप्तरूप कुमुदांच्या खेदास कारणभूत असा चंद्रास्तच, झालें. ४ अर्जुनाच्या बाणाचा वेग इतका होता कीं त्याच्या योगानें एक कोसावर असणाऱ्या शत्रूंचें मस्तक तुटल्यावर तें खालीं पडावयास जो वेळ लागे त्या वेळांत तो बाण एक कोस आणखीपुढें जाई. ५ पृथ्वीवरील इंद्रच. (अर्जुन) ६ हे आश्रितकल्याणनिधे. ७ ऊन न लागावें म्हणून. ८ बाणांच्या गृहांत.

निज-बोधें श्रित-त्वद्गत-दुःखेंशीं सकळ काढिलीं शल्यें ॥ ८४ ॥
अश्व परशरांहीं भवतापांहीं जेंवि दास पोळविले ॥
ते देवें भक्तिरसें जाणों स्वचरणरजांत लोळविले ॥ ८५ ॥
देवर्षि मुखीं घालुनि बोट म्हणे हा सुयोधनी कुटिला ॥
भक्ति-बळेंचि पहा हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला ॥ ८६ ॥
ज्याचें पदनख दासां जें सुख दे तापल्या न तें विधु तो ॥
भगवान् स्वयें अहा या विजयहयां सत्पदास[1] तेंवि धुतो ॥ ८७ ॥
ज्याच्या श्री-पददास्यें पावे तोखा सदा रमा-जाया ॥
हरितो मना नराचा होउनि[2] तो खासदार माजा या ॥ ८८ ॥
पुरुषार्थद ते केले दास हयहितोदया-कर[3] खरारे ॥
झालासि दास-दास प्रभुही तूं बा दयाकर खरा रे ॥ ८९ ॥
प्रेमें माता बाळा न्हाणी कीं भक्त शंभुच्या लिंगा ॥
तैसाचि नर-हयां हरि कवि हो याचेचि पाय आलिंगा ॥ ९० ॥
औषध सुचणक कल्पी पीतपट[4] पसाहि तोबरा माप ॥
श्रित-साहित्य कराया न बरा मंदार[5] तो बरा माप[6] ॥ ९१ ॥
हरि हरित तृणीं चारी तो प्रभु ज्याचा प्रताप दुर्वार ॥
हरि[7] हरि तई करिति पद देउनि गणपति-शिरीं हि दुर्वा र[8] ॥९२॥
तोकतृषाशमना, कीं क्षालाया तात तोकमल, पाणी ॥
प्यायाचें ही वेंची, करि न पिउनि तेंचि तो कमलपाणी[9] ॥ ९३ ॥
उच्चैःश्रवा म्हणावा पार्थाच्या कां न नीच तुरगानीं ॥
ज्या पूजी तो ज्याचें यश नंदनकाननीं[10] चतुरगानीं ॥ ९४ ॥
योजुनि तुरगवर रथीं आपण कुरुबळ पहात देव रिघे ॥
मग विजयातें मर्दुनि रडवाया खळप[11], हात दे वरि घे ॥ ९५ ॥

---

१ साधूंचे पाय धुवावे त्याप्रमाणें. २ तो (कृष्ण) नराचा (अर्जुनाचा) खासदार होऊन माजा (माझ्या) मना हरितो. (हें नारदाचें म्हणणें आहे). ३ (आपल्या) दासाच्या हयांचे कल्याणोत्पत्तीची खाणी. ४ पीतपट (पीतांबर) हाच तोबरा, व पसा हेंच माप. ५ कल्पवृक्ष. ६ लक्ष्मीपति ७ हे उद्गार बोधक शब्द. ८ र (रुदन). ९ कृष्ण. १० ज्या कृष्णाचें यश नंदन वनांत चतुरगानीं (चतुरांच्या गायनांत) आहे तो (कृष्ण) ज्या पूजी (घोड्यांची सेवा करितो) त्या तुरगांनीं इ० ११ महादुष्ट.

## आर्या-दाम[1]रामायणांतील.

श्रीपति झाला दशरथ-सुत राम दशाननासि माराया ॥
मा रायां जनकाची होय सुता त्रिजगदाधि साराया ॥ १ ॥
सारा[3] या प्रभुची हे लीला गाती सदैव ही सुकवी ॥
सुकवी भवजलनिधितें निरुपम सुख रसिकजन-मनीं पिकवी ॥२॥
पिक वीतबाध[4] कवि या चरितांम्रवनांत[5] कूजती[6]; सुरस[7] ॥
सुरसंघीचा लाजे, यश हें श्री-शिव ह्मणे शिवे[8] परिस ॥ ३ ॥
परिस सुवर्ण करितसे लोहा, जीवास शिवचि हा महिमा[9] ॥
महि मान्यां[10] स्वर्गाही, स्वकुल म्हणे धन्य, यत्प्रभा अहिमा ॥४॥

---

## आर्या-निरोष्ठरामायणांतील.

ह्या रामायणांत कवीनें ओष्ठ्य वर्ण सर्वथैव वर्ज्य केले आहेत, म्हणून ह्यास ‘ निरोष्ठरामायण ’ ह्मटलें आहे.

गंगातीरीं राहे तृण-सदनीं[11] अजित, तों जिचा दादा[12] ॥
राक्षस राजा ती[13] ये रति याची त्वद्धरा[14] धरी नादा ॥ १ ॥
तत्कर्ण-घ्राणांतें खड्गें दाशरथि[15] धाकटा खंडी ॥
अजितशर[16]निहत सकटक खर तें कथि रडत अग्रजा चंडी ॥ २ ॥

---

१ ‘ दाम ’ ह्याचा अर्थ हार असा आहे. फुलें एकांत एक गुंतवून जसा त्यांचा हार करितात, त्या प्रमाणें ह्या आर्यांपैकीं प्रत्येक अर्धाचीं शेवटील तीन अक्षरें, दुसऱ्या अर्धाच्या आरंभीं आणिलीं आहेत; म्हणून त्या आर्या एकांत एक गुंतल्या जाऊन त्यांचा हारच बनून गेला आहे, ह्यावरून कवीनें ह्या रामायणास ‘ दामरामायण ’ हें नांव दिलें आहे. २ स्वर्ग, मृत्यु व पाताल ह्यांतील लोकांचें दुःख, ३ श्रेष्ठ. ४ गेलीं आहे बाधा ज्यांची म्ह० निर्भय. ५ ( राम ) चरित्र हेंच आंब्यांचे वन, त्यांत. ६ गातात–शब्द करितात. ७ स्वर्गांतील सुरस–( अमृतरस ). ८ हे पार्वति. ९ हा रामाचा महिमा. १० ( रामावतारामुळें ) पृथ्वी ही स्वर्गलोकास मान्य झाली; ( व ) यत्प्रभा ( ज्याची कांति ) अहिमा ( उष्ण ) तो सूर्य ( आपल्या वंशांत राम जन्मल्या मुळें ) स्वकुल धन्य म्हणे. ११ गवताच्या झोपडींत. १२ वडील भाऊ रावण. १३ शूर्पणखा. १४ मनो हर अशा रामाला, रति याची. ( रति सुख मागे ), ( व ) नादा धरी. १५ लक्ष्मण. १६ सकटक ( ससैन्य ) खर ( ह्यानावाचा राक्षस तिचा भाऊ ) अजितशर निहत ( रामाच्या बाणानें नष्ट झाला ), तें (वर्तमान) चंडी ( रागीट शूर्पणखा ) अग्रजा ( रावणाला ) कथी, असा अन्वय.

लंकेश कनक-हरिण श्री-दृगतिथि[1] करि, अजी धरा यास ॥
ऐसें ती सांगे, तें जाय अजित ही तया धरायास ॥ ३ ॥
कळतां खळ, अज हाणी शर, हरिसा[2] तार आर्त-नाद करी ॥
हा सीते हा सखया ऐसा, अरि तत्क्षणींच धैर्य हरी ॥ ४ ॥
न त्रास धरी न निघे अग्रज-संरक्षणासि निज दीर ॥
याकरितां रागें जें सीता गांजी तया, त्यजी धीर ॥ ५ ॥
अति-तीक्ष्ण[3]-गी-शरक्षत जाय रडत दाशरथि, तशांत शिरे ॥
दिक्कंठ[4] अजित-सदनीं श्रीस हरी, शस्त्र गिळि जरी न जिरे ॥ ६ ॥

## आर्या-परंतु रामायणांतील

ह्या रामायणांतील प्रत्येक आर्येंत 'परंतु' हा शब्द घालून कवीनें त्यास 'परंतु' रामायण ही संज्ञा दिली आहे.

श्रीरामचरित करितें मुक्त सकृत् किंमपि[5] सेवितां भावें ॥
पार न लागे दशशत-वदनाहि[6] परंतु वाटतें गावें ॥ १ ॥
संकल्पेंचि सुर-द्विजपीडकरक्षः-क्षयें[7] स्व-भजन-रसा ॥
देता; परंतु झाला दशरथभक्तप्रियार्थ[8] अज नरसा[9] ॥ २ ॥
एकेचि मूर्तिनें प्रभु करिता त्रैलोक्य-कामना-पूर्ति[10] ॥
क्रीडार्थ परंतु धरी चार त्रिजगन्मनोहरा मूर्ती ॥ ३ ॥
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न कुमार सारसाक्ष जना ॥
दिसती बाळ परंतु स्वगुणांहीं हरिति गुरुमुनींद्रमना ॥ ४ ॥
स्त्रीवध निंद्य परंतु ब्रम्होक्तें[11] तूर्ण ताटका मारी ॥
त्याँ प्रभुयशासि मानी अमृताचें पूर्ण ताट कामारी ॥ ५ ॥
मुनि मिथिलेशि निघे कीं जनक स्वाध्वर[12]विलोकना बाहे ॥

---

१ सीतेला दृग्गोचर. २ रामासारिखा. ३ अति तीक्ष्ण जी ( सीतेची ) वाणी, तेच बाण. त्यांनीं जखमी झालेला. ४ दिक् म्हणजे दिशा, त्या १० आहेत; म्हणून लक्षणेनें दिक्शब्दाचा अर्थ १० असा घेऊन, 'दिक्कंठ' ह्याचा अर्थ दशकंठ ( रावण ) असा करावयाचा. ५ थोडें ही. ६ दशशत म्ह० हजार आहेत वदनें ( तोंडें ) ज्यास असा जो शेष त्याला ही. ७ देव आणि ब्राम्हण ह्यांस पीडा देणाऱ्या राक्षसांच्या क्षयानें. ८ दशरथ हाच भक्त त्याच्या संतोषाकरितां. ९ मनुष्यासारखा. १० त्रैलोक्याच्या इच्छेची तृप्ति. ११ विश्वामित्राच्या सांगण्यावरून. १२ आपला यज्ञ पाहण्यास.

नेणार परंतु म्हणे प्रभु शिवचापेक्षणस्पृहा आहे ॥ ६ ॥
जातां गौतम-मुनिचा आश्रम लागे, पुसे कथा राम ॥
तत्काळ अहल्येचें चिर नष्ट परंतु वाढवी धाम ॥ ७ ॥
अति-कठिण भर्ग-धनु अति-सुकुमार प्रभु परंतु गुण जोडी ॥
ओढी सलील लीला-नरतनु तें इक्षु जेविं गज मोडी ॥ ८ ॥
लेंक सुना करुनि पुढें दशरथ राजा प्रवेशतां सारी ॥
मुदिता होय अयोध्या, तींत सदा श्री परंतु हे भारी ॥ ९ ॥
ज्याचा वियोग घटिका-भरहि सुदुःसह परंतु आजाला ॥
भेटाया तो भरत प्रेषावा लागलाचि राजाला ॥ १० ॥

## आर्या-सन्मणि-मालेंतील.

"सत् म्ह० साधु हींच रत्नें त्यांची माला." ह्या आर्या-पैकीं प्रत्येकींत एकेका साधूचें वर्णन केलें आहे, म्हणून ह्या प्रकरणास 'सन्मणिमाला' म्हटलें आहे.

जो ज्ञानराज भगवान् श्रवणीं सुज्ञान दे वदे वाचा ॥
अवतार गमे अकरा-वा कां सुज्ञा न देवदेवाचा ॥ १ ॥
नमिला शमि-लास्यप्रद शांति-जलधि एकनाथ तो भावें ॥
शोभावें ज्याचें यश विश्वीं ज्या देववृंद लोभावें ॥ २ ॥
कर जोडून करिन मी न नृसिंह-सरस्वतीस कां नमन ॥
सज्जन सेविति ज्याचें सद्यश व्हाया सुतृप्त कान मन ॥ ३ ॥
स्वर्वल्लि-सुरभि-सुर-सरिदधिका श्रितसर्व-कामदा साची ॥
श्री-रामाची जैशी सत्कीर्ति तशीच रामदासाची ॥ ४ ॥
नमिला साष्टांग श्री-पतिभक्ति-रसज्ञ वामनस्वामी ॥
रस-भवना तत्कवना मानीं या तेंवि वाम न स्वा मी ॥ ५ ॥

१ महादेवाचें धनुष्य पाहण्याची इच्छा. २ दोरी चढवी (धनुष्य सज्यकरी). ३ केवळ मौजेनें मानवी तनु धारण करणारा (राम). ४ ही (श्री)=आतांची शोभा. ५ ज्ञानदेव. ६ शांतिप्रधान अशा जनाला लास्य (नृत्य) लक्षणेनें आनंद देणारा ७ ह्या नांवाच्या साधूस. ८ कल्पवृक्ष, कामधेनु व भागीरथी ह्यांच्या (कीर्तीपेक्षां) अधिक. ९ (कवि) वामन पंडित. १० शृंगारादि रसांचें गृह. ११ सुंदर. १२ स्वकीय कवनास. १३ मी मोरोपंत.

वंदन नंदनसा मी करितों भावें मुकुंद-राजाला ॥
वश झाल्या सद्विद्या सत्कीर्ति सुयुक्ति सुंदरा जाला ॥ ६ ॥
वंदाया मजला तो ब्राम्हण बहिरा तथा पिसा मान्य ॥
जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य ॥ ७ ॥
हरिविजय-ग्रंथातें आधिं मग श्री-धरासि वंदीन ॥
शिव-वंदन-कामांहीं वंदावा प्रथम देव नंदी न ॥ ८ ॥
श्रीमुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील ॥
बंदी लक्ष जयाचे ज्याचें यश भव्य जेंवि मंदील ॥ ९ ॥
कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा ॥
भलत्या मुखांतुनि अशी सुरस-खनि निघेल काय जी वाचा ॥१०॥
कर जोडितों सुटाया तनुरूपा तापहेतु कारा मी ॥
कीं सतनु मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं ॥ ११ ॥
माया हे संसृतिची जाळूनि सशोक तो कवी रमला ॥
राम-पदाब्जीं अलिसा, बहुमत सुमुदोक तो कबीर मला ॥ १२ ॥
साधु म्हणावें म्हणती नर माधवदास साधु याला जे ॥
अति-सारीं पट ज्याचे न रमाधव दाससा धुया लाजे ॥ १३ ॥
नरहरि नामा पावे संत न सोनार दास-मान कसा ॥
तरला करुनि भवाचा अंत न सोनार दासमान-कसा ॥ १४ ॥
लाजविलेचि निजयशें दुग्धाब्धितरंग रंगनाथानें ॥
भक्ति ज्ञानें ज्याची मति पोषी जेंवि अंगना थानें ॥ १५ ॥

---

## अर्या-धर्मोपदेश प्रकरणीं.

सत्यातें जोडावें सुज्ञें धर्मासि पळ न सोडावें ॥
पाशांतें तोडावें धीरें न कदापि पाप जोडावें ॥ १ ॥
बा गा धर्माच्या तों कोणी सोडूं नयेचि कासेतें ॥
निष्फळ होतीं मेघें त्यजिलीं आलींहि जीविका सेतें ॥ २ ॥
अंभो-दास पहाती जैशीं पसरूनि नित्य आं शेतें ॥

१ सुंदर स्त्रिया. २ ह्या नांवाचा. ३ बृहस्पतीचा. ४ सु+मुत्+ओक )—उत्तम आनंदाचें स्थान. ५ जे नर माधवदास याला साधु म्हणती (ते) साधु म्हणावे; ) असा अन्वय. ६ मायापाशास. ७ पिकाला आलेलीं ही शेतें (जर) मेघें त्यजिलीं (तर) निष्फळ होतात. ८ आ पसरून=मोठ्या उत्कंठेनें.

धर्मांशिं तशीं भूतें करि पूर्ण समर्थ हाचि आशेतें ॥ ३ ॥
निज हतकर धर्माचें कुशलें विटवूंनयेचि मन कांहीं ॥
यापरि[1] पोषण पालन लालन करिजे न अन्य जनकांहीं ॥ ४ ॥
साधु म्हणति[2] जो न करी धर्माशीं नीतिशीं विरोधा त्या ॥
रक्षीं व्यसनीं, तदितर जन उदकीं लोष्टसा विरो, धात्या ॥ ५ ॥
म्हणऊनि अनुसरावें सुज्ञें न क्रोध-लोभ-काम-मता ॥
पतनार्थ कां अहंता पोषावी गा तशीच कां ममता ॥ ६ ॥

---

## आर्या-सुभद्राहरण प्रकरणीं.

धर्म व द्रौपदी हीं उभयतां एकांतीं असतां कांहीं कारणानें त्यांस पाहण्याचा दोष अर्जुनाचे हातून घडला होता. त्याच्या निवृत्तीकरितां तो तीर्थाटनास गेला. तेव्हां फिरत फिरत पश्चिमदिशेस द्वारकेजवळ प्रभासतीर्थीं आल्यावर, त्यानें कृष्णाची धाकटी बहीण सुभद्रा ही बळरामानें दुर्योधनास देण्याचा निश्चय केला आहे हें वर्तमान ऐकिलें. तेव्हां ती आपणास प्राप्त व्हावी म्हणून कृष्णाच्या अनुमतानें त्यानें कपटसंन्यास घेतला, आणि संधि पाहून सुभद्रेचें हरण केलें. मग हा अर्जुन असें समजल्यावर बळरामानें त्यास मोठ्या आदरानें बोलावून आणून सुभद्रा दिली. ही कथा ह्यांत आहे.

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासाला[3] ॥
आप्तमुखें निज-मातुळ-कुळ-वृत्तांतासि[4] ऐकता झाला ॥ १ ॥
कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ॥
तीतें स्वमतें हलधर धृतराष्ट्र-सुतासि[5] द्यावया पाहे ॥ २ ॥
तातादिक[6] म्हणति मनीं सुमति खळाला अचक्षुला रत्न ॥
शूद्रास श्रुति देतो राम न चालेचि या-पुढें यत्न ॥ ३ ॥
ऐकुनिं मनीं म्हणे[7] मज तीर्थ-स्नायींस[8] जाहली शुद्धि ॥
या सुकृतें ते व्हावी प्राप्त विरक्तास जेंवि सद्बुद्धि ॥ ४ ॥

---

१ धर्माप्रमाणें. २ साधु म्हणती हे धात्या (ईश्वरा) जो धर्माशीं (व) नीतिशीं विरोधा न करी इत्यादि. ३ द्वारके जवळील एका तीर्थाला. ४ आपल्या मामाचें (वसुदेवाचें) कुल, म्ह० यादव कुल, त्याच्या वृत्तांतास. ५ दुर्योधनाला. ६ वसुदेव आदिकरून. ७ ह्याचा कर्ता अर्जुन ८ तीर्थांचीं स्नानें करणारा जो मी त्यास.

निज-सुख-सिद्धि सुभद्रा साधाया होइन त्रिदंडि यति ॥
प्रिय तीहूनि नसे मज; तीं कीं ही रीति-गति अहो नियति ॥५॥
पार्थ त्रिदंडि-वेष स्वीकारी हलधरासि वंचाया ॥
युक्तीनें स्वपरविहितें-हित करितां कपट दोष कंचा या ॥ ६ ॥
द्वारवतींत वसे तो यति वार्षिक चार मास-पर्यंत ॥
हर्यंतःकरणासचि ठावा तैंद्योग जो संपर्यंत ॥ ७ ॥
मौन सदा एकांत-स्थिति साधु समाधि-योग सुविरक्ती ॥
सक्ति न लोकसमाजीं; लागे पौरांसि पार्थ-यति-भक्ती ॥ ८ ॥
मोठे मोठे हि मठ-द्वारांतुनि भेटि घेति पायांची ॥
असम-शर-ज्वर-भर खर करपवि परि वरि समाधि वायांची॥९॥
रामासहि कळलें कीं योगी मोठा असें म्हणे पाहूं ॥
आहों ब्रम्हण्य तया आणूं भिक्षेसि शिर पदीं वाहूं ॥ १० ॥
तो यति एके दिवशीं बळदेवें आणिला स्वगेहास ॥
पूजुनि सुश्रद्धेनें जेववितां माधवास ये हास ॥ ११ ॥
यतिदर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजा-जवळ ॥
न बळ भेक्षी परि यति-हस्तींचा पाहतां गळे कवळ ॥ १२ ॥
घाली घृतांत सैंधव दुग्धीं जंबीर पायसीं कथिका ॥
मथि काम-शर जया त्या राम म्हणे साधु मोक्ष-सत्पथिका॥१३॥
आर्यासि निजसुरी ती उत्तर दानांत कन्यका यतिला ॥

१ आपल्या सुखाची साक्षात् सिद्धिच. २ तीन दंड धारण करणारा संन्यासी. ३ सुभद्रा (प्राप्त व्हावी) नाहीं तर ही संन्याशाची अवस्था खचित (फार बरी होय) ४ फसवायास. ५ आपलें व दुसऱ्याचें योग्य मार्गास अनुसरून केलेलें हित. ६ कशा-चा—कोणता. ७ चातुर्मास्यभर. ८ फक्त कृष्णाच्या अंतःकरणासच ९संन्यासाची युक्ति. १० संपूर्ण. ११ तीव्र वैराग्य. १२ असम (विषम संख्याक) म्ह० पांच आहेत शर (बाण) ज्याचे असा म्हणजे मदन, त्याच्या ज्वराचा भर. हा करपवि ह्याचा कर्ता. १३ जया (अर्जुनास) कामशर मर्थी, तया राम (बळराम) म्हणे, साधु (शाबास) मोक्षसत्पथिका (हे मोक्षमार्गांतील पांथस्था). १४ कन्यका यतिला पाहून भुले (म्हणून) आर्यासि (बळरामास) ती निजसुरी (झोंपाळू) (वाटे) किंवा, कन्यका यतिला पाहून भुले (तथापि) आर्यासि निज. उत्तर दानांत (केवळ) सुरीतीच (वाटे) म्हणजे जरी ती यतीला पाहून भुलली होती, तरी व-डिलांची मर्यादा तिनें सोडिली नाहीं.

पाहूनि भुले स्मर तो रति ती दृष्टांत अन्य काय तिला ॥ १४ ॥
जीच्या प्रवृत्तिनें वश केला आधींच सर्ववीरमणी ॥
त्यास कटाक्ष-प्रेक्षण-बाणीं मोहील कां न ती रमणी ॥ १५ ॥
कन्यारत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर ॥
घोर-प्रताप परि भी भीमानुज कीं अनंत-बळ थोर ॥ १६ ॥
दामोदर दासा दे अनुमोदन ती हरावया नवरी ॥
दादास देव दावी दारकरीति स्वयें सदैव वरी ॥ १७ ॥
ताताला मातेला एकांतीं गुह्य वृत्त हें कळवी ॥
बळवीर-भीति कोपो-पशमोपायास सांगुनी पळवी ॥ १८ ॥
अनुकूळ ब्रम्ह तसें तों झालें तन्मनो-रथा पर्व ॥
तीर्थस्नान कराया पुरवासी लोक चालिले सर्व ॥ १९ ॥
नरहयरथगज-शिबिकारूढ सकळ वृष्णि-दारजन चाले ॥
झाले सिद्ध वऱ्हाडी तैसे यदुभट; धरा बळें हाले ॥ २० ॥
दिव्यरथांत सुभद्रा बैसुनि सेनेंत तेधवां शोभे ॥
यन्मुख-सुधाकरें नर-वरपार्थाशयपयोनिधि क्षोभे ॥ २१ ॥
तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रा-रथीं जसा पाटीं ॥
सुचिरक्षुधित ब्राम्हण हां हां म्हणतांहि वाढिल्या ताटीं ॥ २२ ॥
समयज्ञ चतुर सेवक धनु तूण तशांत देति आणोनी ॥
धांवति रक्षक सैनिक कपटयति-कृतात्यनर्थ जाणोनी ॥ २३ ॥
त्यांतें म्हणे सुभद्रा-मुक्ताहर वीर अर्जुन मराल ॥
समरा लक्षांहि या परि काक तुम्ही गात विसर्जुन मराल ॥ २४ ॥
धर्मानुज मी अर्जुन सिंह, तुम्ही शशकिशोर आटोपा ॥

---

१ वार्तेनें. २ अनंत ( शेष )-बळराम. त्याचें बळ. बळराम हा शेषावतार होता म्हणून त्यास कवीनें अनंत म्हटलें आहे. ३ लहान मुलाची रीत. ४ बाह्यात्कारीं. ५ राग शांत करण्याची युक्ति. ६ परब्रम्ह-कृष्ण. ७ जसा कृष्ण त्याच्या मनोरथास अनुकूळ ( साह्यकारी ) होता, त्याप्रमाणेंच एक पर्वही त्याला अनुकूल झालें. पर्व आल्या मुळें आपला हेतु सिद्धीस न्यावयास त्यास संधि सांपडली, हें तात्पर्य. ८ यादवांच्या स्त्रिया. ९ जिच्या मुखचंद्राच्या योगानें. १० नरवर (पुरुषश्रेष्ठ) असा पार्थ ( अर्जुन ) त्याचा आशय ( मन ) हाच पयोनिधि ( समुद्र ) ११ कपटी संन्याशानें केलेला मोठा अनर्थ. १२ सुभद्रा हीच मुक्ता ( मोती ) तिचें हरण करणारा वीर अर्जुन हाच हंस.

या टोपा कवचाच्या भीमा वल्गा उगेचि आटोपा ॥ २५ ॥
ऐसें नीट दटावुनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ ॥
मारिति हाका केवळ नागविला वनिं जसा वणिक्‌-सार्थ ॥ २६ ॥
सार्थक पार्थ करी, ती कैरविणी तो सुधांशु गौरविता ॥
सविता बिसिनीसि वरी कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता ॥ २७ ॥
श्रुति सत्क्रिय धर्म-पथा शोभविती दंपती तसे स्वरथा ॥
अन्योन्य-प्रिय संगम तो प्रेमळ भक्त ती मुकुंदकथा ॥ २८ ॥
झटिति भटकटक बहु करि कन्या नेली म्हणोनि बोभाट ॥
वाटे बळासि सांगे जोजो त्या दस्युचाचि तो भाट ॥ २९ ॥
प्रस्फुर-दधर-दलें प्रभु बलभद्र म्हणे खरेंचि सांगा रे ॥
कोठें तो कपट-पटू गांठितसें जो पटांत आंगारे ॥ ३० ॥
कोठें रथ, मुसळ पुरे, कवच कशाला, धनुष्य राहों द्या ॥
वत्सेला निजधर्षण-करखळ-दंडोत्सवासि पाहों द्या ॥ ३१ ॥
पर्वी अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे ॥
संध्याराग-सुरंजित-शरदभ्राहूनि फार तो शोभे ॥ ६२ ॥
कोप-ज्वर-भर-कंपित-काय प्रभु लोचनें करी शोणें ॥
होणें पुढें सुदुर्घट वारावें त्या महेश्वरा कोणें ॥ ३३ ॥
जाय हळुच विनयनत-काय चतुर वृष्णिराय देव हरी ॥
माय सुतार्थ पतीचे काय गुरूचे नमूनि पाय धरी ॥ ३४ ॥
नमनीं प्रकटवि सहभवं सद्गुण शांति-क्षमानुकंपादी ॥
कंपा दीनसख नुरवि अधरीं प्रणतींहि भव्य संपादी ॥ ३५ ॥
हांसे बळभद्र म्हणे कृष्णाक्रूरोद्धवा अहो कळलें ॥

१ घोड्यांचे लगाम २ वाण्यांचा तांडा. ३ सत्कर्मांनें वागणारा. ४ जो जो बळासि ( बळरामास ) ( हें वर्तमान ) सांगे ( तो तो ) त्या दस्यूचा ( अर्जुनाचा ) भाटच ( स्तुतिपाठकच ) वाटे–प्रत्येक मनुष्य अर्जुनाच्याच पराक्रमाचें वर्णन करूंलागला हा भाव. ५ ( रागानें कांपत आहे अधरोष्ठ ज्याचा. ६ आपलें बलात्कारानें हरण करणाऱ्या दुष्टाला जो दंड हाच उत्साह, त्यास. ७ सायंकालच्या तांबडेपणानें रंगविलेल्या शरत्कालच्या मेघा पेक्षां अधिक शोभे, म्हणजे रागानें फार लाल झाला. ८ अत्यंत कोपानें ज्याचें शरीर कांपत आहे असा. ९ बळराम. १० जन्मतःअसणारे–स्वाभाविक.

वळलें मन मत्पद, भय सोडा आदान बंधुचें टळलें ॥ ३६ ॥
जा जा उठा मुलीला पाहूं वाहूं वरा घरा आणा ॥
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या आणा ॥ ३७ ॥
अथवा कशास शासनभय धरुनि मनीं पळेल तो दूर ॥
शूर ख्यात पळेना नेऊंद्या पारिबर्ह अक्रूर ॥ ३८ ॥
धाडा भूषा वसनें दासी-दासाश्व-हस्ति-रथ-रत्नें ॥
झाला भगीरथाचा पार्थ सखा आजि या महायत्नें ॥ ३९ ॥
हे रसिक-कर्ण तर्णक-शत तर्पायासि कामधेनुकथा ॥
करिती प्रभुवरअनुचर परसुखकर अनुसरोनि लोकपथा ॥ ४० ॥

# श्रीधर.

श्रीधर हा पंढरपुराजवळ नाझरें म्हणून गांव आहे तेथील एका कुळकरण्याचा मुलगा. जातीचा देशस्थ ब्राम्हण. ह्याच्या बापाचें नांव ब्रम्हानंद आणि आईचें नांव सावित्री बाई. ह्यानें चौदावर्षांचे वयांतच संन्यास घेतला. हा नेहमीं पंढरपुरांत राहत असे.

श्रीधरानें ओंव्या केल्या आहेत. त्याची कविता रसभरित आहे. हा पैठण येथें आपल्या पन्नासाव्या वर्षी समाधिस्थ झाला.

जन्म शके १६०० इ० स० १६७८. मरण शके १६५० इ० स० १७२८

## त्यानें केलेले ग्रंथ.

### पंढरपूर येथें.

रामविजय शके १६२५ त समाप्त. हरिविजय शके १६२५ त समाप्त.
पांडवप्रताप शके १६३४ त समाप्त.

### बारामती येथें.

शिवलीलामृत शके १६४० त समाप्त.

## याशिवाय दुसरे ग्रंथ.

काशी खंड. ब्रम्होत्तर. जैमिनी अश्वमेध. पांडुरंगमाहात्म्य.

१ मत्पद सोडा व भय सोडा. २ मोठें भय. ३ अंग काढ. ४ ईश्वराचे भक्त. ५ उत्कृष्ट सुख दायक.

# वेंचे हरिविजयांतील.

## ओंव्या.

## अध्याय अठरावा.

### अक्रूरागमन.

बलराम आणि कृष्ण ह्मांस फसवून मारण्या करितां धनुर्याग पाहाण्याचे निमित्तानें मथुरेस बोलावून आणावें म्हणून कंसानें अक्रूरास गोकुळीं पाठविलें, ही कथा पुढें सांगितली आहे.

ऐकोनि हरिप्रताप उदंड ॥ कंस चिंताक्रांत अखंड ॥ म्हणे कृष्णें दैत्य मारिले प्रचंड ॥ देव समस्त भीती जया ॥ १ ॥ पंचाननाचा प्रताप ऐकोन ॥ भयाभीत जैंवि वारण ॥ कीं यशवंत विनतानंदन ॥ दंदशूक ऐकोन तटस्थ॥२॥तैसा भयें व्यापिला कंस ॥ गोड कांहीं न वाटे जिवास ॥ नाठवे विलास रात्रंदिवस ॥ परमपुरुष दृष्टी पडे॥३॥ देखिला नसतां चक्रपाणी ॥ दुरूनि ऐकतां प्रताप श्रवणीं ॥ तैसीच मूर्ती ध्यानीं मनीं ॥ ठसाउनियां बैसली ॥ ४ ॥ मेळऊनियां प्रधान चतुर ॥ विचारीं बैसले सकळ नृपवर ॥ म्हणती आम्हांसी नाटोपे नंदकुमर ॥ कैसा प्रकार करावा ॥ ५ ॥ प्रधान म्हणती धनुर्याग ॥ आरंभावा सवेग ॥ बळिराम आणि श्रीरंग ॥ आदरें करूनि आणावे ॥ ६ ॥ नंद गौळीयां समवेतें ॥ मान देऊनियां आणावा येथें ॥ नम्र वचन बोलून त्यातें ॥ शेवटीं घात करावा ॥ ७ ॥ दिवाभीताचे घरीं जाण ॥ काग गेलिया नम्रता[1] धरून ॥ तैसा गौळियांसमवेत कृष्ण ॥ येथें कोंडोनि वधावा ॥ ॥ ८ ॥ विषवल्ली जों वाढ नेघे ॥ तों खंडूनियां टाकावी वेगें ॥ तरीच आपणास सुख भोगे ॥ चिरकाळ नृपवरा ॥ ९ ॥ पुढां अनर्थ बहु दिसताहे ॥ म्हणऊनि सुखनिद्रा करूं नये ॥ सत्वर शोधावा उपाये ॥ तरीच कुशळ आपुलें ॥ १० ॥ नयनीं हरळ खुपतां ॥ सत्वर काढावें तत्वतां ॥ कंटक पदीं भेदितां ॥ आधीं काढिजे कोरोनि ॥ ११ ॥ तैसा नाना उपाय करूनी ॥ रामकृष्णांसी आणूनी ॥ विश्वासें घ्यावा प्राण येच क्षणीं ॥ तरीच हें कार्य साधेल ॥ १२ ॥ दाऊनियां आंगपतन ॥

---

1 नम्र होणें, नम्रता.

पाषाण फोडील लोहघन ॥ कीं कांटे चरणीं लागून ॥ जैसे जिव्हार भेदिती ॥ १३ ॥ मस्तंक करूनियां खालतें ॥ पारधी विंधी मृगातें॥सरांटे जेंवि महागजातें ॥ कळ लाउनि उभे करिती ॥ १४ ॥ कीं बचनाग मुखीं घालितां ॥ जिव्हेसी गोड लागे तत्वतां ॥ मग सर्वेंचि मृत्युव्यथा ॥ प्राप्त करी तात्काळ ॥ १५ ॥ वरी आमिष लाऊनि साचार ॥ क्षणमात्रें गळ भेदी जिव्हार ॥ कीं चणे टाकूनि वानर ॥ विश्वासवूनि धरिती पैं ॥ १६ ॥ कीं वरवर बोले गोड मैंद ॥ परी आपुल्या कार्यासी सावध ॥ तैसे बळदेव आणि गोविंद ॥ विश्वासवूनि वधावे ॥ १७ ॥ ऐकूनि प्रधानाची युक्ती ॥ कंसासी हर्ष नसमाय चित्तीं ॥ म्हणे तुमचे बुद्धीपुढें बृहस्पती ॥ उणा वाटे मजलागीं ॥ १८ ॥ तरी आतां पाठवावा कोण ॥ नम्रतें बोले विचक्षण ॥ नानायुक्ती करून ॥ रामकृष्णां आणील ॥ १९ ॥ प्रधान म्हणती पाठवावा अक्रूर ॥ स्थिरबुद्धी परम चतुर ॥ त्याचिया बोलें क्षणमात्र ॥ नलगतां येथें येतील ते ॥ २० ॥ मग बोलावूनि अक्रूर ॥ त्यास सांगें मनींचा विचार ॥ गोकुळा जाऊनि सत्वर ॥ रामकृष्णांसी आणावें ॥ २१ ॥ धनुर्याग मांडिला येथें ॥ सांगावें नंदादिगौळियांतें ॥ महोत्साव पाहोनि मागुतें ॥ गोकुळासी जाइजे ॥ २२ ॥ आमुचा दिव्य रथ जावा घेऊनी ॥ त्यावरी बैसवीं रामचक्रपाणी ॥ उदयीक सत्वर दोघांसि आणोनी ॥ महोत्साव दाखवावा ॥ २३ ॥ आज्ञा वंदूनि अक्रूर ॥ रथ घेऊन निघाला सत्वर ॥ म्हणे माझिया सुकृततरुवरें ॥ वाढ आजी घेतली ॥ २४ ॥ मनांत चिंता वाटे थोर ॥ म्हणे कंस चांडाळ दुराचार ॥ बळराम आणि यदुवीर ॥ दोघे सुकुमार कैसे आणूं ॥ २५ ॥ मागुती श्रीकृष्णचरित्र ॥ अद्भुत आठवी मनांत ॥ संहारिले दारुण दैत्य ॥ [2]केशी [3]अघ [4]बकादिक ॥ २६ ॥ कृष्णप्रताप प्रचंड देख ॥ काय करील कंस मशक ॥ जगद्वंद्यासी आंवश्यक ॥ नेईन आतां निर्धारें ॥ २७ ॥ आणीक एक

---

१ लोखंडाचा घन कठिण असतो; पण पाषाण त्यावर ( नम्र होऊन ) पडेल तर तो त्यास सुद्धां भेदील. २ केशी दैत्य हा कंसाकडून कृष्णाला मारण्या करितां घोडा होऊन गोकुळांत गेला होता तो कृष्णानें मारला. ३ अघासुर हा कृष्णाला मारण्या करितां मोठा अजगर होऊन गेला होता तोही कृष्णानें मारला. ४ बकासुर हा कृष्णाला मारण्या करितां बगळा होऊन गेला होता तोही कृष्णानें मारला.

चिंता अंतरीं ॥ विश्वास धरी कीं न धरी ॥ हा कंस-सेवक म्हणोनि मजवरी ॥ कोपेल काय जगदात्मा ॥ २८ ॥ तो तरी सर्वात्मा सर्वसाक्षी ॥ जो अनंत ब्रम्हांडें चित्तीं परीक्षी ॥ भक्ताभक्तांचीं लक्षणें लक्षी ॥ संकटीं रक्षी निजदासां ॥ २९ ॥ म्हणे आजि धन्य नयन ॥ देखेन वैकुंठींचें निधान ॥ पूर्णब्रम्ह सनातन ॥ मी पाहेन डोळेभरी ॥ ३० ॥ जो दश-शत-मुखांग-शयन ॥ मी त्याचे पदीं भाळ ठेवीन ॥ जो नीलग्रीवाचें त्द्दयध्यान ॥ चतुरानन बाळ ज्याचें ॥ ३१ ॥ जो क्षीराब्धिवासी पूर्ण ब्रम्ह ॥ वेदशास्त्रांसि न कळे वर्म ॥ त्या हरीसी आजि क्षेम ॥ मी देईन प्रेमावडी ॥ ३२ ॥ जो निर्गुण निर्विकार ॥ जो देशकाळातीत अपार ॥ तो गोकुळीं यादवेश्वर ॥ डोळेभरी पाहीन मी ॥ ३३॥ दुरूनि गोकुळ अक्रूरें देखतां ॥ साष्टांग घातलें दंडवता ॥ म्हणे धन्य व्रजवासी समस्त ॥ नित्य मुख पाहती हरीचें ॥ ३४ ॥ तों गोखुरांमागें चांगलीं ॥ पाउलें हरीचीं उमटलीं ॥ अक्रूरें घेऊनियां धुळी ॥ लाविली भाळीं आपुले ॥ ३५ ॥ जोडोनियां दोन्ही हात ॥ चरणचाली अक्रूर चालत ॥ कंठ झाला सद्गदित ॥ अश्रुपात वाहती ॥ ३६ ॥ पद्मुद्रा उमटल्या जेथें ॥ मागुती प्रणिपात करी तेथें ॥ तों वृक्ष देखिले निजभक्तें ॥ काय त्यांतें बोलत ॥ ३७ ॥ म्हणे धन्य धन्य तुम्ही वृक्ष ॥ तुमचे छायेसि बैसला कमलाक्ष ॥ जो भूतांतरात्मा कर्माध्यक्ष ॥ सहस्राक्ष शरण जया ॥ ३८ ॥ तों सायंकाळीं परतला गोभार ॥ गोपांसहीत यादवेश्वर ॥ सवें ज्येष्ठ बंधु बळिभद्र वीर ॥ वाद्यगजर बहु होती ॥ ३९ ॥ गोरज-धुळी दाटली बहुत ॥ तेणें झांकोळला अक्रूर-रथ॥ नंद-मंदिराजवळि अकस्मात ॥ अक्रूर तेधवां पातला ॥ ४० ॥ अक्रूरें नंद देखोन ॥ धांवोनि दिधलें क्षेमालिंगन ॥ तों पातले दोघेजण ॥ शेषनारायण ते काळीं ॥ ४१ ॥ देखिला त्रिभुवननाथ डोळां ॥ नीळ जीमूत-वर्ण घनसांवळा ॥ रुळती आपाद वनमाळा ॥ गोरजें डौरला वदनचंद्र ॥ ४२ ॥ उदार श्रीमुख आकर्ण-नयन ॥ कुंडलासभोंवती किरण ॥ हरि-तनूचा आश्रय पूर्ण ॥ अलंकार घव-घवित ॥ ४३ ॥ अक्रूर यादवाचा वडील बहुत ॥ देखूनियां श्रीकृष्णनाथ ॥ चरण वंदावया धांवत ॥ तो अक्रूरें दंडवत घातलें ॥ ४४ ॥ नेत्रीं चालल्या प्रेमांबुधारा ॥ ऐसें देखोनि परात्पर सोइरा ॥ अक्रूराचा

कर धरोनि सत्वरा ॥ उठवूनियां क्षेम दीधलें ॥ ४५ ॥ अक्रूराचे गळां मिठी ॥ दृढ घालीत जगजेठी ॥ रेवती-रमण परमेष्ठी ॥ त्यास ही भेटी नोहेची ॥ ४६ ॥ निजभक्त जाणती गोडी ॥ समाधी कायसी बापुडी ॥ तीर्थांव्रतांचिया कोडी ॥ करूनियां वोंवाळिजे ॥ ४७ ॥ क्षणक्षणां तो अक्रूर ॥ कृष्णमुख न्याहाळोनि सुंदर ॥ धरी हरिचरण वारंवार ॥ तृप्ति नोहे सर्वथा ॥ ४८ ॥ बळिरामासी नमून ॥ अक्रूरें दीधलें आलिंगन ॥ साक्षात् शेषनारायण ॥ अवतार पुरुष देखिला ॥ ४९ ॥ अक्रूराचे दोन्ही हात ॥ बळदेव आणि अनंत ॥ धरूनि प्रवेशले मंदिरांत ॥ नंदासहित तेधवां ॥ ५० ॥ यशोदेसी नमस्कारी अक्रूर ॥ आसनीं बैसला सादर ॥ सांगे मथुरेचा समाचार ॥ सविस्तर साद्यंत ॥ ५१ ॥ नंदासि म्हणे अक्रूर ॥ कंसें बलाविलें तुम्हांसि सत्वर ॥ बळदेव आणि यादवेश्वर ॥ याग पाह्यवया चलावें ॥ ५२ ॥ धनुर्याग पाहोनियां मागुती ॥ सवेंचि यावें गोकुळाप्रती ॥ उदया येतां गभस्ती ॥ अति सत्वर निघावें ॥ ५३ ॥ तों नंद-यशोदा बोलत ॥ मथुरेसि नेता श्रीकृष्णनाथ ॥ तेचि क्षणीं आमुचा प्राणांत ॥ होईल जाण अक्रूरा ॥ ५४ ॥ कृष्णाचा करावया घात ॥ कंस अहो-रात्र जपत ॥ अक्रूरा तूं आमुचा परम आप्त ॥ पाहे विचारूनि मानसीं ॥ ५५ ॥ अक्रूर हांसोनियां बोलत ॥ तुमचे दृष्टीस हा बाळ दिसत ॥ परी कृतांतासी शिक्षा करीत ॥ कृष्णनाथ निर्धारें ॥ ५६ ॥ हरी बोले तेचि समयीं ॥ अंतरीं भय धरूं नका कांहीं ॥ चला मथुरेसि लवलाहीं ॥ गौळी समागमें घेऊनी ॥ ५७ ॥ अक्रूर बोले न लगतां एकक्षण ॥ कंसासी मारील श्रीकृष्ण ॥ मुष्टीक चाणूर यांचे मरण ॥ जवळि बहुधा पातलें ॥ ५८ ॥ कृष्णें पूर्वीं पराक्रम केले ॥ ते नंद-यशोदेशी आठवले ॥ थोर दैत्य संहारिले ॥ अघ बक केशी प्रलंब ॥५९ ॥ गोवर्धन

१ आलिंगन. २ मुष्टिक आणि चाणूर हे दैत्य मोठे पहिलवान होते. त्यांनीं कृष्णाला आणि बलरामाला कुस्ती करून मारावें म्हणून कंसानें कृष्ण बलिराम मथुरेस आल्यावर त्यांची ह्यांची कुस्ती लाविली. त्यावेळीं मुष्टिकास बलरामानें मारलें आणि चाणूरास कृष्णानें मारलें. ३ अघ, बक, आणि केशी ह्यांच्या कथांच्या टिपा ह्याच अध्यायांत मागें दिल्या आहेत त्या पहाव्या. प्रलंबासुर हा गौळ्याचे सोंग घेऊन कृष्ण बलराम वृंदावनांत गोपांसह वर्तमान खेळत होते तेथें कृष्णबलरामांस मारण्या करितां गेला होता तो बलरामानें मारला.

पर्वत उचलिला ॥ काळिया मर्दोनि अग्नी प्राशिला ॥ आखंडल शरण आला ॥ तोही देखिला सकळिकीं ॥ ६० ॥ हा असे निर्भय सर्वदा पाहें ॥ यासी कळिकाळाचें नाहीं भये ॥ बुद्धिबळाचा समुद्र यादवराय ॥ ते गोष्टी मानवली समस्तांसी ॥ ६१ ॥ कर्ता हर्ता भुवनगोप्ता ॥ सरी सर्वत्र जयाची सत्ता ॥ तो ह्मा यशोदे तव सुता ॥ नाहीं भय कंसाचें ॥ ६२ ॥ अक्रूर म्हणे प्रातःकाळीं ॥ निघावे नंदादि सर्व गौळी ॥ गोकुळीं मात प्रगटली ॥ कीं वनमाळी उद्यां जातो ॥ ६३ ॥ तों उगवला वासरमणी ॥ स्नान संध्यादि भोजन सारूनी ॥ बळदेव आणि चक्रपाणी ॥ सिद्ध जाले तेधवां ॥ ६४ ॥ दिव्य रथ अक्रूरें सजिला ॥ गौळीयांचा मेळा निघाला ॥ गोरस कावडी तेवेळा ॥ भरोनि घेतल्या कंसभेटी ॥ ६५ ॥ यशोदा आणि रोहिणी यांते ॥ नमस्कारिलें बळिराम कृष्णनाथें ॥ हात जोडोनियां म्हणती मातें ॥ जाऊनि येतों पुढतीं ॥ ६६ ॥ यशोदा म्हणे हे जगजेठी ॥ आतां कैची तुझी भेटी ॥ स्नेहाचे उमाळे उठती पोटीं ॥ स्तनीं पान्हा फूटला ॥ ६७ ॥ तूं जातोसि मनमोहना ॥ मी आतां नेठेवीं आपुल्या प्राणा ॥ माझिया विसांव्या राजीव-नयना ॥ मन-रंजना श्रीहरी ॥ ६८ ॥ मम सांवळे कान्हाई ॥ जग-न्मोहने कृष्णाबाई ॥ तुझे गुण आठऊं कितीकाई ॥ मिती नाहीं तयांते ॥ ६९ ॥ विश्वरूप दाविलें नयनीं ॥ गोवर्धन उचलिला चक्रपाणी ॥ द्वादश गांवें मह्रा

१ कृष्णानें कालियमर्दन केल्यावर यमुना तीरीं एकाएकीं मोठा वणवा लागला तो अग्नि कृष्ण पियाला अशी कथा आहे. २ इंद्र—इंद्रानें वर्षास वृष्टि चांगली करावी म्हणून त्यास प्रसन्न करून घेण्या करितां तदुद्देशानें नंद वर्षास यज्ञ करीत असे, तो नकरतां ब्राम्हण, गाई, गोवर्धन पर्वत ह्यांच्या उद्देशानें यज्ञ करावा म्हणजे पर्जन्य वृष्टि चांगली होऊन धान्य तृणाची समृद्धि पुष्कल होईल असें सांगून इंद्रोद्देशाचा यज्ञ कृष्णानें मोडला. त्या वरून इंद्रास मोठा राग येऊन गोकुळ सर्व वाहवून नेण्या करितां त्यानें मनस्वीच वृष्टि करविली, त्या वेळीं कृष्णानें गोवर्धन पर्वत बोटावर उचलून धरून त्याचे खालीं सर्व गोकुळाचें संरक्षण केलें. हें इंद्रानें पाहिलें तेव्हां इंद्र हत गर्व होऊन कृष्णास शरण आला अशी कथा आहे. ३ कृष्णानें मृत्तिका खाल्ली म्हणून बळरामानें एकदां यशोदेस सांगितलें; तेव्हां यशोदा कृष्णास मारूं लागली, त्यावेळीं आपण मृत्तिका खाल्ली नाहीं म्हणून दाखविण्या—करितां कृष्णानें आपलें तोंड उघडून यशोदेस दाखविलें; त्यावेळीं तोंडाचे आंत सर्व विश्व दाखविलें.

अग्नी ॥ गिळोनि तुवां रक्षिलें ॥ ७० ॥ नंद बुडाला यमुना-जीवनीं ॥ घेऊनि आलासि सारंग पाणी ॥ सर्प गिळिलें शक्ति-स्थानीं ॥ तेथें रक्षिलें पाडसा१ ॥ ७१ ॥ ब्रम्हांड-नायका तव जननी ॥ म्हणतां लज्जा वाटे मनीं ॥ माता पिता बंधु भगिनी ॥ तूंचि माझा श्रीरंगा ॥ ७२ ॥ मातेचिया चरणावरी ॥ मस्तक ठेवी श्रीमुरारी ॥ माता म्हणे पूतनारी ॥ उपेक्षा कां केली तुवां माझी ॥ ७३ ॥ तंव गोपिका आल्या धांवत ॥ दोहीं हातीं त्दृदय पिटित ॥ कितीएक पडती मूर्छागत ॥ थोर प्राणांत वोढवला ॥ ७४ ॥ एक धरणीवरी लोळती ॥ एक दीर्घ स्वरें हाका देती ॥ एक अवनीवरी कपाळ पिटिती ॥ प्राणांत गती वोढवली ॥ ७५ ॥ एक म्हणती गेला सांवळा ॥ आतां अग्नि लावा गोकुला ॥ गोकुळींचा प्राण चालिला ॥ प्रेतकळा आलीपैं ॥ ७६ ॥ हा चांडाला अक्रूरा परियेसीं ॥ अकस्मात कोठूनि आलासी ॥ आहा गोकुळींचा प्राण नेतोसी ॥ निर्दय होसी तूं साच ॥ ७७ ॥ सकळ गौळिणींचिया हत्या ॥ अक्रूरा पडतील तुझया माथां ॥ नेवों नको श्रीकृष्णानाथा ॥ इतुकें आतां आम्हांसि देई ॥ ७८ ॥ तुझें नाम ठेविलें अक्रूर ॥ परि तुंजसारिखा नसे निर्दय थोर ॥ बहुत झालासी कां क्रूर ॥ परम निष्ठूर तूं होसी ॥ ७९ ॥ तंव रामकृष्ण रथावरी ॥ बैसोनियां चालिले सत्वरी ॥ रथापुढें येऊनि व्रजनारी ॥ धरणी आडव्या पडताती ॥ ८० ॥ एक अक्रूरापुढें पदर पसरोन ॥ म्हणती आम्ही अनाथ दीन ॥ करीं आजि कृष्णदान ॥ कीर्ति त्रिभुवनीं भरोंदे ॥ ८१ ॥ अक्रूरा देखतां घेऊनियां माती ॥ गोपी आपुल्या मुखीं घालिती ॥ म्हणती मनमोहना यदुपती ॥ भेटसी आतां कधीं तूं ॥ ८२ ॥ ऐसें देखोनि त्या अवसरा ॥ अष्टभाव२ नावरती अक्रूरा ॥ नयनीं चालिल्या अश्रुधारा ॥ प्रेम देखोनि गोपिकांचे ॥ ८३ ॥ म्हणे धन्यधन्य यांचें प्रेम ॥ यांनीं वश्य केला पुरुषोत्तम ॥ जो निर्विकार

---

१ कंसानें एकदां कृष्णास मारण्या करितां गोकुळांत दूत पाठवून गोवर्धन पर्वत आणि आजूबाजूचें बारा कोस अरण्य यांस आग लावविली ती कृष्णानें गिळली अशी कथा आहे. २ सात्विक अष्टभाव ते येणेप्रमाणें– १ स्तंभ ( स्तब्धता ), २ प्रलय ( बेशुद्धि ), ३ रोमांच ( आंगावर कांटा येणें ), ४ स्वेद ( घर्म ), ५ वैवर्ण्य ( तोंडावरचा वर्ण फिरणें ), ६ वेपथु ( कंप ), ७ अश्रु ( डोळयांतून पाणी येणें ), आणि ८ वैस्वर्य (स्वर पालटणें).

परब्रम्ह ॥ नाम रूपातीत जो ॥ ८४ ॥ गोपींचिया शोकासी नाहीं पार ॥ जैसा वनासि जातां रघुवीर ॥ पाठी लागे अयोध्या नगर ॥ तैसेंचि येथें जाह्लें ॥ ८५ ॥ जीवना-वीण मीन जैसे ॥ गोकुळींचे लोकं तळमळती तैसे ॥ यशोदेशी मूर्छा येतसे ॥ धांवतसे रथा पाठीं ॥ ८६ ॥ माझे विसावया जग-जीवना ॥ तुझें मुख पाहोंदे मनमोहना ॥ यई मज प्रेमाचा पान्हा ॥ पाजूं कोणा सांगपां ॥ ८७ ॥ माझे सांवळे कान्हाई ॥ उभी राहें कृष्णाबाई ॥ तुज वेगळ्या दिशा दाही ॥ वोस झाल्या मज आतां ॥८७॥ ॥ व्रजस्त्रियांचा आकांत भारी ॥ ऐकोनि श्रीकृष्ण रथावरी ॥ हातानें दुरूनि खुणा करी ॥ येईन लौकरी म्हणोनी ॥८८॥ हरी म्हणे अक्रूरा ॥ आतां रथ चालोंद्या सत्वरा ॥ तरीच या गोपिका सुंदरा ॥ दुरी मागें राहतील ॥ ८९ ॥ रथ घड घडां समीरगती ॥ क्रमूनि मागें टाकिली जगती ॥ तेधवां गोपिका मूर्छागत पडती ॥ हाका फोडिती कृष्णनामें ॥ ९० ॥ म्हणती सखया वनमाळी ॥ तुझा वियोगा-नळ आम्हा जाळी ॥ एक म्हणती रथा-जवळी ॥ धांवोनि जाऊं चलागे ॥ ९१ ॥ अक्रूरासि घालोनि कृष्णाची आण ॥ रथ वेगें आणावा परतोन ॥ नेदी तरी बळें हिरोन ॥ आणूं मनमोहन आतांची ॥ ९२ ॥ आम्ही आहोत इतक्या सुंदरी ॥ अक्रूर एकला काय करी ॥ तों रथ गेला बहुत दुरी ॥ विंकळ नारी पडियेल्या ॥ ९३ ॥ रथ उतरला खोल भूमीस ॥ नदिसे ध्वज आणि कलश ॥ मग होऊनियां निराश ॥ गोपी समस्त परतल्या ॥९४॥ ॥ अवघ्या गोपी आकांत करीत ॥ गोकुळा चालिल्या समस्त ॥ एक म्हणती आग त्वरित ॥ लावा आतां गोकुळा ॥ ९५ ॥ ऐसा शोक करीत सुंदरी ॥ प्रवेशल्या यशोदेचिया मंदिरीं ॥ यशोदा म्हणे ते अवसरीं ॥ माझा श्रीहरी दावा गे ॥ ९६ ॥ सकळ गोपी यशोदेचे कंठीं ॥ घालिती तेधवां दृढ मिठी ॥ शोक केला तो न माय सृष्टी ॥ नवर्णवेचि कोण्हाते ॥ ९७ ॥ श्रीकृष्णाची बाळलेणीं ॥ टाकिलीं गोपीपुढें आणोनि ॥ हरीचीं खेळणीं पोटीं धरूनीं ॥ माय रडे तेधवां ॥ ९८ ॥ असो ते खेद करीत गौळिणी ॥ प्रवेशल्या आपुले सदनीं ॥ गृहकृत्य करितां चक्रपाणी ॥ गीत गाती सर्वदा ॥ ९९ ॥

# वेंचे, रामविजयांतील.

## ओव्या.

### अध्याय पहिला.

जय जय गजवदना निरुपमा ॥ अगाध न वर्णवे तुझा महिमा ॥ तुझि या गुणाचो पावावया सीमा ॥ कैसा सरता होईन मी ॥ १ ॥ काखेसी मेरू घेवूनि देखा ॥ कैसे नृत्य करील पिपीलिका ॥ कैसें ब्रम्हांड उचलेल मशका ॥ भूगोळ मक्षिका केंवि हालवी ॥ २ ॥ चंद्रासी कर्पूराचें उटणें वासरमणीसी दर्पण दाखवणें ॥ हिमनगासी वारा घालणें ॥ मेघासी समर्पण उदकांजुळी ॥ ३ ॥ सुर-तरूपुढें ठेविलें बदरी-फळ ॥ मळयानिळासी सुगंध परिमळ ॥ कामधेनूसी शुष्क-तृण-कवळ ॥ आणोनियां समर्पिलें ॥ ४ ॥ क्षीरसिंधूसी समर्पिलें अजाक्षीर ॥ कनकाद्री-पुढें ठेविली गार ॥ तैसें माकृत-बोलें अपार ॥ तुझें महत्व केंवि वर्णू ॥ ५ ॥ परी जो छंद घेत बाळक॥स्नेहें करून पुरवी जनक॥तरी हा राम-विजय ग्रंथ सुरेख ॥ सिद्धी पावो तव कृपें ॥६॥ आतां नमूं सरसिजो-द्भव-कुमारी ॥ जे विलसे सदा कवि-जिव्हा-ग्रीं ॥ जीचे वरदें मूकही करी ॥ वाचस्पतीसीं विवाद ॥ ७ ॥ जे आनंद सरोवर-मराळिका ॥ जे चातुर्य-चंपक-कळिका ॥ जेचे कृपेची करून नौका ॥ कवि-बाळका नेत परती-रा ॥ ८ ॥ कृपें तुझे विरंची-कुमारी ॥ जन्मांध होती महा जोहरी ॥ अति मूढतो वेदार्थ करी ॥ शक्रपदीं बैसे रंक ॥ ९ ॥ अंबे तूं कवि-त्दद्या-ब्ज-भ्रमरी ॥ कीं निजा-नंद-सागरींची लहरी ॥ वाग्वल्ली तूं बैसें जिव्हाग्रीं ॥ विरूढे सफळ सर्वदा ॥ १० ॥ विवेक-हंस शुद्ध धवळ ॥ त्यावरी तुझें आसन चंचळ ॥ तप्त-कांचन जैसें सुढाळ ॥ तैसें निर्मळ निजांग तुझें ॥ ११ ॥ शुभ्र कंचुकी शुभ्र अंबर ॥ दिव्य मुक्तलग अलंकार ॥ निजबोधवीणा घेऊनि सुस्वर ॥ गायन करिसी स्वानंदें ॥ १२ ॥ ऐकतां शारदेचें गायन ॥ तन्मय विधी विष्णु ईशान ॥ अंबे तुझें सौंदर्य पाहून ॥ मीनकेतन तटस्थ ॥ १३ ॥ रंभा उर्वशी तिलोत्तमा ॥ सावित्री आणि मुख्य रमा ॥ तुझ्या चातुर्यसमुद्राची सीमा ॥ त्याही कदा न पावती ॥ १४ ॥ अंबे तुझे गुण केंवि वर्णावे ॥ केंवि अर्कासो अर्की सुमनें पूजावें ॥ अंबर कैसें मुष्टींत साठवे ॥ पाल्वीं

बांधवे वाय कैसा ॥ १५ ॥ नकरवे उर्वीचे वजन ॥ नगणवे सिंधूचें जीवन ॥ सप्तावरणें भेदून ॥ मशक केंवी जाऊं शके ॥ १५ ॥ ऐकोनि बाळकाचीं वचनें ॥ जननी त्हदयीं धरी प्रीतीनें ॥ तैसें सरस्वतीनें निज कृपेनें ॥ घातलें ठाणें जिव्हाग्रीं ॥ १७ ॥ माझें मन मूढ चकोर ॥ कुहू माजी इच्छी रोहिणी-वर ॥ परी सरस्वती कृपाळू थोर ॥ शुद्ध बीज प्रगटली ॥ १८ ॥ बीजेपासून चढत्या कळा ॥ तो चकोरासी अधीक सोहळा ॥ तैसीच येथें रघुनाथ-लीला ॥ चढे आगळा रस पुढें ॥ १९ ॥ ज्ञानाचे अनंत डोळे ॥ उघडिले एकेचि वेळे ॥ आतां वंदूं सद्गुरूचीं पाउलें ज्याचेनि प्रगटे दिव्य ज्ञान ॥ २० ॥ जो अज्ञान-तिमिर-छेदक जो प्रगट वेदांत-ज्ञानार्क ॥ तो ब्रम्हानंद महाराज देख ॥ परमाद्भुत महिमा ज्याचा ॥ २१ ॥ जोका पांडुरंगनगर-विख्यात ॥ जो भक्त भीमातटीं समाधिस्थ॥तो यतिराज महिमा अद्भुत ॥ कवण वर्णूं शकेपैं ॥ २२ ॥ जागृती स्वप्न सुषुप्ती तुर्या पूर्ण ॥ चहू अवस्थेवरी ज्याचें आसन ॥ उन्मनीही निरसून ॥ स्वसुखीं पूर्ण समाधिस्थ ॥ २३ ॥ चांदणें कैंचें नसतां मृगांक ॥ कीं किरणें कैंचीं नुगवतां अर्क ॥ जीवनावांचोनि बीज देख ॥ सहसा अंकुर फुटेना ॥ २४ ॥ जरी नेत्रेंवीण नदिसे पदार्थ ॥ मथनेंवीण न निवडे नवनीत ॥ तैसा सद्गुरुवांचोनि परमार्थ ॥ ठाई नपडे जीवासी ॥ २५ ॥ वर नसतां व्यर्थ वऱ्हाड ॥ शीर नसतां कायसें धड ॥ तैसें गुरुकृपेवीण व्यर्थ कावाड ॥ व्रतें तपें साधनें ॥ २६ ॥ अंजनेंवीण नसांपडे निधान ॥ कीं गायत्रीवीण ब्राम्हण पूर्ण ॥ सीमा कैंची ग्रामावीण ॥ तैसें गुरुवीण ज्ञान नघडे ॥ २७ ॥ म्हणोनी तनु मन धनेसी अनन्य ॥ ब्रम्हानंद स्वामीस शरण ॥ आरंभीं श्रीरामकथा गहन ॥ ग्रंथ संपूर्ण सिद्धी पावो ॥ २८ ॥ ऐसे ऐकतां सप्रेम बोल ॥ बोलिला श्रीगुरु-दयाळ ॥ चकोराकारणें उतावेळ ॥ मृगांक जैसा उगवे ॥ २९ ॥ कीं चातकालागीं धांवे जलधर ॥ कीं क्षुधितापुढें क्षीर-सागर ॥ कीं कल्पवृक्ष शोधीत आला घर ॥ दरिद्रियाचें साक्षेपें ॥ ३० ॥ तैसा श्रीगुरु दयासागर ॥ तेणें दीधले अक्षय्य वर ॥ म्हणे सिद्धी पावेल साचार ॥ रामविजय ग्रंथ हा ॥ ३१ ॥ आतां वंदूं संतसज्जन ॥ जे वैराग्य वनींचे पंचानन ॥ जे ज्ञानां-बरींचे चंड-किरण ॥ उदय अस्त नसे जया ॥ ॥ ३२ ॥ जे भक्ति-सरोवरींचे राजहंस ॥ जेकां अविद्या-रव्यहुताश ॥

कीं ते पद्म-हस्ती विशेष ॥ भव-रोग-वैद्य हे ॥ ३३ ॥ कीं जीव पावे आपुल्या स्व-पदांसी ॥ ऐसे मुहूर्त देणार जोशी ॥ कीं ते पंचाक्षरी नि-श्चयेसीं ॥ जे पंच-भूतांसी पळविती ॥ ३४ ॥ कीं दैवी संपत्तीचें भाग्य-वंत ॥ मुमुक्षांसी करिती दरिद्र-रहित ॥ कीं सद्विद्येचीं अद्भुत ॥ गोपुरें काय उंचावलीं ॥ ३५ ॥ संत श्रोते चतुर पंडित ॥ माझें बोलणें आर्ष अत्यंत ॥ जैसें सरस्वतीपुढें मूढ बहुत ॥ वाग्विलास दावितसे ॥ ३६ ॥ सूर्यापुढें जैसा दीप देख ॥ जान्हवीस न्हाणी थिल्लरोदक ॥ कीं कनका-द्री अति सुरेख ॥ त्यासी अलंकार पितळेचे ॥ ३७ ॥ कामधेनूस सम-र्पिलें अजाक्षीर ॥ चंद्रासी सीतळ करी रंभापत्र ॥ कल्पतरू कल्पिलें देणार ॥ त्यासि निंबोळ्या समर्पिल्या ॥ ३८ ॥ रत्नाकरापुढें काचवटी समर्पिली ॥ तैसी माझी आर्षबोली ॥ परी तुम्हीं प्रीतीं ठेविली ॥ प्राकृत शब्दीं नवल हें ॥ ३९ ॥ विष्णूसि भूषणें अपार ॥ परी तुळसीवरी आ-वडी थोर ॥ कीं अपर्णापतीसी बिल्वपत्र ॥ भक्तीं वाहतां आवडत ॥ ॥ ४० ॥ रायें पाठिसीं दासी घालितां ॥ तिची सर्वांवरी चाले सत्ता ॥ प्रभु अल्पमोलाचे अलंकार लेता ॥ जनां समस्ता थोर दिसे ॥ ४१ ॥ म्हणोनि तुम्ही संत प्रभु थोर ॥ महिमार्णवींचीं जाहाजें अपार ॥ मोटेंत बांधवेल समीर ॥ चरणीं अंबर क्रमवेलपैं ॥ ४२ ॥ गणवेल पृथिवीचे रजःकण ॥ मोजवेल सागरीचें जीवन ॥ कनकाद्रीचा चेंडू करून ॥ उ-डविजेल सर्वथा ॥ ४३ ॥ भोगींद्र-मस्तकींचा मणी ॥ आणवेल एकादे क्षणीं ॥ सूर्य जातां धरवेल गगनीं ॥ नक्षत्रें गुणीं ओंविजे ॥ ४४ ॥ का-ढवेल शशिमंडळीचें अमृत ॥ मोडिजेल ऐरावताचे दंत ॥ दिग्गज आ-णोनि समस्त ॥ एकेठायीं बांधिजेती ॥ ४५ ॥ तुरंग करुनी प्रभंजन ॥ सर्वांठायीं करवेल गमन ॥ परी तें संतांचें महिमान ॥ ब्रम्हानंदें पूर्ण न वर्णवे ॥ ४६ ॥ तों संत बोलती आनंदघन ॥ मन निवालें तुझे बोल ऐकोन॥आम्ही करूं इच्छितों रामकथा श्रवण ॥ वरी दृष्टांत गोड तुझे ॥ ॥ ४७ ॥ मेरू सुंदर रत्नेंकरून ॥ नक्षत्रीं मंडित गगन ॥ कीं वृक्षफळीं परिपूर्ण ॥ दृष्टांतीं संपूर्ण ग्रंथ शोभा ॥४८ ॥ कीं शांती क्षमा दया विशे-ष ॥ तेणें मंडित सत्पुरुष ॥ कीं परिवारासमवेत नरेश ॥ दृष्टांतें सुरस ग्रंथशोभा ॥ ४९ ॥ आधींच भूक लागली बहुत ॥ त्याही वरी वाढिलें पंचामृत॥कीं दुर्बळासी अकस्मात ॥ कल्पतरू भेटला ॥ ५० ॥ कन्या-

थीं हिंडतां भूमंडळ ॥ त्यासी राजकन्या घाली माळ ॥ कीं रोगिया रसायण निर्मळ ॥ अकस्मात जोडलें ॥ ५१ ॥ आतां बहुत टाकुनी शब्दजाळ ॥ बोलें रामकथा रसाळ ॥ जैसी सिकता सांडोनि मराळ ॥ मुक्ताफळें सेविती ॥ ५२ ॥ कीं कोशगृहीं प्रवेशोनी ॥ भांडारी रत्नें काढी निवडोनी ॥ कीं दोष टाकोनि सज्जनीं ॥ उत्तम गुण स्वीकारिजे ॥ ॥ ५३ ॥ ऐसे संताचे बोल परिकर ॥ ऐकोनि ब्रम्हानंदें श्रीधर ॥ साष्टांग घालोनि नमस्कार ॥ म्हणे सादर परिसीजे ॥ ५४ ॥ असंभाव्य श्रीरामचरित्र॥शतकोटि ग्रंथविस्तार॥वाल्मीकि बोलिला अपार॥कथा-समुद्र अगम्य ॥५५॥ मुळापासोन इतुक्या कथा ॥ कैशा वर्णवतील तत्त्वतां॥ त्या-माजि वाल्मीकि-रामायण-नाटक-ग्रंथा ॥ श्री रामविजया लागीं कथूं ॥ ५६ ॥ समस्त कवींसी नमस्कार ॥ जो जगद्गुरु आचार्य शंकर॥ जेणें मतें उच्छेदूनि समग्र ॥ शुद्ध मार्ग वाढविला ॥ ५७ ॥ जो श्रीधराचार्य टीकाकार ॥ त्यासी नमस्कारीत श्रीधर ॥ मधुसूदनादिक नरेंद्र ॥ ग्रंथ अपार जयांचे ॥ ५८ ॥ जो शृंगार-वनींचा विहंगम जाण ॥ तो जयदेव पद्मावती-रमण ॥ ज्याची काव्यकळा पाहोन ॥ पंडित जन तटस्थ ॥ ५९ ॥ जो वेदांत क्षीरार्णवींचा मीन ॥ जेणें विवेकसिंधू निर्मिला पूर्ण ॥ तो मुकुंदराज गुणनिधान ॥ तयाचे चरण वंदिले ॥ ६० ॥ तारावया जग समग्र ॥ पुन्हा अवतरला रमा-वर ॥ गीता-र्थ केला साचार ॥ तो ज्ञानेश्वर जग-द्गुरू ॥ ६१ ॥ जो भानुदास-कुल-भूषण ॥ प्रतिष्ठानवासी परिपूर्ण ॥ त्या एकनाथें ग्रंथ संपूर्ण ॥ बहु रसाळ कथियेले ॥ ६२ ॥ जे चातुर्यराजधानीचे कळस ॥ मुक्तेश्वर मुद्गलदास ॥ ज्यांचे ग्रंथ पाहतां सुरस ॥ ब्रम्हानंद उचंबळे ॥ ६३ ॥ जैसा चंडांशु सतेज व्योमीं ॥ तैसाचि केवळ वामन स्वामी ॥ ज्याची श्लोक-रचना ये भूमी ॥ भुमंडळावरी अपूर्व ॥ ६४ ॥ कृष्णदास जयराम ॥ जें शांति दयेचें निजधाम ॥ ज्याचे ग्रंथ ज्ञानभरित परम ॥ जो निःसीम ब्रम्हचारी ॥६५॥ श्रीराम-उपासक निर्मळ ॥ जो भजन सरोवरीचा मराळ ॥ तो रामदास महाराज केवळ ॥ भक्ती प्रबळवी जना ॥ ६६ ॥ ब्रम्हानंदस्वामीचा बंधू सत्य ॥ नाम तयाचें श्रीरंगनाथ ॥ ज्याची कविता समस्त ॥ अपार जन उद्धरीले ॥ ६७ ॥ आतां असो समस्त कविवर ॥ अवघे ब्रम्हानंद रूप साचार ॥ त्यांसी अनन्य-शरण श्रीधर ॥ द्यावा वर ग्रं-

भासी ॥६८॥ रवि-कुळीं अवतारला श्रीधर ॥ कैसें केलें लीला-चरित्र ॥ तरला वाल्मीकि साचार ॥ कथा अपार बोलिला ॥ ६९ ॥ हें वर्णितां श्रीरामचरित्र ॥ तरला वाल्मीकि साचार ॥ पाप आचरला अपार ॥ ऐका सादर गोष्टी ते ॥ ७० ॥ वाल्मीकि पूर्वीं द्विजसुत ॥ त्यजोनि आचार यज्ञोपवीत ॥ किरातसंगें वाट पाडित ॥ अति उन्मत्त विषयांध ॥ ७१ ॥ महा दुर्धर कानन ॥ देखतां भयाभीत होय मन ॥ पर्वत-दरीमाजी स्थळ करोन ॥ सहपरिवारें वसे तेथें ॥ ७२ ॥ भोंवतें द्वादश गांवें पर्यंत ॥ पाळती राखोनि वाट पाडित ॥ केल्या ब्रम्हहत्या असंख्यात ॥ नाहीं गणती इतर जीवां ॥ ७३ ॥ मत्स्य धरावया लागीं बक ॥ जैसा होऊनि बसे सात्विक ॥ कीं मूषकालागीं बिडालिक ॥ बैसे टपत तयापरी॥७४॥ ॥ कीं अंगसंकोचें पारधी ॥ जाणोनि तात्काळ मृग साधी ॥ तैसा वाल्ह्या जीव वधी ॥ पापबुद्धी निर्दय ॥ ७५ ॥ अपार जीव मारिले ॥ पापाचे पर्वत संचिले ॥ जैसें अंत्यज-गृहा-भोंवते पडिले ॥ ढीग पशु-अस्थींचे ॥ ७६ ॥ ऐसें करितां पापाचरण ॥ तयासी आलें वृद्धपण ॥ पुत्र जाले अति तरुण ॥ परी आंगवण नसांडी ॥ ७७ ॥ हातीं शस्त्र घेऊनि वाल्ह्या ॥ मार्ग लक्षीत जों बैसला ॥ तों अकस्मात नारद प्रगटला ॥ पूर्व-पुण्यें करोनी ॥ ७८ ॥ चंद्र वेष्टिती नक्षत्रें जैसीं ॥ भोंवती ऋषींची मांदी तैसी ॥ तों पाळती सांगती वाल्हियासी ॥ जाती तापसी बहुसाल ॥ ७९ ॥ वाटेसी धांवून आडवा आला ॥ शस्त्र उभारुनि ते वेळां ॥ दटावूनि ऋषींचां मेळा ॥ उभा केला क्षणभरी ॥ ८० ॥ कीं स्वर्गपंथें जातां नेटें ॥ जैसी यमपुरी लागेवाटे ॥ कीं पुण्यें आचरितां उद्धटें ॥ काम, क्रोध आडविती ॥ ८१ ॥ असा वाल्ह्या म्हणे तयांसी ॥ यात्रा आणारे मज पासीं ॥ नाहीं तरी मुकाल प्राणासी ॥ माझे हस्तें करोनी ॥ ८२ ॥ मग पुढें होऊन ब्रम्हनंदन ॥ म्हणे ऐक ऐक माझें वचन ॥ तुज आलें वृद्ध-पण ॥ पापें अपार घडलीं कीं ॥ ८३ ॥ द्रव्य जोडिलें तुवां अपार ॥ जाले दुष्कृताचे संभार ॥ तुझ्या पापासी वांटेकर ॥ कोण्ही आहेत कीं विचारीं ॥ ८४ ॥ आले तुज जवळी मरण ॥ यम जेव्हां गांजील दारुण ॥ तेव्हां तुज सोडवील कोण ॥ पाहें विचारोनि अंतरीं ॥ ८५ ॥ दारा पुत्र धन यौवन ॥ बंधु सेवक आप्तजन ॥ शस्त्रें अस्त्रें चातुरंग सैन्य ॥ नये कामा तेवेळे ॥ ८६ ॥ जीं जीं कर्में प्राणी करिती ॥ तितुकीं देव

अज्ञान तारिले ॥ ४ ॥ नमूं सद्गुरु तुकाराम ॥ जेणें निरसिला भवभ्रम ॥ आपुलें नामीं देऊनि प्रेम ॥ भवबंधन निवारिलें ॥ ५ ॥ आरंभिला भक्तविजय ग्रंथ ॥ न्हा सिद्धि पाव्वावा तुम्ही समस्त ॥ जें दुर्बळाघरीं मांडतां कृत्य ॥ साहित्य श्रीमंत करिताती ॥ ६ ॥ कीं डोळस असतां कृपाघन ॥ अंधासी हिंडवी तीर्थाटन ॥ तेंवि तुम्ही कृपादान ॥ सरत्री वचनें करावीं ॥ ७ ॥ मंदगती मी अज्ञान ॥ नाहीं केलें काव्यपठण ॥ नाहीं पाहिलीं ग्रंथ पुराणें ॥ नेणें भाषा गीर्वाणी ॥ ८ ॥ परंतु येथें असे परी ॥ जे भक्तचरित्रें आवडती हरी ॥ ऐसें बोलिला त्रिपुरारी ॥ भविष्योत्तरीं पुराणीं ॥ ९ ॥ म्हणऊनि धिवसा चित्तीं ॥ मज उपजली अति प्रीती ॥ चंचूनें टिटवी अपांपती ॥ कोरडा करीन म्हणतसे ॥ १० ॥ ज्या हरीचे वर्णितां गुण ॥ श्रुतीसि पडलें अति मौन्य ॥ शेषाच्या जिव्हा चिरल्या जाण ॥ केलें अंथरुण आंगाचें ॥ ११ ॥ ब्रम्हा इंद्र आणि हर ॥ हेही नेणती ज्याचा पार ॥ तेथें मी काय पामर ॥ गुण वर्णावया तयाचे ॥ १२ ॥ बाळकें अघटित घेतली आळ ॥ माता पुरवी तात्काळ ॥ तैसा तो दीनदयाळ ॥ आळ माझी पुरवील कीं ॥ १३ ॥ मागें संत वरदानीं ॥ एकनाथ बोलिले रामायणीं ॥ तैशीं माझीं प्रसादबोलणीं ॥ वरदवाणी नसे कीं ॥ १४ ॥ नामदेव मुक्तेश्वरांनीं ॥ भारतीं वर्णिल्या चक्रपाणी ॥ तैसीं माझीं प्रसादबोलणीं ॥ वरदवाणी नसे कीं ॥ १५ ॥ श्रीभागवतीं टीका वामनी॥हरिविजय केला श्रीधरांनीं ॥ तैसीं माझीं प्रसादबोलणीं ॥ वरदवाणी नसे कीं ॥ १६ ॥ बोधराज रामदासांनीं ॥ गीतीं आळविला कैवल्यदानी ॥ तैसीं माझीं प्रसादबोलणीं ॥ वरदवाणी नसे कीं ॥ १७ ॥ मी मतिमंद असतां जाण ॥ निजभक्तांचे वर्णितां गुण ॥ कृपा करील रुक्मिणीरमण ॥ भक्तभूषण कृपाळू ॥ १८ ॥ उपजलों जयाच्या गोत्रीं जाण ॥ तया वसिष्ठासी साष्टांग नमन ॥ तेही आपले कृपेंकरून॥ ग्रंथ सिद्धीस पावितील ॥१९ ॥ आतां नमूं माता पिता ॥ जे सकळ तीर्थांसी वरिष्टता ॥ ज्यांचेनि नरदेह तत्वतां ॥ लाधला अवचितां निजभाग्यें ॥ २० ॥ आमचें कुळींचें दैवत ॥ उभयपक्षीं श्रीरुक्मिणीकांत ॥ तयास नमितां देवता समस्त ॥ तृप्त होती निर्धारें ॥ ॥ २१ ॥ तो बुद्धिदाता चक्रपाणी ॥ जैशी वदवील कवित्ववाणी ॥ तें सादर होऊनि संतसज्जनीं ॥ परिसावें श्रवणीं निज प्रेमें ॥ २२ ॥ म्हणा-

ल निजबुद्धीनें त्वरित॥ आपुलेंची मतें रचिला ग्रंथ॥तरी तैसें नव्हे निश्चित ॥ विकल्प चित्तांत न धरावा ॥ २३ ॥ तरीं उत्तर देशीं साचार ॥ नाभाजी विरंचीचा अवतार ॥ त्यानें संतचरित्र ग्रंथ थोर ॥ ग्वालेर भाषेंत लिहिला असे ॥ २४ ॥ मानदेशीं उद्धवचिद्घन ॥ त्यांनीं भक्तचरित्रें वर्णिलीं जाण ॥ दोहींचें संमत एक करून ॥ हा भक्तविजयग्रंथ आरंभिला ॥ २५ ॥ श्रीभीमातीरवासी रुक्मिणीरमण ॥ त्यानें दिधलें आश्वासन ॥ ग्रंथ प्राकृत वदविला गहन ॥ तो परिसा सज्जन निज प्रीति ॥ २६ ॥ बाळक बोबडें बोले वचन ॥ परी माता चोज करी ऐकोन ॥ तैसें माझें आरुष भाषण ॥ अंगीकाराल वाटतें ॥ २७ ॥ कीं गंगेसी ओहळ गेला जाण ॥ तिनें केला आपुल्या समान ॥ तेंवि तुमचे कृपेनें सरतीं वचनें ॥ होतील ऐसें वाटतें ॥ २८ ॥ कीं कस्तुरींत मृत्तिका गेली मिळोन ॥ मोला चढली तिजसमान ॥ तैसेंच माझें प्राकृत भाषण ॥ कराल मान्य वाटतें ॥ २९ ॥ कीं दुग्धांत पडलें किंचित जीवन ॥ पयें केलें आपुल्यासमान ॥ तेंवि तुम्हांसीं सलगी करितां जाण ॥ सरतीं वचनें होतील कीं ॥ ३० ॥ तुम्ही संत ईश्वरमूर्ती ॥ ऐसा निश्चय दृढ चित्तीं ॥ म्हणोनियां महीपति ॥ नमन करी सद्भावें ॥ ३१ ॥

## ओंव्या, भक्तविजय-एकनाथ चरित्र.

### अध्याय ४५.

त्या भानुदासास पुत्र सद्गुणी ॥ त्याचें नांव ठेविलें चक्रपाणी ॥ तो परम भाविक वैष्णव ज्ञानी ॥ श्रीहरिभजनीं निमग्न ॥ १ ॥ त्याचा पुत्र सूर्यनारायण ॥ जो ज्ञानप्रकाशें देदीप्यमान ॥ त्याची कांता सुलक्षण ॥ नांव रुक्मिणी तियेचें ॥ २ ॥ ते निजउदरीं प्रसवली सुत ॥ नाम तयाचें एकनाथ ॥ तो जगद्गुरु अवतरला साक्षात ॥ परिसा चरित्र तयाचें ॥३॥ तो दिवसेंदिवस जाहाला थोर ॥ व्रतबंध लग्न केलें सत्वर ॥ मायबापें तयावर ॥ कृपा अपार करिताती ॥ ४ ॥ तेथें जनार्दनपंत सुज्ञानरासी॥ दत्तात्रेयदर्शन होतसे त्यासी ॥ एकनाथ उठोनि एके दिवशीं ॥ गेले दर्शनासी ॥ तयाच्या ॥ ५ ॥ आंगडें टाकोनी मस्तकावरी॥ सद्भावें तयासी नमस्कार करी ॥ जनार्दनें देखोनि ते अवसरीं ॥ विस्मित अंतरीं होतसे ॥ ६ ॥ म्हणे तूं कोणाचा सांग त्वरितें ॥ कशास्तव आलासी

येथें ॥ जनार्दन संबोखून होते ॥ वृत्तांत पुसत तेधवां ॥ ७ ॥ कीं टाकोनि मातापितयांसी ॥ रुसोनि आलासि आम्हांपाशीं ॥ हें यथार्थ सांगावें मजपासीं ॥ संकोच मानसीं न धरितां ॥ ८ ॥ मग जोडोनियां दोन्हीकर ॥ एकनाथ बोले मधुरोत्तर ॥ म्हणे ऋग्वेदी ब्राम्हणकुमर ॥ दर्शना साचार पातलों ॥ ९ ॥ मायबापांवरी न रुसतां ॥ उगाचि अनुताप वाटला चित्ता ॥ कीं देहीं जडली प्रपंचममता ॥ काम क्रोधें चित्ता गांजिलें ॥ १० ॥ लोभ माया दंभ अहंकार ॥ हे देहीं दिसती अनिवार ॥ म्हणोनि स्वामिदर्शनासी सत्वर ॥ आलों साचार निजप्रेमें ॥ ११ ॥ आतां हेचि इच्छा आहे मानसा ॥ निरंतर राहावें तुम्हांपासीं ॥ सेवा करावी अहर्निसी ॥ निजभावेसी आवडी ॥ १२ ॥ मी पतीत शरण आलों पाहें ॥ अंगीकार करीं सद्गुरुमायें ॥ ऐसें बोलोनि लवलाहें ॥ धरिले पाय सद्भावें ॥ १३ ॥ एकनाथाचें ऐकोनि वचन ॥ आश्चर्य करिती जनार्दन ॥ म्हणे वय तो दिसताहे लहान ॥ परि विशाळ ज्ञान अनुपम्य ॥ १४ ॥ मग जनार्दनें अभय देऊनि त्यासी ॥ म्हणितलें सुखें असावें आम्हांपासीं ॥ हें वचन ऐकोनि मानसीं उल्हास चित्तासी वाटला ॥ १५ ॥ जैसा द्वैपायन पडतां संशयवनीं ॥ तयासी भेटला नारदमुनी ॥ तेंवि जनार्दनाचे अभयवचनीं ॥ एकनाथ मनीं संतोषले ॥ १६ ॥ स्वामीसेवेसी निरंतर ॥ अहोरात्र असे तत्पर ॥ कोणेदिशीं न पडे अंतर ॥ भावार्थ थोर धरियेला ॥ १७ ॥ रात्रीं निजतां जनार्दन ॥ स्वकरें चुरीत बैसे चरण ॥ निद्रा लागतां त्याजकारणें ॥ परी नाहीं उठणें सर्वथा ॥ १८ ॥ विडा करूनि निजहस्तें सर्व साहित्य घालोनि त्यांत ॥ जनार्दनासी होऊनि विनत ॥ मुखांतें घाली निजप्रेमें ॥ १९ ॥ मुख प्रक्षाळावयासी तस्त ॥ निजकरें पुढें आणोनि ठेवित ॥ स्नान घालोनि आपल्या हातें ॥ साहित्य देत पूजेचें ॥ २० ॥ जेवित शेष उच्छिष्ट राहत ॥ तें प्रीतीनें भक्षी एकनाथ ॥ ऐसी सेवा दिवस बहुत ॥ असे करीत निजप्रेमें ॥ २१ ॥ हें जनार्दन दृष्टीसि देखतां ॥ मग आश्चर्य करिती निजचित्ता ॥ म्हणे मनुष्य म्हणोंनये एकनाथा ॥ सकळ गुरु-भक्तां वरिष्ठ कीं ॥ २२ ॥ एकांत पाहोनि एकेदिवशीं ॥ जनार्दन कृपेनें पुसती तयासी ॥ तूं सेवा करिसि आम्हांपासीं ॥ मायबापांसी न कळतां ॥२३ ॥ तुम्ही तो विरक्त दिसतां जाण ॥

घरीं पाहिजे वस्त्र अन्न ॥ वडील वृद्ध दोघेजण ॥ चिंता दारुण करतील कीं ॥ २४ ॥ ऐसें जाणोनि जनार्दन ॥ घरीं पाठवीत वस्त्र अन्न ॥ वडिलांसि कळतां वर्तमान ॥ समाधान वाटलें ॥ २५ ॥ जनार्दन विचारूनि अंतरीं ॥ म्हणे यासि सांगावी कांहीं चाकरी ॥ मग एकनाथासि आज्ञा करी ॥ हिशोब दप्तरीं राखावा ॥ २६ ॥ तूं तेथें असशील जरी प्रवीण ॥ तरी कळों येईल अवघें ज्ञान॥ मग अवश्य म्हणोनि केलें नमन॥ आज्ञा प्रमाण स्वामीची ॥ २७ ॥ गुरुसेवेसि न पडतां अंतर ॥ हिशेब राखी-निरंतर॥ जनार्दन म्हणती हा परम चतुर ॥ कळला विचार मजलागी ॥ २८ ॥ तरी कांहीं निमित्त करून जाण ॥ स्वरूपीं लावावें त्याचें मन एकनाथासी जवळ बोलाऊन ॥ म्हणे हिशेब दाखवणें आम्हांसी ॥२९॥ पाहोनि खर्डा खतावणी ॥ हिशोब दाखवीं आम्हांलागोनी॥अवश्य म्हणोनि तयेक्षणीं॥ पुढती चरणीं लागले ॥ ३०॥ सेवेचा सारोनि नित्य. नेम ॥ रात्रीं दीपकासी घातलें भरण ॥ एकनाथ आडका राहिला चुकोन ॥ तोचि धुंडोनी पाहातसे ॥ ३१ ॥ तो कोठें न सांपडे तयास ॥ ताळा न पडेचि हिशोबास ॥ मग एकाग्र करोनि चित्तास ॥ हिशोब पाहात बैसला ॥ ३२ ॥ क्षणभरी कांहींच न करी शयन ॥ न मानुनी निजदेहाचा शीण ॥ तृषा लागली अति दारुण ॥ परि उदकपान करीना ॥ ३३ ॥ म्हणे उपहार करून उदकास घेतां ॥ तरी निद्रा आळस येईल आतां ॥ मग काय सांगावें गुरुनाथा ॥ विवेक चित्ता करितसे ॥ ३४ ॥ जनार्दन जागृत होऊनि त्वरित ॥ सभोंवतें विलोकून जों पाहत ॥ तो एकनाथ न दिसे तेथ ॥ म्हणऊनी विस्मित जाहले ॥ ३५ ॥ अंतरगृहीं धुंडितांचि देखा ॥ तों हिशोब पाहात बैसला एका ॥ भरण घालोनियां दीपका ॥ धुंडित आडका निश्चळत्वें ॥ ३६ ॥ तों अकस्मात ताळा पडतां ॥ हारुष वाटला एकनाथा ॥ मग आपुल्याचि हातें टाळी पिटितां ॥ दुसरा नसतां सन्निध ॥ ३७ ॥ मागें उभे राहोनि तेथ॥ जनार्दन कौतुक पाहात ॥ मग सन्मुख होउनि त्वरित ॥ स्वमुखें पुसती तयासीं॥ ३८ ॥ सद्गुरु म्हणती एकनाथा ॥ काय आश्चर्य वाटलें आतां ॥ म्हणउनि हर्ष मानुनी चित्ता ॥ हांसलासि तूं येक्षणीं ॥ ३९ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ वरते पाहे विलोकून ॥ मग सत्वर उभा राहोन॥ केलें नमन सद्भावें ॥ ४० ॥ म्हणे सर्व हिशोब शोधून पाहतां ॥ त्यांत

एक अडका चुकला होता ॥ त्याचा अकस्मात् ताळा पडतां ॥ उल्हास चित्ता वाटला ॥ ४१ ॥ म्हणउनी संतोष पावोनि मनें ॥ हांसे आलें म-जकारणें ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ जनार्दन विस्मित जाहला ॥ ४२ ॥ मग एकनाथासी सद्गुरु बोलत ॥ तुझें आडक्याकडे लागलें चित्त ॥ तैसें श्रीकृष्णचरणीं होतां रत ॥ तरी पावसी निजहित आपुलें ॥ ४३ ॥ ऐशीं अक्षरें पडतां कानीं ॥ अनुताप जाहला तयेक्षणीं ॥ म्हणे हे इच्छा होती मनीं ॥ जे आज्ञा स्वामीनीं मज द्यावी ॥ ४४ ॥ धन्य दिवस सुदिन आजिचा ॥ अनुभव जाहला निजकृपेचा ॥ विकार तुटोनि मायेचा ॥ ठाव प्रपंचाचा पुसिला ॥ ४५ ॥ मग लेखणी घेऊनि तयेक्षणीं ॥ एक-नाथ ठेवी सद्गुरुचरणीं ॥ सांगीतली जमाखर्चाची घडणी ॥ ते ऐकावी सज्जनीं निजप्रीति ॥ ४६ ॥ नरदेह मुद्दल सालमजकूर ॥ गुदस्तां रुजूं पूर्ण संस्कार ॥ प्रेम पत्र ह्रदयीं अक्षर ॥ स्वधर्में थोर खर्च केला ॥४७ फळ त्याग करितांचि सकळ ॥ रुजू पावला स्वामीजवळ ॥ ब्रम्हार्पणीं तये वेळे ॥ आपिलें न कळेचि सर्वथा ॥ ४८ ॥ विचार हा सुरनीस ने-माचा ॥ सावधानपणें लिहितां साचा ॥ वरी मन सूर सद्गुरुकृपेचा ॥ हिशोब सकळाचा पुसिला ॥ ४९ ॥ एवं नरदेह जमा झाडियासि आ णुनी ॥ अज्ञान बाकी झाडा करुनी ॥ मी विनटलों तुमचे चरणीं ॥ व्यापार सांडोनि निजछंदें ॥५० ॥ त्रैलोक्याचे स्वामी आपण ॥ व्यापार झाला तुम्हांपासून ॥ ते वाचेसि आवडे कृष्णनाम ॥ कृपें करूनी आ पुल्या ॥ ५१ ॥ सोहं दिधलें खुर्दखत ॥ तें मस्तकीं वंदिलें म्यां त्वरित ॥ प्रेमाचीं वस्त्रें अपरमित ॥ पावलों निश्चित ये काळीं ॥ ५२ ॥ निजमु-क्तिचा लाधलों विडा ॥ तेणें वारिली भवरोगपीडा ॥ कैवल्यपुरासी जा-उनी रोकडा ॥ चैतन्यहुडां बैसलों ॥ ५३ ॥ स्वानुभवाची तहशीलनिकी रसद स्वामीस दीधली शेखीं ॥ संतसंगे वारुन वसूल बाकी ॥ हुजर नेटकी भक्तीची ॥ ५४ ॥ पूर्व सुकृत होतें कांहीं ॥ मग रामनामव्यापार लाधलों पाहीं ॥ ऐसें म्हणऊन ते समयीं ॥ घातलें पाईं दंडवत ॥ ५५ ॥ हें वचन ऐकतांचि श्रवणीं ॥ जनार्दन विस्मित झाले मनीं ॥ म्हणती यास उपदेश द्यावया लागोनी ॥ अधिकार दिसोनी येतसे ॥ ५६ ॥ मग उठवूनि एकनाथाप्रती ॥ जनार्दन कृपेनें आलिंगिती ॥ रामकृष्ण मंत्र तारक निश्चितीं ॥ सद्गुरु सांगत तेधवां ॥ ५७ ॥ तेथेंच विश्वास ठेवूनी

दृढ॥ परमार्थयोग साधिला पुढें ॥ कीर्तनीं श्रीहरीचे पवाडे॥ गातसे कोडे निजप्रीती ॥ ५८ ॥ इतुकी कृपा जालियावर ॥ परि सद्गुरुसेवेसी न पडे अंतर ॥ दिवसेंदिवस अधिकोत्तर ॥ सद्भाव साचार बैसला ॥ ५९ ॥ हा निश्चय देखोनि जनार्दन ॥ म्हणे यासी मनुष्य म्हणेल कोण ॥ विश्वोद्धार करावयालागोन ॥ अवतार पूर्ण विष्णूचा ॥ ६० ॥ आतां यावरी करुनी कृपादृष्टी॥श्रीदत्तात्रयाची करावी भेटी ॥ ऐसें विचारोनी पोटीं ॥ जीविची गोष्टी सांगतसे ॥ ६१ ॥ एकनाथासि म्हणे जनार्दन ॥ तुज दत्तात्रेयाची भेटी करवीन ॥ परि निर्भय असोनियां मन ॥ चित्तीं न भिणें सर्वथा ॥ ६२ ॥ ते आपुलीं स्वरूपें कडोविकडी ॥ पालट करित घडोघडी ॥ अज्ञान जना निंदिती रोकडी ॥ काया चोखडी तेचि धरिती ॥ ६३ ॥ मी जयासीं बोलेन गोष्टी ॥ तूं त्याचे चरणीं घालीं मिठी ॥ आलिंगन देऊनि उठाउठी ॥ सद्गुरूशीं पोटीं धरावें ॥ ६४ ॥ प्रसाद देतील तुजकारणें ॥ तरी तेथेंच भक्षी निज प्रीतीनें ॥ ऐसीं जनार्दन देतां शिकवण ॥ एकनाथ चरण धरीतसे ॥ ६५ ॥ म्हणे हेचि इच्छा बहुत दिनीं ॥ वाढत असे माझिये मनीं ॥ परि स्वामीचि मर्यादा उल्लंघोनि ॥ सर्वथा माझेनी न बोलवे ॥ ६६ ॥ तें आज आपुल्या स्वमुखें करुन ॥ मज दिधलें अभय वचन ॥ तें आणि मनोरथ पूर्ण करुन ॥ करवावें दर्शन दत्ताचें ॥ ६७ ॥ ऐसा पूर्ण जाणोनियां हेत ॥ एकनाथासी नेलें अरण्यांत ॥ तंव तेथें अनुसुयासुत ॥ आले अकस्मात भेटावया ॥६८॥ विशाळ डोळे आरक्त नयन ॥ हातीं शस्त्रें अश्ववाहन ॥ सन्निध येऊन उतरला जाण ॥ मग केलें नमन जनार्दनें ॥ ६९ ॥ यवनभाषेनें अनुसुयासुत ॥ जनार्दनाशीं गोष्टी बोलत ॥ हें दृष्टीशीं देखतां एकनाथ ॥ आश्चर्य करिती मानसीं ॥ ७० ॥ मग एकनाथ बोलाउनी लवलाहीं ॥ उचलोनि स्वामीच्या घातला पायीं ॥ त्यांनीं आश्वासन देऊनि पाहीं॥ वरदान काय बोलत ॥ ७१ ॥ श्रुतिशास्त्राचें जे मथित ॥ व्यासें काढिलें श्रीभागवत ॥ त्याचा अर्थ सखोल गुप्त ॥ वदेल प्राकृत प्रसिद्ध हा ॥ ७२ ॥ आणीक भावार्थ रामायण ॥ वदेल रसाळ निरोपण ॥ तें निज प्रीतीनें करित श्रवण ॥ तरतील जन सकळिक ॥ ७३ ॥ आणीक पदप्रबंध बहुत ॥ श्रीहरिचरित्र अति अद्भुत ॥ कीर्तनीं गावोनि सप्रेमयुक्त ॥ उद्धरील पतीत श्रवणमात्रें ॥ ७४ ॥ ऐसा वर देऊन सत्वर ॥

मस्तकीं ठेविला अभय कर ॥ निमिष न लोटतां साचार ॥ अदृश्य झाले तेधवां ॥ ७५ ॥ एकनाथासी धरोनि हातीं ॥ मंदिरा आले सत्वर गती ॥ एकएकासी न विसंबिती ॥ जेंवि लेंकुरा भती निजमाय ॥ ७६ ॥ तान्हयास न पडे मातेचा विसर ॥ हें परस्परें साक्ष देतसे अंतर ॥ तेंवि एकनाथ जनार्दन निरंतर ॥ असती साचार एकचि ते ॥ ७७ ॥ तंव कोणेएके दिवशीं ॥ जनार्दन विचारिती मानसीं ॥ आतां सेवा घेणें याज पाशीं ॥ अनुचित मज दीसताहे ॥ ७८ ॥ मग एकनाथासी बोलती वचन ॥ माझी आज्ञा तुज प्रमाण ॥ आतां प्रतिष्ठानासि जाऊन ॥ गृहस्थाश्रम चालवीं ॥ ७९ ॥ हें प्रमाण वचन करितां त्वरित ॥ तुज प्रसन्न होईल रुक्मिणीकांत ॥ जनार्दनें मस्तकीं ठेविला हात ॥ प्रतिष्ठानासी त्वरित चालिला ॥ ८० ॥ सद्गुरुवचन हेंचि प्रमाण ॥ त्याहुनि वरिष्ठ नाहीं साधन ॥ हे गुरुभक्तीची जाण खूण ॥ इतराकारणें न घडेची ॥ ८१ ॥

# रघुनाथ पंडित.

ह्या कवीचें वृत्त कांहींच माहीत नाहीं. यानें केलेला एक लहानसा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याचें नांव नलदमयंतीस्वयंवराख्यान. हें मूळ संस्कृत नैषध काव्याचे आधारानें केलें आहे.

ह्याच्या कवितेंत प्रास, यमक इत्यादि शब्दालंकार व उपमा रूपक-उत्प्रेक्षा इत्यादि अर्थालंकार पुष्कळ व चांगले साधले आहेत. वृत्तें नानातऱ्हेचीं योजलीं आहेत.

हा सुमारें शके १७०० मध्यें होता.

ह्याचा एकच ग्रंथ नलदमयंतीस्वयंवराख्यान.

## नलदमयंतीस्वयंवराख्यान.

शार्दूल पुण्यश्लोक नृपावळींत पहिला होवोनि जो राहिला ॥
विक्री० तो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला ॥

व्यासोक्तें अवगाहिला बुध जनीं नाना गुणीं गायिला ॥
जो नामें नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥ १ ॥

आर्या. इंद्रादिक वर असतां, कसी नल–सतीच होय दमयंती ॥
सुंदर–सकळ–वधूंतें, कसी न लसतीच होय दमयंती ॥ २ ॥

दिंडी. कथा बोलूं हे मधुर सुधा–धारा॥होय शृंगारा करुण–रसा थारा ॥
निषध–राजा नळ–नामधेय होता॥वीरसेनाचा तनय महा–होता॥३
चौगुणीनें[1] जरि पूर्ण शीत–भानू॥नळाऐसा तरि कला[2]–निधी वानूं॥
प्रतापाचा जो न मावळे भानू॥तयासारीखा कोण दुजा मानूं॥४॥

वसंत तिल० चंद्रासि लागति कळा[3] उपराग येतो ॥
गंगेशि भंग[4] बहु पाण–उतार होतो ॥
जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला ॥
नाहीं समान नळ–राज–महा–यशाला ॥ ५ ॥

शार्दूल वि० वृ० वाजीचें मन जाणता सकळही राजी शिपाई जया ॥
याजी होउनियां द्विजांसि म्हणतो या जी धनें घ्यावया ॥
त्याजी जो धनदापरी सुकृत जें त्या जीव ऐसें गणी ॥
गा जी तो नळ भूप रूप धरुनी गाजी गुणांच्या गणीं ॥ ६ ॥

दिंडी लोक[5]–बंधू जो होय रवी–ऐसा॥कुवलयाला[6] जो सुखद चंद्र जैसा॥
सांग[7] नोहे तो कुसुम–चाप तैसा॥निषध–रायाशीं तुल्य–रूप कैसा७

---

१ चौपटीनें म्हणजे ६४ कळांनी. पौर्णिमेचा पूर्ण चंद्र १६ कळांचा असतो, तो ६४ कळांचा होईल तर. २ चंद्र. कला म्हणजे चंद्र–बिंबाचा १६ वा अंश! श्लेषानें ६४ कलां पैकीं प्रत्येक. तात्पर्य कीं चंद्रा कडे कला आहेत पण १६ आहेत आणि नळराजाकडे ६४ कला आहेत म्हणून त्यांची बराबरी नाहीं. ३ क्षय वृद्धि. ४ लाटा. " भंग बहु " येणे करून पावसाळ्यांत पूर येतो तो सुचविला; आणि "पाणउतार" येणेकरून उन्हाळ्यांत पाणी आटेंत तें सुचविलें. तात्पर्य कीं, गंगेचे पाणी कमजास्त होतें आणि नळाचें यश सर्वदा एकसारखें असतें तेव्हां गंगा शुभ्र आहे तरी तिची नळयशाला उपमा देतां येत नाहीं. ५ लोकबंधू=लोकांचा बंधू–सर्व लोकांस प्रकाश देतो म्हणून. नळही लोकांचा हित कर्ता म्हणून लोकबंधू होय. ६ कुवलय म्ह० चंद्र विकासी कमल. हीं कमलें चंद्रोदयीं विकासतात म्हणून त्यांस चंद्र हा सुखद म्ह० सुख देणारा आहे. तसा नळही कुवलया म्ह० कुच्या ( पृथ्वीच्या ) वलयाला म्ह० सर्व पृथ्वीवरच्या लोकांला सुख देणारा आहे. ७ सांग म्ह० अंगासहित. कुसुमचाप म्ह० मदन हा अनंग ( अंगहिन ) आहे.

आर्या. नाडी-ज्ञान जयांचें, स-रोग बंधू चतुष्पद गणावे ॥
सुत तेजी-तुरगीचे नळ-सम सुंदर कदापि न म्हणावे ॥८॥

शिखरि णीवृ॰ कदा नेणों वोढी शरधितुनि काढी शर कदा ॥
कदा धन्वीं जोडी वरिविरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवर-लक्षास्तव रणीं ॥
कळे राजेंद्राची त्वरित शर-संधान-करणी ॥ ९ ॥

वसंत ति॰ धाले धनी पुढिल याचक या नळाचे ॥
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास जन मागिल देखियेले ॥
त्यांहींच ते सकळ पूरित-काम केले ॥ १० ॥

दिंडी. अशी अगणित-गुण-कीर्ति नैषधाची ॥
फिरे भुवन-त्रयीं जान्हवीच साची ॥
असें असतां द्विज पांच सात याची ॥
भेटि घेती वैदर्भ-राजयाची ॥ ११ ॥

वसंत ति॰ द्वारीं झुलोत गजसंघ हिंसोत वाजी ॥
गाजो तुला सकल लोक असोत राजी ॥
सोमा-भिराम-वदना सदनांत रंगीं ॥
क्रीडा करो तुजसवें ललना पलंगीं ॥ १२ ॥

दिंडी. अशा आशीर्वादासि तिहीं केलें ॥ भीम-भूपें मग तयां बोलिजेलें ॥
तुम्ही आलां कोठूनि अशा बोलें॥द्विजीं निषधा-पासाव म्हणीजेलें१३
भीम राजा मग गिरा वदे ऐसी॥निषध-देशीं नळ-राज-रीति कैसी॥
असें ऐकोनी वदति विप्र त्यासी॥विप्रयासीं वक्तृत्व ये जयांसीं॥१४॥

१ बंधू ह्म॰ चंद्र, हा सरोग ह्म॰ रोगी ह्म॰ क्षयी आहे, कारण चंद्राच्या कलांचा कृष्ण पक्षीं क्षय होत असतो. २ तेजी ( घोडा ), तुरगी ( घोडी ) चे सुत ह्म॰अश्विनी कुमार. हे सूर्याचे पुत्र होते, ह्मणजे त्वष्ट्याची संज्ञानामक कन्या सूर्यास दिली होती, तिला सूर्याचें तेज सहन होईना म्हणून ती घोडी झाली; मग सूर्य ही घोडा होऊन तिचे पाठीस लागला; तेव्हां पुढें त्या उभयतां पासून हे उत्पन्न झाले, अशी कथा आहे. हे स्वर्गीचे वैद्य असून फार सुंदर होते. आतां नाडीज्ञानाविषयीं म्ह॰ वैद्यविद्येविषयीं त्यांची आणि नळाची बरोबरी म्हणावी तर चंद्र ( सूर्या पासून प्रकाशित होतो म्हणून ) सूर्यापासून उत्पन्न असल्यामुळें चंद्र त्यांचा बंधु होतो, तोच मुळीं क्षयी. तात्पर्य कीं,प्रत्यक्ष बंधूला जाला नीट करतां येत नाहीं तो दुसऱ्यास काय नीट करतो!तेव्हां त्यांला चतुष्पद ह्म॰पशुच ह्मणावे. आतां सौंदर्यानें बरोबरी ह्मणावी तर पशूचे आणि मनुष्याचे रूपाची बरोबरी कशी व्हावी ! ३ भीमराजाची.

वसंत हे वामनैकपद भूमि नसोनि जंघी ॥
ति० एके दिशींच दिन-राज नभास लंघीं ॥
वांराशि वानर-विलंघित होय तो कीं ॥
लोकीं नसे नल-यश-स्तुलना विलोकीं ॥ १५ ॥

शार्दूल जो पाहे सद-स-द्विचार त्दर्यी जोपा जनाची करी ॥
वि०वृ० जो पावे समर्यी, विशेष गणिला जो पावनांभीतरीं ॥
सोपा जो सकळां द्विजां, सुमतिचा सोपा, सदा लाभतो ॥
कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो ॥ १६ ॥
जो धैर्यें धर-सा, सहस्र-कर-सा तेजें तमा दूरसा ॥
जो रत्ना-कर-सा गभीर, शिरसा भूपां, यशो-हारसा ॥
ज्ञाता जो सरसावला नव-रसां-माझारि शृंगारसा ॥
शोभे तामरसा-क्ष तो नळ रसा-नाथ स्तवूं फारसा ॥ १७ ॥

दिंडी. अशी होतां नळ-चरित-कथा कांहीं॥भीमनामा भूपाळ परिसतांही॥
जवळि होती लडिवाळ जे सदाही॥सुता दमयंती नाम जीस पाहीं१८

मालिनी निषध-पति-कथा हे जे सुधेतें जयंती ॥
वृत्त. परिसुनि दमयंती रंजली रंजयंती ॥

---

१ हे भूमि वामनैक पद=वामन ह्म० लहान मुलगा त्याच्या एका पावलां इतकी, तेव्हां ती नळाच्या विस्तीर्ण यशाला उपमा देण्याला योग्य नाहीं. वामनावतारीं विष्णूनें बलिराजापाशीं त्रिपाद भूमि मागितली, पण त्याच्या एका पावलांतच सर्व पृथ्वी आटली अशी कथा आहे तिकडे ह्या वर्णनाचें धोरण आहे. २ दिनराज ह्म० सूर्य, हा अनूरु सारथि आहे ह्म० ज्याला मांड्या नाहींत असा त्याचा सारथि आहे; तेव्हां तो जंघी ह्म० वेगानें चालणारा नसूनही एका दिवसांत आकाश ओलांडितो. तेव्हां नळराजाच्या विस्तीर्ण यशाला अशा लहानशा आकाशाची उपमा देतां येत नाहीं. ३वारांशि ह्म० समुद्र, हा तर वानरांनीं (मर्कटांनीं) ओलांडला आहे; तेव्हां नलाच्या यशाला समुद्राची ही उपमा देववत नाहीं. ४ जो समर्थी पावे म्ह० प्रसंगीं कार्य करी म्हणजे उपयोगी पडे. ५ सर्वांत पवित्र मानलेला. ६ ब्राम्हणांशीं सौम्य रीतीनें वागणारा. ७ सद्बुद्धीचा सोपा ह्म० घर. ८ भेटतो ह्म० केव्हां ही सर्वांस भेटत असे. ९ पर्वता सारखा— पर्वताला अचळ असें नांव आहे ह्म० कांहीं झालें तरी तो हालत नाहीं, त्या प्रमाणें हा कसाही प्रसंग आला तरीं अचल होता ह्मणून धैर्यानें नसा. १० तमा दूरसा—तेजस्वी, तेजानें सूर्या प्रमाणें तेजस्वी. ११ समुद्रा प्रमाणें—समुद्र फार खोल असतो त्या प्रमाणें हा मनानें खोल; अर्थात् गंभीर. १२ यशाच्या हारासारखा—सर्व राजांच्या गळ्यांत हा यशाच्या हारासारखा होता ह्म० हा पराक्रमी असल्यामुळें याच्या योगानें इतर राजांस युद्धांत यश मिळे. १३ पुढें आला—पहिली पदवी पावला, नऊरसांत शृंगार जसा पहिला तसा सर्व राजांत हा पहिला.

नवलं मज न भासे चंद्र-वंशै-क-शाली ॥
नल तरि वन-माळो भीमकी हेचि जाली ॥ १९ ॥

मालथ नळ-राज-कथा सुधांचि साजे ॥ दमयंती वरवर्णिनी विराजे ॥
भारा मिळणी उभयांशि होय जेथें॥अधिकारी अधिका-नुराग तेथें॥२०॥

दिंडी. भीमकी ते मोहिली गुण-रूपें॥मनीं लावियला वेध कुसुम-चापें ॥
असो गौरविले विप्र तिच्या बापें॥धनें वसनें त्यां दीधलीं अमूपें२१
कथा तेथीली होय असो ऐसी ॥ हेर आला तें वदत नैषधासी ॥
तुझ्या कथनीं वैदर्भ-राजयासी॥प्रीति होती तनयाहि तयापासी॥२२

शार्दूल बापाच्या उजवे कडेस बसली म्यां पाहिली नोवरी ॥
वि०वृ० व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि जे आदरी ॥
तापातें हरिते करोनि मधुरालापासि जे सुंदरी ॥
ज्या पाव जगदीश, सांग-सुमन-श्चापा नृपा त्या वरी॥२३॥

वसंत जें अंतरंग पिवळें सरसीरुहाचें॥भासे मनांत मज अंग तसें तियेचें॥
ति० गोरोचनापरिस गोर असें गणावें॥सोनेंच बावनकसी न कसें ह्मणावें२४

दिंडी असें बोले तों चार समाचारा ॥ करी दमयंती नल-मनीं विहारा ॥
नोवरी हे मज होय कसी दारा॥करूं लागे तें भूप या विचारा॥२५
विभूतीनें झांकला अनळसा तो॥ गुप्त दमयंती-विरह नृपा होतो ॥
नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो॥सागरानें तो काय सांगिजेतो॥२६॥

वसंत मानी मनोज-शर हार तुरे फुलांचे॥कंदर्पकोपवचनें ध्वनि कोकिलांचे॥
ति० राका-शशी मदन-दर्पण भावलाहे॥नेघेचि तो,न परिसे,न तयासि पाहे२७

१ चंद्रवंशांत एकटा शोभणारा २ कृष्ण. ३ कृष्णाकडे भीमकी म्ह० रुक्मिणी आणि नळाकडे भीमकी म्ह० भीमकन्या दमयंती. ४ अमृत. ५ उत्तमाचें वर्णन करणारी. ६ एकत्र होणें. ७ दमयंती ठिकाणीं. ८ हक्कदार. ९ अधिक प्रीति. ह्या श्लोकाचें तात्पर्य–अमृत हा उत्तम पदार्थ पडला आणि दमयंती ही उत्तम पदार्थाचें वर्णन करणारी म्ह० गुण घेणारी पडली; म्हणून ह्या दोघांचा मिलाफ झाल्यावर अधिक अनुराग म्ह० प्रीतिच हक्कदार म्ह० हक्काची आहे म्ह० संचित होणारी आहे. गुण आणि गुणज्ञ ह्यांची गांठ पडल्यावर अधिक प्रीति होते तद्वत्. येथें श्लेषानें हा एक दृष्टांत सुचविला आहे; तो असा–सुधा म्ह० चुना आणि वरवर्णिनी म्ह० हळदही एकत्र मिळाली असतां अधिकच अनुराग म्ह० रक्तिमा येतो, तद्वत्; किंवा, चुना हा मूळचा शुभ्र असतो, तेव्हां त्याची आणि वरवर्णिनीची (उत्तम शुभ्र वर्णाचे स्त्रीची) गांठ पडली असतां शुभ्रांत शुभ्र मिसळल्यानें अधिकच शुभ्र होणार हें उघडच आहे. एकंदर तात्पर्य कीं, दमयंती ही नळाची कथा ऐकून रिझली म्हणून वरच्या श्लोकांत जें सांगितलें तें योग्यच आहे; कारण तें तसेंच व्हावयाचें. १० अंग धारण करणारा मदन. हें "नृपा" ह्याचें विशेषण. ११ "ने घे" "न परिसे" आणि "न पाहे" ह्या क्रियापदांचा मागील तीन चरणांतील कर्मांशी यथासंख्य अन्वय आहे. म्हणजे हार तुरे ने घे, कोकिलांचे ध्वनि न परिसे, आणि राकाशशी (पौर्णिमेचा चंद्र) न पाहे

शार्दूल विं०वृ०
छायानायकसा निदाघ-समयीं छाया करी तो विधू ॥
वायां या त्वदया श्रमासि करितो दायादसा हा मधू ॥
जाया जे रुचली मनीं तिजकडे जाया नये कीं प्रहा ॥
रायाला न गमे न जाय रजनी आयास होती महा ॥ २८ ॥

आर्या.
रजनी दिवस गमेना नृपतिस संगीतही सुख गमेना ॥
मन कोठेंहि रमेना ह्मणोनि करि वनविहार सहसेना ॥ २९ ॥

वसंत तिं०वृ०
गंगा-तरंग-सम जो निज-देह-वर्णी ॥
मृंगापरी रुचिर कांति जयाशि कर्णी ॥
जंघाल जो पवन-संगतिची सवे घे ॥
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ ३० ॥
जो अंबरीं उफळवां खुर लागला हे ॥
तो चंद्रमा निजतनूवरि डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवलत्व ने घे ॥
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ ३१ ॥

दिंडी.
सवें सेना भूपाळ निघालाहे ॥ शींव लंघीं उद्यान एक पाहे ॥
रिघे तेथें मित सेवकांसि बाहे॥ फौज सारी बाहेर उभी राहे ॥३२॥
पनस जंबू जंबीर विविध निंबें ॥ कुंद चंदन माकंद सुदाडिंबें ॥
तुंग नारिंगें विकसलीं कंदबें॥ वसति जेथें शुक-सारिका-कंदबें ३३

वंश स्थ०
लतेतळी रुंद निरुंद कालवे ॥ गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
परागही सांद्र तयांत रंगती ॥ फुलांसवें भृंगतती तरंगती॥ ॥३४॥

आर्या.
ग्परि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसांचे ॥
ंस असे फणसांचे षण्मासांचे कितेक वरसाचे ॥ ३५ ॥

उपेंद्र व०
तया वनीं एक तटाक तोयें ॥ तुडुंबलें तामरसा-नपायें ॥
निरंतरामंद मरंद बाहे ॥ तापांतही यास्तव रिक्त नोहे ॥ ३६ ॥

द्रुत विं०
अमृतही पयही म्हणवी तसे ॥ उभय होय तसी रुचि वीतसे ॥
मधर सारस तें जल गातसे ॥ मधुर सारस यास्तव गा तसें ॥३७॥

---

१ स्त्री. २ जायाला. ३ वायूच्या गतीची सवे म्ह० बरोबरी घेई. तात्पर्य कीं वायू प्रमाणें जल्द चालणारा. ४ गड्डे. ५ कमलें असल्यामुळें. ६ सरोवरांतलें. ७ एका जातीचे पक्षी आहेत. हे बगळ्यासारखे असतात, पण त्यापेक्षां मोठे असतात.

वसंत पीतां मरंद उदर-भर-बंभराचें ॥ जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें[1] ॥
ति० जें पद्म तेथिल सहस्र-दळां धरी तें॥प्रत्यक्षसूर्य-किरणांस विसाववी तें[2] ३८
दिंडी. तया कासारीं राज-हंस पाहे ॥ राजहंसांचा कळप पोहताहें ॥
तयांसाठीं हे वापिकाच पोहे॥नळें केली हें कोण म्हणे नोहे ॥३९॥
तया हंसांचे देह कांचनाचे ॥ पक्ष झळकती वीज जशी नाचे ॥
रंग माणिकसे चंचुचे पदांचे ॥ जसे अधरींचे भीम-कन्यकेचे ४०
वसंत ति० त्यांतील एक कलहंस तटीं निजेला ॥
जो भागला जल-विहार विशेष केला ॥
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ॥
पक्षीं तनू लपवि भूप तया पहातो ॥ ४१ ॥
टांकी उपानह पदें अतिमंद ठेवी ॥
केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ॥
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥ ४२ ॥
मालिनी० कलकल कलहंसें फार केला सुटाया ॥
फडफड निजपक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपतिस मणिबंधीं टोंचिता होय चंचू ॥
धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू ॥ ४३ ॥
तदितर खग भेणें वेगळाले पळाले ॥
उपवन जल केली जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ॥
कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ ४४ ॥
दिंडी. न सोडी हा नळ भूमिपाळ मातें ॥ असें जाणोनी हंस वदे त्यातें ॥
हंसहिंसा नच घडो तुझ्या हातें॥स्वस्थळातें पावेन पक्षपातें[4]॥४५॥
तुला दुसरे आहेत वीर कोटी ॥ भले झुंजारी शक्ति जयां मोठी ॥

---

१ लक्ष्मीचें नांव पद्मालया असें आहे. तेव्हां अर्थात् कमल हें तिचें मंदिर होतें, तें भ्रमरांचेंही मकरंद पितानां मंदिर झालें. तात्पर्य कीं, त्या सरोवरांत कमलांवर भ्रमर पुष्कळ होते. २ विसावा देतें. म्ह० कमलें सहस्रपत्राचीं असून तेजस्वी असल्यामुळें सहस्रकर सूर्याचे किरणांची गरज पडत नाहीं. ३ राजमुख्य—नळ. ४ उडून

तयां माराया धैर्य धरीं पोटीं ॥ पांखरूं हे. मारणें बुद्धि खोटी॥४६॥
वधुनि माझी हे कनकरूप काया॥ कटक-मुकुटादी भूषणें कराया॥
कशी आशा उपजली तूज राया॥बहुत तूझें औदार्य दया माया४७

शार्दूल विं॰वृ॰
म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी ॥
कांता काय वदों नव-प्रसव ते सातां दिसांची तशी ॥
पाता त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे ॥
हातामाजि नृपा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ॥४८॥

पद. हरहर सांपडलों, सांपडलों ॥ कैसा फांशीं पडलों ॥ ध्रु० ॥
इतर नदी जळ टांकीं ॥ टाकुनि आलों याच तटाकीं ॥ १ ॥
सोडुनि मानस-केली ॥ कापुनि घ्याया आलों शेली ॥ २ ॥
ठेविन तव पदिं माथा ॥ आतां सोडवि मज रघुनाथा॥३॥ ॥४९॥

दिंडी. सखे माझे परतोनि घरा येतां ॥ तवां सजणे हा समाचार घेतां ॥
तया शोकें घायाळ त्दृदय होतां॥कशी होशिल तें आठवितों आतां॥५०॥
थोर होतिल बाळकें तुझीं बाळे ॥ तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोकशाळे॥मला आठवितां त्दृदय तिचें पोळे॥५१॥

मालिनी वृत्त.
सदय त्दृदय याचें भूप हा ताप-हारी ॥
म्हणुनि परिसतां मी होय येथें विहारी ॥
मजहि वध कराया घातकी पातला जो ॥
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ॥ ५२ ॥

वसंत ति॰वृ॰
येणेंपरी परिसतां अति दीन वाचा ॥
हेलावला नळ पयोधि दया-रसाचा ॥
सोडी म्हणे विहर जा अथवा फिराया ॥
राहें यथानिजमनोरथ हंसराया ॥ ५३ ॥

मालिनी वृत्त.
सुटुनि खग पळाला बैसला शालशाखे ॥
क्षणभरि निजदेहीं मुक्तिविश्रांति चाखे ॥
स्वजन तंव तयाचे भोंवताले मिळाले ॥
कवळित निजबंधू बाष्पबिंदू गळाले ॥ ५४ ॥

शिखरिणीवृ॰
विसांवा घे कांहीं उडुनि लवलाही परतला ॥
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला ॥

---

१ मानस सरोवरीं क्रीडा. २ हे तरुणी.

म्हणे हंस क्षोणी-पतिस तुज कोण्ही सम नसे ॥
दयेचा हा ठेवा तुजजवळि देवा बहु वसे ॥ ५५ ॥

दिंडी. ऐक राया तूं थोर दया-सिंधू ॥ नीति-सागरही तूंच दीन-बंधू ॥
निखंदूनी बोलिलों नको निंदूं॥सकल वदसी तरि पाय तुझे वंदूं॥५६
पारधीमाजी खगा मृगा राजे॥ करिति हिंसा जी तीच बरी साजे ॥
तुवां दिधली मज मोकळीक बा जे॥दया केली ही कीर्ति तुझी गाजे५७
हंस मिळणें हें कठिण मही लोकीं॥सोनियाचा तो नवल हें विलोकीं॥
तशा मजलाही सोडिलें तुवां कीं॥तुझा ऐसा उपकार मी न झांकीं५८
तुझा कर-पंजर होय मला थारा॥तुझ्या वचनांचा ओघ दुग्ध-धारा॥
तुझें मानस बहु थोर गा उदारा॥सत्यलोकेशहि तूंचि गुणा-गारा५९
किती रांवे असतील तुझे धामीं॥किती कोकिळा सारिका तसा मी॥
चित्त जडलें हें तूझिया लगामीं॥नृपा स्वामी मज योजि तुझ्या कामीं६०

वसंत नि० वृ०
हें पांखरूं मजसि येइल काय कामा ॥
ऐसें नृपा न वद पूरित-लोककामा ॥
मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारीं ॥
छाया करी तपन-दीप्तिसही निवारी ॥ ६१ ॥

द्रुत वि०
विरहिसा दिसतोसि महा नळा ॥ परि हरीन तुझ्या विरहा-नळा॥
चतुर जी तरुणी त्दृदयंगमा ॥ करवितों तिजशीं तुज संगमा ॥६२॥

मालिनी वृत्त
वॅर नृपति विराजे भीम हें नाम ज्याला ॥
वॅर दमन-ऋषीनें दीधला कीं तयाला ॥
वॅर सुत दम-नामा दांत-नामा द्वितीय ॥
वरतनु दमयंती नंदिनी हे तृतीय ॥ ६३ ॥

वसंत ति० वृ०
तेजो-निधीस तनया यमुना जसी ते ॥
सीता जशी सुजनका जनका तसी ते ॥
ते आवडे सुतहि ते न तसे तयाली ॥
ते नोवरी करवितों तुज मी दयाला ॥ ६४ ॥

---

१ मागें निंदूं नको म्हणून सांगितलें; पण जें काय सगळें तुला निंदेचें बोलायाचे तें जर बोलशील तर, म्हणजे निंदा करून दोष लावशील तर तुझे पायां पडतो म्ह० माफी मागतों. २ मनांत भरणारी. म्ह० सुंदर. ३ सर्वांवर ४ प्रसाद, देणगी. ५ ज्येष्ठ म्ह० पहिला मुलगा. ६ उत्तम शरीराची. ७ जनक राजाला. ८ बापाला.

राया तिचें मुख सुधाकर या द्वयाला ॥
नाहींच वेगळिक हें गमतें मनाला ॥
संपूर्ण नित्य असता नसता कलंकी ॥
हा चंद्र हें मुख असें मग कोण शंकी ॥ ६५ ॥

चांपेकळीपरिसही सरलत्व नाकीं ॥
जीचा धरी अधर विद्रुमभावना कीं ॥
भासे मनांत मज बिंबफळ भ्रमानें ॥
कीं सत्य चंचुपुट वोढविलें शुकानें ॥ ६६ ॥

पद. रूपवती ते भूपसुता अनुरूप नसे दुसरी वनिता ॥
हूप धरूनि वरीं तिजला अनुरूप पयोधि जशी सरिता ॥ ध्रु० ॥
वीज अचंचळ शीतळ जे तजवीज कशी तुज हे नुमजे ॥
नीज जशी तुझिया नयना सुखबीज सपल्लव भावलता ॥ १ ॥
सुंदरता तव तीजविणें अति मंद गमे तरि काय जिणें ॥
कुंद-रदा तर मंदर-धीरा सुंदरिला हो वश करिता ॥ २ ॥
नूतन-नीरज-नूत-मुखी पुरुहूत-वधूसि सखी निरखी ॥
दूत तुझा परि मीच सुखी करवीन म्हणे रघुनाथनुता॥३॥ ॥६७॥

वसंत ति० वृ० धाता करींच करिता मृदु हे न होती ॥
या कारणास्तव मनोमय मूस ओती ॥
तेथें भरोनि पहिला रस पूर्ण केली ॥
ओतीव हे न घडितां कृति बोलिजेली ॥ ६८ ॥

---

१ पोवळ्याशीं सारखेपणा. २ अधरोष्ठ पोंवळ्या सारखा लाल असल्यामुळें त्यावर तोंडल्याची भ्रांति होऊन. ३ राघूनें अधरोष्ठास तोंडलें समजून तें खाण्यासाठीं आपली चोंचच काय पुढें केली. येथें दमयंतीचे नासिकेवर राघूचे चोंचीची उत्प्रेक्षा केली आहे. ह्मणजे तिचें नाक राघूचे चोंची सारखें होतें हें तात्पर्य. आतां ह्या श्लोकाचे प्रथम चरणांत चांपेकळीसारखें तिचें नाक सरळ होतें असें ह्मटलें आहे, तर्‍हीं पूर्व भाग सरळ असून शेंडा चोंची सारखा होता असें समजावें. ४ ही दमयंती सुखबीज ह्म० सुखाचें मूळ आहे. ५ तशीच. पल्लवयुक्त हावभावाची वेलच आहे. ह्म० हिचे आंगीं सर्व हावभाव असून ते वेलीचे पल्लवा प्रमाणें बाहेर फुटलेले आहेत. ह्म० पूर्ण वयांत आहे; ह्मणून तुझ्या डोळ्यांना झोंप लागल्या सारखी झाली आहे ती टाक आणि तिला वरण्याचा उद्योग कर. ६ "नुत" ह्या बद्दल छंदाकरतां "नूत" असें घातलें आहे. नवीन कमलाने जिचें मुख नुत म्ह० स्तुत आहे म्ह० नवीन कमला पेक्षां ही जिचें मुख चांगलें. ७ रघुनाथ पंडितानें स्तुत असा जो नळ त्याला. ८ शृंगार.

ऐसीं खगेंद्र वचनें वदतां तयाला ॥
विश्रांति हो विरह-खेदहि फार झाला ॥
आधार हा मज म्हणोनि गणोनि डोले ॥
झाला सवेंचि विरही नळराज बोले ॥ ६९ ॥
वेल्हाळ ते न दिसतां विरहां-धकारीं ॥
चालून मी हळुच चांचपतां पुढारीं ॥
चक्रापरीच मजलों असतां फिराया ॥
हंसा तुझा उदय होउ सुखी कराया ॥ ७० ॥
ध्यानीं धरूनि निजला मन हें निरीक्षी ॥
दृष्टीपुढें दिसतसे मज ते मृगाक्षी ॥
आहे जणो जवळि हे गज-राज-गामी ॥
ऐसाचि भाव तंव बोलतसें तिला मी ॥ ७१ ॥
भृंगें विराजित नवीं अरविंदपत्रें ॥
पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें ॥
घालीन अंजन अशा मतिनें तयांकीं ॥
आहा वृथा उतरलों भिजलों विलोकीं ॥ ७२ ॥
हंसा विलोकुनि सुधाकर अष्टमीचा ॥
म्यां मानिला निटिल-देश तिचाच साचा ॥
शंखद्वयीं धरुनि कोंकुम कीर-वाणी ॥
लावावया तिलक लांबविला स्वपाणी ॥ ७३ ॥

दिंडी. भला माझा तूं हंस गडी राया॥विरह दुस्तर-विस्तार निस्तराया ॥
चित्त नेघे मज तुज जा म्हणाया॥तेंचि वाहन तरि तूं करीं फिराया ७४
असें बोलोनी नळें रंजवीला ॥ अंजुळीमाजी हंस बैसवीला ॥
गमे चंपक-कुसुमा-घ-हार-झेला॥पाठवाया युवतीस सिद्ध केला ७५
त्वरित पुनरागम असो तुझा येथें ॥ झेंप घालीं सुखरूप गगनपंथें॥

---

१ चक्रवाक पक्ष्याप्रमाणें. रात्रीं चक्रवाक आणि त्याची स्त्री यांचा वियोग होत असतो आणि तो तिला आंधारांत धुंडीत फिरत असतो अशी कविप्रसिद्धि आहे. २ श्लेषानें सूर्य असा अर्थ घ्यावयाचा. सूर्योदय झाला ह्मणजे चक्रवाक पक्ष्यांचा संयोग होत असतो. ३ कुंकुमाचा. ह्याचा पुढील "तिलक" शब्दाकडे अन्वय. ४ चित्त.

नको विसरूं आम्हांसि असों येथें॥वदुनि धरिजे महित्वरा महीनाथें ७६
वरें येतों म्हणऊनि हंस बोले॥उडुनि जातां बहु शकुन तया झाले॥
पवन-चंचळ मधु-बिंदु मुखीं आले॥वामभागीं उभयतां गरुड गेले ७७
उडत होते खग वायसादि जाणा॥ तयां भासे तैं हंस तो ससाणा॥
नभा मानूनी कीं निकष निसाणा॥स्वर्णरेखा तें तेज मनीं आणा ७८
असा वेगें तो नभामाजि धांवे ॥ तया वीदर्भी देशि क्षणी पावे ॥
तेथ कुंडिन-नगरासमीप धांवे ॥ राजमंदिरीं गोपुरीं विसावे ॥७९॥

मालिनी वृत्त.
खग मग नगरीचे गोपुरीं झेंप घाली ॥
मृदु-पवन-गवाक्षीं बैसतां झोंप आली ॥
तदुपरि जव-शाली वेंघला चंद्रशाला ॥
निरखि विततशाला राजधानी विशाला ॥ ८० ॥

चूर्णिका.
सकळ भुवन-ललामायमाना ॥
मानाधिक-विभव-धनिक-सदन-शत विराजमाना ॥
कलश-जनित-मुनि-चकित-जलधि-शरणाति-
विस्तृत-परिखा-तरीपायमाना ॥
चंद्रशाला-विजित-सुर-विमाना ॥
जिचे सौध गगन-मंडपा-धार-स्तंभचि माना ॥
लाविति ते जलदा निज-माना ॥
वासव-चाप जयास कमाना ॥
ऐसी कुंडिन-नामधेय-नगरी राजहंसें पाहिली ॥ ८१ ॥

वसंत ति० वृ०
कोणी वणिक्जन विकी तुळितां तराजे ॥
कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥
दोन्ही समान निरखी विकणार देतो ॥

१ वेगवान्. २ मानाधिक म्ह० गणती होत नाहीं असें. ३ अगस्तिऋषि. अगस्तिऋषीनें समुद्रप्राशन केलें अशी कथा आहे. तेव्हां त्याच्या भयानें समुद्रास शरण येण्यास योग्य अशा अतिविस्तृत जा परिखा म्ह० खंदक त्यांच्या मध्यें अंतरीपाय मान म्ह० बेटा प्रमाणें असणारी. तात्पर्य कीं, कुंडिन नगरीस सभोंवती खंदक असून ते इतके मोठे होते कीं, त्यांत समुद्रमुद्रा सामावला असता. ४ देवांची विमानें फार सुंदर असून तीं पृथ्वी पासून फार उंचावर चालतात, त्यापेक्षांही कुंडिन नगरींतल्या चंद्रशाला म्ह० वरच्या माड्या सुंदर आणि उंच होत्या असें तात्पर्य.

घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥ ८२ ॥
तेणें तमें नगर तें धरितां निडारीं ॥
तेथें विलास-वन एक दिसे पुढारीं ॥
जेथें सुशीतिळ महीतळ सांद्र साई ॥
जाई जुई फुलमयी बहु अंबराई ॥ ८३ ॥

पद. तया वनीं खेळे भूप-सुता ॥ ध्रु० ॥
खेळविता बहु मेळविला सखि-मेळ तया सहिता ॥ १ ॥
राजस ते द्विजराज-मुखी गज-गज-गती ललिता ॥ २ ॥
ध्यात असे नळ-राज-कथा रघुनाथकवींद्रनुता ॥ ३ ॥ ८४ ॥

वसंत ति०वृ० तो मंडळाकृति फिरे उतरावयाला ॥
भैमीमुखेंदु-परिवेष म्हणों तयाला ॥
तेथें महीवरि कसा खग बैसताहे ॥
कीं सुंदरी निज कुतूहल जेंवि पाहे ॥ ८५ ॥
जो बैसतांच पळ पक्षपुटीं धरेला ॥
झाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला ॥
पाहे तया खग-वरासि वरा-नना हे ॥
मानी मनीं नवलही मग बोलताहे ॥ ८६ ॥

शिखरिणीवृ० असा पक्षी लक्षी बहु-विहग-लक्षीं न मिळता ॥
सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता ॥
अगाई हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी ॥
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी ॥ ८७ ॥

वसंत ति०वृ० ऐसें वदे मग तयास धरावया हे ॥
तें होय हंस-गमना पहिलीच आहे ॥
वाजेच ना वलय नूपुर-नाद नोहे ॥
तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ॥ ८८ ॥
हे मंदमंद-पद सुंदर कुंद-दंती ॥
चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दंती ॥

---

पृथ्वीला. २ दमयंती पहिलीच (हंसगमना हंसाप्रमाणें हळू चालणारी) होती ती पुनः हंस धरण्याकरितां तशी झाली, म्ह० श्लेषानें, हंसाकडे गमन करणारी झाली.

हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते ॥[1]
निष्कंप कंकण-करांस पुढें करीते ॥ ८९ ॥

द्रुत गवसलाच असा खग भासला ॥ तंव तदीय सखीजन हांसला ॥
वि० मग सवेंच बुझावुनि हांकिला॥उडविलाचि पिटाळुनि टाकिला॥९०॥

वसंत० कांहीं उडोनि गगनीं मग नीट येतो ॥
ति०वृ० नाहींच दूर न समीप बसे तसा तो ॥
पाहे सुधा-कर-मुखी कलहंस-राया ॥
लाहे मनोरथ तयास पुन्हा धराया ॥ ९१ ॥

सवाई. हंस धरीन म्हणोनि मनोरथ हा मज होय विनोद तुम्हाला ॥
हा कलहंस पिटाळवितांहि पुन्हा उडवाल तया विहगाला ॥
जा परत्याच तुम्ही नलगेच असें वदुनी नृप-राज-सुता ते ॥
राहविला सखिचा जन आपणमात्र तयास धरूं मग जाते॥९२॥

वसंत रागेजली अरुण-कांति विराजवीते ॥
ति०वृ० हे एकली सुतनु चंद्रकला तसी ते ॥
गेली हळूच कलहंस समीप केला ॥
कांहीं पुढें फडकला अवलोकिजेला ॥ ९३ ॥
आणीकही पद न वाजत मंद चाले ॥
जो चालतां पदर सांवरिला न हाले ॥
हेही करी निजकरीं खग सांपडेसा ॥
तोही हळू हळुच होय पलीकडेसा ॥ ९४ ॥

मालिनी मद-गज-गमनेनें मागुती चाल केली ॥
वृ० विनत-तनु-लता हे तत्समीपास नेली ॥
पुनरपि फडके तो फारसा दूर नाहीं ॥
जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं ॥ ९५ ॥

वसंत हंसें तदा चतुर-संमत युक्ति केली ॥
ति०वृ० ते चालवीत सुतनू बहु दूर नेली ॥
छाया तियेशि दुसरी तिसरी वनाळी ॥[2]

---

१ हातांत कांकणें होतीं तीं न वाजावीं म्हणून हात न हालवितां. २ तिला दुसरी सोबतीला तिचीच छाया होती आणि तिसरी वनपंक्ति होती. तात्पर्य कीं, तेथें तिचे शिवाय दुसरें कोणी मनुष्य नव्हतें.

जे सांवळी युवति-तुल्य दिसे निराळी ॥ ९६ ॥

प्रमाणि॰ तया वनांत एकली ॥ विलासिनी विलोकिली ॥
का॰वृ॰ मदें भरोनि डोलतो ॥ तियेस हंस बोलतो ॥ ९७ ॥

दिंडी. भूमि-भागीं फिरणार तूं तुला मी॥कसा सांपडेन सांग गगन-गामी॥
बाळ बाळे जरि होय चंद्रकामी॥हस्त त्याचा लागेल काय सोमीं ॥९८॥
कसें नांदे तारुण्य तुझ्या देहीं ॥ बाल्य गेलें तें नेणसीच कांहीं ॥
उगवतांचकीं सहस्रभानु पाहीं॥काय नलिनी-संकोच जात नाहीं॥९९॥
असो सांपडतों तुझ्या करामाजी॥पुन्हा सुटका करिशील काय माझी॥
कसा पातेजूं बाळ-बुद्धि तूझी॥स्त्रीत्व भावें बहु आणशील बाजी॥१००

आर्यागीति. पाषाणरूपहातें ॥ भ्रमवि तयातें धरूनि तद्देहातें ॥
जीवंत तो गवसला॥समज तियेचे गृहींच तो मग वसला॥१०१

मालिनी चतुर नर जसा हा बोलतो हंस तैसा ॥
वृ॰ तरि न धरि मृगाक्षी विस्मयीं भाव कैसा ॥
पळुनि मज निखंदी तीस तो खेद नाहीं ॥
शिणहि विसरली ते बोलतो होय कांहीं ॥ १०२ ॥

दिंडी. कोण तूं गा कोठील कवणियाचा॥कसा जाला तव देह सोनियाचा॥
कशी आली ही तुज मनुज-वाचा॥काय भाग्योदय सांगुं या वनाचा१०३
धरिल पाहिल सोडील असा पाहीं॥मजवरता विश्वास तुझा नाहीं॥
असो पुसतें तें सांग कथा कांहीं॥जाइं अथवा मग याच वनीं राहीं१०४
असें बोलोनी मौन धरूनि राहे ॥ काय बोले तो हंस असें पाहे ॥
तदा त्याचा वचनौघ असा वाहे॥राज-कन्ये तूं आयकें गिरा हे१०५
ब्रम्हदेवाचे बहु विमान-वाही ॥ हंस आहेती ऐकिलें तुवांही ॥
तया वंशीं सौवर्ण-देह हाही॥ज्या सरीखा सखि सर्वमान्य नाहीं१०६

वसंत मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें ॥
ति॰वृ॰ तीं जेवितों मृदुल-नाल मृणाल-कंदें ॥
आम्ही असों नृपसुते तरि कांचनाचे ॥
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे ॥ १०७ ॥.
जो मानसीं विहरतो विहिरो परी तो ॥
कां आमुची कुलसती असती करीतो ॥

---

१ मानस सरोवरीं, २ कुळाची कीर्ति. ३ सोडी.

राखीं नळा निज-यशो-मय-हंस राया ॥
आलों महीवर फिराद अशी करायां ॥ १०८ ॥
मी गुंतलों नळ-महींद्र-गुणौ-घ-पाशीं ॥
सेवेसही मग करोनि तयाच पाशीं ॥
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे ॥
लोकेशता विभवही चतुराननाचें ॥ १०९ ॥
एकांत लेखनहि वाचनही करीतो ॥
माझी तनु-द्युति समीप तदा धरीतो ॥
या कारणें नळ मला बहु आप्त मानी ॥
तो सांगता निज-मनोरथ होय कानीं ॥ ११० ॥
आधींच नैषध-कथा नवनीत-भेला ॥
होतां अलंकरणरूप इच्या जिभेला ॥
हंसोदयें विघरतां अधरीं धरी ते ॥
स्वीकारितां वचन तें मग आदरी ते ॥ १११ ॥

दिंडी. नळें तुजशीं एकांत काय केला॥तोचि ऐकाया जीव हा भुकेला ॥
तया बोलोनी निर्वावि या भुकेला॥ऐकवावा मज म्हणुनि नायिकेला ११२
नळाशीं जो एकांत तुझा तो कां॥प्रकट कीजे म्यां सांग इतर लोकां॥
धन्य डोळे न करोनि तदालोका॥नळकथेनें हे कर्ण धन्य हो का ११३
निषधराजीं हे फार दिसे राजी ॥ असें हंसें जाणोनि मनामाजी ॥
बोलिजेली नळराज कथा हे जी॥भला हेजीव तीशि म्हणे हे जी ११४
नळ म्हणाला मज सहज धरुनि बाहीं॥तुला कोठेंही बंक-अटक नाहीं॥
सकळ भुवनें तरि फिरुनि राजगेहीं॥एक नवरी मज योग्य बरी पाहीं ११५

वसंत
नि० वृ०
एकांत हाच वदला मज जाण बाळे ॥
तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे ॥

१ नळाचा यशोमय हंस हा मानस सरोवरीं येऊन विहार करतो तो खुशाल करो, पण "आम्ही सुवर्ण कांति हंस" ही जी आमची कुळाची कीर्ति आहे ती नाहींशी करतो. कारण तो शुभ्र असल्यामुळें आम्ही शुभ्र होतों. ह्याकरतां हे नळा आपला यशोमय हंस आपले जवळ राखून ठेव अशी फिर्याद करण्या करतां पृथ्वीवर आलों आहे. तात्पर्य कीं, नळाची कीर्ति मानस सरोबरा पर्यंत गेली होती. २ गोळा. ३ सूर्योदयें, पक्षीं, हंसागमनानें. ४ न ऐकलेला म्हणून.

येणेपरी परिसतांच तया अनन्या ॥
ते बोलते चतुर सुंदर राजकन्या ॥ ११६ ॥
मी जाण देवनळही स्वकरीं धराया ॥
सांगेन काय चतुरा मज लाज जाया ॥
काळें करूनि सुख जोंवरी होय लेखीं ॥
हें बोलणें ख-ग मनीं उभयार्थ लेखी ॥ ११७ ॥
स्रग्वि श्लेषशब्दें इणें भाव सांगीतला ॥
णीवृ० नैषधा-धीश तो नाथ मागीतला ॥

---

१ जवळ कोणी दुसरें नवतें अशाला म्ह० एकट्याला. २ ह्या श्लोकाचा अन्वय–हे चतुरा लेखीं सुख काळें करूनि जोंवरि होय (तोंवरि) मी देवनळ ही स्वकरीं धराया (योग्य म्हणून) मज लाज जाया सांगेन काय (हें) जाण–म्ह० तूं चतुर आहेस; तूंच पहा कीं, ब्रम्ह लिखित जें सुख (नळप्राप्तिरूप, किंवा तदप्राप्तिरूप दुःख) होणार तें होई पर्यंत मला लाज जाया (मला निर्लज्जता प्राप्त होण्याला) देवनळ देखील हातीं धरण्याला योग्य म्हणून सांगेन काय? नाहीं सांगणार. कारण चांगला वृक्ष टाकून देवनळ (पोकळ वृक्ष) हातीं घेण्याला योग्य म्हणून सांगावें ही लज्जेची गोष्ट नव्हे काय? तात्पर्य कीं, देवनळच हातीं धरण्याचें ब्रम्ह देवानें कपाळीं लिहिलें असेल तर उपाय नाहीं, पण जें लिहिलें असेल तें घडे पर्यंत मी असें सांगणार नाहीं. ह्या उत्तरांत नळच वरण्यास योग्य आहे, इतर देवनळा सारखे आहेत, असें दमयंतीनें सुचविलें. हाच अर्थ श्लेषानें व्यक्त होता, तो असा–लेखीं (जे चार देव नळ झाले होते तदितर देवांमध्यें) काहीं काळानें जें सुख (नळरूपी देवांस न वरण्याचें) होणार तें होई पर्यंत म्ह० मी नळाला वरी पर्यंत देवनळ म्ह० नळरूप धरणारे देव हे स्वकरीं धरावा म्ह० पाणि ग्रहण करण्यास योग्य म्हणून मला निर्लज्जता येण्याला सांगेन काय? अर्थात् सांगणार नाहीं. जेव्हां नळाशी विवाह होईल तेव्हां अर्थातूच हे अयोग्य असें होईल. किंवा (देवनळ शब्दाचीं दोन पदें करून) नळ हा देवही म्ह० देव असला तरी दैवीं लिहिलें असेल त्या प्रमाणें काहीं काळानें त्याचें प्राप्तिरूप सुख होई पर्यंत मला निर्लज्जता येण्याला मी तो पाणि ग्रहण करण्यास योग्य आहे असें सांगेन काय? तात्पर्य कीं, तुला नळ हा वर आवडला कीं नाहीं म्हणून तूं पूर्व श्लोकांत विचारलें, तर स्त्रिया अमुक वर आवडला असें कधीं सांगत असतात काय? असें सांगण्यास त्यांला लाज नाहीं काय? देव असला तरी सांगणार नाहींत; असें उत्तर दिलें. यांत लाजमुळें सांगत नाहींत पण मनांतून तसें असतें असें सुचविलें. ह्यावरून नळच इष्ट आहे असें दर्शविलें.

होय जाणीयली घे त्रपा-कंचुला ॥
हंस बोलावया हालवी चंचुला ॥ ११८ ॥
वसंत ति० वृ० गांळ्याळ जें त्दृदय सांद्र न होय ज्याचें ॥
नामेंचि देवनळ कार्य नसे तयांचें ॥
धत्तूर हा कनक-नाम सदा धरीतो ॥
होईल काय रसिका कनकापरी तो ॥ ११९ ॥
ती बोलते युवति लाज मनीं दडाली ॥
होती तुवां विघरतां मन ती उडाली ॥
आतां वरूं नळ-वरासि तुला नवाजूं ॥
गाऊं तुझी स्तुति करून कशास लाजूं ॥ १२० ॥
मालिनी वृ० परिसुनि वच ऐसें जें इणें बोलिजेलें ॥
पतग-कुल-वतंसें अंतरीं ध्याइजेलें ॥
पर-वश-त्दृदया हे नैषधें राज-हंसें ॥
म्हणुनि समजतों हें बोलिजे राजहंसें ॥ १२१ ॥
दिंडी जशी रंजलीस तूं निषध-भूपीं ॥ तसा तोही रंजला तुझ्या रुपीं ॥
दैव-घटने अन्योन्य व्हाल सोपीं॥तुम्ही नांदाल सत्य हें निरोपी१२२
कोण योजावी नोवरी नळाला॥ब्रम्हदेवानें हा विचार केला ॥
तुझा नामा-क्षर-संघ घेइजेला॥असें भासतसे माझिया मनाला१२३
मालिनी वृ० नळरहित वराशीं तूज योजूनि पाहे ॥
तरि मग विधि ऐसा कोण तो मूढ आहे ॥
अचतुर नर तोही जाहल्या जेविता कीं ॥
सळमिसळ करीना सर्वथा क्षीर ताकीं ॥ १२४ ॥
दिंडी कशाला हें बोलणें काय येणें ॥ तुवां वरिला नळराज तुंही तेणें ॥
सफळ माझें हें येथवरी येणें ॥राजकन्ये नीरोप मला देणें ॥१२५॥
चतुर सुंदर तो तरुण निषध-राजा॥ तुवां राजी केलाच तूं घरा जा॥
धन्य वैदर्भी दैव-योग तुझा॥ बोल मानीं सत्यार्थ मनीं माझा१२६
जाउनी तूं बोल असें राजहंसा ॥ तुझी दासी जाहलें राज-हंसा ॥
नको चिंता तूं करूं अरि-ध्वंसा॥एक शुभ्रां-शु-वंश-जा-वतंसा २७
नको पाहूं तूं नोवरी नळाशी ॥ मीच भावें होईन सत्य दासी ॥
जरी यावें आतांचि तयापाशीं॥गोष्ट भासे विपरीत लौकिकाशीं१२८

मालिनी वृ० करुनि मज रवाना राजसे तूज साठीं ॥
नृपति निरखि माझी वाट आराम-वाटीं ॥
बसवुनि निजपाठीं तूज नेईन तेथें ॥
परि चुकुर तुझे हे लोक होतील येथें ॥ १२९ ॥

वसंत तिं० वृ० येरीकडे नृपति धाडुनि राजहंसा ॥
तो बैसला करित आपण तत्प्रशंसा ॥
येईल शीघ्र घटना करुनी तियेची ॥
होईल भेटि मज आज तये प्रियेची ॥ १३० ॥

शार्दूल वि० वृ० आरामीं विरहो-त्करें[1] तरुतळीं थारा करोनी स्वयें ॥
वारा घेत बसे तपे तपनसा तारापती निश्चयें ॥
माराचा शर-मार नावरि म्हणे दारा घडे ती कशी ॥
हा राजीव-दला-क्ष-माधव जनोद्धारा कृपा हो अशी ॥१३१॥
तों चिन्हें शुभ पाहुनी नृप म्हणे लाभेल लाभ-वळी ॥
आला सन्मुख राजहंस निरखी बाहूयुगें आंवळी ॥
बोले मंजुळ वाक्य येथ बसलों लावूनि त्वद्ध्यान रे ॥
जालें वृत्त समग्र सांगुनि करीं हंसा समाधान रे ॥ १३२ ॥

दिंडी: काय वदली तुजसवें हंसराया ॥ मान्य झाली कीं ती मला वराया ॥
कधीं भेटे ती निजकरीं धराया॥विरह-बाधा मज नये आंवराया॥१३३
हंस बोले नृप-राज सुगुण-सारा ॥ माळ घालीते ती तुला उदारा ॥
तुझ्या ध्यानीं सल्लग्न जे विचारा॥सत्य मानी ती होय तुझी दारा॥१३४॥
जाइं नगरा तूं नृपा कृपा-राशी ॥ पत्र येतांची जा स्वयंवरासी ॥
स्वयें ये ते चालूनि मंदिरासी॥फार वदणें नलगे सुखोत्करासी.॥१३५
बरें येतों बोलोनि पाय-हातें ॥ नमुनि चाले सप्रेम तो गृहातें ॥
नृप निघे तैं सहचमू निज-पुरातें॥हंस ध्यानीं लावुनी अंतरातें॥१३६॥
जनकतनयेशी पवन-तनयसा तो ॥ वदुनि वेगीं उड्डान नभीं घेतो ॥
नळापाशीं वृत्तांत निवेदी तो ॥ स्वधामातें पावोनि सुखी होतो.॥१३७
असो ऐशी हे कथा सौरसाची॥श्रवण करितां बहु गोड गमे साची॥
धन्य लीला त्या ऐक नैषधाची ॥ प्रकट वाणी रघुनाथ पंडिताची१३८

[1] विरहाधिक्यानें.

असो आल्या इजजवळि सख्या ऐशा॥बोलती त्या मग तास सकळ कशा॥
हंस धरुनी परिपूर्ण तुझी आशा॥काय गेला तो उडुनि-गगन-देशा॥१३९

मालिनी वृ०
धरुनि कर सखींनीं सौध-शालेंत नेली ॥
खग-वचन-मधूनें जे मनीं मोहिजेली ॥
नळ-विरह-भरानें पोळली गुप्त-रूपें ॥
नवल कनकशी ते गौरहो तप्त-रूपें ॥ १४० ॥

वसंत ति० वृ०
होणार जो वर तदीय वियोग दाही ॥
सांगावयासहि नये लपवावयाही ॥
या सांगवी मदन लाज न सांगवी तें ॥
कीं या दुहींत शिणलें मन रंगवीतें ॥ १४१ ॥

शिखरि० वृ०
न रंजे कारंजें निरखुनि फणीतें फणफणी ॥
मुदेनें मोदेना नळ-गुण-गणीं जे गुणगुणी ॥
न बैसे जे सेजेवरि न परिसे जे शुक-गिरा ॥
न नाहे मांना हे न धरि ललना हेतु दुसरा ॥ १४२ ॥

वसंत ति० वृ०
लज्जावती युवति हे वडिलांसि धाकें ॥
झांकीतसे विरह-पावक तो न झांके ॥
जो पंजरीं लपविला वसनां-तराळीं ॥
तो झांकिला गगन-दीप तरी झळाळी ॥ १४३ ॥
तीचे मनीं नळ मनोभव वीर होते ॥
होतां तयांसि कथिलें जथिलें अहो ते ॥
त्यांहींच ते दुखविली सुतनू निजेली ॥
मूर्च्छावती निज-जनीं अवलोकिजेली ॥ १४४ ॥

मालिनी वृ०
गजबज बहु झाली माय धांवोनि आली ॥
धरुनि व्हदय-देशीं तीजला सेज केली ॥
करिति विझण-वारे त्या सख्या वेगळाल्या ॥
वडिल वडिल दाया जाणत्याही मिळाल्या ॥ १४५ ॥

आर्या.
ते शीतळो-पचारीं जागी झाली हळूच मग बोले ॥
औषध नलगे मजला परिसुनि जननी बरें म्हणुनि डोले१४६

१ कंमविंचरण्याचे फणीला२ त्रासकरी. ३ डोकींत घालण्याच्या मुदेनें. ४ गुणगुण. ५ स्नान न करी. ६ समजा. ७ नलगे ह्म० नको. श्लेषानें—नल गे ह्म० मजला गे नल हेंच औषध.

दिंडी. मूल उपवरं हे जाहली इयेला॥ पाहिजे कीं वर योग्य पाहिजेला॥
असें ऐकोनी वधूचिया बोला॥सैंवराचा मग यत्न नृपें केला॥१४७
नगर सारें शृंगारविलें तैसें ॥ भूमिलोकिं वैकुंठ दिसे जैसें ॥
लिखित पाठविलें सकळ नृपा कैसें॥तुम्ही यावें जी सैंवरासि ऐसें१४८
निषधराजासी लिखित पाठवितो ॥ प्रतिद्वीपीं भूपतिसही लिहीतो॥
असा यत्नीं लागला नृप अहो तो॥पुढें परिसा वृत्तांत कसा होतो१४९
ऋषी नारद असतां नभो-विहारीं ॥ वैजयंती ज्या दिसे मनोहारी॥
मणी रमणीय कनक-कलश भारी॥सुर-पतीचा जो सौध महा भारी१५०
तया प्रासादीं जाय ऋषी पाहे ॥ सभा केली देवेंद्र बैसलाहे ॥
फार आदरिलें तया देवरायें॥अर्घ्यपाद्यादिक करुनि विनत-कायें१५१

भुजंगप्रयात वृ०.
समुद्रोद्भवा अप्सरा साठ कोटी ॥
जयांची द्युती ते रतीलाहि लोटी ॥
विधीनें तशा त्या तुळूं पाहिजेल्या ॥
जियेशीं हळू जाहल्या उंच गेल्या ॥ १५२ ॥

मालिनी वृ०
उपवर दमयंती जाहली नोवरी ते ॥
कवण वर कळेना हे जयातें वरीते ॥
दृढतर-निज-लज्जा-गव्हरीं हेतु केला ॥
जिवलगहि सखीला जो नसे सांगिजेला ॥ १५३ ॥

दिंडी. नवे तरणे नृपमुख्य तीजसाठीं ॥ मोहिले ते करिताति यत्न कोटी ॥
कलह-वार्ता ही मानिताति पोटीं॥तया युवतीची आस तयां मोटी१५४
असें नारद बोलोनि तो निघाला॥जाय ह्रदयासी मानल्या स्थळाला॥
थोर चिंता मग होय सुरेंद्राला॥म्हणे कैसी ते वरिल आपणाला१५५
वरुण पावक यम इंद्र हे मिळाले ॥ असे चौघेही रथारूढ झाले ॥
मही-लोकासी यावया निघाले॥तया कुंडिननगरासमीप आले१५६

द्रुतवि० वृ०
तंव तया चवघांस तया पथीं ॥
निषध-नायक येत दिसे रथीं ॥
तरुण सुंदर जो चतुरा-ग्रणी ॥
अतुळ-वैभव राज-शिरोमणी ॥ १५७ ॥

मालिनी वृ०
निरखुनि निषधेंद्रा इंद्र तो बोलताहे ॥
युवति उभयथाही लभ्य आम्हांसि नोहे ॥

वरिल जरि नळाला ते तया लाभली जे ॥
न वरि तरि आम्हासी मूढ ते काय कीजे ॥ १५८ ॥

शिखरिणी वृ० नळातें पाचारी सुरपति विचारी कुशल तो ॥
म्हणे आम्हांपाशीं तव गुरु विलासी निवसतो ॥
खुणा ज्याज्या त्याच्या तुजजवळि त्यात्या निरखितों ॥
खरा तूं तद्वंशी म्हणउनि तदंशी समजतों ॥ १५९ ॥

वसंततिलका वृ० तो वन्हि तो वरुण तो यम इंद्र गा मी ॥
झालों तुला सकळ हे विदित स्वनामीं ॥
बोले मही-रमण हा नळ चंद्र-वंशी ॥
वंदी पदास तुमच्या तुमचाच अंशी ॥ १६० ॥

दिंडी. नळा कोठें जातोसि असें बोले ॥ नळें इंद्रासी असें बोलिजेलें ॥
भीम-भूपें हें लिखित पाठवीलें ॥ सैंवरालागीं येइजे बहीलें ॥ १६१ ॥
बोलताहे देवेंद्र नृपवराला ॥ नैषधा तूं आलासि सैंवराला ॥
समज आम्ही तुज जवळि याचनेला ॥ करूं आलों मनिं धरुनि कामनेला ६२

वसंततिलका वृ० जे हे दिशा-पति विशाल-यशा अशांला ॥
आशा-वशा कु-वलयां-त-दृशा कशाला ॥
हा बोल तूं न वद तूजसमीप येतों ॥
आम्ही मखीं निजमुखीं अवदान घेतों ॥ १६३ ॥
केला विचार हृदयीं नळराज यानें ॥
हा जीवहि धनहि देइन निश्चयानें ॥
देवेंद्र दे जरि म्हणेल कदापि भैमी ॥
ते देववेल मज काय करीन गे मी ॥ १६४ ॥

---

१ मूर्ख. जर नळाला तिनें वरलें नाहीं तर अशी मूर्ख आह्माला काय करायाची आहे. २ पिता-वीरसेन. ३ नळ चंद्रवंशी आहे आणि चंद्र हा देव आहे, ह्मणून तुमचाच ह्म० देवांचाच अंशी असें ह्मटलें ४ इंद्र-पूर्वेचा पति, अग्नि-आग्नेय दिशेचा पति, यम-दक्षिण दिशेचा पति, वरुण-पश्चिमेचा पति; असे जे हे दिक्पति, अशांला, हे विशालयशा-नळा, कुवलयां त दृशा म्ह० पृथ्वीच्या अं रलेंच पाहणारी, म्ह० स्वर्गीची नव्हे आणि तुह्मी तर स्वर्गीचे आहां, तेव्हां अशी दमयंती तुह्मांला कशाला आशावश पाहिजे ह्म० तुह्मीं हिची कशाला आशा करावी; हा बोल तूं न वद, कारण आह्मीं तुज जवळ येऊन यज्ञांत आपल्या मुखांनीं अवदान घेतों. म्ह० हविर्भाग घेतों. तात्पर्य कीं, पृथ्वी वरच्या वस्तूंची आह्मांस इच्छा नाहीं असें नाहीं. ५ काना डोळा.

दिंडी. म्हणे राजेंद्र तया देवदेवा ॥ काय आज्ञा जी काय करूं सेवा ॥
वीरसेनाचा थोर पुण्यठेवा ॥ मज मिळाला तो दर्शनाख्य देवा १६५

वसंत तिं० वृ०
झाले सुरा-धिप नरा-धिपतीस राया ॥
भैमी जसी मज वरील तसें कराया ॥
बोलावयास तिजशीं तिचिया घरा जा ॥
तूं बोलका चतुर केवळ होस राजा ॥ १६६ ॥

मालिनी वृ०
मग हळुच सुरेंद्रा बोलिजे भूपतीनें ॥
मज निज-सुमनाची घातली माळ तीनें ॥
त्द्दय तरि तियेचें सांद्र जालें सुवासें ॥
चलित न करवें तें कोणत्याही मयासें ॥ १६७ ॥

दिंडी. पुन्हा बोले देवेंद्र नृपवरा या ॥ तुला झालें वश त्द्दय तिचें राया ॥
तरिच आलों हे याचना कराया ॥ तुझ्या वाक्यें आम्हासि ते वराया १६८

वसंत तिं० वृ०
दातव्यही स्ववश आपण जाणताही ॥
पर्याय उत्तर वदेच न देच कांहीं ॥
दाता असा शठ कसा ठकसा कदापि ॥
जो याचकावरि दया न करीच पापी ॥ १६९ ॥
गहिंवरत गळाही चावळे जीभ वाळे ॥
विकळ पण शरीरीं कंपही या निराळे ॥
धनिक विमुख होतां अंतरीं शोक राहे ॥
हरहर मज भासे यातना याचना हे ॥ १७० ॥
भांबावला धनमदें भलतेंच बोले ॥
तो बोलही सरस मानुनि लोक डोले ॥
मांसेंकरूनि भरला गळसाच भावे ॥

१ पुष्पाची. तरी तिचें त्द्दय सुवासानें ( चांगल्या वासानें ) भरलें आहे. आतां मजकडे पुष्पांची माळ आली असतां तिजकडे सुवास राहील कसा ? तर सुमनाची म्ह० आपल्या चांगल्या मनाची आणि सुवास म्ह० माझा तिचे मनांत चांगला वास-वसति. तात्पर्य कीं, तिचें मन मजवर पक्कें बसलें आहे. २ जें द्यावयाचें तें. ३ ह्या क्रियेचा कर्ता "धनिक" अध्याहृत आहे. ४ मासे धरण्याच्या गळा, प्रमाणेच भावे म्ह० वाटतो. हा गळ मांसानें भरलेला असतो म्ह० त्यास मांस लावलेलें असतें. धनिक तर मांसानें पुष्ट असतोच. ह्या गळाला मीनानें म्ह० माशानें धरलें म्ह० तो बळसा पावतो म्ह० गरक्यांत येतो. तसें दीनानें धनिकास धरलें असतां त्याला गोता बसतो म्ह० फसतो.

ज्या दीन मीन धरितां वळसाच पावे ॥ १७१ ॥

दिंडी. असे परिसोनी बोल वासवाचे ॥ तया नळराजा काय वदे वाचे ॥
तुम्ही जाणते थोर थोर साचे॥असां साक्षी तुम्हि मझिया मनांचे १७२
ज्याशि जेथें सामर्थ्य नसे त्यातें॥कसें कार्या त्या तुम्ही सांगिजेतें ॥
नाळ तान्हें उचलील काय जातें॥बोलणाराचें मोल फोल जातें १७३
सात बंकाही पलीकडे हो ते ॥ राजकन्येची भेट कशी होते ॥
त्यजुनि राज्य त्व दूतता कशी ते॥धरावी म्यां त्वद्दयासि जे कशीते १७४

वसंत ति० वृ०
बोले सुरेंद्र नृप-सौध सुखें फिराया ॥
आकार गुप्त वर देइन देवराया ॥
जाईं विदर्भ-वसुधेस सुतेस शोधीं ॥
आम्हांसि ते तरि वरील तुझ्याच बोधीं ॥ १७५ ॥

ओंव्या. इंद्र त्रैलोक्यनायक ॥ तोही जालासे याचक ॥
दाक्षिण्यानें भूपाळक ॥ यांच्या वाक्यें गुंतला ॥ १७६ ॥
बरें म्हणोनी उत्तरें ॥ रथावरोनि उतरे ॥
तया राजपुरीं भरे ॥ शोभा तेथील पाहतो ॥ १७७ ॥

वसंत ति० वृ०
तो जाहला नृपवर स्थिर दूत-भावीं ॥
मानीचना युवतिच्या विरहास भावी ॥
कुंभोद्भवें तरि महोदधिपान केलें ॥
दुर्वार वाडवशिखेस न मानिजेलें ॥ १७८ ॥
प्राणापरीच त्वद्दयीं नगरांतरीं तो ॥
गुप्त स्वरूप नलभूप तदा धरी तो ॥
बंकी रिघे तंव तया दिसताति बंके ॥
पंके-रुहास्य न दिसेचि तया न शंके ॥ १७९ ॥

ओंव्या. तया राजसौधांतरीं ॥ शोभा पाहे परोपरी ॥
कोठें आहे ते सुंदरी ॥ धुंडावया लागला ॥ १८० ॥
कोणी एक दोघी दूती ॥ तेथें अन्योन्य बोलती ॥
येथें आहे दमयंती ॥ जाई बोलोनि येई ॥ १८१ ॥
तिजसवें सौधांतरीं ॥ राजा जाय अंतःपुरीं ॥
तेथें देखिली सुंदरी ॥ जैसा पूर्ण चंद्रमा ॥ १८२ ॥
सुमन-सेजेच्या पलंगीं ॥ बैसलीसे तन्वंगी ॥

सख्या खेळताती संगीं ॥ बहु अप्सरा त्या जैशा ॥ १८३ ॥

मालिनी वृ० प्रगट निजपुढारां जाहला राजमौळी ॥
पदर वरि न घेतां हार जैसा झळाळी ॥
निज-हृदय-निवासी काय बाहीर आला ॥
निरखुनि दमयंती तेंवि मानी तयाला ॥ १८४ ॥

द्रुत वि० गजबजोनि समस्त तिच्या सख्या॥गजगमा उठल्या निजसारिख्या॥
पदर सांवरितां नृपबाळिका॥झळकती हृदयीं मणिमाळिका॥१८५॥

शार्दूल वि०वृ० कोणी एक सखी विलोकुनि नळ-क्षोणी-श्वरा मोहिली ॥
कोणी तत्तनु-कांति-सिंधु-पतित द्रोणी-परी पोंहली ॥
कोणी हा मज नाहिं नाथ म्हणुनी लोणी तशी पाझरे ॥
कोणी एक तयास लाजुनि विरे कोणी वियोगें झुरे ॥१८६॥
रामातें जनक-क्षमापति-सुता, रामा जशी रेवती ॥
कामारीस नगा-धिराज-तनया, कामासि जैशी रती ॥
या मानूनि तसी विदर्भ-दुहिता रामा मनीं भाविते ॥
हा माझा हृदया-ब्ज-सूर्य म्हणुनी त्या मानिनी बोलते१८७

साकी. कोण तुम्ही कवणीचे कोठुनि येथें कां आलां हो ॥
काय निमित्तें दिधला मजला हा निज-दर्शन लाहो ॥ १८८ ॥
अटक न केली तुम्हांसि येतां त्या सातांही बंकीं ॥
ही माझ्या नयनाचीं सुकृतें विशेष मी हें शंकीं ॥ १८९ ॥
संभवलां कवणाचे वंशीं सांगा हो अकलंकीं ॥
उभे असां कां भागतसां हो या बैसा पर्यंकीं ॥ १९० ॥

वसंत ति०वृ० राजे असाल तरि धन्य वसुंधरा हे ॥
शोभाल देव तरि नाक यथार्थ आहे ॥
भोगी तुम्हो उपजलां जरि नागलोकीं ॥
खालीं असोनि सकळांवरि होय तो कीं ॥ १९१ ॥

साकी. दुग्ध-पूर नसतां निजरूपीं क्षीर-सिंधु तो जैसा ॥
वसंत आला नाहीं तरि तो उद्यानभाग जैसा ॥
अमृत-कराचा उदय न होतां रजनी-समयो जैसा ॥

१ होडी. २ बलरामास. ३ शिवास.

तुमच्या विरहें आजि जाहला कवण देश तो ऐसा ॥१९२॥

वसंत ति० वृ०
भूपाळ जो मम मनो-मुकुरीं उभा सें ॥
तो नैषधेंद्र तुमचा अनुबिंब भासे ॥
रूपें तरीच दिसताति दिगंतराळीं ॥
तीं हीं कसीं म्हणवतील तुम्हां निराळीं ॥ १९३ ॥

साकी.
सरस द्युति-पद फुल शिरसाचें मृदु फुललें स्वभावें ॥
चालवाल किति दूर तयातें अदय-त्द्दय-भावें ॥
कर्ण-युगुल हें धन्य करावें सांगुन निज नांवें ॥
स्तवन करी रघुनाथ तयाचें कवन आदरावें ॥ १९४ ॥

मालिनी वृ०
तुजवरि मन ईचें यापरी कां इयेला ॥
त्यजसि सुम-शरानें हा असा बोध केला ॥
तृणकण गणि जैसें त्यासि धैर्यें गणी तो ॥
युवतिसि मग बोले राज-चूडा-मणी तो ॥ १९५ ॥

वसंत ति० वृ०
आहेस कीं सुखवती कमनीय-लीळे ॥
निश्चित कीं त्द्दय होय तुझें सुशीळे ॥
आतां नकोच अवलंब विलंबनाचा ॥
हेजीव मी समज मुख्य सुराधिपाचा ॥ १९६ ॥

स्वा- ग० वृ०
जो धरी निजकरीं शत-कोटी॥ज्याशि नम्र सुमनः-शत-कोटी ॥
तोसु-रेंद्रहि तुला नत याची॥हा असो वर तुला न तयाची॥१९७॥

घना- क्षरी.
तया इंद्रा करीं धरीं ॥ अथवा तयाचे शेजारीं ॥
नांदे जो तेजोनिधी भारी ॥ तया वरीं राजसे ॥ १९८ ॥
तोही येईना जरी मना ॥ तरी वरावें शमना ॥
अथवा करून करुणा ॥ त्या वरुणा वरीं कीं ॥ १९९ ॥
ऐसें बोलतां भूपाळ ॥ काय बोले ते वेल्हाळ ॥
कांहीं बोलतां पाल्हाळ ॥ नाम कुळ सांगावें ॥ २०० ॥

वसंत ति० वृ०
बोले नृपाळ पुससी मज वंश नामें ॥
यावीण सांग तटलीं तुझि काय कामें ॥

१ इंद्रादिक चार देवांचा जो गण त्याजकडचा. २ उशिराचा. ३ यांचना करतां. ४ बरोबरी. ५ अग्नि. ६ यमाला.

आलों सुधांशुमुखि जे घटना कराया ॥
तीतें विचारुनि वरीं सुर-लोक-राया ॥ २०१ ॥

घनाक्षरी. बोले सुंदरी तयासी ॥ स्ववंशनाम न सांगसी ॥
तरी आम्ही पर पुरुषासीं ॥ वदणें मर्यादा नोहे ॥ २०२ ॥
तिचा पाहुनियां कोप ॥ काय बोले नळ भूप ॥
चंद्रवंशाचें हें रोप ॥ माझें जाण राजसे ॥ २०३ ॥
महा-जनाचा आचार ॥ निज-नामाचा उच्चार ॥
करूं नये हें साचार ॥ शास्त्राधार आहे कीं ॥ २०४ ॥
पुन्हा बोलते सुंदरी ॥ चंद्रवंशी महीवरी ॥
बहु आहेत ते परी ॥ नामें घेतां जाणवे ॥ २०५ ॥

आर्या. मी वासुदेव ऐसें स्वनाम मुरहर वदे सकळ-वेदी ॥
आधार तोचि मानुनि निजाभिधानासि कवण न निवेदी॥२०६॥

घनाक्षरी. बोले नैषधेंद्र वाचा ॥ नाम हेजीब इंद्राचा ॥
किती साक्षेप नामाचा ॥ काय तेणें करिसी तूं ॥ २०७ ॥
केला काय अंगीकार ॥ बोलूं इंद्रासी निर्धार ॥
तंव ते बोले सुकुमार ॥ चंद्रा-कार-वदनातें ॥ २०८ ॥

वसंततिलका वृत्त. ऐरावतावरि बसोनि विमानदेशीं ॥
जो संचरे सुर-पती सुख-संपदेशीं ॥
मी भूमिके वरि असोनि तयास कांहीं ॥
मागावया तरि कशी मज लाज नाहीं ॥ २०९ ॥

घनाक्षरी. नळावेगळा भ्रतार ॥ नलगे स्वप्नीं हें साचार ॥
ऐसा निश्चय विचार ॥ तंव राजेंद्र बोलतो ॥ २१० ॥
टाकुनि इंद्राचा संभ्रम ॥ धरिशी कां तूं नळभ्रम ॥
जाईल विश्राम-विभ्रम ॥ नसना श्रम होईल ॥ २११ ॥
तुझें सौंदर्य पहावया ॥ धरी सहस्राक्ष-काया ॥
तया वरीं देवराया ॥ नळ-माया टाकुनी ॥ २१२ ॥
अथवा तुज तो मोहला ॥ होऊं नेदी नैषधाला ॥
यास्तव त्याच इंद्राला ॥ माळ गळां घालावी ॥ २१३ ॥

१ जाणणारा.

वसंत ति० वृ० येणेंपरीच अनळासि यमा-धिपासी ॥
पाशीसही तरि वरीं म्हणतां नृपासी ॥
आधार लेश न वदे नव-सारसाक्षी ॥
होते तयासि सुर-नायक गुप्त साक्षी ॥ २१२ ॥
ऐसा अवंचक वदोनि नृपाळ आला ॥
इंद्रादिकांसहि निवेदित वृत्त जाला ॥
पाचारिले मग महीं-द्र विदर्भ-भूपें ॥
आले समस्तहि सभेसि स-हर्ष-रूपें ॥ २१३ ॥

ओंव्या. इंद्रादिक तेही अधिप ॥ धरूनि आले नळ-रूप ॥
सभे बैसले अमूप ॥ जेथें भूप शोभती ॥ २१४ ॥
आला नळही भूपाळ ॥ कीर्तिरूपें जो विशाळ ॥
तदा दमयंती वेल्हाळ ॥ सखियांसीं बोलते ॥ २१५ ॥
नळ-राज-हिरा वरिला ॥ तोचि मनीं म्यां धरिला ॥
सुर किंवा नर भला ॥ न वरीं अन्यातें निश्चयें ॥ २१६ ॥
ऐसें बोलोनी सुंदरी ॥ बैसे शिबिकेभीतरीं ॥
आली राज-सभां-तरीं ॥ बरोबरी शारदा ॥ २१७ ॥
बोले शारदा तियेला ॥ ऐकें राजांच्या नामांला ॥
मना येईल तयाला ॥ माळ गळां घालीं तूं ॥ २१८ ॥

शार्दूलवि० वृ० हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता हारा-वळी कंधरीं ॥
हा राहे शरयू-समीप नगरीं हा राजसे आदरीं ॥
हा राजीव-दला-क्ष सद्गुण-निधी फारा जनाचा मद्दा ॥
शारा हाच वरीं रिपूंशि परते सारावयाचा पद्दा ॥ २१९ ॥

वसंत ति० वृ० येणेंपरीच बहु भूप निवेदिजेले ॥
हीच्या मनासचि न येति उगेचि ठेले ॥
जेथें व[1]ळी धरुनि पंचे-न[2]ळी वसे ते ॥
तेथें विरंचि-तनयेसमवेत येते ॥ २२० ॥

घनाक्षरी. बोले शारदा वचन ॥ येथें बाई सावधान ॥
बरें घालूनियां मन ॥ वर-लाभें सुखी हो ॥ २२१ ॥

१ ओळ, रांग. २ पांचनळ.

वसंत ति० वृ०

'ज्यांचीं पदें धरिति देव शिरो-ललामीं ॥
स्वाराज्य जो मिरवितो गज-राज-गामी ॥
जो वज्र-पाणि बहु-लोचन कांति भारी ॥
हा पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २२२ ॥
साहील कोण सजणें बहु तेज याचें ॥
मध्यस्थ रूप धरितो हरिचें यमाचे ॥
स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी ॥
हा पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २२३ ॥
सपूर्णते समज यास्तव दक्षिणा-शा ॥
पाप्यास दंड धरितो करितो विनाशा ॥
देहीं जया मिरवते घन-कांति भारी ॥
हा पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २२४ ॥
आधार हाच सजणे बहु-जीवनाचा ॥
रक्षी दयेंकरूनि मान ऋषी-जनाचा ॥
यादांस फार म्हणती जन सौख्य-कारी ॥
हा पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २२५ ॥
होतील नंदन-विलास जयास तो हा ॥
आहे धनंजयहि धर्महि जाण तो हा ॥
रत्नाकरीं तुज विराजविता विहारी ॥
हा पाहिजे तरि वरीं नळ रूप-धारी ॥ २२६ ॥

१ स्वर्गाचें राज्य. २ इंद्र. ह्या श्लोकांत "बहु लोचन" ह्या विशेषणानें इंद्र हजार डोळ्याचा आहे, तेव्हां तो कुरूप असल्या मुळें वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ३ अग्नि. ह्या श्लोकांत आरंभींच अग्नीच्या तापाची असह्यता सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ४ यम. ह्या श्लोकांत "घन कांति" ह्या विशेषणानें यम काळा आहे, असें सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ५ वरुण. ह्या श्लोकांत जीं विशेषणं आहेत तीं सर्व. वरुण इतरांचे बरें करण्यांत सर्वदा असतो, त्यास स्त्री कडे लक्ष्य देण्यास वेळ होत नाहीं, असें सुचवितात. त्या वरून तो वरण्यास अयोग्य हें उघड आहे. ६ नळ. ह्या श्लोकांत वरच्या चारही देवांचे गुण नळा मध्यें आहेत असें सुचविलें आहे. "नंदन विलास" शब्दानें इंद्रता सुचविली. इंद्राकडे नंदन वनांतले विलास आणि नळा कडे आनंद कारक विलास. "धनंजय" शब्दाने अग्निता सुचविली. धनंजय असें अग्नीचें नांव आहे; तसा नळही आहे. नलपक्षीं ध-

शारदेस मग राज-सुता हे ॥ शारदें-दु-वंदना वदताहे ॥
शेवटील नळ हा मज बाई॥मानला बहु मनीं सुख-दाई २२७

ओंव्या तेव्हां दमयंती सुंदरी ॥ इंद्रादिकां नमस्कारी ॥
तयां बोलली उत्तरीं ॥ अमृतापरीस मधुर ॥ २२८ ॥
माझा भीम जैसा पिता ॥ तसे तुम्ही जी तत्वतां ॥
करा कन्या-दान आतां ॥ नळ-नाथाचे करीं ॥ २२९ ॥

द्रुत सुर समस्त इच्या वर-निश्चयें ॥ सुरस-मस्त असें वदले स्वयें ॥
वि० नळ-वराशि वरोनि सुखी असें॥तुज नको जन कोण म्हणे असें २३०

वसंत मावेचना सुख मनीं कमनीय बाला ॥
ति०वृ० मायेसही विसरली न पुसेचि बाला ॥
दूर्वा-दळीं कदलि-बंध-मधूक-माळा ॥
तीणें अलंकृत करी नळ-कंठ-नाळा ॥ २३१ ॥

ओंव्या चौघे श्रेष्ठ सुरेश्वर ॥ देते झाले अष्ट वर ॥
मस्तकीं ठेवोनी कर ॥ दोन दोन एकेकें ॥ २३२ ॥
देऊनियां तया वर ॥ स्वर्ग-भुवना गेले सुर ॥
निराश होऊनि नरेश्वर ॥ जाते झाले स्व-स्थाना ॥ २३३॥

शिख नृपाळाचे मांडीवरी बसुनि मांडी हरिखते ॥
रि०वृ० तयां पाहों आले जन सकळ जाले हरिख ते ॥
महा वाद्यें नाना निनदहि तनाना मग घडे ॥

---

नांत जिंकणारा असा अर्थ ह्म० पुष्कळ द्रव्य मिळविणारा. "धर्म" हें यमाचें नांव आहे. नळ ही धर्म आहे ह्म० नीति मान् आहे. "रत्ना करीं विहारी" ह्म० समुद्रांत राहणारा वरुण आहे, तसा नळ ही आहे. नळ पक्षीं, रत्नाकरीं ह्म० रत्नाचे खाणींत (रत्न समुदायांत ) विहारी म्ह० खेळणारा, म्ह० ज्या पाशीं पुष्कळ रत्नें आहेत, असें सुचवून नळा कडे वरुणता सुचविली. पण वरुणाला स्त्रीकडे पाहण्याला बनत नाहीं असा त्याकडे वरती दोष सांगितला आहे, तो दोष न यावा म्हणून "तुज विराजविता" असें विशेषण दिलें आहे. म्हणजे या वरून तुला रत्नाच्या दागिन्यांनीं भरून खुष ठेवील असें सुचविलें. "नळरूप धारी" म्ह० नळाचें रूप धारण करणारा असा वरती चार श्लोकांत अर्थ आणि येथें "रूपधारी" म्ह० सुरूप नळ असा अर्थ.

१सुरस म्ह० अमृत, तें पिऊन मस्त झालेले. २बापाला ३दूर्वांनी युक्त. ४केळीच्या सोपटाच्या दोरांत गुंफलेली मधूक (दुपारी) पुष्पांची माळ. ५इंद्र, अग्नि, यम, आणि वरुण. ६ करी ७ अनंदानें ८ आनंदित.

पिता तीचा पाटीभर धनहि वांटी बहु विडे ॥ २३४ ॥

ओंव्या. नाना परींचें मिष्टान्न ॥ चारी दिवस भोजन ॥
वधूवरें मिरवून ॥ घर-भरणी करविली ॥ २३५ ॥
राजा निरोपा तें घेत ॥ मग दमयंती समवेत ॥
आपल्या नगरातें जात ॥ नांदे आनंदभरें ॥ २३६ ॥

शार्दूल विक्रीडित. लोकीं सौरभ-काव्य-नाटक-कला-लंकार-चूडामणी ॥
सर्वां नैषध विद्वदौषध असे विख्यात वाग्धोरणी ॥
हे त्याचीच टिका टिकोनि घटिका ऐकेल जो आदरें ॥
बोले त्या रघुनाथ पंडित कवी भेटे हरी सादरें ॥ २३७॥

इति रघुनाथपंडित विरचित नळदमयंती स्वयंवराख्यान समाप्त.

# चिंतामणि कवि.

## दिंड्या-ध्रुवाख्यानाच्या.

सूर्यवंशांतील उत्तानपाद राजास दोन नायका होत्या. थोरलीचें नांव सुनीति व धाकटीचें नांव सुरुचि. सुरुचि राजास फार प्रिय होती. थोरलीचा मुलगा ध्रुव एकदा बापाच्या मांडीवर जाऊन बसला, तें धाकटीस न साहून, तिनें त्यास पायानें मांडीवरून खालीं लोटलें. तेव्हां ध्रुवास फार वाईट वाटून तो परमेश्वरास शरण गेला; तेव्हां त्यानें प्रसन्न होऊन ध्रुवास अचल पद दिलें. हीकथा ह्या आख्यानांत आहे.

सूर्यवंशी उत्तानपादराजा ॥ रूपवंती तयास दोन भाजा ॥
कनिष्टेशी अत्यंत प्रीतमाया ॥ पट्टराणीची पडों नेदे छाया ॥ १ ॥
वरिष्ठेसी जाहला एक पुत्र ॥ भक्त-राज वैकुंठ-पाळ-मित्र[1] ॥
सुकुमार-आकर्ण-पद्मनेत्र[2] ॥ ठाणें माण[3] रेखिले जे विचित्र ॥ २ ॥
पांचवर्षें लोटलीं ध्रुवा आंगीं ॥ पिता ठाऊका नाहि तया लागीं ॥
पुसे मातेसी भक्तराज योगी ॥ तात कोठें तो सांग मला वेगीं ॥ ३ ॥
म्हणे माता तान्हया तोचि तुझा ॥ धराधीश बोलती ज्यास प्रजा॥

१ वैकुंठाचा पालक जो विष्णु त्याचा मित्र ( भक्त ). २ काना पर्यंत आले आहेत कमला सारखे नेत्र ज्याचे. ३ स्थान आणि मान म्ह० ज्या स्थानीं ज्या प्रमाणाचे अवयव असावयाचे त्या प्रमाणे ते होते.

येरु बोले पाहीन पिता माझा ॥ नको जाऊं मारील राजं-भाजा ॥४॥
पूर्व पुण्यें शुभ दिवस उगवला ॥ मुलांसंगें तो राज-गृहा गेला ॥
राजदृष्टी सन्मूख उभा ठेला ॥ पिता पाहे तों मोह झकंबला ॥ ५ ॥
अनीवार मोहास पूर आला ॥ ऊचलोनी मांडियें बैसवीला ॥
बाळशब्दें खेळवी तनूजाला ॥ नसाहे तें राणीस कोप आला ॥ ६॥
उचंबळे क्रोधाग्नि शिखा टाकी ॥ ह्मणे कोण बैसला राजअंकीं ॥
राव कैसा खेळवी कवतूकीं ॥ ध्रुव राजा होईल धरालोकीं ॥ ७ ॥
धरोनियां सापत्न भाव चित्तीं ॥ पदें लोटोनी पाडियला क्षीती ॥
रडत गेला माउली जेथ होती ॥ अश्रुपातें हालवी नेत्रपातीं ॥ ८ ॥
ह्मणे माता तान्हया काय झालें ॥ कोण पापीयें तुज गांजियेलें ॥
मला रायें मांडिये बैसवीलें ॥ राजभाजेनें पदें लोटियेलें ॥ ९ ॥
बुझावीतां माउली काय बोले ॥ अम्ही देवासी नाहिं पूजियेलें.॥
येरु बोले तो देव कसा आहे ॥ वसे कोठें तो सांग लवलाहे ॥ १० ॥
माय बोले सर्वत्र देव आहे ॥ चरा-चर व्यापूनि विश्व राहे ॥
तया लागीं धुंडिती महायोगी ॥ पूर्व पुण्यें दरुषण तया लागी ॥११॥
तुझी बुद्धी काय बा वय सान ॥ तुला कैसें देईल दरुषण ॥
ध्रुव बोले त्यागीन तरी प्राण ॥ हरी देईना जरी दरुषण ॥ १२ ॥
उभा जैसा तैसाचि निघे वेगें ॥ रडत पाठी लागली माय मागें ॥
पुत्र गेला रायासि दूत सांगे ॥ राय झाला घाबरा मोहं-संगें ॥ १३॥
सर्व सौख्याचें मूळ बाळ माझें ॥ ध्रुव गेला घेणार राज्यओझें ॥
वनीं प्राण त्यागीन लोकलाजे ॥ काय जीणें मारिलें दुष्ट भाजे ॥१४॥
लवलाह्ये लागला ध्रुवापाठीं ॥ ह्मणे बाळा ऐक बा एक गोष्टी ॥
बुझावीतों तुज धरुनि हनूवटी ॥ तूजवीणें दाटला प्राण कंठीं ॥ १५ ॥
फीर मागें देईन एक गांव ॥ ध्रुव बोले देईल देव राव ॥
पांच गांव दीधले फीर आतां ॥ ध्रुव बोले मागेन जगन्नाथा ॥ १६ ॥
राय बोले देईन एक देश ॥ ध्रुव बोले देईल जगदीश ॥
अर्ध राज्य दीधलें आण तुझी ॥ ध्रुव बोले देवासि लाज माझी ॥१७॥
सर्व राज्य दीधलें फीर मागें ॥ ध्रुव बोले देइजे रमा-रंगें [४] ॥
स्नेह कां रे सांडिला ध्रुवा आजी ॥ काळतोंडा जाहलों जगामाजी ॥१८॥

---

१ तो ध्रुव. २ दर्शन. ३ ममतेच्या योगानें. ४ लक्ष्मीला रंजविणारा विष्णु त्यानें.

ध्रुव बोले पितयास तात देवा ॥ अतां येतों मीं लोभ असों द्यावा ॥
हरी-भक्तीचा लोभ कसा देहीं ॥ अनुतापें कोंदल्या दिशा दाही॥१९॥
सर्व भावें उभऊनि दोन बाही ॥ म्हणे देवा भेट दे लवलाहीं ॥
निरंजनीं जावोनि उभा राहे ॥ शोक आक्रोशें करूनियां बाहे ॥२०॥
दुरूनीयां अष्टाक्षसुता पाहे ॥ तया दृष्टी सायुज्य-पदा लाहे ॥
जवळ येऊनी पुसे बाळकासी ॥ वय सानें तूं कोण वनवासी ॥ २१ ॥
पूर्व वृत्तांत सांगे नारदासी ॥ आयकोनी तोषला देवऋषी ॥
गुरुमंत्रावांचोनि देव कैंचा ॥ श्रुती सर्व बोलती अशी वाचा ॥ २२ ॥
सकल मंत्रां माझारि मख्य साचा ॥ मंत्रराज द्वादशा अक्षरांचा ॥
ध्रुवा कानीं सांगूनि मुनी गेला ॥ जपतांची तो त्दर्दयि मगटला ॥ २३ ॥
चतुर्भुज सायुध घननीला ॥ तया दृष्टी सन्मूख उभा ठेला ॥
दिव्यं रूपें, ध्रुवें देखियेलें ॥ नमस्कारोनी मनीं पूजियेलें ॥ २४ ॥
देव बोले तूं काय इच्छितोसी ॥ धरा-धीश की स्वर्ग भोगवासी ॥
ध्रुव बोले मज भक्ति सदां देई ॥ पद दीजे न, उठवि दुजी आई ॥२५॥
ध्रुव यानीं तो वाहुनियां नेला ॥ ध्रुवस्थानीं तो अढळ बैसवीला ॥
चंद्र सूर्य नक्षत्र ग्रह तारा ॥ सप्तऋषिही घालिती ज्यास फेरा ॥ २६ ॥
ध्रुवाख्यान ऐकती गाति वाचे ॥ ध्रुवासनींही अढळ वास त्यांचे ॥
चिंतामणी गावोनि गुण साचे ॥ सौख्य पावोनी हरी-पदीं नाचे ॥२७॥

---

# प्रभाकर.

## लावणी-लक्ष्मी पार्वती संवाद. ( हा विनोदपर आहे )

लक्ष्मि गर्वे निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ॥
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज मीय असो पशुपती ॥ ध्रु० ॥
स्मशानवासी भुषण भयंकर पिंगट मुकुटीं जटा ॥

---

१ आठ आहेत अक्ष ( डोळे ) ज्याला असा जो ब्रम्हदेव त्याच्या सुताला म्ह० नारदाला. २ नारदाच्या दर्शनानें. ३ मोक्षाला. ४ मला त्वां राज्यादि पद देऊं नये. ५ अचळ पदावर. ६ ह्या आख्यानांत ऱ्हस्वदीर्घांच्या यथायोग्य प्रयोगाकडे कवीनें मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. ७ पार्वतीला. ८ शिवः पशो, मोठा पशु.

भाळचंद्र ज्या तीन नेत्र भस्माचा कपाळीं पटा ॥
व्याघ्रांबर गज[1]चर्मांबर परिधान शुद्ध कानफाटा[2] ॥
रुंडमाळा[3] ती कंठीं कुंडलें भुजंग रुळती[4] कटीं ॥
त्रिशूळ पाणी त्रिपुंड्र भाळीं लोह-कंकण मणगटा ॥
नंदीवहन सर्पांचा सदोदित करि कमरे लंगूटा ॥
कसा अवडतो शंकर गिरिजे सांग तुला भजमती ॥
लक्ष जन्मिचें पातक म्हणउनि पडलिस ऐशा हतीं ॥ १ ॥ ल०
भोळा माझा सांब लक्षुमी उगाच निंदू नका ॥
अनाद्यंत ज्या अगम्य सुख तें अलभ्य ब्रम्हादिका ॥
सोळा सहस्र शत एक मुख्य तुम्हि आठ जणी नारिका ॥
कार्यवादु तो कृष्ण कसा करि पूर्ण मनोरथ सखा ॥
वक्रदंत शिशुपाळ कंसही कपटें मर्दुनि[6] बकां ॥
प्रताप बहु वर्णितां कशा भाळल्यात गो-रक्षका ॥
जरासंध-रिपु-भयें वसवली जळांत द्वारावती ॥
तस्करास कसा श्वशूर जडला हा भीमक भूपती ॥
मच्छ कूर्म हा सूकर झाला सिंह वामन श्रीपती ॥
जन्म गेला पहा अशा खालि म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥२॥ल०
भुतें पिशाचें यक्ष ब्रम्हराक्षस हे ज्याचे दूत ॥
श्वान सभोंतें मिळवुनि संगें फिरे भीक मागत ॥
भुंभुं वाजवि शंख मुखाने चिताभस्म लावि नीत ॥
शूर्पकर्णी षण्मूख जयाचे नवल-परीचे सूत ॥
मना गमे तिथे निद्रा करितो जिवंत पहातां भूत ॥
हिमालयाचें थोर असें प्रारब्ध पाहुन विस्मित ॥
धन्य तुझी पार्वती अशाची राखितेस चितवृत्ती ॥
दैव दशा भर्तार तामसी कठीण ते तव गती ॥
लक्षुमि गर्वें निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ॥
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज भीय असो पशुपती ॥ ३ ॥

हत्तीच्या कातड्याचें वस्त्र. २ कानफाटा गोसांवी. ३ शरीरापासून तुटलेल्या मस्तकांची माळा. ४ हालती. ५ गालांवर. ६ बकासुरास. ७ गुरें राख्यांला. ८ नित्य. ९ गणपति. १० विलक्षण प्रकारचे.

अनंत घेतो जन्म तुझा पति क्षीर समुद्रा मधीं ॥
शेषावर निद्रिस्त नाभिवर चार मुखाचा विधी ॥
वहन विहंगम दिलें सुदर्शन करुन शंकरें अधीं ॥
सुरासुरीं तुजसाठिं मंथिला पराक्रमें जलनिधी ॥
इच्छा करिती प्राणिमात्र तूं चंचळ, नाहिस सुधी[1] ॥
शंख सहोदर[2] तुझा लक्षुमी श्रीमंत झालिस कधीं ॥
कृपानिधी हा सांब वसें अर्धांगि मी त्याची सती ॥
लिला तयाची विचित्र भासे विदीत सर्वां मती ॥
मत्स्य कूर्म हा सूकर झाला सिंह वामन श्रीपती ॥
जन्म गेला पहा अशा खालिं म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥४॥ल०
तप सामर्थें करुनि शिवाला भस्मासुरें जिंकिलें ॥
धरुनि तुळी पार्वती त्वरेनें स्कंधावर वाहिलें ॥
लपूं लागला सांब तेव्हां मम पतीस पाचारिलें ॥
मोहनी रूप प्रत्यक्ष धरुनी त्या राक्षसास मारिलें ॥
गजेंद्र करितां धांवा नक्रासह त्या उद्धारिलें ॥
सुधन्व्यास तैला मधिं तळतां तैल थंडें जाहलें ॥
अशी घालितो उडी संकटीं बघ माझा श्रीपती ॥
कोमलांग राजीव नेत्र नव्हे शिवा सारखा जती[4] ॥
लक्षुमि गर्वें निंदा बोलुनि झिड कारिति पार्वती ॥
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज भीय असो पशुपती ॥ ५॥ ल०
नको सांगु बडिवार रिकामा लक्षुमि नानापरी ॥

---

१ सरळ स्वभावाची नाहींस. २ देवांनीं समुद्र मंथन करून १४ रत्नें काढिलीं त्यांपैकीं 'लक्ष्मी' व 'शंख' हीं आहेत म्ह० शंखाला तिचा सहोदर म्ह० सखाभाऊ म्हटलें आहे. ३ धर्मानें अश्वमेधयज्ञानिमित्त सोडलेला वारू हंसध्वज राजा (सुधन्व्याचाबाप) ह्यानें धरिला, व त्याच्या संरक्षणार्थ आलेल्या पांडव सैन्याशीं लढ- वया करितां आपल्या सर्व लोकांस, (कोणी आज्ञाभंग केल्यास कढत तेलांत त्यास तळूं असें भय घालून, ताकीद दिली; परंतु त्याचा मुलगा सुधन्वा हा लढावयास न झाल्यामुळें राजानें त्यास तापलेल्या तेलांत टाकिलें, तेव्हां तो मुलगा परम कृष्ण भक्त होता, म्हणून तें तेल तत्काल थंड झालें. अशी कथा आहे. ४ यति.

नंदाचीं गोधनें चारिलीं कुंजवना भीतरीं ॥
मुखांत घालुनि वेणू वाजवुनि मोहित करि सुंदरी ॥[1]
गवळ्याचें उच्छिष्ट भक्षिलें नव्हे निर्मळ श्रीहरी ॥
श्यामवर्ण सर्वांग, खोंवितो मयूर पिच्छें शिरीं ॥
नवनित-चोरें कसें मर्दन केलें दैत्याचें तरी ॥
लग्न लाविलें बसून रिसाशीं, कुब्जा होती दुती ॥[2]
किती एकक गुण सांगु ऐकतां दुःखित होशिल चित्तीं ॥
मत्स्य कूर्म हा सूकर सिंह वामन श्रीपती ॥
जन्म गेला पहा अशा खालि म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥६॥ ल०
अनंत कोटि ब्रम्हांड निर्मिता जगांत जगवेगळा ॥
चार वेद सा शास्त्रें धुंडितां कुंठित झाल्या कळा[3] ॥
निराकार निर्गूण सगुण मी पाहुनि पडलें गळां ॥
जन्मों जन्मिं हा असो पती मज घनश्याम सांवळा ॥
परम सुशिल निष्कलंक वर्नि उद्धारलि अहिल्या शिळा ॥
नामस्मरणें शीतळ झाला सांब-देह सागळा[4] ॥
मुकुटमणी वैकुंठ पीठ ज्या अमर सदां वंदिती ॥
प्राप्त व्हावे हे चरण म्हणुनि किति समाधिस्थ बैसती ॥
लक्ष्मि गर्वें निंदा बोलुनि झिड कारिति पार्वती ॥
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशुपती ॥७॥ ल
ताडपत्र शृंगार म्हणुनि ज्यां छळिलें जइं शंकरा ॥
प्रसन्न झाला महेश मज समजावी घेउनि करा ॥
शृंगाराचे पर्वत पडले अमोल एकक हिरा ॥

१ जांबवान् नावाच्या अस्वलाची जांबवती कन्या कृष्णानें वरिली; त्या गोष्टी स अनुलक्षून हें लिहिलें आहे. २ कुब्जा ह्या नावाची अंगानें तीन ठिकाणीं वाकडी अशी कंसाची एक दासी होती; तिचें काम उत्तम चंदनाची उटी तयार करण्याचें होतें. कृष्ण व बळराम ह्यांस कंसानें गोकुळांतून आणविलें असतां ते मथुरेंत रस्त्यातून चालले तेव्हां त्यांस पाहून कुब्जेनें त्यांच्या आंगांस गंधाची उटी लाविली. मग कृष्णानें तिची हनुवटी हातानें धरून व पायावर पाय देऊन तिला सरळ केलें, आणि तिच्यावर कृपा केली; अशी कथा आहे. ३ चौसष्ट कला. ४ सगळा.

कुबेराची संपदा तुळेना अहारे विश्वेश्वरा ॥
एकरूप शिव, विष्णू लक्ष्मी गौरी एक स्मरा ॥
लय लावुनि एकाग्र भजावें मृत्युंजय श्रीधरा ॥
लक्ष्मी पार्वतिचा संवाद ऐसा गोड हा खरा ॥
भक्ति पुरस्सर जपुनि करावें प्रसन्न नित हरिहरा ॥
महादेव गुणि सांब-हरीच्या चरणांबुजि लोळती ॥
प्रभाकराच्या कवना गुणिजन हेत धरुनि धांवती ॥ ८ ॥ ल०

# आनंद तनय

## श्लोक-मार्कंडेयाख्यान

मृकंडु ऋषीस पुत्र नव्हता म्हणून त्याचे स्त्रीने त्याला शिव प्रसन्न करून घेऊन त्या पाशीं पुत्र मागण्यास सांगितलें, त्या प्रमाणे त्यानें पुत्र मागितला; पण शिव म्हणाले कीं एक १६ वर्षे आयुष्याचा पण सुंदर आणि शाहाणा आणि दुसरा १०० वर्षे आयुष्याचा पण कुरूप आणिं मूर्ख असे दोन पुत्र आहेत, ह्यांपैकीं जो तुला आवडेल तो तूं घे. मृकंडूनें १६ वर्षे आयुष्याचाच मागितला आणि शिवानें तो दिला. पुढें १६ वर्षे भरण्याचे सुमारास आई बापांस फार वाईट वाटूं लागलें; तेव्हां मार्कंडेयानें ( मृकंडु पुत्रानें ) भिऊं नका, मी शिव प्रसन्न करून घेतों म्हणजे मला भय नाहीं, असें सांगून तो शिव पूजेस लागला. पुढें शिव प्रसन्न होऊन त्यानें मार्कंडेयाचे अंतसमयीं आलेल्या यमास लाथ मारून पाडून मार्कंडेयास चिरंजीव केलें; ही कथा पुढील आख्यानांत सांगितली आहे.

शिव हर मृड शंभो छंद जैं लागला हो ॥
सुरवर वर लाहो सर्व-सौभाग्य-लाहो ॥
असि सुरस कथा हे वर्णिलीसे पुराणीं ॥
अजि तुम्ही परिसा हो पूर्ण होती शिराणी ॥ १ ॥

१ नित्य. २ ह्या पदाचा संबंध सांब व हरी ह्यांकडे आहे ३ पावो. ४ लाभ. ५ इच्छा.

पूर्वी एक मृकंडु-नामक मुनी सत्कर्म-धर्मोथिला ॥
कांतेनें प्रिय कांत तो प्रियपणें पुत्रार्थ हों प्रार्थिला ॥
संतानाविण हें जिणें जड जगीं संसार निःस्सारसा ॥
भासे यास्तव हो स्तवा पशुपती[1] मागां कुळो-द्धारसा ॥ २ ॥
जाणोन त्द्व्रत तिचें मुनि-राज-राजें ॥
हे मी सुखी करिन फार सुता-तुरा जे ॥
तो आचरे गिरि-दरींत[2] महा तपातें ॥
सोसूनिया कठिण-वात-हिमा-तपातें ॥ ३ ॥
ध्यानीं बसे मुनि उदार-सदा-शिवाचे ॥
पंचाक्षरी[3]-प्रमुख मंत्र जपोनि वाचे ॥
ऐसें पुरश्चरण[4] संचित फार केलें ॥
शेखीं[5] तयासि निज-पुण्य फळासिं आलें ॥ ४ ॥
झाला प्रसन्न मुनि-मान्य पिनाक-पाणी ॥
बा रे अभीष्ट वर माग म्हणे सु-वाणी ॥
मी तो विरक्त विभवादि नको परंतु ॥
संतान एक मज दे कुळ-हेतु-तंतु ॥ ५ ॥
त्या नंतरें शिव सनातन-कर्म-साक्षी ॥
बोले सखोल तनु अर्ध जया मृगाक्षी ॥
देईन दान परि एक विधान भासे ॥
तूं एक माग मग लाग विवेक- कासे ॥ ६ ॥
साधू सुंदर शाहणा सुत तया सोळाच वर्षें मिती ॥
जो का मूढ कुरूप तो शत वरी वर्षें असे स्वस्थिती ॥
या दोहींत कसा मनांत रुचला तो म्यां तुतें दीधला ॥
झाला थोर तटस्थ ऐकुनि मुनी दोहीं कडे वेधला ॥ ७ ॥
मग म्हणे मुनि राज कृपा निधी ॥ घरिं विचारुन येईन आवधी ॥
निज-वधूंसि कसा सुत मानला॥पुसुन येइन सांब शिवा भला॥८॥
त्वरित गति निघाला शीघ्र सद्माशि आला ॥
प्रिय-वधूंस वराला सांगता सांग झाला ॥
मग सति पद माथां वंदुनी प्राण-नाथा ॥

१ शिव. २ पर्वतगुहेंत. ३ नमःशिवाय हा मंत्र. ४ मंत्रजप. ५ शेवटीं.

कथि न सुरस गाथा सर्व संसार-बाधा ॥ ९ ॥
मोठा वृक्ष विमूढ रूपरहित प्राणें जिणें राहती ॥
ते पाषाण धरेसि जाण जड कीं कल्पांतही पाहती ॥
लोकीं टाकिति घूक काक बक ते दीर्घायुषी सांग ते ॥
ऐसा पुत्र नको नको प्रिय-तमा पायांस मी लागतें ॥ १० ॥
मूर्खांचें वय दुःख दायक जगीं मातापित्याचीं मुखें ॥
या लोकीं उजळी कदापि नव्हती चित्तास कैचीं सुखें ॥
तो भूभार विकार-कारण कडा सांगावया भागतें ॥
ऐसा पुत्र नको नको प्रियतमा पायास मी लागतें ॥ ११ ॥
सारा-सार-विचार-पंडित महा-चातुर्य-चिंतामणी ॥
विद्या वेद विनोद वाद बुधता वेदांत-बोधा धणी ॥
रूपें सुंदर देह दिव्य धरिला थोड्या वयाचा जरी ॥
वंशोत्तंस अभंग मंगळ निधी कल्याण कारी तरी ॥ १२ ॥
धीमंत तो करि सु-कर्म निज-स्वभावें ॥
कर्मे स्व-धर्म उजळेल गुण-स्वभावें ॥
धर्मेंच मर्म समजेल तदा भवारी ॥
तुष्टेल इष्टद सदा-शिव कष्ट वारी ॥ १३ ॥
आकर्णोनि सुपर्णसा पुन-रपी पूर्व-स्थळा पातला ॥
साष्टांगें प्रणिपात त्या मुनि-वरें पादां-बुजीं घातला ॥
दे देवा मज पुत्र सुंदर भला ज्ञाता सुत्द-त्ताप-हा ॥
गौरी-नाथ तथास्तु बोलुनि निज-स्थानासि गेला पहा ॥१४॥
आश्रमीं मग मुनी प्रमदेशीं ॥
नांदतां गिरि-गुहां-तर-देशीं ॥
गर्भ-चिन्ह धरिलें पति पाहे ॥
तो म्हणे मुनि महेश-कृपा हे ॥ १५ ॥
यारीती नव मास पूर्ण भरतां सत्पुत्र झाला भला ॥
तोषा-वेश विशेषसा मुनि-वरा संसार त्या भासला ॥
पाहे पुत्र-मुखास अंतर-सुखा लेखा नसे माय ते ॥
ब्रम्हांडीं न समाय पुत्र-विभवें सांगों कथा काय ते ॥ १६ ॥
मार्कंडेय अशी मृकुंडु मुनिनें नामा-भिधा ठेविली ॥

वाढे बाळक बोबडें जंव वदे ते वाक्-सुधा सेविली ॥
झाले वत्सर पांच योग्य म्हणुनी केला द्विजाती भला ॥
झाला धर्म-निधान तो गुरु-कुळीं विद्या भली लाधला॥१७॥
तर्क-व्याकरणादि-नाटक-कळा-लंकार-शास्त्रांतरीं ॥
ज्याचा खेळ अशी विशाळ झळके प्रज्ञा-प्रभा अंतरीं ॥
लीलाप्राय समस्त प्राकृत-कथा वेदांत-सिद्धांत ते ॥
हातीं आमलका-समान डुलती सांगों किती काय ते॥ १८ ॥
यापरी पुरवितां शिव डोहळे ॥
भोगिती सरस ते सुख-सोहळे ॥
लोटतां पळ घटी दिन काळ जी ॥
लागली उभयतांसहि काळजी ॥ १९ ॥
वर्षांवरी स्वसुख-वर्षत वर्ष जातां॥चित्तांत जीतचि उठे बहु हर्ष जातां॥
माता पिता उभयतां भय-ताप-संगें॥संतप्त गुप्त रुदती बहुता-प्रसंगें॥२०
हा संकटा कट कटा विकटा कपाळा ॥
कां दीधला सुत मला सुर-लोक-पाळा ॥
तों तों सुखी न गणितांचि अशा भयातें ॥
दैवा फुटे त्द्दय आठवितां वयातें ॥ २१ ॥
मार्कंडेया कारणें माय-बापें ॥ झालीं दीनें शोषिलीं शोक तापें ॥
वर्षें गेलीं पंधरा आजि याला ॥ एका वर्षा केंवि देखों तयाला ॥ २२ ॥
धरिल धाक मनीं वदतां तया ॥ बहुत मानिल हा रुदतां भया ॥
म्हणुनि ना रुदती वदती भिती ॥ उभयतां सहज-स्थिति दाविती ॥ २३ ॥
परंतु तें दुःख मनीं न झांके ॥ सर्वेंद्रियां शोक-समुद्र फांके ॥
येती बळें लोचनिं बाष्प-धारा ॥ या इंगितें जाणविलें कुमारा ॥ २४ ॥
सवा-जोडुनि हात वदे मृदु मात कशास मनांत विखेद करां ॥
ई. काय उणें पडलें मज पासुनि पाय नमी विनवी पितरां ॥
कंठ ससद्गद बोलति ते शितिकंठ-वरें दिधलासि बरा ॥
संकट घालुनि शंकर दे वर शंकतसों सकळंक-वरा ॥ २५ ॥
कां उगलीं न वसोंचि घरीं नवसोनि शिवा सुत देइं म्हणों ॥

---

१ सांबानें जो वर दिला तो 'सकलंक म्ह० संकटाचा आहे म्हणून अशा वराला.

पुण्य-तपेंचि वरेण्य विभूवर पुण्य वदे गति काय जणों ॥
षोडश-वार्षिक पंडित कीं शतवार्षिक मूर्ख मनास रुचे ॥
तो दिधला वदतां बुध-भूषण मागितलेंचि असेंचि सुचे ॥ २६ ॥
काम रुदंत होति त्या प्रति निरोपितां ॥ वदति यापरी माउली पिता ॥
दावृ० शिव शिवा असा खेद कासया॥करितसां तुम्ही नाहिं नाश या॥२७
शिव दयाळु जो दे सुसंतती ॥ भजति त्यांचिया रक्षितो तती ॥
अजि तया उणी काय संपदा॥विनटतां पदा वारि आपदा ॥ २८ ॥
भवन कानना शोक-नाशका ॥ शरण जातसें लोक-नायका ॥
अभय-दान दे तोचि साधका॥म्हणुनिया तया काय साधका॥२९
निशि दिनीं भजा अंबिका-पती॥भजे तया कळी काळ कांपती ॥
उभयतां विचारूनि मूल तो ॥ अभयतें भजा आदिमूल तो ॥ ३० ॥

श्लोक. पूजानुरक्त बहु भक्त विरक्त झाला ॥
चित्तीं जपे सतत सांब-पदां-बुजाला ॥
मृत्युंजयाविण जगीं भय कोण नाशी ॥
निर्धार हा समजुनी नियमी मनाशी ॥ ३१
जपत तपत ऐसा तो करी तीर्थ यात्रा ॥
धवल शुभ विभूती लाउनी सर्व गात्रां ॥
स्फटिक-मणि-गणाच्या रम्य रुद्राक्ष-माळा ॥
करिं शिरिं निजकंठीं नित्य घाली सुढाळा ॥ ३२ ॥

सवा-पंडित थोर मृकंडु-कुमार अखंड शिवार्चनि मंडित झाला ॥
ई. हिंडत हिंडत चंड-महेश-कवेरि-सुता-तटिनी प्रति आला ॥
त्याच दिनी यमगंड मनीं समजोनि मुनि-प्रभु पार्थिव-पाणी ॥
पूजितसे तिळ-तंदुळ-बेल-फुलें शिव शंकर गर्जत वाणी ॥ ३३ ॥

चूर्णिका. श्री शंकर-पद-पंकज-भजनां-कितां माजि अग्रेसरें ॥
मृकंडु-तपो-धनाचिया कुमरें ॥
देह-गेह-मोह त्यजुनि एकसरें ॥

---

१श्रेष्ठ. २चांगलें (पुत्र दिला म्हणून जें बोलणें तें)पण पुढें त्याची गति काय होणार कोणास ठाऊक. ३ ह्या मार्कंडेयास. ४ "त्या विणें नसे अन्यथा गती" असाही पाठ आहे. ५ जुनाट-शिव. ६ चंडमहेशाचें देऊळ जिचे काठीं होतें अशी कावेरी नदी. ७ मरणकाळ. ८ पार्थिवलिंग.

सर्व विषय विषासम मानुनि विरागा वसरें ॥
मज्ञेचेनी मसरें श्रीचंद्र-चूड-चरण- नलिन-
ध्याया विना नाठवोनि दुसरें ॥
दंड-धर-मचंड-भय मानुनी षोडश वर्षांतिक गड ॥
समजोनी तांडव-युक्त अखंड आराधना आरंभिली ॥ ३४ ॥
मंदाकिनी-जळ-तिळ-तंदुळ-बिल्व-दळीं ॥
मंदार-करवीर-इंदीवर-बकुळीं ॥
श्रीचंदन-केशर-कस्तूरिकादि-परिमळीं ॥
भक्तां माजी परम-बळी पूजि शांभव लिंग ॥
मानसीं योजी धीर अभंग गर्जत नामें नीट निसंग ॥
शंभो देव शंकर मंगळ मद असो ॥
ऐसीये अवसरीं चिन्मय ध्यानीं तन्मय होउनि ॥
बैसला मुनि-राज-केसरी ॥
तंव जाणुनि आयुष्या-वसान-वारी ॥
जैसे गिरीहुनि उतरे महा-मवाह-वारी ॥ ३५ ॥
तैसे हाकित टाकित गर्जत आले दूत अचाट ॥
दुर्धर जैसे घोर पिसाट पाहति पूजा-पूर्तिचि वाट ॥
तों मुनि झाला शंकर-भाट ॥
वर्णित हाजी मुनि-जन-काजीं मानस धाजी मी भयवाजी ॥
येवुन मार्थितो हर हरा निज-निटिल-निर्गत ॥
ज्वलन-ज्वाला-भस्मीकृत-स्मरा गौरी-हरा ॥
तांडवावसान तूं जटा-धरा मणता-र्ति-हरा ॥
पाहिमां पाहिमां शंभो ॥ ३६ ॥

श्लोक. आठवोनि विपदा शिव पूजी ॥ अर्पूनी शिव-पदांशि वपू जी ॥
आदरीचि परमा नियमातें ॥ जो मनांत पर मानि यमातें ॥३७॥
त्द-त्पद्मीं शिव-पाद-पद्म धरुनी पद्मा-सनीं बैसला ॥

१ वेळ. २ उदक. ३ मुनिजनाच्या कार्यी. ४ नम्र झालेल्यांची पीडा दूर करणाऱ्या. ५ विपत्ती. ६ आसन मांडी घालून.

जैसा पद्मज पद्म-पाणि-युगुलीं प्रार्थी तसा भासला ॥
त्या काळीं विकराळ सेवक यथाकाळीं मुनी-द्वावरी ॥
काळें पाठविलें बळें क्षिति-तळीं त्यां कोण पां आवरी ॥ ३८ ॥
आले गर्जत खड्ग-खेटक-गदा-पाणी दणाणी धरा ॥
हातीं झेलित वागुरा निगदिती वोढा विदारा धरा ॥
धांवा घेत उफाळती द्विजवरा ते लक्षिती लोचनीं ॥
तों भ्याले शिव-मूर्ति देखुनि दिठीं ध्यानीं जगन्मोहनीं ॥ ३९ ॥
दचकती चकती धृति सांडिती ॥ प्रबळ ते बळ तेथ न मांडिती ॥
रय-मदा यम-दास विरामिती॥मग मनीं गमनीं धरिती मती॥४०॥
पूजा-समाप्ति समयीं दृढ-दीर्घ-पाशीं ॥
वोढूं म्हणोनि यम-हेर उभेच पार्शी ॥
हें धर्म-मर्म जंव जाणवलें द्विजाला -
तों तों सदाशिव-पदांबुजि सज्ज झाला ॥ ४१ ॥
भ्याले असें समजुनी शिवपूजनातें ॥
लेखीच ना मुनि मनांत रिपू-जनातें ॥
वाचेसि नाम जपतां शिव-शंकराचें ॥
सामर्थ्य लेश न चले यम-किंकरांचें ॥ ४२ ॥
सवाई. देखुनि दंग मुनींद्र अभंगते, जाति विहंग तसे यमधामा ॥
चार समस्त विचार निवेदिति फार हटेंचि जपे शिव-नामा
पार्थिव-चंड करींच अखंड भजे कळभंड तनू स्थिर दावी ॥
बोलुनि-यां परि ते नमिती करिं यावरि चाकरि काय करावी॥४३
श्लोक. ऐकतांचि यम क्रुद्ध जाहला ॥ सेवकां प्रति म्हणे सजा हुला ॥
आजि सिद्ध करणें द्विजा हला॥हें प्रयोजन विना न जाहल्या॥४४

१ ब्रम्हदेव. २ हातांत कमल घेऊन आणि दोन्ही हात जोडून. ३ प्रार्थना करतां. पूर्वी एकदां शिवाचा अंत लावण्या साठीं ब्रम्हदेव वरती आणि विष्णू खालती असे गेले होते. तेव्हां ब्रम्हदेवाला शोध लागला नसतां शोध लागला असें त्यानें खोटें सांगितलें; म्हणून शिवानें "तूं अपूज्य" होशील असा ब्रम्हदेवाला शाप दिला, ( त्यावरून आतां पृथ्वीवर ब्रम्हदेव कोणी पूजीत नाहीं ) त्यावेळीं ब्रम्हदेवानें शिवाची हात जोडून प्रार्थना केली अशी कथा आहे. ४ हेर. ५ शिवाच्या उग्र मूर्तीचें पार्थिव लिंग. ६ गोगाऱ्यांतील एक भेद आहे. रेड्याला. ८ हुला.

अश्व- झाला सकोप पर जाला मुठाळुनि भुजालागींच थापटि करें ॥
धाटी- घाला द्विजावरिच घालवया यम निघाला सवेग निकरें ॥
छं०. पाला समर्पित कपाला म्हणुनि तंवचि पालाणुनी निर्ज-हला ॥
आला मुनीजवळि आलांपितांचि जाळि आलांबुसा उसळला॥४५

श्लोक. क्रोधें काळ उफाळिला भुजबळें जाळें झुगारी गळां ॥
तो झांकोनि दिठी शिवा प्रति मिठी मारी मुनी आगळा ॥
लिंगाही समवेत पाश जडतां हांकारिलें ब्राम्हणें ॥
शंभो शंकर धूर्जटे पुरहरा आतां नुपेक्षीं म्हणे ॥ ४६ ॥
भूता-धीश्वर भक्त-वत्सल भवा-राती भवानी-पती ॥
भोळा शंकर दिव्य तो प्रकटतां दिग्पाळ त्या कांपती ॥
लिंगा पासुनि पिंग पिंगट जटा प्रोत्तुंग बाहू करीं ॥
ढक्का शूल कपाल सायक करी हांसोनि रोषोत्करीं ॥ ४७ ॥

चूर्णिका. ऐसी ऐकुनि दीनवाणी श्रीमत्पिनाकपाणी ॥
लिंगा पासुनि धिंग भीमशंकर दुष्कर पिंग-
टाक्ष उठावे कोटि पतंग-सोज्वळ अंडीं तुंग भुजंग ॥
माथां तरंगति गंगा-तरंग हस्तकिं नाचति दिव्य कुरंग ॥
तेणें देखुनि यम तृण लेखुनि पद वक्षस्थळावरि ताडिला ॥
वसुंधरे वरी पाडिला आल्हादूनि देवें ॥
नृसिंव्हें प्रऱ्हदा परी रक्षिला ॥
तंव तो मार्कंडेय जयजय शब्दें उदेला ॥
त्रिवार चिरंजीव म्हणुनी संबोधिला ॥
आनंद-नंदनें नित्यानंदें भरोनि वारंवार ॥
शिव पद पंकजें वंदिलीं ॥ ४८ ॥

श्लोक. निरखुनि यम डोळां मारिली लात देवें ॥
क्षण न लगत भूमीं पाडिला वामदेवें ॥
सुरवर सुमनांचे वर्षती भार भारी ॥
मुनि नमुनि उभा तो धीट जैसा इभा-री ॥ ४९ ॥

---

१ जाळ्याला. २ हातीं धरून. ३ बिल्वपत्रें. ४ शिवाला. ५ सोगीर घालून. ६ आपल्या रेड्याला. ७ भोंपळ्याप्रमाणें. ८ धिप्पाड. ९ अतिक्रोधानें. १० दुर्धर. ११ आनंदतनयानें; हें ह्या आख्यानाच्या कवीचें नाव. १२ सिंह.

त्वरित गति पळाले दूत दाही दिशाला ॥
म्हणति मनि अशाची व्यर्थ सेवा कशाला ॥
मग नग-पति-कन्या मान्य धन्या प्रभूतें ॥
स्तवुंनि निरखितो तैं सूत देव प्रभूतें ॥ ५० ॥
मृकंडूच्या बाळा धरि त्द्दयिं काळांतक करें ॥
म्हणे बारे वत्सा भजन-जळ-मत्स्या न विसरें ॥
जनामध्यें कांहीं भय लय कदाही तुज नसो ॥
चिरंजीवी होई त्द्दयिं विष-बाधा तुज नसो ॥ ५१ ॥
चिरंजीवी केला स्वशरण मुनी काळ दमुनी ॥
तदा आले ब्रम्हादिक सुर उभे पाय नमुनी ॥
मुखें नाना रीती स्तवुनि करिती ते विनवणी ॥
महादेवा तूंतें विहित न दिसे सांग करणी ५२
प्रभो तूझे आज्ञे विरहित नसे दंड धरिला ॥
तसा तो ही ऐसा प्रहरुनि हरा मान हरिला ॥
क्षमा कीजे देवा करि पद-सुसेवा विधि वदे ॥
तयातें संरक्षीं सकरुण निरीक्षीं अभय दे ॥ ५३ ॥
मुला मार्कंडेया तव नियम सोळाचि वरुषें ॥
यथा काळीं काळें म्हणुनि उभिले पाश सरिसे ॥
म्हणे याचा नाहीं अणु भरिही अन्याय अगती ॥
तुवां ऐसें केलें तरि वदतसे लोक जगतीं ॥ ५४ ॥
परिसुनि सुरवाणी तुष्टला शूल-पाणी ॥
वदत मधुर वाणी नित्य आनंद-खाणी ॥
शिव-भजन करीती ते जगीं एक-रीती ॥
विषयि विषय-भीती त्यां नसे काळ-भीती ॥ ५५ ॥
वर्षें षोडश हाचि निश्चय खरा मिथ्या नव्हे मद्गिरा ॥
गेलीं कल्प-शतें तरी मुनिवरा ऐसीच काया स्थिरा ॥
राहो नित्यपणें म्हणे तंव हरा वंदी सुरांचा फरा ॥
तेव्हां तो नगराज त्र्यंबक बरा वंदोनि गेला घरा ॥ ५६ ॥
मुनीतें बोलेहो तदुपरि महादेव समजा ॥
न चाले आम्हांसीं भय यम करी काय गमजा ॥

त्वरें जाई बाळा बहुत श्रमती तात जननी ॥
तुझ्या नामा बारे निशिदिनिं वसे शब्द अननीं ॥ ५७ ॥
बदोनी असें धाडिलें त्याश्रमाला ॥ तया पाहतां नाश झाला श्रमाला ॥
धरी माय पोटीं तया बाळकासी॥मुखीं वर्णिती त्या जगत्पाळकासी॥५८
कसा वांचलासी मुला तूं अपायीं ॥ वदे तो शिवें वाचवीलें उपायीं ॥
बहू सौख्य झालें मृकंडूसि पाहें॥मितीनें तया बाळका लागिं पाहे॥५९
ऐसें रक्षियलें तयासि समजा त्या शंकरें एकदा ॥
त्याचें नाम जपा निरंतर तुम्हीं नेदी श्रमातें कदा ॥
ज्याची कीर्ति न वर्णवेचि सहसा त्या नारदा तुंबरा ॥
तो आनंदसुत स्वयें हरि हरा अर्जोनि गर्जे बरा ॥ ६० ॥

---

## श्लोक-उमा रमा संवाद.

एके काळीं पार्वती आणि पद्मा[1] ॥ सारी-पाटा खेळती चित्र-सद्मा[2] ॥
डाई येतां बोलती लोक-धर्मा ॥ हांसोनीयां काढिती वर्म-कर्मा ॥१॥
कोठें भिक्षुक[3] सांग गे, बळिगृहीं मागे भुमी-दान तो ॥
कोठें तो पशु-पाळ[4], गोकुळिं असे वत्सें गुरें राखितो ॥
सर्पा-धीश[5] कुठें असे वद सखे, निद्रिस्त शेषावरी ॥
कोठें सांग स्मशान-वास[6], करि तो[7] वृंदे[8] स्मशानीं हरी ॥ २ ॥

१ लक्ष्मी. २ चित्रानें सुशोभित केलेल्या गृहांत. ३ भिक्षा मागणारा—शिव. ४ पशु रक्षक—शिव. ५ सर्पांचा स्वामी म्ह० पुष्कळ सर्प आंगावर बाळगणारा—शिव. ६ स्मशानांत रहाणारा—शिव. ७ स्मशानवास—स्मशानांत राहणें. ८ वृंदेबरोबर. वृंदा ही जालंधर नामक असुर होता त्याची स्त्री. ही मोठी पतिव्रता होती म्हणून तिचे पुण्यानें सुरासुरयुद्धांत जालंधराचा पराजय होत नसे. ह्यामुळें विष्णूस संकट पडून जालंधर युद्धांत गुंतला असतां विष्णूनें जालंधराच्या रूपानें वृंदेच्या पातिव्रताचा भंग केला. ह्या पातकानें जालंधर युद्धांत मरण पावला. पुढें वृंदेला जेव्हां हें विष्णूचें कपट समजलें तेव्हां तिनें त्याला स्त्रीवियोग होईल म्हणून शाप दिला; त्याप्रमाणें त्याला रामावतारीं सीतेचा वियोग झाला. पुढें वृंदा जालंधरा बरोबर सती गेली, पण विष्णूला तिचा वियोग सोसवेना म्हणून तिनें सती जाण्यापूर्वीं त्याला सांगितलें कीं मी सती गेल्यावर माझ्या चितेवर तुळस उत्पन्न होईल तिजशीं तूं विवाह कर म्हणजे तुझें वियोगदुःख शांत होईल; त्याप्रमाणें त्यानें केल्यावर त्याची शांति झाली अशी कथा आहे. ह्या कथेवरून विष्णू वृंदे बराबर स्मशानांत होता हें उघड आहे, म्हणून ह्या कथेचे धोरणानें उमा रमेस लावून बोलली आहे.

इंद्राची अमरावती बळि बळें घे शुक्र-यज्ञादिकें ॥
तेव्हां श्री-हरि साह्य होउनि तया मागे महा कौतुकें ॥
दैत्यांच्या वचना जिणोनि सखये देवेंद्र तो रक्षिला ॥
भिक्षा मागुनि शंकरें नृपतिचा सत्पुत्र तो भक्षिला ॥ ३ ॥
ऐके गे सखये स्व-भक्त आपुला जाणोनियां निश्चयें ॥
त्यातें शोधुंनि तुष्टला अतिशयें पुत्रासि देतां स्वयें ॥
स्त्री-पुत्रा समवेत नेउनि पदीं श्रीशंकरें स्थापिलें ॥
देतां मौउसिनें स्तनासि हरिनें जीवें कसें भक्षिलें ॥ ४ ॥
राक्षसी पुतना स्तनीं विष भरी मारीन हे अंतरीं ॥
आणी ते शबरी कृपा बहु परी केली जई श्रीहरी ॥
नेली मोक्ष पदा हरी विषमता नेणें कदां तो स्वयें ॥
पोटा लागि नसे तरी शिव सखे घे वीष गे निश्चयें ॥ ५ ॥
क्षीराब्धी मथिला सुरासुर इहीं रत्नें तदा काढिलीं ॥
दिल्हीं उत्तम पाहुनी सकळिकां श्री शंकरें त्या स्थळीं ॥
वांटी त्यासि नुरे उरे विष तया कोण्ही न घेती पहा ॥
अंगीकार करी म्हणोनि सखये कंठीं धरी शीव हा ॥ ६ ॥
पोटालागि नसे तरीं व्रजपुरीं चोऱ्या करी श्रीहरी ॥
मागे दुग्ध दधीं बरें नवनिता मारी यशोदा बरी ॥
तेव्हां जाउनि भक्षिली यमुनिची माती किती सांगगे ॥
क्रोधें धांउनि मारितां जननिनें वासी कसें तोंड गे ॥ ७ ॥
गौळी गे गिरिजे तयांशि न कळे सद्ब्रह्म हा श्रीहरी ॥
भक्तीनें भुलला म्हणोनि सखये भावार्थ चोऱ्या करी ॥

---

१ शुक्राकडून करविलेल्या यज्ञादि क्रियेनें. २ त्रिपादभूमि मागे. ३ बलीच्या. ४ श्रियाळ राजाचा. ५ चिलया नामक पुत्र ह्याची कथा श्रीधराच्या शिवलीलामृतांतील ओव्याचा उतारा घेतला आहे त्यांत आहे ती तेथें पहावी. ६ परीक्षा पाहून. ७ पूतनेनें. कृष्णास मारण्याच्या हेतूनें पूतनेनें कृष्णास स्तनपान दिलें तेव्हां कृष्णानें तिचे प्राणाचें आकर्षण केलें हीगोष्ट प्रसिद्धच आहे. पूतना ही कंस मामाची बहीण, तेव्हां अर्थातच कृष्णाची मावशी झाली. ८ एक भिल्लीण. हिनें रामचंद्र वनवासांत असतां त्यास वन्यफळें भक्षणास देऊन त्याचें आपले घरीं आतिथ्य केलें होतें. ९ भक्तीनें.

ऐसें कीं न कळे म्हणोनि वदनीं माती-मिसें दाविलीं ॥
ब्रम्हांडें शत-कोटि तोंड पसरी त्या माजि तीं देखिलीं ॥ ८ ॥
ऐके गे गिरिजे हरें वर[1] दिल्हा भस्मा-सुराला जईं ॥
तेव्हां तो सखये फिरोनि पडला श्री शंकराला तईं ॥
तोंडें वासुनियां शिवें स्मरियला श्री-कांत माझा भला ॥
दैत्या भस्म करोनि सोडवि हरी तें सांग तूंवा मला ॥ ९ ॥
लक्ष्मी ऐकसि काळ-यौवन[2] जधीं पाठीस तो लागला ॥
तेव्हां श्रीहरिनें शिवास नमितां तत्काळ तो पावला ॥
कृष्णातें मुचकुंद[3] आड करितां दैत्येंद्र तो पावला ॥
निद्रा मोडि तयासि भस्म करुनी श्रीकृष्ण तो रक्षिला ॥ १० ॥
बाई ब्रम्ह-कपाट पाठिसि जधीं श्री शंकरा लागलें ॥
ब्रम्हांडीं फिरला परंतु न सुटे विष्णूसि बोभाइलें ॥

---

१ ज्याच्या मस्तकीं हात ठेविशील त्याचें भस्म होईल हा वर. असा शिवाचा वर मिळतांच भस्मासुर शिवावरच उलटून त्याच्याच मस्तकीं हात ठेवण्यास लागला. तेव्हां शिवानें विष्णूचा स्तव केला; त्यावेळीं विष्णूनें बटूचा वेष धरून भस्मासुराला भाषणानें संतुष्ट करून वराची परीक्षा पाहण्याकरितां तूं आपले मस्तकावर हात ठेवून पहा म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें भस्मासुरानें करतांच त्याचें भस्म झालें अशी कथा आहे. २ कालयौवन ( कालयवन ) हा एक मोठा दैत्य यवनांचा राजा होता. त्यानें यादवांवर स्वारी केली तेव्हां कृष्णाचें आणि त्याचें मोठें युद्ध झालें; पण तो अजिंक्य आहे असें कृष्णास वाटल्यावरून कृष्ण पळाला. तेव्हां कालयौवनही त्याच्या पाठीस लागला. त्यावेळीं कृष्ण पळतां पळतां ज्या गुहेंत मुचकुंद निजला होता त्या गुहेंत शिरला आणि मुचकुंदाच्या आड लपून बसला. मागून कालयौवन आला त्यास मुचकुंद निजला होता हाच कृष्ण असें वाटून त्यानें त्यास लाथ मारली. तेव्हां मुचकुंदानें जागें होऊन कालयौवनाकडे क्रोधानें पाहिले तों लागलाच कालयौवन दग्ध झाला अशी कथा आहे. ही कृष्णाचे रक्षणाची युक्ति कृष्ण शिवास शरण गेला तेव्हां त्यानें सांगितली. ३ मुचकुंद हा सूर्य वंशी इक्ष्वा-कुकुळांतला राजा होता. त्यानें देव दैत्यांचे युद्धांत देवांस साहाय्य केल्यावरून त्याचा जय झाला. तेव्हां देवांनीं संतुष्ट होऊन मोक्षाशिवाय पाहिजे तें माग म्हणून त्यास सांगितलें. तेव्हां तो नुकताच युद्धश्रमानें थकला होता म्हणून निद्रा करण्यास निवांत स्थल आणि माझे निद्रेचा भंग करील त्यास माझ्या दृष्टिपातानें मृत्यु हें मागितलें. देवांनीं तें लागलेंच दिलें. अशी कथा आहे.

ब्रह्याला उपदेश देउनि सखे रुद्रासि गे रक्षिलें ॥
दोघांच्या स्वरूपांसि भेद नसतां सुःशान तें राहिलें ॥ ११ ॥
विष्णू शंकर दोन भिन्न नसती सद्ब्रम्हिच्या चित्कळा ॥
दोघांची न कळे अतर्क्य करणी ते कोण वर्णी लिळा ॥
शब्दांची कुसरीं विनोद रचिला संवाद झाला भला ॥
लक्ष्मी पार्वति भेटल्या अनुभवें आनंद झाला मला ॥ १२ ॥

# अनंतफंदी.

अनंतफंदी हा नगरजिल्ह्यांतील संयमनेर गांवचा रहाणारा. हा यजुर्वेदी कौंडिण्यगोत्री ब्राम्हण. ह्याचें वडिलाचें नांव भवानीबावा आणि आईचें नांव राऊबाई. ह्याचें आडनांव घोलप.

ह्यांचें फंदी असें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, पूर्वीं संगमनेरं येथें मलिकफंदी म्हणून कोणीएक फकीर होता, तो नेहमीं लोकांत चमत्कारिक रीतीनें वागत असे म्हणून त्यास लोक फंदी असें म्हणत. त्या फकिराचा आणि अनंतफंदीचा फार स्नेह असे त्यावरून ह्यासही लोक फंदी म्हणूं लागले.

अनंतफंदी हा पूर्वीं तमाशा करीत असे. पुढें तमाशा सोडून देण्याचें कारण असें झालें कीं, एक वेळ संगमनेर येथें अहल्याबाई होळकरीण आली होती; तिला हा लावण्याकरून तमाशा करतो असें समजल्यावर तिनें त्यास सांगितलें कीं, तुम्ही ब्राम्हण असून तमाशा करितां हें नीट नाहीं. तोच पश्चाताप होऊन त्यानें डफावर थाप मारून डफ फोडून टाकिला. आणि त्या दिवसापासून तो कथा करूं लागला.

अनंतफंदी यानें कटाव फटके आणि लावण्या फार केल्या आहेत. क्वचित् श्लोक, आर्याही कथेच्या संबंधानें केल्या आहेत. ह्याचा ओंवीबद्ध ग्रंथ एकच आहे. त्याचें नांव "माधवग्रंथ" हाग्रंथ करण्याचें कारण असें झालें कीं,ज्यावेळेस सवाईमाधवराव पेशवे माडीवरून उडीटाकून मरण पावले त्यावेळेस पुण्याच्या कारभारी मंडळींनीं बाजीराव रघुनाथ यांजकडून पुढें झालेल्या सर्व हकीकतीचें एक पत्र अनंतफंदीस पाठविलें, आणि त्याची कविता करूं सांगितली. त्यावरून त्यानें हा ओंवीबद्ध-

ग्रंथ केला. या ग्रंथाचे अध्याय पुष्कळ होते, परंतु त्यांतील हल्लीं सहा अध्याय मात्र सांपडतात.

अनंतफंदीस श्रीपतफंदी म्हणून एक मुलगा होता. त्यास लोक सवाईफंदी म्हणत. तोही कविता चांगली करीत असे. तो शके १७१९ त जन्मून शके १७९४ त कार्तिक शुद्ध ५ स मरण पावला. हल्लीं त्याचे अनंतफंदी आणि गणपतफंदी ह्या नांवाचे दोन मुलगे आहेत. तेहीं कविता करीत असतात. अनंतफंदीनें राजेरजवाड्यांवर कवनें करून वर्षासनें मिळवून ठेविलीं आहेत. तीं हल्लीं चालूं आहेत. ह्यांचा वडिलांपासून चालत आलेला धंदा सराफीचा; तोही हल्ली चालू आहे.

अनंतफंदीची कांहीं कविता मनांत लागलीच ठसणारी आहे. ह्याच्या ओंव्या महिपतीच्या ओंव्याच्या पद्धतीवर आहेत. अनंतफंदीच्या मरणकाळीं त्याचें वय ७५ वर्षांचें होतें.

| | |
|---|---|
| जन्म काल शके १६६६ | इ० स० १७७४ |
| मरण काल शके १७४१ | इ० स० १८१९ |
| कार्तिक शुद्ध ४. | |

## त्याची प्रसिद्ध कविता व ग्रंथ.

कटाव, फटके, लावण्या, माधवग्रंथ ( ओंवीबद्ध. )

### वेंचे-उपदेशपर फटका.

लंडे गुंडे हिरसे तट्टू ह्यांची संगत धरूं नको ॥ नरदेहासी येउन प्राण्या दुष्ट वासना धरूं नको ॥ ध्रु० ॥ भंगी चंगी बटकी सटकी ह्यांच्या मेळ्यांत बसूं नको ॥ बिकट वाट वहिवाट नसावी धोपट मार्गा सोडुं नको ॥ संसारामधिं ऐस आपला उगाच भटकत फिरूं नको ॥ चल सालसपण धरूनि निखालस बोला खोल्या बोलुं नको ॥ पर धन पर नार ह्यांस पाहुनी चित्त भ्रमुं हें देउं नको ॥ अंगिं नम्रता सदा असावी राग कुणावर धरूं नको ॥ नास्तिकपणांत शिरुनि जनाचा बोल आपणा घेउं नको ॥ भली भलाई कर कांहीं पण अधर्म मार्गी शिरूं नको ॥ चाल ॥ माय बापां वर रुसूं नको ॥ दूर एकला बसूं नको ॥ व्यवहारामधिं फ

सूं नको ॥ कधीं रिकामा असूं नको ॥ चा० प० ॥ परी उलाढाली भलभलत्या पोटासाठीं करूं नको ॥ १ ॥ लंडेगुंडे० ॥ वर्म काढुनी शरमायाला उणें कुणाला बोलुं नको ॥ बुडवाया दुसऱ्याचा ठेवा करूनि हेवा झटूं नको ॥ मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्वभार हा वाहुं नको एकाहुंन एक चढी जगामधि थोरपणाला मिरवुं नको ॥ हिमायतीच्या बळें गरिबगुरि बालां तूं गुरकावुं नको ॥ दोदिवसांची जाइल सत्ता अपेश माथां घेऊंनको ॥ बहुत कर्जबाजारी होउनि बोज आपला दवडुंनको ॥ स्नेह्यासाठीं पदरमोड कर परंतु जामिन होउं नको ॥ चा० ॥ विडा पैजेचा उचलुं नको ॥ उणी तराजू तोलुं नको ॥ गहाण कुणाचें डुलवुं नको ॥ असल्यावर भीक मागुं नको ॥ चा० प० ॥ नसल्यावर सांगणें कशाला गांव तुझा भिड धरूं नको ॥ २ ॥ लंडे० ॥ उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करूं नको ॥ बरी खुशामत शहण्याची ही मूर्खाची ती मैत्र नको ॥ कष्टाची बरि भाजि भाकरी तुपसाकरेची चोरि नको ॥ आल्या अतिथा मुठभर द्याया मागें पुढती पाहुं नको ॥ दिली स्थिती देवानें तींतच मानीं सुख कधिं विटूं नको ॥ असल्या गाठीं धनसंचय कर सत्कार्यी व्यय हटूं नको ॥ आतां तुजही गोष्ट सांगतों सत्कर्मा ओसरूंनको ॥ सत्कीर्ती नौबदिचा डंका गाजे मग शंकाच नको ॥ चाल ॥ सुविचारा कातरूंनको ॥ सत्संगत अंतरूं नको ॥ द्वैताला अनुसरूं नको ॥ हरिभजना विस्मरूं नको ॥ गावयास अनंतफंदिचे फटके मागें सरूं नको ॥ ३ ॥ लंडे० ॥

( २ )

येउंदे वाचे नाम देवाचें अष्टौ प्रहरा शिव हर हर हर ॥ धृ० ॥ दे टाकुनि हे छंद वावुगे फंद विषयिंची काय मजा ॥ हरिनामाची लावीं ध्वजा ॥ असार हा संसार त्यजा ॥ तमोगुणाला देच रजा ॥ रजसत्वाची करी पुजा ॥ क्षमा शांति मनिं धरीत जा ॥ भगवीं वस्त्रें करीं पोटभर भिक्षा मागें घर घर घर ॥ १ ॥ येउदे० ॥ परोपकारा शरिर झिजावें जैसा मैलागिरिचंदन ॥ कर सज्जन चरणीं वंदन ॥ सा शत्रूंचें करि कंदन ॥ गृह वैभव वाजी स्यंदन ॥ अशाश्वतीं ह्या हो धुंद न ॥ आठीव मनी दशरथ नंदन ॥ अनंतफंदी म्हणे घालीं विठ्ठला गरके गर गर गर ॥ २ ॥ येउंदे० ॥

## ॥ लावणी. ॥

नरदेहामधिं येउन नर हो साधन ऐसें करा ॥ जेणें भवसागर तरुनि सुखें व्हावें पैलतिरा ॥ ध्रु० ॥ संसारार्णवि भिजा गड्यांनो संसारार्णवि० परंतु परमार्थ साधनातें साधा यांतच मजा ॥ परनारी धनं त्यजा ॥ गड्यांनो परना० ॥ मदमत्सर मीपणा सहित द्या तमो गुणाला रजा ॥ भाव न ठेवुनी दुजा ॥ गड्या० ॥ अकपट होउनि थोर लहानां सम दृष्टीनें पुजा ॥ अन्याय पथें न जा ॥ गड्यांनो० ॥ सद् सद्विचार करुनी लोकीं सत्कीर्तीनें सजा ॥ कोणा नच द्या इजा ॥ गड्यांनो० ॥ परि आश्रय दुःखितांस द्याया तन मन धनें झिजा ॥ संकट समयीं धजा ॥ गड्यांनो० ॥ सत्यवचन राखण्यास न ढळा कथितों ह्या हित गुजा ॥ व्हा सावध नच निजा ॥ गड्यांनो० ॥ पळ घटका प्रहर दिवस, यांहीं अयुष्य होतें वजा ॥ जगदीशाला भजा ॥ गड्यांनो० ॥ अनंनफंदी म्हणे तोचि मग तारिल देउनि करा ॥ १ ॥ नरदेहामधिं० ॥

## वेंचे, माधव ग्रंथांतील.

### ओंव्या, अध्याय पहिला.

शके सत्राशें सत्रा-माझारी ॥ राक्षसनाम संवत्सरीं ॥ श्री माधव गेले कैलासपुरी ॥ राज्य भार सोडोनिया ॥१॥ गणपतीच्या रंगमहालावरी ॥ उभेठाकले क्षणभरी ॥ त्या समयीं तो मोगलारी ॥ काय करिता झाला ॥ २ ॥ धर्म राज्य होतां अखर ॥ पुढिला जाणोनी ता मकार ॥ तो श्री नारायण कुमर॥अवतार आपुला संपवी ॥ ३ ॥ आश्विन शुद्ध द्वादशी॥ उडी टाकिली ते दिवशीं ॥ आश्विन शुद्ध पौर्णिमेशी ॥ कैलासवासी जाहले ॥ ४ ॥ एकाएकी उडी आपुल्यासुखें ॥ टाकिली त्या नारायणात्मकें ॥ प्रयत्नही केले बहुतेके ॥ परंतु असाध्य जाहले ॥ ५ ॥ नानाशीं कळलें वर्तमान ॥ श्रीमाधव पावले मरण ॥ चिंताक्रांत बाळाजी जनार्दन ॥ गोड कांहीं न लागे ॥ ६ ॥ म्हणे हें काय उलटें जाहलें ॥ आम्हास काय येथें ठेविलें ॥ अर्थातची स्वराज्य संपलें॥ चांगलें न केलें श्रीमाधवें ॥ ७ ॥ एकवि जाहला कल्लोळ ॥ नाना पिटिती वक्षस्थळ॥ जीव जंतु समग्र पक्षीकुळ ॥ दुःखार्णवीं पडियेलें ॥ ८ ॥ प्रजा लोक पाळ जितुके ॥ शोकार्णवीं पडिले तितुके ॥ श्री माधवें केलें इ-

तुकें ॥ पुढें दुःख कीं कळेना ॥ ९ ॥ असो या परी दुःख जालें जना ॥ रुद्रभूत माधव नारायणा ॥ सर्वे देऊनि मुख्य सेना ॥ दहन करवी रायाचें ॥ १० ॥ सहज करूनि बंदोबस्त ॥ लोकपाळ गेले समस्त ॥ नाना आपुले सदनीं स्वस्थ ॥ चिंताक्रांत बैसले ॥ ११ ॥ म्हणे आतां केसा करावा विचार ॥ बोलवोनी शिंदे होळकर ॥ अष्ट उमराव ही समग्र ॥ बोलाविले नानांनीं ॥ १२ ॥ आतां दत्त घ्यावा म्हणे नाना ॥ हें योग्य मानलें समस्त जना ॥ परंतु शिंद्याचे नये मना ॥ नानाशी बोलता जाहला ॥ १३ ॥ नानाशीं म्हणे दवलतराव शूर ॥ धनी असतां उभयता वीर ॥ एकापरीस एक धुरंधर ॥ दत्त तो कासया ॥ १४ ॥ अदुग्ध नसता मुलाची माय ॥ मग वर दुग्धाचें कारण काय ॥ जरी नसते आपा बाजीराय ॥ मग दत्त घेणेचि माम ॥ १५ ॥ पदरीं असतां लाखो धन ॥ मग कासया व्याजीं रीण ॥ टाकोनी गंगाजीवन ॥ कूपोदक तें कासया ॥ १६ ॥ सागवानी मोडोनी घर ॥ उभे करावे येरंड शेर ॥ जिवंत असतां लग्न-वर ॥ मग कासया पाटाचा ॥ १७ ॥ टाकुनी धुवा साखर ॥ गुळ कां व्हावा प्रियकर ॥ पोळी असतां भाकर ॥ टाकुनी कां भक्षावी ॥ १८ ॥ हातें वस्त्र फाडोनी आपलें ॥ तुणवीत असावें देउनी मोलें ॥ क्षुधेनें पीडिलीं घरचीं मुलें ॥ इतरा सांगे भोजना ॥ १९ ॥ मिळत असतां दुग्ध मांडे ॥ मग कां खावे ते हो कोंडे ॥ बोलत येत असतां तोंडें ॥ मग मुक्यानें कां खुणवावें ॥ २० ॥ लोणकढें सांडूनि वाया ॥ मग वासाचें तूप कासया ॥ घरचा दीप विझवुनीया ॥ परघरीं अग्नि कां मागावा ॥ २१ ॥ नवें वस्त्र असुनी नेटकें ॥ टाकुनी कां नेसावें फाटकें ॥ घरची असोनी मारतीं कटकें ॥ मग मर्कटें कां ठेवावीं ॥ २२ ॥ घरीं सुवर्ण असतां विपुळ ॥ मग कासया ल्यावें पितळ ॥ असोनी वाळ्याचा पंखा शीतळ ॥ मग साल कां वारावी ॥ २३ ॥ टाकूनीया उत्तम चंदन ॥ मग कां धुंडावें बाभुळवन ॥ हिरा टाकुनी देदीप्यमान ॥ मग कां गारा वेंचाव्या ॥ २४ ॥ असो या परी शिंद्यानें ॥ केलें नानाशीं बोलणें ॥ या वंशावांचूनि म्हणे ॥ इतरास मुजरा ना घडे ॥ २५ ॥ असा ठेवितांची दस्त ॥ मग नाना जाहले चिंताग्रस्त ॥ जबरी पाहूनि टेंकले हस्त ॥ केवढें मस्थ नानाचें ॥ २६ ॥ ऐशी लाउनीया निकट ॥ शिंद्याचें सामर्थ्य पाहूनि विकट ॥ नाना नि-

स्तेज होऊनि फिकट ॥ चिंताज्वरें व्यापिला ॥ २७ ॥ मग मनीं विचार करी नाना ॥ जर दत्ताची करावी योजना ॥ तो शिंदा आमुच्या शहाणपणा ॥ चालों नेदी सर्वथा ॥ २८ ॥ फौजा शिंद्याच्या मांयदळ ॥ चाळीस पलटणें पायदळ ॥ राज्यांत होईल गोंधळ ॥ शिंद्यापुढें बळ चालेना ॥ २९ ॥ तशांत जुन्नरास शिंद्याचीं पलटणें ॥ दोचवरोजां जाणार त्वरेनें ॥ आणावया त्रिवर्गां कारणें ॥ हें गुह्य समजलें नानाला ॥ ३० ॥ शिंदा घेउनी येणार तिघांतें ॥ मग संकट पडेल मातें ॥ मग नानानें परशराम भाउ तें॥मिरजकरातें बोलाविलें ॥ ३१ ॥ कीं शिंद्याची पलटणें न पोचतां ॥ तुम्ही जुन्नरास जावें आतां ॥ घेउनिया राघव सुता ॥ अमृता येथेंची आणावें ॥ ३२ ॥ नानाची आज्ञा घेऊन ॥ दिवसा दोन प्रहरीं पटवर्धन ॥ करिते जाहले प्रयाण ॥ माघ शुद्ध षष्ठी सुमुहूर्तें ॥ ३३ ॥ त्वरित भाऊ गेले जुन्नरांत ॥ रथसप्तमीस पोंचले तेथ ॥ अष्टमीस भेटोनिया त्रिवर्गांत ॥ एकांत स्थानीं बैसले ॥ ३४ ॥ परशुराम भाउ जोडोनी कर ॥ अमृतरायजीच्या समोर ॥ विनंती करीत वारंवार ॥ रावसाहेबाशी ऐकातें ॥ ३५ ॥ कीं पुण्यास ही दोन्ही मुलें ॥ नानानी सत्वरें बोलविले ॥ मग अमृत रायें उत्तर केलें ॥ परशरामभाउतें तेधवा ॥ ३६ ॥ जैसें मला ठेवितां येथें ॥ ह्या दोघांस घेउनी जातां तेथें ॥ फूट पाडूं नका उभयतातें ॥ दोघे एकत्र ठेवावे ॥ ३७ ॥ मीं जरी म्हणतो नका नेऊ ॥ तरी तुम्ही बळें न्यावयास आलांत भाऊ ॥ थोर वयातीत वृद्ध भाऊ ॥ तुम्हाशी म्या काय सांगावें ॥ ३८॥ नानाचे व तुमचे वांटीं मुलें ॥ घालितों मी तुमच्या बोलें ॥ आजपावेतों म्या सांभाळिलें ॥ आतां तुम्ही सांभाळावें ॥ ३९ ॥ म्यां केले रजाचे गज ॥ आतां सोडोनि जाताती मज ॥ डोळां अश्रु आले सहज ॥ रावसाहेबांच्या तेधवां ॥ ४० ॥ मग भाउ म्हणे मुलांची चिंता॥तुम्ही न करावी सर्वथा॥मी सेवक जिवंत असतां॥मुलांस धक्का लागों न दे॥४१॥ उभयतांस मी वाजतें वारें ॥ लागों न दे राघव कुमरे॥ ऐकोनी भाऊचीं मृदूत्तरें ॥ अमृतराय संतोषले ॥ ४२ ॥ अमृतरायें उभयतां लागोनी ॥ विडे दीधले त्या क्षणीं ॥ आपुल्या हस्तें गुलाबपाणी ॥ परशुरामपंतें शिंपिलें ॥ ४३ ॥ विडे घालूनि मुखामाजी ॥ सजवोनी उभे केले वाजी ॥ जाते समयीं आपा व बाजी ॥ वेंघायास आले पशूकडे ॥ ४४ ॥ मग

दोघे बंधु धरिले पोटीं ॥ आतां तुमच्या आमच्या भेटी ॥ तो घडवील जेव्हां जगजेठी ॥ तेंव्हाचो भेटी होतील ॥ ४५ ॥ पोटामाजी घातली डोई ॥ आपा बाजो, उभयताही ॥ दादासाहेब आनंदीबाई ॥ त्यांच ठायीं तुम्ही आम्हा ॥ ४६ ॥ तेरा वर्षे एकत्र ॥ दादासाहेबाचे पुत्र ॥ हे ब्रम्हा विष्णु त्रिनेत्र ॥ हे एके ठायीं होते तिघे ॥ ४७ ॥ आतां पडों पाहे अंतर ॥ मला येथें ठेवितां दूर ॥ असो होईल जय जय कार ॥ जा आशीर्वाद दीधला ॥ ४८ ॥ अमृत रायें अमृतोत्तरें ॥ समजाविलें राघव कुमरे ॥ निघता जैसे रघुवीरें ॥ दशरथातें त्यागिले ॥ ४९ ॥ गोकुळीं टाकुनि तात मात ॥ मथुरेशी गेला सिंधु जामात ॥ मागें यशोदा आक्रदंत ॥ तैसे येथें जाहलें ॥ ५० ॥ अथवा लहू घालोनी रथीं ॥ घेऊनि गेला शत्रुघ्न नृपति ॥ गडबडा लोळे सिता सती ॥ वाल्मिकाचे आश्रमीं ॥५१॥ असो वाढेल कथा फार ॥ उभयतां जाले अश्वस्वार ॥ परशुराम भाउ बरोबर ॥ घेऊनि आले दोघांते ॥ ५२ ॥ खडकी पुला जवळिके ॥ आणली सुमुहूर्ते पाहुनी निके ॥ नानाशी भाउ सांगतां मुखें ॥ हर्ष न माय अंतरीं ॥ ५३ ॥ हे कथा बाजीराव रघुनाथें ॥ लिहून दीधली आपल्या हातें ॥ त्या पत्रासम टीका येथें ॥ कवित्व केलें कवीनें ॥ ५४ ॥ स्वस्ति श्री-माधव कवन सुंदर ॥ संमत बाजी रघुनाथ पत्राधार ॥ त्या पत्राहूनि हा विस्तार ॥ प्रथमोध्याय गोड हा ॥ ५५ ॥

# रामजोशी.

राम जोशी हा सोलापूरचा मुख वस्तू राहणारा, जातीचा देशस्थ ब्राम्हण होता. तो कथा कीर्तन करून आपलें उपजीवन करीत असे. तो कवि असून चतुर वक्ता होता. मोरोपंतानें जशा आर्या केल्या आहेत, तशा ह्यानें लावण्या केल्या आहेत. ह्याची कविता सरस आहे. तो कथेंत प्रायः आपलीच कविता म्हणत असे. कधीं कधीं मोरोपंताच्या आर्याही म्हणत असे. मोरोपंताची कविता ह्यानें फार प्रसिद्ध केली असें सांगतात. हा आपले वयाचे ५० व्या वर्षी वारला.

जन्म शके १६८४ इ०स० १७६२
मरण शके १७३४ इ०स० १८१२

## त्यानें केलेले ग्रंथ.

छंदोमंजरी ( छंदःशास्त्रावर ). लावण्याच्या चालीचीं अनेक पदें.

---

### अनेक प्रकारचीं लावण्यांच्या चालीचीं पदें; त्यांतील कांहीं वेंचे.

### लावणी १

दो दिवसांची तनु हे साची सुरतरसाची करुनि मजा ॥ गमजा करितां मनिं उमजाना हें सुख न पुढें पडेल वजा ॥ भाई सावध व्हा० ॥ ध्रु० ॥ आज उद्यांचा पूर नद्यांचा वयलगद्याचा बहर नवा ॥ उलट्या झाल्या कुलटा रांडा मग कोठिल हो मालपुवा ॥ थाट बसाया पाट रुप्याचें ताट त्यामधें दूध रवा ॥ धना वयाला बसेल घसरा मग विसरा हो गोड खवा ॥ रांडा पोरें वंचक चोरें जंवर मिळवितां तंवर थवा ॥ शितें तंव-रतीं भुतें भोंवतीं कोण कुणाचा सखा जिवा ॥ जोंवरि पैसा तोंवरि बे-सा मंचकिं म्हणतिल घ्याल हवा ॥ बेटा बेटी हतीं नरवटी देतिल हा खूप समज ठिवा ॥ पात यांत कीं घात होतसे हात जोडितों हरिसि भ-जा ॥ फुका सुखाला मुकाल कथितों न कालचा दिन आज दुजा ॥ दो दिवसांची तनु हे० भाई सावध व्हा० ॥ १ ॥ कनकधनाचा मद मदनाचा वोसरल्यावर रंग फिका॥ रुका न पदरीं विकाल घर मग वि-लासभरजरि कुठुन दुका ॥ गज रथ घोडा कलगी तोडा पाईं जोडा लाल झुका ॥ तोडा जाउन खोडा येइल बसेल येखादा धरमधका ॥ सुगंध शाला नरम दुशाला गरम मसाला पान पका ॥ हार तुरे हे बरे न पुढती बुरे हाल खेळाल बुका ॥ कोकशाला नाटकशाला दासी यां-चा घ्याल मुका ॥ कामुक होउनि कां मुकतां परमार्थ सुखाला देह वि-का ॥ कदम मुलाजा यांत भुला जा तुम्हा न लाजा मनिं समजा ॥ दूत यमाचे भूत आणितिल नेला तुमचा बाप अजा ॥ दो दिवसांची० ॥ भाई सावध व्हा० ॥ २ ॥ पुरे करा या मौजा तेथुनि फौजा झाल्याचि रवाना ॥ यमदूताची ढाल बिनीवर बाल सफेदी देखाना ॥ पुढें यमाचे खडे दूत हे बडे हरामी समजाना ॥ मार मारतिल फार कुणी भला मा-

मा काका गौसानां ॥ रांडा आतां मांडा चारिति खांडा म्हणतिल करा- चुना ॥ मूल कुणाचें भूल तुम्हाला चूल चालती तंवर म्हणा ॥ तडका येतिल सारे अड्का हुंडकायाला मरतांना ॥ पीठ गिळेना मीठ मिळेना ऐसें करितिल ऐकांना॥ वेडा होइल परि जन वेडा म्हणतिल पेढा आठि- व ज़ा ॥ अडाल भूवरि पडाल मग तुम्हि रडाल न म्हणा काळ खुजा ॥ दो दिवसांची० ॥ भाई सावध व्हा० ॥३॥ सुभा करुनि मनसुभा येखादा उभा करा परिवार भरा ॥ काय तुम्हाला यांत सांचलें आंत वांचलें अ- युधरा ॥ दारजनाला हार नगांचे भार मुलिस मुलग्यास तुरा ॥ द्याल पु- न्हा जरि घ्याल न देतिल तुम्हांसि त्यांतिल जरा चुरा ॥ कां मरतां ध- न लोभें फिरतां पुरता याचा शोध करा ॥ कोण तुम्हाला वाली तो व- नमाली लाविल पैलतिरा ॥ लोहघनाच्या जाड कवाडा आड बसा कीं बाड चिरा ॥ काळ सखत पाताळ तळांतुनि काढिल अंबुधिमाजि शि- रीं ॥ फार कशाला सार सांगतों बार बार जन्मा नवजा ॥ कविरायाचा बोल नव्हे हा फोल डोल ध्यानीं उमजा ॥ दो दिवसांची०॥ भाई सावध व्हा० ॥ ४ ॥

## लावणी २.

भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा ॥ धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु० ॥ चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरी ॥ जरा तरी समज धरीं अंतरीं ॥ हटा तटानें पटा रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं ॥ मठाची उठा ठेव कां करी॥वनांत अथवा जनांत हो कां म- नांत भलत्या परी ॥ हरीचें नांव भवांबुधि-तरी ॥ चा०॥ काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लांकडें ॥ हीं काय भवाला दुर करितिल माकडें ॥ बाहेर मिरविशी आंत हरिशीं वांकडें ॥ अशा भक्तिच्या रसारहित तूं कसा म्हणविशी बुधा ॥ धरिशि तरि हरिचा सेवक सुधा ॥ १ ॥ जाळ गळ्यामधिं माळ कशाला व्याळ काम कोपला.॥ आंतुनि बाहेर म्हण- विशी भला ॥ वित पाहतां पित्त येतसे चित्त पाहिजे मला ॥ असें हरि म्हणतो नुमजे तुला ॥ दांभिक वर संभावित अभ्यंतरीं भाहिंस बि बला ॥ बहिर्मुख नर नरका लाधला ॥ चा० ॥ तूं पोटासाठीं करि खटप- ट भलतिशी ॥ परि भक्तिरसाविण हरि भेटल काय तुसी ॥ काय ध्या- न धरुनियां गोमुखिला जाळिसी ॥ स्वार्थसुखें परमार्थ बुडविला अनर्थ

केला बुधा ॥ धरिशि तरि हरिचा सेवक सुधा ॥ २ ॥ टिळा टोपिवर शिळा पडो या बिळांत करिशो जपा ॥ तथापि न होय हरिची कृपा ॥ दर्भ मुष्टिच्या गांभि धरुनियां निर्भर पशुच्या वपा ॥ जाळिशी तिळां तांदुळा तुपा ॥ दंड कमंडलु बंड माजविशी मुंड मुंडशी तपा ॥ न सार्थक लटक्या साऱ्या गपा ॥ चा० ॥ ही बार बार तलवार येईल काय पुन्हा ॥ ह्या दुर्लभ नरदेहांत ठेविशी कुन्हा ॥ भगवंत भुकेला भक्तीचा पाहुणा ॥ वर्म कळेना धर्म घडेना कर्म चित न द्विधा ॥ सदा हरि कविरायावर फिदा ॥ भला जन्म हा तुला लाधला० ॥ ३ ॥

## लावणी ३.

जाऊं नकारे विषयाटविची वाट कठिण मोठी ॥ नागविले किति भले गड्यानो असंख्य जन कोटी ॥ ध्रु० ॥ याच वनामधीं भिल्ल नांदतो काम नाम त्याला ॥ पंचशरानें विश्व मोहिलें ठाउक सकळाला ॥ काम क्रोधादिक सांगाती जिंकती काळाला ॥ नितंबिनी वागुरा पसरल्या कामि कुरंगाला ॥ चा० ॥ भजा तुम्ही निशि-दिनीं देवाला ॥ हेंचि निदानीं येइल कामाला ॥ दया नाहींच निर्दय मदनाला ॥ चा० ॥ सरक सरक तूं पडुं नको गहनीं दुर्ममता खोटी ॥ हरी मायेचा खेळ कळेना ढांगिल उफराटी ॥ जाउं० ॥ १ ॥

## लावणी ४.

नरजन्मामधिं नरा करुनि घे नरनारायण गडी ॥ तरिच सार्थक मानव कुडी ॥ ध्रु० ॥ बा चौऱ्यांशी लक्ष वेळ संसार पडला गळां ॥ चिंतेचा पिकला मळा ॥ दार धनाचा लोभ टाकुनी झडकर हो वेगळा ॥ हा कसा उकलिशी पिळा ॥ धना निमित्तें जना पुढें तूं दाविसि नाना कळा ॥ किति तुला मुलाचा लळा ॥ चा० ॥ तूं पडुं नको याचे भरीं ॥ तुझ्या हें खापर फुटतें शिरीं ॥ तुला मी गोष्ट सांगतों खरी ॥ आतां कर तांतडी ॥ ही पुन्हा नये बा घडी ॥ नरजन्मामधीं० ॥ १ ॥ निपट बावळा या विषयाच्या मागें लागसि कसा ॥ कां होशी बा धड पिसा ॥ वयां-धनाची किति चंचळ गति कां धरिशी भरंवसा ॥ हें सकळ मनाला पुसा ॥ उदरासाठीं दुर्धनिकांच्या पुढें पसरिशी पसा ॥ किति उगाळशिल कोळसा ॥ चा० ॥ हें तुला शिकविलें कुणी ॥ दयाळ

नरनारायण धणी ॥ अर्जुनि तरि करि ही घोकणी ॥ विष-वल्लीची जडी ॥ तूं म्हणसिल साखर खडी ॥ नरजन्मामाधिं० ॥ २ ॥ नवस कामना करूनि मनांमधिं म्हणशिल पुरुषोत्तमा ॥ दे सतत विपुल रमा ॥ विषय-वासना तुला तुटेना मानसि या संभ्रमा ॥ काय पुढें बोलशिल अधमा ॥ किती प्रपंचामधें फिरुनियां पावसि विफल श्रमा ॥ कां न करिशी भजनोत्तमा ॥ चा० ॥ हें कसें तुला भावलें ॥ करावी अचळा दारामुलें ॥ मिळेना पुढती हें बाहुलें ॥ कविरायाची घडी ॥ दाविल भवार्णवाची थडी ॥ ३ ॥ नरजन्मामाधिं० ॥

# कितीएक कवींचीं पदें वगैरे.

## शिवराम स्वामीचें पद.

संत दयाळ कसे ॥ राजा रंक जया सरिसे ॥ ध्रु० ॥ देउनि भेटी तोडिति माया ॥ नेउनि दाविति निजपद ठाया ॥ १ ॥ संत० ॥ श्रवणीं पाजुनि अमृतवाणी ॥ नेउनि दाविति चिन्मयखाणी ॥ २ ॥ संत० ॥ शिवरामाचें अभिनव लेणें ॥ लेवविलें मज पूर्ण कृपेनें ॥ ३ ॥ संत० ॥

---

## केशवस्वामीचीं पदें.

### पद १.

धांव विभो करुणाकर माधव देव दयानिधे देवकीनंदन ॥ध्रु०॥ हे करुणाकर दीन-जनोद्धर ॥ हा भव दुस्तर यांतुनि उद्धर ॥ धांव० ॥ १ ॥ काम मदादिक गांजिति हे अति ॥ धांव रमापति सेवक-हितकर ॥ धांव० ॥२॥ जनन-मरण-भय-हरण करि त्वरें ॥ चरणिं शरण दृढ केशव किंकर ॥ धांव० ॥ ३ ॥

### पद २

संतसमागम कराचिना ॥ शांति दया मनिं धराचिना ॥ चिन्मयराघव वराचिना ॥ झडकरि कांहो तराचिना ॥ १ ॥ संतसमागम काशी रे ॥ क्षणभर वस्तिशि जाशी रे ॥ नासति पातकराशी रे पावसि परमपदासी रे ॥ २ ॥ कामतरूवर तोडावा ॥ संशय अवघा मोडावा ॥ सर्वसमागम सोडावा ॥ केशवस्वामी जोडावा ॥ ३ ॥

## पद रंगनाथाचें.

भक्तासि भगवत्भजनें, भवसागर मृगजळवत रे ॥ ध्रु० ॥ चिद्विलास जग नग हेमीं, वस्तुत्वें भेदातितरे॥ अस्ति भाति प्रिय रुप आत्मा, तो नामरूपाविरहित रे ॥ होउनियां अनुभव ऐसा, हरिभजनीं अत्यद्भुत रे ॥ भक्तासि० ॥ १ ॥ जाळिलें संचित समुळीं, ज्ञानाग्नीमाजी निगुती ॥ क्रियमाण पूर्व मवाहें, विधिपूर्वक कर्में घडती ॥ निर्हेतुक निरहंकारें, ब्रम्हार्पण सहजचि होती ॥ प्रारब्ध कलेवर भोगी, साक्षी हा ईश्वरमूर्ती ॥ भक्तासि० ॥ २ ॥ अहिकुंडलवत्तनु पाहतां, संतोष विस्मय न वसे ॥ तैसें या विद्वद्वर्या, स्वरूपाहुनि आन न भासे ॥ मृत्तिकेविण कुल्लाळें, घट कोठुनि आणीलासे ॥ रंगला या निजरंगीं, निर्विषयीं सदांनि विलासे ॥ भक्तासि० ॥ ३ ॥

## पदें अमृतरायाचीं.

### पद १

कोठें नव जावें २ ॥ श्रीहरिलागीं भजावें ॥ ध्रु० ॥ दो चों दिवसां घाटा॥ भरडुनि उदक करुनियां प्यावें ॥ कोठें० ॥ १ ॥ समयीं आल्या अतितासि ॥ यथाशक्ती भोजन द्यावें ॥ कोठें० ॥ २ ॥ उठतां बसतां धामीं ॥ अमृतेश्वरासी ध्यातची जावें ॥ कोठें० ॥ ३ ॥

### पद २

अखंड हरिहरि वदा रे ॥ बापांनो अखंड हरि हरि वदा ॥ किति सेवाल धन दुर्मदा ॥ रे बापांनो अखंड हरि हरि वदा ॥ ध्रु० ॥ काय रानांत आटल्या नद्या ॥ काय तरू म्हणति फळ न द्या ॥ किति कांडोकांडि मिरवाल मुद्या ॥ गेलि आजची घडि न ये उद्यां ॥ रे बापांनो० ॥ १ ॥ काय बिदींत न मिळति चिंध्या ॥ काय न मिळे भोंपळा दुध्या ॥ या तो युक्ति शुकाच्या सुध्या ॥ वाचा एकोबाचा पुस्तकाध्या ॥ रे बापांनो० ॥ २ ॥ काय पर्वति बुजल्या दऱ्या ॥ काय दुकाळ पडला कऱ्यां॥ काय महर्ग तृणाच्या बोऱ्या॥या तो वैराग्ययुक्ति खऱ्या ॥ रे बापां० ॥ ३ ॥ बाहु असतां आपणापाशीं ॥ मग कशास पाहिजे उशी ॥ काय अडचण महदाकाशीं ॥ ठाय नेदि काय पृथ्वी कुशी ॥ रे बापांनो० ॥ ४ ॥ काय लोकिं दारवठे रोधिले ॥ काय न मिळति जुने ओंधळे ॥

ऐसें टाकुनि दुर्मद आंधळे ॥ व्यर्थ अमोल आयुष्य उधळे ॥ रे बापांनो० ॥ ५ ॥ कर जोडुनि अमृत विनवितो ॥ बाहु उभारुनि गर्जतो ॥ जो निश्चय धरुनि बैसतो ॥ त्या घरीं बसल्या राम देतो ॥ रे बापांनो० ॥ ६ ॥

## पद ३

होउनि गोंसावी गोंसावी ॥ हरिकथाचि परिसावी ॥ ध्रु० ॥ गमन नसे ज्या गांवीं ॥ तेथिल वाट कशास पुसावी ॥ होउनि० ॥ १ ॥ मुखें मिळो खंबाइत ॥ अथवा भगवींही नेसावीं ॥ होउनि० ॥ २ ॥ भिक्षा मागुन निस्पृहतेनें ॥ सत्संगति पोसावी ॥ होउनि० ॥ ३ ॥ दुर्वाक्यें सोसुनियां ॥ आपण अमृतवृष्टि वर्षावी ॥ होउनि० ॥ ४ ॥

## पद ४

त्याचा हरि विकला, हरि विकला ॥ प्रेमें हरिगुण शिकला ॥ त्याचा० ॥ ध्रु० ॥ दो चौ दिवेसां सेवी ॥ भाजी चुका चाकवत सुकला ॥ त्याचा० ॥ १ ॥ कर्ज नसे कोणाचें ॥ देण्या घेण्यापासुनि मुकला ॥ त्याचा० ॥ ॥२॥ संतुष्ट यदृच्छा-लाभें ॥ आनंद ज्याच्या हृदयीं पिकला ॥ त्याचा० ॥ ३ ॥ आधिं वंदे अमृतेश्वर ॥ जो नर धनकामिनीवर थुकला ॥ त्याचा० ॥ ४ ॥

## पद ५,

अशाश्वत संग्रह कोण करी ॥ ध्रु० ॥ चिरगुट चिंध्या जोडोनि कंथा ॥ गोदडी हेचि बरी ॥ अशाश्वत० ॥ १ ॥ नित्य नूतन देइल माधव ॥ भिक्षा तेचि बरी ॥ अशाश्वत० ॥ २ ॥ कोण करी घर सोपें माड्या ॥ विवरीं वस्ति बरी ॥ अशाश्वत० ॥ ३ ॥ आत्म स्त्री सुत परकी होती ॥ ठेविति भूमिवरी ॥ अशाश्वत० ॥ ४ ॥ अमृत म्हणे मज भिक्षाडोहळे ॥ उठति अशा लहरी ॥ अशाश्वत० ॥ ५ ॥

## पद श्रीधराचें.

सखया रामा, विश्रांति तुझिये नामीं ॥ म्हणउनि मजला ने त्वरें निजसुखधामीं ॥ सखया० ॥ ध्रु० ॥ अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी ॥ पशु सुत जाया धन धामीं प्रीती मोठी ॥ माझी माझी म्हणुनि त्यां धरिलीं पोटीं ॥ यांच्या संगें भोगिल्या दुःखकोटी ॥ सखया० ॥ १ ॥ सोडुनि सविता धांवलों दिशा दाही ॥ शववत झालों मागुता कौतुक पाहीं ॥

परि खळ जन हे नेदिती कवडी तेही ॥ परि हे आशा पापिणी लाजत नाहीं ॥ सखया० ॥ २ ॥ जंववरि दृढता तंववरि या तनुची प्रीती ॥ जर्जर झाल्या निंदक हे अवघे होती ॥ यांचीं दुःखें तुजला मी सांगूं किती ॥ म्हणउनि येतो श्रीधर काकुळती ॥ सखया० ॥ ३ ॥

---

## पदें आनंदतनयाचीं.

### पद १

बरवें समजा रे उमजा रे ॥ कां करतां गमजा रे ॥ ध्रु० ॥ मायामय जग सारें ॥ अवघें दो दिवसांचें वारें ॥ बरवें० ॥ १ ॥ दारा धन सुत पोरें ॥ अवघीं नागवणीसम चोरें ॥ बरवें० ॥ २ ॥ धरुनी पथ परभारें ॥ तरला आनंदतनय विचारें ॥ बरवें० ॥ ३ ॥

### पद २

रत हरि पदकमलकंद सेवि मनोभ्रमरा ॥ध्रु०॥ दुष्ट दैत्य दमुनि देत निज-भक्ता थारा ॥ द्रुततर मनिं धरुनि भाव सांडि भव-पसारा ॥रत०॥ १॥ शुक सनकादीक मुनी जपति ज्या आधारा ॥ सुरवर मुनि गाति मुखें नित्य निराकारा ॥ रत० ॥ २ ॥ पावन पदरजें करुनि गौतममुनिदारा॥ निशिदिनिं आनंदतनय गाय वेद सारा ॥ रत० ॥ ३ ॥

### पद ३

दाखवीं दिव्य पाय दयानिधे रामा ॥ ध्रु० ॥ हीन दीन आस तुझी, कास पूर्ण आम्हां ॥ धरावया पाहतसे अगा घनःश्यामा ॥ दाखवीं ॥ १ ॥ माय बाप बंधु गोत्र, मित्र तूंचि आम्हां ॥ तुजवीण कोण असे सांग सख्या रामा ॥ दाखवीं० ॥ २ ॥ सखया अनंदतनय म्हणे अगा गुणग्रामा ॥ शीघ्रभाग हरी त्वरें पुसोनियां धामा ॥ दाखवीं० ॥ ३ ॥

### पद ४.

कां रे नाठविशी कमलनयन वासुदेव ॥ ध्रु० ॥ जपति जया संत सनक ॥ सकळ जना जननि जनक ॥ कां रे० ॥१॥ कलुषहरण विमल चरित ॥ करुनि निजानंदभरित ॥ कां रे० ॥ २ ॥ विचरे आनंदतनय ॥ त्द्दयीं धरुनि नंदतनय ॥ कां रे० ॥ ३ ॥

### पद ५.

त्यांचा संग नको मजलागीं ॥ त्यांच्या तोंडा लागो आगी ॥ ध्रु० ॥ वरि

वरि वचनें लागति गोड ॥ अंतरिं दुर्बुद्धीचा मोड ॥ त्यांचा संग नको० ॥ १ ॥ भजतां श्रीरामाचे पाय ॥ मध्यें करिती अंतराय ॥ त्यांचा संग नको० ॥ २ ॥ घेउन सौजन्याचें सोंग ॥ साधिति जारणमारण योग ॥ त्यांचा संग नको० ॥ ३ ॥ भजनीं दावुनियां विश्वास ॥ व्यसनीं घालिति जे विश्वास ॥ त्यांचा संग नको० ॥ ४ ॥ अखंड जननिंदेतें ध्याय ॥ आनंदतनय वदे कविराय ॥ त्यांचा संग नको० ॥ ५ ॥

पद ६

साजणी गे माझे मनिचें, हितगुज हें ऐकें बाई ॥ ध्रु० ॥ लाज काय धरुनी आतां, भय लौकिक करणें काई ॥ वेधलेंच मानस माझें, न चळे हें दुसरे ठाईं ॥ होईन रामाची दासी ॥ भावें वंदिन पादासीं ॥ स्वशिरा मी ठेविन पाईं ॥ साजणी० ॥ १ ॥ कां महेशचापच व्याया, पण केला माझ्या तातें ॥ रामचंद्र ओढिल कैसा, नवपल्लवकोमल हातें ॥ नवसा तुम्हि सांबशिवातें ॥ नवसारसलोचन यातें ॥ नुचलो परि वरिलें अपुले ठाईं ॥ साजणी० ॥ २ ॥ या मनासि आला माझ्या, शरकार्मुकपाणी राजा ॥ कामनाचि दुसरी नाहीं, कृतनिश्चय जालें भाजा ॥ सकळा तुम्हि गाजावाजा ॥ न करा मातेस वदा जा ॥ नमतें मी तुमच्या पाईं ॥ साजणी० ॥ ३ ॥ पाहतांचि राघव डोळां, मन तन्मय जालें माझें ॥ लाहतांचि प्रेमविसावा, मज जाली न जगीं लाजे ॥ रमतें मन देव न रामीं ॥ नमनीं मन देव नरा मी ॥ म्हणतो आनंदसुताचा स्वामी ॥ साजणी० ॥ ४ ॥

---

## पदें, विठ्ठल कवीचीं.

पद १

कशाला माळ गळां घालावी ॥ ध्रु० ॥ त्द्दर्दीय काम हरिनाम नये मुखीं॥ धाम वनासी मन लावी ॥ कशाला० ॥ १ ॥ भस्मलसित तनु कल्मलजित मति ॥ होउनि चित्त न तो लावी ॥ कशाला० ॥ २ ॥ जटाजूट पुटपुट अधरपुटीं ॥ कुटें जनाचीं बोलावीं ॥ कशाला० ॥ ३ ॥ विठ्ठलभजन मनीं नसतां नर ॥ तनू खराशीं तोलावी ॥ कशाला० ॥ ४ ॥

पद २

कृपाघना तुज कां नये करुणा ॥ शुक सनकादिक वंदिति चरणा ॥ कृ०

॥ ध्रु० ॥ उत्कंठा मनिं, पाय पहाया ॥ लागली निशिदिनिं जगदाभरणा ॥ कृ० ॥ १ ॥ अंतरिंचा तूं, जाणसि आशय ॥ पूर्ण करिशि कांध, अघसंहरणा ॥ कृपाघना ॥ २ ॥ ध्यान भजन मी, कांहिंच नेणें ॥ दास म्हणवितों पतितोद्धरणा ॥ कृपाघना० ॥ ३ ॥

पद ३

स्मरतां नित्य हरी ॥ मग ते माया काय करी ॥ ध्रु० ॥ श्रवणें मननें अद्वय भजनें ॥ पळतो काळ दुरी ॥ मग ते० ॥ १ ॥ करुणाकर वरदायक जो हरी ॥ ठेवी हात शिरीं ॥ मग ते० ॥ २ ॥ शिष्य निरंतर उद्धव चरणीं ॥ अमृतपान करी ॥ मग ते० ॥ ३ ॥

## पदें, मयूर कवींचीं.

वर असा विभो दे कीं वत्सा गा मल्लीला ॥ ध्रु० ॥ पदवी श्रीची गोपीकांला ॥ वैकुंठींचीं दिधली बल्लवपल्लीला ॥ वर असा० ॥ १ ॥ तुझ्या कीर्तिमात्रें पुढें ॥ न पुसे कोणि धन्वंतरिनें खल्लीला ॥ वर असा० ॥२॥ भक्त-मयूर-सुख-घना ॥ न सुर-द्रुम-याचक नीचाच्या गल्लीला ॥ वर असा० ॥ ३ ॥

पद २

सुखकरा मुकुंदा रामा कृष्णा गोपाळा ॥ ध्रु० ॥ केशवा माधवा हरे ॥ नुरवीं भो या कामा लोभा कोपाला ॥ सुख० ॥ १ ॥ जगदाकारा तुला भ्यालों ॥ जेंवि भुजग मानुनि कनकाच्या गोफाला ॥ सुख० ॥ २ ॥ भक्त मयूर-सुख-घना ॥ हा नत जन तव पादिं तुळसीचा हो पाला ॥ ॥ सुख० ॥ ३ ॥

## पदें, जीवनतनयाचीं.

पद १

माझ्या बाळावरता रोष ॥ कैकयि धरिशी कां ॥ ध्रु० ॥ चिमणें बाळक कीं रघुराय ॥ केला नसतां तव अन्याय ॥ वनासि दवडुनि सुख तरि काय ॥ ऐसा अनर्थ करिसी कां ॥ १ ॥ राम केवळ नेणत बाळ ॥ फिरेल विपिनीं कीं अळुमाळ ॥ यास्तव वाटतसे हळहळ ॥ ठेविन भाळ चरणीं कां ॥ २ ॥ अंतरल्यावर श्रीरघुराज ॥ माझे प्राणचि जातिल

आज ॥ त्रिभुवानें अपकीर्तीची लाज ॥ व्यर्थचि आज वरिसी कां ॥ ॥ ३ ॥ देई भरताशी संभार ॥ परि मजवरता करिं उपकार ॥ जीवनतनयाचा दातार ॥ चित्तीं दूर धरिसि कां ॥ ४ ॥

पद २

माझ्या बाळा रघुवीरा ॥ वनासि जाउं नको ॥ ध्रु० ॥ कोमळ नाजुक तुझा काय ॥ व्यर्थचि भारें भरलासी काय ॥ रडतें मोकलोनि मी धाय ॥ पंकीं गाय रोवुं नको ॥ माझ्या० ॥ १ ॥ तुझे पायां येतिल फोड ॥ वनविचराची इच्छा सोड ॥ देई मजला येवढी जोड ॥ सुकृतमोड मोडुं नको ॥ माझ्या० ॥ २ ॥ सूक्ष्म केवळ तूं तर बाळ ॥ कैसा फिरसिल रानोमाळ ॥ होइल अनर्थ कीं तात्काळ ॥ विपरित काळ दावुं नको ॥ माझ्या० ॥ ३ ॥ विनवित रामासी ते माय ॥ स्वस्थचि मजपाशीं तूं राय ॥ जीवनतनय वंदितो पाय ॥ कांहीं उदास होउं नको ॥ माझ्या० ॥ ४ ॥

## पद प्रेमाबाईचें.

माझा भरत देखिला काय ॥ कोणितरि सांगा हो ॥ ध्रु०॥ शोभे गौरवर्णी काय ॥ कैकेयी ते ज्याची माय ॥ जो रामाचा बंधूराय ॥ वंदिति पाय जन ज्याचे ॥ माझा० ॥ १ ॥ ज्याला म्हणती सर्व नृपाळ ॥ जो अनशनींच नेतो काळ ॥ यास्तव वाटतसे हळहळ ॥ ठेवित भाळ मज चरणीं ॥ माझा० ॥ २ ॥ मस्तकिं वागवि जटाभार ॥ सुटला मजसाठीं संसार ॥ प्रेमाबाईवर उपकार ॥ होइल फार भेटीचा ॥ माझा० ॥ ३ ॥

---

## पदें, शिवदिनकेसरीचीं

पद १

जैसें ज्यानें केलें ॥ तैसें त्याला फळ झालें ॥ ऐसें अनुभवासि आलें ॥ यांत आमुचें काय गेलें ॥ ध्रु० ॥ जार चोर चाहाडखोर ॥ निंदा द्वेषी रांडा पोर ॥ त्यासी यमदुतांनीं बांधुनि अघोर नरकीं नेलें ॥ यांत० ॥ १ ॥ काळ व्याळ हा विक्राळ ॥ डंखूं पाहे सर्वांहि काळ ॥ त्याचें भय सांडुनियां मूर्खें स्वहित टोलाविलें ॥ यांत० ॥ २ ॥ भक्त विरक्त योगी संत ॥ सिद्ध ज्ञानी जीवन्मुक्त ॥ त्यांची सेवा करितां दैवें वैकुंठासी

नेलें ॥ यांत० ॥ ३ ॥ अर्थ स्वार्थ साधन अर्थ ॥ केंसरि शिवदिन गुरु परमार्थ ॥ गुरुभक्ताचें गुरुभक्तिनें जन्ममरण चुकविलें ॥ यांत० ॥ ४ ॥

### पद २

गड्यांनो घ्या हरिच्या नामा ॥ लिहितां कशास ओनामा ॥ ध्रु० ॥ सांगतो एका एक वर्म ॥ पहावे भागवती धर्म ॥ दुःखसें प्राप्त होय शर्म ॥ यत्न त्या कशास रे परम ॥ न पावे हरिवांचुनि क्षेमा ॥ लिहितां० ॥ १ ॥ शरण सद्गुरुला जावें ॥ हरिभजनीं नच लाजावें ॥ हरिचें सगुण रूप ध्यावें ॥निर्मळ भावें पूजावें ॥ सांडुनि त्हृदयांतिल कामा॥ लिहितां० ॥ २ ॥ गृह धन जन यांची ममता ॥ धरुनी व्यर्थचि कां श्रमतां ॥ त्हृदयीं वागवुनी समता ॥ हरिचें चरणांबुज नमितां ॥ नेइल हरि तो निजधामा ॥ लिहितां० ॥ ३ ॥

## पद भुजंगनाथाचें.

नरतनु हे नव्हे साच भ्रमतां कशाला ॥ ध्रु० ॥ नूतन संपत्तिविकार ॥ धरुनि फार अहंकार ॥ करुनि कनक अळंकार ॥ वोढिती दुशाला ॥ नरतनु ॥ १ ॥ सांडुनि हरिकृपाधनासि ॥ आवडि कामिनीधनासि ॥ हेंचि मूळ नीधनासि ॥ नुमजा अशाला ॥ नरतनु० ॥ २ ॥ नाथ भुजग म्हणे उपाय ॥ धरारे सद्गुरुचे पाय ॥ सकळ साधती उपाव ॥ भेटा जगदीशाला ॥ नरतनु० ॥ ३ ॥

## पद रामजोशाचें.

भजभज भवजलधिमाजि मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥ धरिशिल दृढ चरणकमल, घडि भरि तरि करुनि विमल ॥ तरिच सकल पाप शमल, त्यज रे भवाला ॥ भजभज० ॥ १ ॥ सांडुनिया विषयवमन, झडकरि करिं षड्रिदमन ॥ पूजि मन हें करुनि सुमन ॥ गिरिजाधवाला ॥ भजभज० ॥२॥सावध हो करिशि काय, शंकर गुरु बाप माय ॥ चिंतुनि कवि रामपाय ॥ त्हृदयीं निवाला ॥ भजभज० ॥ ३ ॥

### पद, मध्वमुनीचें.

उद्धवा शांतवन कर जा, त्या गोकुलवासि जनांचें ॥ ध्रु० ॥ बा नंद य

शोदा माता, मजसाठीं त्यजतिल प्राण ॥ त्यागुनी प्रपंचा फिरती, मनिं उदास रानोरान ॥ अन्नपाणि त्यजिलें रडती, अति दुःखित जाले दीन॥ चाल ॥ जन्मलों तेंहुनि झटले ॥ मजलागीं तिळ तिळ तुटले ॥ कटि खांदे वाहतां घुटले ॥ आटलें रक्त देहाचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ १ ॥ आइ बाप त्यजुनी बाळें, मजसंगें खेळत होतीं ॥ गोडशा शिदोऱ्या आणुनी, आवडिनें मजला देती ॥ रात्रंदिस फिरले मागें, दधि गोरस चोरूं येती ॥ चाल० ॥ मी तोडुनि आलों तटका ॥ तो जिवाला लागला चटका ॥ मजविण त्यां युगसम घटका ॥ आठवतें प्रेम जयांचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ २ ॥ पति सुतादि गृह धन त्यजिलें, मज वरती धरुनि ममता॥मानिलें तुच्छ अपवर्गा, मजसंगें निश्चळ रमतां ॥ मद्दत्तचित्त त्या गोपी, नेत्रांतरि ठेवुनि समता ॥ चाल० ॥ तिळतुल्य नाहिं मनिं डगल्या ॥ दृढ निश्चय धरुनी सगल्या ॥ बहुधा त्या नसतिल जगल्या ॥ भंगले मनोरथ ज्यांचे ॥ उद्धवा शांतवन० ॥ ३ ॥ हरि आहे सुखरुप म्हणुनी, भेटतांचि त्यां सांगावें ॥ सांग कीं समस्तां पुशिलें, प्रत्युत्तर त्यां मागावें ॥ करुनियां ज्ञान तयांतें, सांग कीं शोक त्यजावे ॥ चाल० ॥ हें कार्य नव्हे तुजजोगें ॥ मजसाठीं जावें वेगें ॥ हें मध्वमुनीश्वर सांगे, ॥ त्या नपवे ज्ञान जयाचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ ४ ॥

पद २

जाणों हरिचे पाय ॥ आम्ही जाणों हरिचे पाय ॥ ध्रु० ॥ नेम न जाणों यमहि न जाणों ॥ नेणों अन्य उपाय ॥ आम्ही० ॥ १ ॥ परिस देउनी सोनें घेणें ॥ जळो त्याचा व्यावसाय ॥ आम्ही० ॥ २ ॥ कृष्णाचें पद सोडुनि आम्ही ॥ मुक्ति वरूं हयहाय ॥ आम्ही जाणों हरिचे पाय ॥३॥

## पद-सोहिरोबाचें.

हरि भजनावीण काळ घालवूं नकोरे॥हरि भज०॥ध्रु०॥ चिद्रूपासि समज ध्यानीं ॥ आणुनि पुरतें उमज मनीं ॥ आपुले मन्नने चिखल जनीं ॥ कालवूं नकोरे ॥ हरि भज० ॥ १ ॥ दोरिच्या सापा भिउनि भवा ॥ भेद नाहीं जिवा शिवा ॥ अंतरिचा ज्ञान दिवा ॥ मालवूं नकोरे ॥ हरि भज० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे पूर्ण ज्योती ॥ तेथे नाहीं दिवस राती ॥ तयाविणें नेत्र पाती ॥ हालवूं नकोरे ॥ हरि भज० ॥ ३ ॥

## मुरली-देवनाथकृत.

निबिड सघन हे मध्य शार्वरी हरि वाजवि मुरली ॥ मम मानस वश जालें विशेष मति त्या रविं मुरली ॥ ध्रु० ॥ भर्त्ता भोक्ता अलिसुम शर तनु अब्ज ऐक्य असतां ॥ भव्य सुखद रव मंजुल गुरु-तर तैं श्रवणीं बसतां ॥ हिम-नगजा-पतिचा अरि सायक होय त्वदार्यें सलता ॥ पुद चाले अलि तशीच वृंदावनिं कोणी नसतां ॥ लागला छंद त्या रवांत सुमनाचा ॥ विगलीत-वसन पथ धरीत भ्रमणाचा ॥ लक्षोनि अयन चालत फणि-शयनाचा ॥ प्रपंचीं अरुची धरि रुचि हरिपदिं सरोजींच विरली ॥ गत मग अति जिविं लगबग करुनी वन-वृंदीं शिरली ॥ निबिड० ॥ १ ॥ कनक-कमल-मृदु-मृणाल अशनीं वहन गहन ज्याचें ॥ भुक्ति-सुख-गति-प्रमुख मनोहर मुख तत्पितियाचें ॥ बाल्यमिहिर शत लज्जित गति भालचंद्र ज्याचें ॥ नाम जपत शमदाह गरल गलरूप वाद्य प्रभुचें ॥ मनमीन आकळी बळें प्रेमसूत्रें ॥ रवबाण हाणितां भेदि मोहयंत्रें ॥ तनु भावरहित जाहली गलित गात्रें ॥ रमारमण निजवदन विलोकुनि मति जे अनुसरली ॥ गर-सम घर करि हरहर ध्वनि कसि त्वद्यीं संचरली ॥ निबिड० ॥ २ ॥ सजल सघन घन वळला गर गर सभर स्रवति बिंदू ॥ सजल चीर अति रुचिर समीर वर ये साधि तद्वंदू ॥ न गणुनि श्रम ममानस धरि ईशपदांबुजिं छंदू ॥ आनंदसिंधु दीनबंधू रचि जा तटिं ब्रम्हानंदू ॥ स्वानंदें पूर्ण निरखितां रूप नयनीं ॥ समरसें चित्त सांठवी त्वदयभुवनीं ॥ नासला भास जाहला ऐक्य मिळणी ॥ पूर्ण ब्रम्ह गोविंदजिची श्रीमूर्ति मनीं भरली ॥ देवनाथ सायुज्यवृत्तिच्या सुखांत तरतरली ॥ निबिड० ॥ ३ ॥

## भूपाळी गणपतीवरची.

उठा उठा सकळ जन ॥ वाचे स्मरा गजानन ॥ गौरीहराचा नंदन ॥ गजवदन गणपती ॥ ध्रु० ॥ ध्यानीं आणोनी सुखमूर्ती ॥ स्तवन करा एकें चित्तीं ॥ तो देईल ज्ञानमूर्ती ॥ मोक्षसुख सोज्वळ ॥ १ ॥ जो निजभक्तांचा दाता ॥ वंद्य सुरवरां समस्तां ॥ त्यासी ध्यातां भवभयचिंता ॥ विघ्नवार्ता निवारी ॥ २ ॥ तो हा सुखाचा सागर ॥ श्रीगणराज मोरेश्वर ॥ भावें विनवीतो गिरिधर ॥ भक्त त्याचा होऊनी ॥ ३ ॥

## भूपाळी गणपतीवरची.

उठिं उठिं बा मोरेश्वरा ॥ चवदा विद्यांच्या माहेरा ॥ चतुर्भुजा परशुकरा॥ अंकुशधरा गजवदना ॥ ध्रु० ॥ माता बोले शैल नंदिनी ॥ योगी उभे असती अंगणीं॥ दर्शन द्यावें चिंतामणी ॥ प्रातःस्मरणीं स्मरती हे ॥ उठिं उठिं बा० ॥ १ ॥ रत्नजडित सिंहासन ॥ वरी बैसले गजानन ॥ रिद्धि सिद्धि दासी दोन ॥ करिती चरण सेवेतें ॥ उठिं उठिं बा० ॥ २ ॥ आंगीं सेंदुराची उटी ॥ शोभे चंद्रमा ललाटीं ॥ मुक्ताफळ हार कंठीं ॥ मुखीं प्रभा फांकतसे ॥ उठिं उठिं बा० ॥ ३ ॥ प्रातःकाळीं हो भूपाळी ॥ योगी ध्याती हृदयकमळीं ॥ निरंजनी कृपेची सांउली ॥ भक्ताहातीं वदवीली ॥ उठिं उठिं बा मोरेश्वरा० ॥ ४ ॥

## भूपाळी रामावरची.

राम आकाशीं पाताळीं ॥ राम नांदे भूमंडळीं ॥ राम योगियांचे मेळीं ॥ सर्व काळीं शोभत ॥ ध्रु० ॥ राम नित्य निरंतरी ॥ राम सबाह्य अभ्यंतरीं ॥ राम विवेकाचे घरीं ॥ भक्तीवरी सांपडे ॥ १ ॥ राम भावें ठायीं पडे ॥ राम भक्तीशीं आतुडे ॥ राम ऐक्यरूपीं जोडे ॥ मौन्य पडे श्रुतीसी ॥ २ ॥ राम योग्यांचें मंडन ॥ राम भक्तांचें भूषण ॥ राम आनंदाचा घन ॥ करी रक्षण दासांचें ॥ ३ ॥

## भूपाळी कृष्णावरची.

उठिं गोपालजी जाइं धेनूंकडे ॥ पाहती सौंगडे वाट तूझी ॥ ध्रु० ॥ लोपली हे निशी मंद झाला शशी ॥ मुनिजन मानसीं तूज ध्याती ॥ १ ॥ भानु उदयाचळीं तेज पुंजाळलें ॥ फुललीं कमळें ऊदकीं हीं ॥ २ ॥ धेनु वत्सें तुला बाहती माधवा ॥ उठिं गा यादवा उशीर झाला ॥ ३ ॥ ऊठ पुरुषोत्तम वाट पाहे रमा ॥ दावीं मुखचंद्रमा सकळिकां ॥ ४ ॥ कनकपात्रांतरीं दीप रत्नें बरीं ॥ ओंवाळिते सुंदरी तुजलागी ॥ ५ ॥

## भूपाळी घनश्यामावरची.

घनश्याम सुंदरा श्रीधरा आरुणोदय झाला ॥ उठिं लौकर वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥ ध्रु० ॥ सायंकाळीं एके मेळीं द्विजगण अवघे

वृक्षीं ॥ अरुणोदय होतांच उडाले चरावया पक्षी ॥ अघमर्षणादि करुनि तापसी तपाचरण-दक्षी ॥ प्रभातकाळीं उठुनि कापडी तीर्थपंथ लक्षी ॥ करुनि सडा संमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं ॥ यमुनाजळासि जाती मुकुंदा दध्योदन-भक्षी ॥ चाल ॥ मुक्तता होऊं पाहे, कमळिणीपासुनी भ्रमरा ॥ पूर्वदिसे मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा ॥ उठिं लौकरि गोविंदा, सांवळ्या नंदकुमारा ॥ चाल ॥ मुख प्रक्षाळण करीं अंगिकारीं भाकरकाला ॥ उठिं लौकर वनमाळी० ॥१॥ घरोघरीं दिप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती ॥ गीत गाती सप्रेमें गोपी सदना येति जाती ॥ प्रवर्तोनि गृहकार्मी रंगावळि घालूं पाहती ॥ अनंदकंदा प्रभात झाली उठ सरली राती ॥ काढि धार क्षिरपात्र घेउनी धेनु हंबरती ॥ द्वारिं उभे गोपाळ हाकमारुनि तुजला बाहती ॥ चाल ॥ हे मुक्ताहार कंठीं, घालिं या रत्नमाळा ॥ हतीं वेत्रयष्टि बरवी, कांबळा घेइं काळा ॥ प्रभात्म.जा मधुसुदना, त्दषिकेशी जगत्पाळा ॥ चाल ॥ लक्षितातिं वासुरें हरि धेनु स्तनपानाला ॥ उठिं लौकर वनमाळी उदयाचळीं० ॥ २ ॥ प्रातःस्नानें करुनि गोपिका अळंकारें नटती ॥ कुंकुमादि चर्चुनी मंथनालागिं आरंभिती ॥ प्रेमभरित अंतरांत वदनीं नामावळि गाती ॥ अर्घ्यदान देउनियां द्विजगण देवार्चन करिती ॥ नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णुपूजा समर्पिती ॥ स्मार्त शिवार्चनसक्त शक्तितें शाक्तहि आराधिती ॥ चाल ॥ ऋषिगण आश्रमवासी, जे निरंजनीं धाले ॥ अरुणोदयि आपुलाले, ध्यानीं निमग्न झाले ॥ पंच पंच उषःकालीं, रविचक्र निघों आलें ॥ चाल ॥ येवढा वेळ निजलासि म्हणुन हरि समजेल नंदाला ॥ उठिं लौकर० ॥ ३ ॥ विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं ॥ अध्यापन गुरु करिती शिष्यांहि अध्ययना उदयीं ॥ याज्ञिकजन कुंडामांधि आहुति टाकितात पाहीं ॥ रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥ हे माझे पाडसे सांवळे ऊठ कृष्णाबाई ॥ सिद्ध सवें बळिराम घेउनि गोधनें वना जाई ॥ चाल ॥ मुनिजनमानसहंसा, श्रीमनः कमलभृंगा ॥ मुरहर पंकजपाणी, पद्मनाभ श्रीरंगा ॥ शकटांतक सर्वेशा, हे हरि प्रतापतुंगा ॥ चाल ॥ कोटि रवींहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ॥ होनाजी बाळ नित्य ध्यातसे, त्द्दयिं नाममाळा ॥ घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणो० ॥ ४ ॥

## आरती गणपतीवरची.

सुखकर्ता दुखहर्ता वार्ता विघ्नाची ॥ नुरवी पुरवी प्रेमकृपा जयाची ॥ सर्वांगीं सुंदर उटि शेंदुराची ॥ कंठीं झळके माळ मुक्ताफळांची ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय मंगलमूर्ती ॥ दर्शनमात्रें मनःकामना पुरती ॥ ध्रु० ॥ रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा ॥ चंदनाची उटी कुंकुम केशरा हिरेजडित मुगुट शोभतो बरा ॥ रुणझुणती नूपुरें चरणीं घागरिया ॥ जयदेव० ॥ २ ॥ लंबोदर पीतांबर फणिवरबंधना ॥ सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना ॥ दास रामाचा वाट पाहे सदना ॥ संकष्टीं पावावें निर्वाणीं रक्षावें सुरवर-वंदना ॥ ३ ॥ जयदेव० ॥

## आरती पांडुरंगावरची.

युगीं अठ्ठाविसीं विटेवरी उभा ॥ वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥ पुंडलिका भेटी परब्रम्ह आलेगा ॥ चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय पांडुरंगा ॥ रखुमाईवल्लभा पावें जिवलगा ॥ ध्रु० ॥ तुळशी माळा गळां कर ठेवुनि कटीं ॥ कांसे पीतांबर कस्तुरि ललाटीं ॥ देव सुरवर नित्य येती भेटी ॥ गरुड हनमंत पुढें उभे राहती ॥ २ ॥ जयदेव० ॥ आषाढी कार्तीकी भक्तजन येती ॥ चंद्रभागेमाजी स्नानें जे करिती ॥ दर्शन हेळायात्रें तयां होय मुक्ती ॥ केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥ ३ ॥ जयदेव० ॥

## आरती देवीवरची.

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं ॥ अनाथनाथे अंबे करुणा विस्तारी ॥ वारी वारी जन्म मरणातें वारीं ॥ हारीं पडलों आतां संकट निवारीं ॥ १ ॥ जयदेवी जयदेवी महिषासुरमथनी ॥ सुरवर ईश्वर वर दे तारक संजिवनी ॥ ध्रु० ॥ त्रिभुवन भवनीं पाहतां तुजऐशी नाहीं ॥ चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं ॥ साही विवादितां पडले प्रवाहीं ॥ तें तूं भक्तालागीं पावसि लवलाहीं ॥ २ ॥ जय० ॥ प्रसन्न वदनें प्रसन्न होसी निजदासा ॥ क्लेशा पासुन सोडीं तोडीं भवपाशा ॥ अंबे तुज वांचून कोण पुरवील आशा ॥ नरहरि तल्लीन झाला पद पंकजकोशा ॥ ३ ॥ जयदेवी० ॥

# त्या ग्रंथांतील कठिण शब्दांचा कोश.

---

### अ.

अंक-मांडी. २ चिन्ह. ३ एक, दोन इ० प्रत्येक.

अकिंचन-निर्धन, भिकारी.

अक्रिय-जें कांहीं करीत नाहीं तें, क्रियाशून्य.

अखिल-सर्व.

अग-पर्वत, डोंगर.

अगद- औषध.

अगम्य-जाणतां येत नाहीं असें.

अंग-खरेपणा, स्वरूप.

अंगद-बाहु भूषण.

अग्रज-वडीलभाऊ.

अगाध-खोल, अपार.

अगार-घर.

अंगुलिभंग-बोटें मोडणें.

अघ-पाप.

अघवाही-पापी.

अघोर-एक गोसाव्याची जात आहे. हे लोक घाणेरडे आणि भयंकर असून नागवे फिरतात, आणि उजवे हातांत मलमूत्रानें भरलेली मनुष्याची करटी घेतात आणि डावे हातांत निखाऱ्याचें खापर घेतात.

अचक्षु-अंध. २ धृतराष्ट्र.

अचाट-अद्भुत, मोठें.

अज-विष्णु. २ ब्रह्मदेव.

अजंगम-झाडें.

अंजन-काजळ, नेत्रौषध.

अजातारि-अजात शत्रु.

अजितत्व-आजिंकपणा.

अजितनाम-ईश्वराचें नाम.

अंजित-ज्यांत अंजन घातलें आहे तो.

अजिन-चर्म, कातडें.

अजिर-अंगण.

अटन-फिरणें.

अडवी-अटवी, अरण्य, रान.

अढळ-अचल, स्थिर.

अणु-अल्प, थोडें.

अंतरंगीं-मनांत.

अंतराय-विघ्न. २ यम.

अंतराल-आकाश.

अंतरीं-मनांत, त्दृदयांत.

अंतरीपायमान-द्वीपतुल्य

अंतर्हित-गुप्त.

अतिकाळ-बहुकाळ.

अतिक्रम-मर्यादा उल्लंघून जाणें

अतिपात-भंग, नाश-अमर्यादा, उल्लंघन.

अतिमात्र-अत्यंत, बहुत, गाढ.

अतींद्रियद्रष्टा-इंद्रियास समजत नाहीं तें पाहणारा.

अंतुरी-स्त्री, जाया, बायको.

अंत्यज-अति शूद्र.

अंत्रपाट-अंतःपट.
अत्रि-एक ऋषि.
अदभ्र-बहुत.
अदंभित्व-दांभिकपण नव्हे तें
अंदुक-हत्तीच्या पायांतली बिडी, सांखळदंड.
अद्रि-पर्वत.
अधर-ओंठ.
अधस्त्री-दासी.
अधिन-वश.
अधिष्ठान-स्थान.
अधिष्ठिली-आक्रमिली.
अध्यास-खरेपणाचा निश्चय,
अध्वर-यज्ञ.
अध्वांग-अध्वंग-ज्याचें अंग अधु आहे तो.
अनंत-अंत नाहीं तो.
अनन्य-ज्यास दुसरा नाहीं तो, एकटा. २अगतिक, अनन्य भावानें भजणारा.
अनर्घ्य-अमूल्य.
अनव-जीर्ण, वृद्ध, जुना.
अनवरत-निरंतर.
अनवसर-अप्रसंग.
अनवसरीं-असमयीं.
अनवसरी-अभाव.
अनळ-अग्नि.
अनाक्रोश-बोलल्यावांचून.
अनाथवाणी-अनाथासारखा. २ दीनवाणी.
अनाद्यंत-ज्याला आदि नाहीं व अंत नाहीं असा, ईश्वर.
अनार्या-हे दुष्टा.
अनिर्देश्य-अमुक म्हणून सांगतां येत नाहीं तं.

अनुकंपा-दया,
अनुकंप्य-दया करण्यास योग्य.
अनुज
अनुजनि } -धाकटा भाऊ.
अनुबिंब-प्रति बिंब.
अनुरक्त-प्रेमानें आसक्त.
अनुराग-प्रीति, प्रेम.
अनुरूप-योग्य.
अनुवादावें-सांगावें, बोलावें.
अनुवादे-सांगे, बोले.
अनुसूयासुत-दत्तात्रेय.
अनृत-खोटा, असत्य.
अन्यतम-बहुतांतून कोणताही एक.
अन्वय-संबंध. २ वंश.
अन्वित-युक्त.
अपरूप-अपूर्व, अदृष्टपूर्व.
अपरोक्ष-समक्ष, प्रत्यक्ष
अपर्णा-पार्वती
अपर्णापति-सदाशिव.
अपसद-दुष्ट.
अपांपति-समुद्र.
अपेक्षा-इच्छा
अप्सरा-देवांगना.
अप्रमेय-जें जाणण्यास कठिण तें.
अंबक-डोळा.
अंबर-आकाश. २ वस्त्र.
अबळा-स्त्री
अबाधित-बिनहरकत.
अंबिका-माता. २ पार्वती.
अंबु-पाणी.
अंबुज-कमल.
अब्जिनी-कमलिनी.
अब्द-मेघ. २ वर्ष.
अभद्र-अशुभ.

अभिनव } -नवीन
अभिन्नव }
अंभोज-कमल.
अंभोद-मेघ.
अंभोरुह-कमळ.
अभ्र-मेघ.
अभ्रमु-हत्तीण.
अमर-देव.
अमरतरु-कल्पवृक्ष.
अमित } -पुष्कळ.
अमूप }
अमृतकर-चंद्र.
अमोघ-सफल.
अयस्-लोखंड
अयन-जाणें, गमन. २ मार्ग.
अरुण-रक्तवर्ण. २ सूर्यसारथि.
अरुवारी-आस्तरणीं.
अरुष-आर्ष, वेडेवांकडे.
अर्क-सूर्य. २ रुईचें झाड.
अर्की-रुईचें झाड.
अर्जणें-संपादणें.
अर्णव-समुद्र.
अर्थ-पैसा, द्रव्य.
अर्थिला-अर्थी, याचक.
अर्धमात्रा-मकारात्मक.
अर्भक-लहानमूल.
अलक्ष-क्ष्य-अतर्क्य, दुर्लक्ष्य.
अलंघ्य—उल्लंघण्यास अयोग्य किंवा कठिण.
अलाबू-भोपळा.
अलि-भ्रमर. २ पंक्ति.
अलिक-कपाळ.
अलिनी-भ्रमरी.
अलिप्त-जो लिप्त नाहीं तो.
अलोट-मोठें, अचाट, अनिवार.
अवकळा-दुश्चिन्ह.
अवगत-ठाउकें.
अवगाहिला-जाणिला.
अवंचक-वंचक नव्हे तो, खरा.
अवचर-अद्भुत.
अवचितां-अकस्मात.
अवतरण-उतरणें.
अवतंस-भूषण.
अवशिलें-योजिलें.
अवधारा-ऐका.
अवन-रक्षण.
अवलोक-दृष्टि.
अवलिळा-सहजांत, लीलेनें.
अवसर-समय, वेळ, काळ.
अवहार-पसरलेल्या सैन्यादिका-चा आटोप.
अव्हाटें-आडमार्गानें.
अव्हेर-तिटकारा २ हेळसांड.
अवाङ्मुखी-खालीं पहाणारी.
अवारित-निवारल्यावांचून.
अवि } -मेंढा.
अवी }
अविद्या-माया, अज्ञान.
अवो-अरे, अगे.
अंश-विभाग.
अशन-भोजन, खाणें.
अशनि-वज्र.
अशरीरवाणी } -आकाशवाणी.
अशरीरिणी }
अशिव-अकल्याण.
अशुद्ध-रक्त.
अशेष-संपूर्ण.
अश्रु-आसवें, नेत्रोदक.
अष्टभाव-निश्चेष्टता, बेशुद्धि (इंद्रिय

ज्ञान शून्यता, रोमांच उभेराहणें, घर्मयेणे, मुखाचें वैवर्ण्य, कंपअसणें, अश्रु येणें, स्वर बदलणें.
असकृत्-वारंवार.
असकें-सर्व.
असती-जारिणी, व्यभिचारणी. २ अपकीर्ति. ३ खोटी, असत्य.
असंभावनी-संवभ नाहीं अशी, किंवा अतर्क्य.
असाधुवाद-दुर्भाषण, निंदा.
असाध्य-नहोण्याजोगें.
असाध्वस-निर्भय.
असांवली, असांरली-अश्रुयुक्त झाली.
असित-नीलवर्ण, काळा.
असितपथ-अग्नि, कृष्णवर्त्मा.
असिपत्र-तरवारीचें पान.
असिपद-असि हा शब्द.
असिवार-खड्गधर, पदाती.
असीपत्र-तरवारीचें पान.
असीपत्रवन-एक नरक आहे, ह्यांत झाडाच्या पानाला तरवारीसारखी धार असते.
असु-प्राण.
असुख-दुःख.
असू-अश्रु, नेत्रोदक.
असूया-हेवा, मत्सर, ईर्षा.
असोशी-हव्यास, अतिइच्छा.
अस्तमित-अस्तास गेलेला.
अस्त्र-शस्त्र. २ मंत्रप्रयोगानें सोडण्याचे शस्त्र.
अस्त्रतति-शस्त्रांचा समूह.
अहंकृति-अहंकार.
अहिवर-सर्पांत श्रेष्ठ, कालिया.
अहेव-सुवासिनी.
अहेवतंतू-सौभाग्यसूत्र.
अहेवपण-सौभाग्य, अवैधव्य.
अळुमाळ-थोडथोडा, थोडासा.
अक्ष-फांसा.
अक्षम-असमर्थ.
अक्षत-तुटलें फुटलें नाहीं तें.
अक्षर-जो नाश पावत नाहीं तो, स्थिर, निश्चळ, नढळणारा.
आकण-कणसें एकदां तुडवून काढलेलें धान्य, मात्रें, खडामाती.
आकर्णन-ऐकणें, श्रवण.
आकळावा-जाणावा.
आकळे-समजे, जाणे. २ स्ववश होई.
आकळेना-समजेना. २ वशहोईना.
आकांक्षीना-इच्छीना.
आक्रंदती-ओरडती.
आक्रोशावे-बोलावें, वदावें.
आक्रोशेवीण-बोलल्यावांचून.
आखंडल-इंद्र.
आख्या-नाम.
आग-अपराध.
आगमन-येणें.
आंगठुसा-आंगवठा.
आगरडे-अग्रें.
आंगवठा-शरीराचाबांधा.
आंगवण-शक्ति. २ खोड, छंद.
आगळा, आगळें-अधिक.
आगा-घर, स्थान. २ अरे.
आगार-घर, स्थान.
आगीं-अग्रभागीं.
आंगीं-स्वतः
आंगोळी-बोट.
आघवें-सर्व, अवघें.
आचार्य-गुरु.

आजी-युद्ध. २ आज.
आज्य-तूप.
आटणी-मिश्रण.
आटाआटी-प्रयास, श्रम, खटपट.
आटापीटा-तसदी, खटाटोप.
आटीं-अरण्यांत.
आटोप-डौल.
आठव } -स्मरण.
आठवण }
आडळ-आडणूक, अडचण.
आड पडे-मागें पडे.
आढ्य-धनिक.
आणिक-दुसरें, निराळें.
आणिकातें-अन्यातें.
आतर-नीर, नावेचा उतार.
आतळणें-स्पर्शणें.
आतिथ्य-पाहुणचार.
आतुडलें-समजलें.
आतुडे-प्राप्तहोय, २ सांपडे, मिळे.
आतुबळी-अतिबळी, बळकट.
आत्मचर्चा-आत्म्याविषयीं विचार.
आत्मज-पुत्र.
आत्मजा-मुलगी, कन्या.
आत्मविद्या-आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान.
आत्महत्या-आपला आपण जीव घेणें. २ आपण आपणास न जाणणें.
आत्मज्ञानी-आत्माह्मणजे ब्रह्म तें जाणणारा.
आथी-आहे.
आदर-सत्कार.
आदर्श-आरसा.
आदळला-पावला.
आदिठाणें-मूळपीठ.
आदिशक्ति-मूळशक्ति.
आंदुवाचे-वाळ्याचे.
आधि-मनाची व्यथा, २ दुःख.
आन-अन्य.२ भिन्न, दुसरें.
आनकदुंदुभि-वसुदेव.
आनन-मुख.
आपगा-नदी.
आपंगिता-सांभाळणारा.
आपन्ना-दुःखी.
आपपर-स्वकीयपरकीय.
आप्त-संबंधी. २ सत्यवक्ता.
आपेआप-आपोआप.
आफळी-आपटी,
आभास-कांहींसा भास, भ्रांति.
आमा-स्तन.
आम्नाय-वेद.
आयती-दीर्घ, विस्तीर्ण.
आयस-लोखंड.
आराणुक-वेळ, फुरसत.
आरामवाटी-बाग.
आरुष-आर्ष,छांदिष्ट.२असमंजस. ३ असंबद्ध.
आरूढ-वर चढलेला.
आरोह-कमर, नितंब.
आर्जव-सरळपणा.
आर्ती } -आवड.
आर्त }
आर्तें-आवडीनें.
आर्या-स्त्री.
आलवाल-आळें.
आलाप-भाषण.२गाण्यांतलाआलाप.
आलापणें-बोलणें. २ गाणें.
आलाबु-भोपळा.
आली-सखी. २ पंक्ति.
आव-धैर्य. २ डौल.

आवरण-कुंपण.
आवाका-धैर्य.
आवास-राहणें.२राहण्याची जागा.
आव्हा-नाम.
आव्हाटें-पसारा. २ आडमार्गानें.
आव्हेरिजे-टाकिजे.
आश-आशा.
आशय-मनोरथ. २ अभिप्राय.
आशा-दिशा. २ इच्छा.
आशी-आशीर्वाद.
आस्य-तोंड, मुख.
आहव-युद्ध.
आहाळणें-पोळणें. २ खळबळणें.
आहाळलीं-पोळलीं.२खळबळलीं.
आहे-ज्वाळा.
आळ-लळा, हट्ट.
आळविणें-कळवळा उत्पन्न करणें.

इ.

इजारा-मक्ता.
इंदिरा-लक्ष्मी.
इंदिरावेषें-लक्ष्मीवेषानें.
इंदीवर-कमळ.
इंद्रियग्राम-इंद्रियसमुदाय.
इंदु-चंद्र.
इभ-हत्ती.
इभी-हत्तीण.
इषु-बाण.
इसाळ-ब्रह्मराक्षस.
इक्षु-ऊंस.
इंद्रजाल-गारुड.
ईशान-शंकर.

उ.

उक्त-बोललेलें. २ भाषण.
उगला-उगाच, निमूटपणें.
उगवून-उलगडून.
उगाणा-उलगडा.
उचंबळणें-भरून सांडणें.
उचित-योग्य.
उच्चैःश्रवा-इंद्राचा घोडा.
उज-सरळ,सरळपणें.२पुनः,फिरून
उजाळे-प्रकाश, शुभ्रता.
उर्जा-पनः.
उटज-पर्णकुटी.
उठाउठी-सत्वर, लवकर, लागलीच.
उठाणें-उत्थान. २ तरंग.
उडुप-चंद्र.
उणीव-न्यूनत्व.
उत-अथवा.
उतटली-भरली.
उतटिला-उकलिला.
उत्तरापति / उत्तरावर -अभिमन्यु.
उत्तराशेला-उत्तरदिशेला.
उत्तरीय-शेला, अंगवस्त्र.
उत्तीर्ण-ऋणमुक्त.
उत्पल-कमल.
उदग्र-उंच. २ ज्याचें अग्र वर आहे तो.
उदंड-पुष्कळ.
उदरंभर-पोट भरणारा.
उदश्रु-रडणारा.
उदेणें-उदय पावणें. २ उद्भवणें.
उद्देशें-हेतूनें, कारणानें.
उद्धार-मुक्त. २ वर काढणें.
उद्यम-उद्योग.
उद्यान-बाग, उपवन.
उद्विग्न-उतावीळ.

उद्भट-मोठा.
उन्मन-विरक्त.
उन्मूलन-उपटणें.
उन्मेख-ज्ञान.
उन्मेष-सुलोचना-हे ज्ञान चक्षुषा.
उपकरण जात-साहित्य.
उपचार-आदर.
उपतिष्ठे-उत्पन्न होई.
उपरति-वैराग्य.
उपरम-शांति.
उपरमे-सुख पावे.
उपराग-ग्रहण.
उपरि-मस्तकावर. २ बहिर्भागीं.
उपवन-बाग.
उपानह-चर्मी जोडा, पैजार.
उपायन-भेट, नजराणा.
उपार-मस्तकावर.
उपाव-उपाय.
उपावि-कारण. २संग. ३अडचण.
उपासना-सेवा.
उपास्ति-उपासना,
उपेगा-उपयोगाला.
उपेक्षा-हयगय, औदासिन्य.
उफळतां-उडतां.
उफाळलें-उद्भवलें.
उबग-उपेक्षा. २ कंटाळा.
उबगणें-उपेक्षणें. २ त्रासणें, कंटाळणें.
उबगलें-उपेक्षिलें. २ कंटाळलें.
उभय-दोन्ही.
उभविती-उभारिती.
उभरून } उचलून.
उभारून }
उभारी-उचली.
उभासे-दिसे.
उभेठाती-उभेराहती.
उमस-दम, विसांवा.
उमगून-शोधून.
उमा-पार्वती.
उमाणें-मोजणें.
उमाळा-उद्भव.
उमाळे-उकळ्या.
उमोप-पुष्कळ.
उरके-संपे.
उरकोन-करून, आटपून,
उरग-सर्प.
उरण-मेंढा.
उरी-अवशिष्ट, बाकी.
उरोज-स्तन.
उलूक-घुबड.
उल्हाटी-उलटी.
उसंत-विश्रांति.
ऊर्ध्वरेता-ब्रम्हचारी.
ऊन-उणें, कमी.
ऊर्वरित-उरलेले, शेष.
ऊमला-लक्ष्मणाची बायको.
ऊर्मी-उकळी, गर्व.
ऋतुदान-रति.

ए

एकनिष्ठ-ईश्वरपरायण.
एकसरें-एकदम. २ एकच मोठा लांब इ०
एकाकी-एकटा.
एणांक-चंद्र.
एणी-हरिणी.
एनस-पातक.
ऐना-आरसा.
ओक-घर, स्थान.
ओखटा-वाईट.

ओगरणें-वाढणें.
ओगरू-वाढणारा.
ओतु-बोका.
ओढवणें-पुढें करणें.
ओपणें-देणें. २ विकणें. ३ स्वाधीन-करणें.
ओसंग-मांडी.
ओसंडोन-सांडून.
ओसर-एकीकडे हो.

## क.

कई } -कधीं.
कयीं }
कच-केश. २ बृहस्पतीचा मुलगा.
कंज-कमल.
कज्जल-काजळ.
कट-हत्तीचें गंडस्थळ.
कटक-सैन्य. २ कडें. ३ कडा.
कटकटा-हाय हाय.
कटायी-कढई.
कटाक्ष-दृष्टिपात.
कंठी-घालवी.
कठोर-कठिण.
कडगें-वांकी भूषणें.
कडवा-वी-वें-क्रूर.
कडसणी-विचार.
कडे-एकीकडे.
कढेंत-कढईत.
कण-रज. २ खडा.
कणव-वा-दया.
कणसा-रजासारखा. २ खड्या-सारखा.
कणवाळपणें-कृपाळूपणानें.
कणिका-कणी.
कतबा-खत.
कंथा-गोधडी.
कथालाप-वर्णन.
कदन-युद्ध. २ मरणें, हनन.
कदंब-कळंबाचें झाड. २ समूह.
कदर्थले-अवमानिले.
कदली-केळ.
कंदर्प-मदन.
कदर्यु-कृपण.
कंदुक-चेंडू.
कनकबीज-धोत्र्याचें बीं.
कनकलतिका-सुवर्णाची वेल.
कनवाळ-कृपाळू.
कपाटीं-गुहेंत.
कपि-वानर.
कंपिततनु-ज्याच्या अंगाला कांप सुटला आहे तो.
कपिध्वज-अर्जुन.
कपी-मारुती.
कबंध-मस्तकावांचून शरीर, धड.
कबरी- } -वेणी.
कबरी भार }
कंबु-शंख.
कमळा-लक्ष्मी.
कमळापति-विष्णु.
कर-हात. २ सोंड. ३ किरण. ४ खंडणी.
करंटा कृपण, हतभाग्य.
करटी-गज, हत्ती.
करणीचा-खोटा.
करपुष्कर-शुंडाग्र. २ हस्तकमल.
करबाडें-कडबा.
करवाल-तरवार.
करा-मडकें.
करिता-गजता, गजत्व, गजपणा.
करी-हत्ती.

करुण-करुणरस. २दयाळू
करुणांबुद-दयेचा मेघ.
कर्णिका-कमलांतील गड्डा.
कलंकी-लांछनयुक्त.
कलगी-मोत्यांचा अ० जडावाचा पागोट्यांत खोंचण्याचा डागिनी.
कलत्र-स्त्री, बायको.
कल्पांत-जगत्प्रलय, ब्रह्मदेवाचा एक दिवस आणि रात्र. हा काळ मनुष्याचे ४३२००००००० वर्षांचा हाय.
कलभ-हत्तीचा छावा.
कुलश जनित
कलश संभव } -अगस्ति मुनी.
कलशोद्भव
कलाप-मयूर पिछ.
कलि-कज्जा. २ कलियुग. ३ दुष्ट.
कलिका-कळी.
कलिला-कलुषित, गढूळ.
कलेवर-शरीर.
कल्लोळ-मोठीलाट.
कवइता-कवन कर्ता, कवि.
कवच-चिलखत.
कवडा-एक पक्षी ( अशुभ सूचक )
कवळ-घांस.
कवळिती-आलिंगिती.
कवि-शुक्राचार्य.
कविजा-शुक्रकन्या देवयानी.
कविहीर-कविश्रेष्ठ.
कश्यप-सप्तऋषीं पैकीं एक.
कशा-चाबूक.
कशी-कांचणी.
कसणें-बांधणें.
कसा-कसोटीस लावा.
कल्हार-कमळ.
कल्होळ-लाटा.
कळानिधि-चंद्र.
काइसनें-कशानें ही.
काई-काय.
काग-कावळा.
काचा-कच्चा.
काचावला-कचरला.
काज-कार्य.
काजरा-कुचल्याचें झाड.
काजळी-जंग. २ डाग.
कांजी-पेज.
काटिला-मळला.
कांड-ब्रह्मांड.
कांडून-नाडून, त्रासदेऊन, जुलूम करून.
कांत-पति. २ सुंदर.
कातर-भितरा.
कांता-बायको. २ सुंदरी.
कातिया-शस्त्र.
कान कोंडें-चोरटें.
कानन-वन, अरण्य.
कापडी-काशीचे कावडी.
काम-इच्छा. २ मदन.
कामदेव-मदन.
कामद-इच्छा पुरविणारा.
कामना-इच्छा, वासना.
कामित-इच्छिलेलें.
कार्पासराशि-कापसाचा ढीग.
कार्यवादु-कामापुरतें गोड बोलणारा.
कार्याकारण-कारण परत्वें.२जितक्यास तितकें.
कारा-बंदिशाळा, तुरुंग.

कालाही-काळसर्प.
कालिंदी-कलिंद पर्वतांतून निघालेली-यमुना.
काव्य-शुक्राचार्य.
काश्यप-कण्व ऋषि.
कांस-कांसोटा, कछ. २ आश्रय.
कासर-महिष, रेडा.
कासार-सरोवर.
कासाविस-दुःखित.
काळकूट-विष.
काळवखें-काळोख.
काळसर्प-काळियासर्प.
किंकरी-दासी.
किंच-आणखी.
कितव-दुष्ट, कपटी,ठक.२द्यूतकार.
किरी-डुकर.
किरीटी-हे अर्जुना.
किशोर-मूल.
किष्किंधा-सुग्रीवाची नगरी.
कीटक-किडा.
कीर-रावा. २ निश्चयें.
कीरवाणी-शुकवाणी.
कीर्तिला-वर्णिला.
कीला-अग्निज्वाला.
कीश-वानर.
कुचेला-वाईट वस्त्र नेसलेली.
कुच्या-ढोण शिरा.
कुचुंबेल-दुखवेल.
कुंजर, कुंजरु-गज.
कुटज-कुड्याचें झाड.
कुंटिणी-वेश्या कोणी एक.
कुटिल-वांकडा. २ कपटी.
कुठार-कुऱ्हाड.
कुडा-वाईट. २ वांकडा. ३ खोटा.
कुडी, कुडं-.
कुंत-भाला.
कुंतळ-केश.
कुत्सा-निंदा.
कुंभिणी, कुंभिनी-पृथ्वी.
कुंभिनीपाळ-पृथ्वीपति.
कुंभीपाक-एक नरक आहे. येथें पातक्यास मडक्यांत घालून शिजवतात.
कुमद-कमळ.
कुमुदिनी-चंद्रविकासी कमलाची वेल.
कुरंग-हरिण.
कुरवंडणें-ओंवाळणें.
कुरवंडी-आरती, ओंवाळणी.
कुरव-केंस.
कुरुकुल-कौरववंश.
कुरुगुरु-कौरवांचागुरु-द्रोणाचार्य.
कुलज-कुलीन.
कुलाल-कुंभार.
कुलिश-वज्र.
कुलिशपाणि-इंद्र.
कुवलय-चंद्रविकासी कमळ. २ भूमंडळ
कुश-दर्भाची एकजात आहे
कुशली-खुशाल.
कुशस्थली-द्वारकापुरी.
कुश्चल-कुत्सित.
कुसरी-चतुराई.
कुसुम-फूल.
कुसुमचाप-मदन.
कुहु-आमावास्या.
कुळपति-कुळपुरुष,कुलांतील-मुख्य

कुक्षि-कूस.
कूट-पश्चात् निंदा.
कूप-आड.
कूर्पर-कोंपर.
कृतांत-यम.
कृतांतभगिनी-यमुना नदी.
कृतार्थ-धन्य.
कृत्तिवास-कातडें धारण करणारा, शिव.
कृत्या-पिशाची.
कृप-कृपाचार्य-द्रोणाच्या बायकोचा भाऊ.
कृशान-अग्नि.
कृशोदरी-सिंहकटी स्त्री.
कृष्णा-द्रौपदी. २ यमुना.
कें-काय.
केउतीं-कशीं.
केउती-कोणती.
केउतें-कशाचें.
केका-मयूरशब्द.
केकी-मयूर.
केणें-व्यापाराचा माल.
केतु-ध्वज.
केली-क्रीडा.
केवि-कसें.
केविलवाणें-दीनवाणें.
केसर-कमळतंतु, केशर.
केसरी-सिंह.
कें-केव्हां.
कैठभारी-कैठभासुरहंता-विष्णु.
कैरविणी-चंद्रविकासी कमळ.
कैवल्य-मोक्ष.
कैवल्यदानी-मोक्षदाता.
कोकशाळा-कसबीण.
कोड-कौतुक, हौस.
कोडी-कोटी.
कोडें-कौतुकानें.
कोढी-कोटी.
कोंदाटलें-दाटलें, भरलें.
कोंभ ⎫ -अंकुर, मोड.
कोंब ⎭
कोमेला-निस्तेज झाला.
कोयाळ-कोकिळ.
कोष्ठ-उदर.
कौपीन-लंगोटी.
कौशिक विश्वामित्र.
कौलिक-मांत्रिक.
क्रोष्ठा-कोल्हा.
क्लीब-नपुंसक.

## ख.

ख-आकाश.
खग-पक्षी.
खगगमन-गरुडवाहन-विष्णु.
खगेंद्र-गरुड.
खचरी-राक्षसी.
खंजन-एक पक्षी आहे, ताजवा-पक्षी.
खडतर-उग्र.
खडतरला-आदळला, खोंचला.
खंडज्ञान-अल्पज्ञान.
खत-पत्र.
खंत ⎫ -खेद, काळजीनें झुरणें.
खंती ⎭
खद्योत-काजवा.
खनि-खाण.
खंबाइत-उंचीवस्त्र.
खर-तीक्ष्ण.२गाढव.३एक राक्षस.

खाजुगें-खाद्य, खाऊ.
खाजें-खाद्य.
खांडा-एके प्रकारची तरवार; हिचें पातें रुंद असून दोहोंकडे धार असत्ये.
खाडाय्यों-लाथाळ,गाईस.
खांडावया-तोडावया.
खांडियाची-शस्त्राची
खाणी-खाण. जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिद ह्मा चार खाणी आहेत.
खिजविणें-कोपविणें, चिडविणें.
खुर्द-लहान, अल्प.
खेटक-ढाल.
खेव } -आलिंगन
खेवो }

ग.

गगन-आकाश.
गगनग-आकाशसंचारी-देव.
गगनवाणी-आकाश वाणी.
गजगमा-गजगामीनी-स्त्री.
गजपुर-हस्तिनापूर.
गजबज-गडबड.
गणप-गणपति.
गंड-अनिष्ट, संकट.
गत-गेलेले.
गततंद्र-ज्याचा आळस गेला आहे तो.
गतवयस्क-म्हातारा, वृद्ध.
गदारोळी-मोठ्यानें.
गदीश } -गदा युद्धांत निष्णात.
गदीन }
गद्य-वाक्यरूप ग्रंथ.
गभस्ति-सूर्य.
गभीर-गंभीर,खोल.
गर } -विष.
गरल }
गरगल-विषकंठ-शिव.
गरिमा-मोठेपणा.
गरी } -श्रेष्ठ.
गुर्वी }
गरीबनवाज-दीनरक्षक.
गुरुद्रथ-गरुडपक्षी.
गल्ल-गाल.
गवसणी-आच्छादन, आवरण.
गव्हर-गुहा, गुह्य, मर्म, तत्व.
गवादि-धर्मपोवई, अन्नसत्र.
गवाक्ष-धारें, झरोका.
गहन-अरण्य. २ खोल.
गळदंड-हत्तीच्या मानेवरून रिकिबीप्रमाणें चढण्यासाठीं सोडलेली दोरी.किलावा.
गांग-गंगेचें.
गांगेय-गंगेचा पुत्र-भीष्म.
गांजणें-छळणें.
गाजी-शूर.
गांठीचें-पदरचें.
गांडीव-अर्जुनाचें धनुष्य.
गाढ-दृढ.
गात्र-शरीर.
गांधर्व-स्त्री पुरुषांचा परस्पर प्रीतीनें विवाह, २ गंधर्वांचें.
गांधार-शकुनि.
गाधिज-विश्वामित्र.
गाबाळ-निरुपयोगि फुटकळ ग्रंथ.
गाभिणी-सगर्भा,गाभण.२गर्भ,गाभें.
गायन-गाणें. २ गाणारा.
गाली-शिव्या.
गांव-योजन, ४ कोस.
गावलगणी-संजयाचें दुसरें नांव.

गाळितिया-गाळण्याचे वस्त्रांत.
गिरा-वाणी, वाक्य.
गिरिश-सदाशिव.
गिवसणें-मिळवणें.
गिवसीत-सांपडत.
गी-वाणी, सरस्वती.
गीत-गाणें.
गीर्वाण-देव. २ संस्कृत भाषा.
गीर्वाणी-संस्कृत भाषा.
गुज-गुह्य.
गुडाकेश-अर्जुन.
गुंडून-गुंडाळून.
गुण-दोरी.
गुणगुणी-हळूहळू फुटफुटे
गुरु-१बाप. २ वडील. ३ उपदेष्टा. ४ जड, ५ मोठा.
गुह-कार्तिकस्वामी.
गुज-गुह्य. २ अनिर्वेद्य.
गृध्र-गिधाड.
गृहसंमार्जन--घरांतील सडा सारवण.
गेह-घर.
गे-हयगय.
गोठण-गोठा.
गोठी-गोष्ट.
गोत्र-पर्वत. २ वंश.
गोधन-गाईचा समुदाय.
गोपायिता-रक्षण कर्ता.
गोपुर-शहरचा दरवाजा. २शहरच्या किंवा देवळाच्या किंवा राजवाड्याच्या दरवाज्यावर बांधलेली उंच इमारत.
गोमटें-सुंदर, चांगलें, प्रिय.
गोरोचन-गाईच्या डोक्यांतलें पीत द्रव्य.
गोवा } -गुंता.
गोवी }
गोविला-गुंतविला.
गोही-साक्ष.
गोहो-नवरा.
ग्रामहरी-कुतरा.
ग्रास-घास.
ग्रीवा-मान, गळा.
ग्लह-पण, डाव.
ग्वाही-साक्षी.

## घ.

घटना-घडवून आणण्याचा तजबीज-योजना.
घटा-हत्ती किंवा मेघ यांचा समुदाय. २ जाड आणि घट्ट कातडें.
घडणी-हिशोब लिहिण्याचा प्रकार.
घडी-१ घट. २ घागर. ३ घटका. ४ मोड. ५ जम, मेळ, जवा.
घनघटा-मेघसमुदाय.
घनदाट-गच्च भरलेला.
घनरस-१ कापूर. २ उदक.
घनवटा-घनदाट.
घनसार-१चंदन. २ कापूर
घरघेणा-घरबुडव्या.
घरघेणी-घरबुडवी.
घरटा-स्थान.
घोप-पोंहचें.
घामेजेना-श्रांत होईना.
घांस-गवत.
घूर्णिका-दासी.
घृत-तूप.
घेयिजेना-घेईना.

घोटक-घोडा.
घोटी-गिळी.
घोटूं-गिळायास.
घोर-क्रूर, भयंकर.
घोष-१ शब्द. २ गोठा. ३ गौळ-
कडा.
घ्राण-नाक.

च.

चकित-भ्यालेला.
चकोर-पक्षि विशेष.हा चंद्रकि-
रणावर उपजीवन पावतो
अशी प्रसिद्धि आहे.
चक्र-चक्रवाक पक्षी.
चक्रवर्ती-सार्वभौमराजा.
चक्रवाल-मंडल, वर्तुल.
चक्रव्यूह-सैन्याची चक्राकार र-
चना.
चखोट-चांगला.
चंचू-चोंच.
चटक-चिमणी.
चंडांशु-सूर्य.
चणक-हरबरे.
चतुरानन-ब्रह्मदेव.
चतुर्दश-चवदा.
चतुष्षष्टि-चौसष्ट.
चंद्रमौळी-महादेव.
चंद्रशाळा-सर्वांहून उंचमाडी.
चपला-वीज.
चपेटे-वेग.
चमू-सैन्य.
चर्म-१ ढाल. २ कातडें.
चरण-पाय.
चराचर-स्थावर जंगम सृष्टि.
चवडा-रुंद.

चवर-चवरी.
चवी-बऱ्या वाइटाची परीक्षा,
गोडी.
चषक-पानपात्र.
चळथ-रास, चवड.
चाकाटला-थक्क जाला. चकित
झाला.
चांग-चांगला.
चांगुणा-श्रियाळराजाची स्त्री.
चाचरणें-अडखळणें.
चांचूवरी-चोंचेंत.
चाड-आवड.
चाप-धनुष्य.
चामर-चंवरी.
चामीकर-सुवर्ण, सोनें.
चारदेह-१स्थूळदेह. २ सूक्ष्मदेह.
३ कारणदेह. ४ लिंगदेह.
चावळे-बडबडे.
चाळूं-हालवूं
चिकित्सा-रोगाची परीक्षा. २ रो-
गाचें निराकरण.
चित-ज्ञान.
चित्तचतुष्टय-मन, बुद्धि, चित्त,
आणि अहंकार.
चीर-वस्त्र.
चुकूर-चकित.
चुरीत-दाबीत.
चूडामणि-शिरोरत्न
चेइरें-जागृति.
चेतना-जीवित्व, चलन लवन.
चेतवे-खवळे.
चेल }
चैल } -वस्त्र.
चेववी }
चेष्टवी } -सचेतन करी, जीववी.

चोख-चांगला. २ शुद्ध निवडून काढल्या.
चोखाळपण-चाखपण.
चोखाळिल्या-शुद्ध केल्या.
चोजे-कौतुक.
चोजवविली-चोळली, माखिली.
चोगुणीनें-चौपटीनें.
चौसांचा-चारवेद आणि साहा शास्त्रें यांचा.
चोहट-चव्हाटा.

छ.

छंद-वृत्त. २ नाद, चट.
छद्म-कपट.
छायानायक-सूर्य.
छायापुरुष-सांवली व पुरुष.
छावा-हत्तीचा बालक.

ज.

जइं-जेव्हां.
जगढाल-ध्वज, झेंडा.
जंगम-मनुष्य, पशुपक्षी, इ०
जघन्य-नीच, कनिष्ठ.
जंघाळ-उंच. २ वेगवान.
जंघी-जंघावंत. २ त्वरितगति.
जटी-जटायुक्त, तपस्वी.
जडभारी-संकट.
जथिलें-जमविलें, सांचविलें.
जनक-बाप. २ एक राजा.
जनकतनया-सीता
जनपद-देश.
जन्मदा-आई.
जनिता-बाप.
जनु-जन्म.
जन्हुकन्या-भागीर
जंबीर-ईडनिंबं.
जयंती-जिंकणारी.
जरठ-म्हातारा.
जरा-म्हातारपण.
जलचर-मत्स्य वगैरे पाण्यांतील प्राणी.
जलाशय-सरोवर, तळें, डोहं.
जल्पना-बडबड.
जवन-वेगवान.
जळ-पाणी.
जळदजाल / जलदजाल -मेघ मंडळ.
जळपानें-आगीनें.
जाइजणें-नाशवंत.
जाच-गांजणूक.
जाची-पीडी.
जाजावती-बोलती, बडबडती.
जाण-जाणणार.
जागवलें-समजलें.
जाणीव-ज्ञान-आत्मज्ञान.
जाति-जाईची वेल.
जान्हवी-भागीरथी.
जानु-गुडघा.
जाया-बायको.
जायीजिणें-नाशवंत.
जिणें-वांचणें, जीवन.
जितावें / जिणावें -जिंकावें.
जितेंद्रिय-ज्यांनी इंद्रियांचें दमन केलें ते.
जिवलग-प्राणप्रिय.
जिव्हार-मर्मस्थान.
जिष्णु-इंद्र. २ विष्णु. ३ अर्जुन. ४ जयशील.
जीन-जीर्ण. २ म्हातारा.
जीमूत-मेघ.

जीव-प्राण. २बृहस्पति.
जीवखाणी-जीवयोनि.
जीवनं-वांचणें २ पाणी.
जीवविलें-वांचविलें.
जुनाट-प्राचीन.
जेविं-जेवीं-जसें, २ जेव्हां.
जेधवां-जेव्हां.
जैं-जेव्हां.
जोगी-गोसावी.
जोपा-पालन, रक्षण, जतन.
जोहारी-रत्नपारखी.
जौंजार-त्रास, कंटाळा.
ज्या-धनुष्याची दोरी.
ज्येष्ठ-वडील, मोठा.
ज्योतिर्विद्-ज्योतिषी.
ज्योत्स्ना-चांदणें.
ज्वलन-अग्नि.

झ.

झकवितां-फसवितां.
झगडा-युद्ध.
झटिति-लवकर, लागलेंच.
झडपणी-निरसन.
झणी-सत्वर.२एकाएकी.३नजाणो कदाचित.
झळंबला-चिकटला.
झांकोळला-व्यापला.
झाडा-झडती २ निरास. २
झुंजार-योद्धा.
झेला-झुपका.
झोंटधरणी-केशधरणी.
झोंटी-डोईचे लांब केश.
झोडा-दांडग्या, निलाजऱ्या.

ट.

टकमक-चकितपणा२चकितपणानें
टकळा-छंद, ध्यास.
टाकाटाकी-त्वरेनें.
टांचराच्यां-टांचेच्या.
टोणपा-लाकडाचा ठोकळा२मूर्ख.
टोप-मुकुट.

ठ.

ठसावे-ठसे.
ठाणमाण-शरीराचा बांधा.
ठाय-ठिकाण, स्थान.
ठायींपाडी-थांग लावी.
ठाव-स्थान-ठिकाण.
ठेला-राहिला २ उभाराहिला.
ठेली-कुंठित झाली२उभीराहिली.

ड.

डाई-डाव, सरसी, वर्चस्व.
डांगें-झाडी.
डोर-झगा.
डोरला-झांकला.

ढ.

ढक्का-डमरु.
ढाळ-उतार.
ढाळिते-वारिते, हालविते.
ढाळिसी-टाकिसी.
ढाळी-ओती.

त.

तई-तेव्हां.
तगटे-झटे.
तटाकीं-तळ्यांत.
तडके-पेडे, फुटे.
तडाग-तळें.
तडीतापडी-गोसावी, बैरागी.
तंतू-सूत्र २ वात.
तत्पद-ब्रह्मज्ञापक शब्द.
तत्वतां-खरेपणानें निश्चयें.

तपन-सूर्य.
तम-अंधःकार
तमोहर-सूर्य
तरंडक-नौका.
तरणि-सूर्य.
तराजे-तागडीनें.
तरी-नौका.
तर्णक-वत्स.
तवक-क्रोध, उकळी.
तहशील-वसूलपट्टी.
तळपणें-चमकणें.
तळपट-सत्यानास.
तळवट-खालचाप्रदेश.
तक्षक-सर्पविशेष.
तात-बाप.
तांतडी-त्वरेनें.
तादात्म्य-ऐक्य.
तापणें-शेकणें.
तामरस-कमळ.
तामरसाक्ष-कमलाक्ष.
तारुवें } -नौका, जहाज.
तारू }
ताळीचीताळ-ताडाचावृक्ष.
तितिक्षा-क्षमा, शांति.
तिमिर-अंधःकार.
तिवाशी-तक्या, २ गिरदी, ३ गादी.
तीन उपद्रवाचे मेळावे-आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक.
तुकंविणें-हालविणें.
तुकीं-पारड्यांत, २ कसोटीस
तुंग-उच्च.
तुझेनी-तुझ्यानें.
तुंबळ-अतिशयित, फार.
तुंबळे-दाटे, भरे.
तुरगी-घोडी.
तुरंबणें-हुंगणें.
तुला-साम्य.
तुळ्य-कापूस.
तुळितां-तोलून पाहतां.
तुळी-हालवी.
तूण } -भाता.
तूणीर }
तूळ-कापूस.
तेजाळ-तेजस्वी.
तेजी-घोडा.
तेजोनिधि-सूर्य.
तेविं } -तसें, २ तेव्हां.
तेवीं }
तें-तेव्हां.
तोक-बाळक.
तोख-संतोष.
तोडर-तोरडी, पाद भूषण.
तोय-पाणी.
त्रपाकंचुक-लज्जाकवच.
त्राहाटिल्या-सिद्धकेल्या, २ वाजविल्या.
त्रितय-तीन पदार्थांचा समुदाय.
त्रिदश-देव.
त्रिपदशोध-'तें, तूं, आहेस' या तीन पदांचा शोध.
त्रिपाद-अग्नि.
त्रिपुटी-कर्ता, क्रिया, कर्म.
त्रिवाचा-सत्य, सत्य; खरेंच.
त्रिशुद्धि-त्रिवारशुद्धि, २ त्रिपद शोध. ३ निश्चयें.
त्वंपद-जीवज्ञापक शब्द

## थ.

थडी-कड, तीर.
थाटी-समुदाय.

थार-थारा, आश्रय.
थिटें-अपें, लहान.
थोकडें-थोडें.
थोरावे-वाढे.
थोरीव-मोठेपणा.

द.

दचक-धाक.
दंदशूक-सर्प.
दंदिया-योद्धा.
दभ्र-अल्प.
दंपती-मेहुण, नवरा बायको.
दमयंती-गर्वहरण करणारी, २ नळस्त्री.
दमुनी-नाशुनी.
दयाळ-दयाळू.
दयित-प्रिय.
दर-शंख, २ भय, ३ ईषत, थोडें.
दरिद्र-दरिद्री.
दरी-गुहा.
दर्वी-पळी.
दर्वीकर-सर्प.
दर्शनें-षडदर्शनें, साहा शास्त्रें.
दव-दावानळ, वणवा, २ वन, अरण्य.
दवस्थ-वणव्यांत सांपडलेला.
दशकंधर-दशकंठ, रावण.
दशन-दांत.
दशशतमुखांग-शेषाचादेह.
दशस्यंदन-दशरथ.
दशानन-रावण.
दंष्ट्रा-दाढ.
दस्र-अश्विनी कुमार.
दसोडी-दशी.
दळ-सैन्य.
दळवाडें-जाडपणा, २ आंग.
दक्षकरें-दक्षिण हस्तें, उजव्या हातें.
दक्षिण-उजवा, २ दक्षिण दिशा.
दाटणी-निबिडता, दाटी.
दादुला-नवरा.
दान्त-इंद्रियदमन करणारा.
दापी-दावी, धमकावी.
दाम-पुष्पमाला, २ दावें.
दामोदर-कृष्ण.
दाय-पितृधन, २ वांटा.
दारा-स्त्री, बायको.
दारु-काष्ठ.
दारुक-कृष्णाचा सारथी.
दारुण-क्रूर, कठिण, भयंकर.
दाव-दावानळ, वणवा, २ वन, अरण्य.
दावार्त-वणव्यानें पीडित.
दिठा-दृष्टि, दर्शन.
दिठि } -दृष्टि.
दिठिवा }
दिठीं-दृष्टीनें, दृष्टीस.
दिनराज-सूर्य.
दिव्य-स्वर्गांतील सुंदर.
दिव्यरस-अमृत.
दीप्ति-प्रकाश, कांति, तेज.
दुखंड-दुभंग.
दुग्धसार-तूप.
दुग्धोदधि-क्षीर समुद्र.
दुधिया-पांढरा भोंपळा.
दुबळा-दरिद्री, २ अशक्त.
दुभणी-दोहन, दोह.
दुभे-प्रसवे.
दुराप-प्राप्तहोण्यास कठिण.
दुरित-पातक.
दुरुक्ति-दुर्भाषण.

दुर्गा-पार्वती.
दुर्निवार-वारणकरण्यास अशक्य.
दुर्हृद-दुष्ट.
दुर्वह-धारण करण्यास अशक्य.
दुष्कर-करायास कठिण.
दुहणें-दूध काढणें.
दुहिता-कन्या. २ सून.
दूती-सुवास, सुगंध.
दून-दुःखित, तप्त.
दूरशी-रजस्वला.
देवगर्भ-देवतुल्य.
देवतटिनी-भागीरथी.
देवदत्त-अर्जुनाच्या शंखाचें नांव.
देवर-दीर.
देवराज-इंद्र.
देवलसी-देवळांतराहणारा. साधु.
देवव्रत-भीष्म.
देवाद्य-महादेव.
देवांगना-देवांच्या स्त्रिया.
देवापगा-गंगा.
देवी-देवांगना, २ राजाची पत्नी, राणी.
देवेंद्र-इंद्र.
देशधडी-देशांतर.
देशिक-गुरु.
देसवटा-स्थान, प्रदेश.
देहअभिमान-देहाभिमान.
देहांतर-अन्य देह.
देहुडी-चौकी.
देव्हारें-देवालय.
दैन्यवाणा-बापुडा.
दैवहत, दैवहतक-दुर्दैवी, करंटा.
द्युति-कांति.
द्युमणि-सूर्य.
द्रौणि-द्रोणपुत्र, अश्वत्थामा.
द्वंद्वयुद्ध-कुस्ती.
द्वंद्वें-सुखदुःखादि युग्में.
द्वारावती-द्वारका.
द्विज-दंत, २ ब्राम्हण. ३ पक्षी.
द्विजराज-चंद्र.
द्विप-गज, हत्ती.
द्वैपायन-व्यास.

## ध.

धडाडीत-जळत.
धणी-लाभ, तृप्ति, वैपुल्य.
धत्तूर-धोतरा.
धन-आनंद, संतोष, २ द्रव्य.
धनद-कुबेर.
धनंजय-अर्जुन, २ अग्नि.
धन्व-धनुष्य.
धन्वी-धनुष्य धारण करणारा.
धमनी-फुंकणी, २ शीर.
धर-पर्वत.
धरणी, धरा-पृथ्वी.
धराधीश-राजा.
धरारमण-पृथ्वीपति, राजा.
धवल-शुभ्र, पांढरें.
धवलारें-घरें.
धवळणें-शुभ्रकरणें.
धाटी-रीत, प्रकार.
धात्री-पृथ्वी, २ दायी, ३ उत्पत्तिस्थान.
धाम-घर, २ तेज.
धाय-तृप्त होय, २ धाक.
धारा-लहान.
धारें-कमी, २ धुराडें.
धाले-तृप्त झाले.

धांवणें-पाठलाग करणारे लोक.
धावें-तृप्त व्हावें.
धिसा / धिवसा -उत्कंठा, धैर्य, हव्यास.
धा-
धुरेसमोर-अग्रभागीं.
धूर्जटी-महादेव.
धृति-धैर्य.
धौम्य-पांडवांचा उपाध्याय.

न.

नई-नदी.
नक्र-सुसर.
नग-पर्वत. २ भूषण. ३ वृक्ष.
नघटे-नघडे.
नघावे-नपावे.
नटले-सिद्ध झाले.
नति-नमस्कार.
नंदिनी-कन्या, मुलगी.
नभोवाणी-आकाश वाणी.
नमनी-नमानी.
नय-न्याय.
नर-मनुष्य, २ अर्जुन, ३ एक ऋषी.
नरसिंह / नरेंद्र -राजा.
नर्तक-नाचणारा.
नलद-वाळा.
नव-नऊ.
नव / नवा -नवीन, २ तरणा.
नवचे-नजाई.
नवनीत-लोणी.
नवाई-गोडी, कौतुक.
नवाजूं-वर्णू.
नवाळी-कौतुक, गोडी.
नवोढा-नववधु, नवरी.
नसूये-न ओढवे, पुढें न सरे.
नहुष-ययाति राजाचा पिता.
नाक-स्वर्ग,
नाकेश-इंद्र.
नाग-हत्ती.
नागवती-मुकती.
नागवे-मुके, २ नावडे.
नाटकशाला-कलावंतिणी.
नाट्य-नृत्य.
नातरीं-किंवा, अथवा.
नातळती-नस्पर्शती.
नातुडसी-न प्राप्त होसी.
नातुंड-नातवंड.
नातुडे-नाटोपे. २ न मिळे.
नाथिला-व्यापला. २ खोटा, जो नाहीं तो.
नाथिलें-जें नाहीं तें. २ व्यापलें, नसतां आलें. ३ किंवा केलें.
नानादर्शनें-षड्दर्शनें.
नाराच-बाण.
नावेक-अंमळ, क्षणभर.
नाहूत-न बोलावलेला.
नाहो-नवरा, पति.
निकट-जवळ.
निकर-समुदाय.
निकष निसाण / निकष पाषाण -कसोटीचा दगड.
निकाश-सदृश.
निकें-खरें.
निखंदी-झिटकारी, धिसपिटावी.
निखंदून-कठोरपणें, टाकून, खडकावून.
निर्गादिलें-बोलिजेलें.
निगम-वेद.

निगुती-निश्चयें.
निग्रह-निश्चयें, २ आटकाव.
निजनिष्टंकें-निश्चयें.
निजपद-आत्मपद.
निजबोध-आत्मज्ञान.
निटिल-कपाळ.
निटिलशेष-कपाळ भाग.
निडळीं-कपाळीं.
निडारीं-दृष्टींत.
नितंबिनी-स्त्री.
निदती-बेणती.
निदाघ-उष्णतां.
निदान-कारण, २ शेवट.
निदिध्यास-ध्यान.
निदेला-निद्रित.
निधडा-धैर्याचा.
निधडें-अभेद्य.
निधान-ठेव, निक्षेप.
निधि-ठेवा.
निधोट-परिपूर्ण. २ एकरूप. ३ धीट.
निपट-केवळ.
निंबलोण-कुरवंडी, दृष्ट काढण्याचें साधन.
निमग्न-बुडालेला, गढलेला, तत्पर.
निमाला-संपला.
निरखीं-पाहें.
निरंजन-निष्कलंक, निरुपाधिक, परमेश्वर.
निरपत्रप-निर्लज्ज.
निरय-नरक.
निरवा-स्वाधीन करा.
निरवावें-स्वाधीन करावें.
निरसतां-नष्ट होतां..
निरुतें-स्पष्ट.
निरुपचार-उपचार हीन.
निरुपाधि-उपाधि शून्य.
निरें-शुद्ध, निर्भेळ.
निरोध-अडकाव.
निरोपी-सांगे.
निर्जर-देव.
निर्दळणें-नाश करणें.
निर्धारीं-निश्चयें, खचित.
निर्धूत-निःशेष.
निर्भर्त्सना-धिःकार, निंदा.
निर्भर-पूर्ण.
निर्वाण-अंत, समाप्ति.
निर्वाणीं-संकटसमयीं.
निर्विकल्प-अव्यभिचरित.
निलय-घर, स्थान.
निवटला-मरोण झाला २ टाकला.
निवटिलें-नाशिलें.
निवटी-नाशकरी, दूरसारी, मारी.
निवणें-भांडें मडकें वगैरे डळमळूं नयेम्हणून त्या खालीं जें ठेविलें असतें तें.
निवाड-निर्णय, निकाल
निवाडा-न्याय.
निवाडें-निश्चयें.
निवास-स्थान.
निवृत्ति-मुक्ति.
निशाणीं-घाव घालणें-जिंकणें.
निःशेष-निखालस, निःसंशय.
निष्क-पदक, अलंकार.
निष्कल-एकरूप.
निस्पृह-निरिछ.
निस्व-निर्धन.
निःसारया-दूर कराया.
नीर-पाणी.

